मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या
इतिहास संशोधन मंडळाची ग्रंथमाला, क्र. १०

# महाराष्ट्रेतिहासाची साधनें

## विभाग दुसरा



संपादक—
श्री. वा. सी. बेंद्रे,
डायरेक्टर इतिहास संशोधन मंडळ.

'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळा'नें पुरस्कार दिलेलें

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या
इतिहास संशोधन मंडळाची ग्रंथमाला, क्र. १०

जुन्या मासिकत्रैमासिकांत प्रसिद्ध झालेलीं

# महाराष्ट्रेतिहासाची साधनें

– विभाग दुसरा –

[इ. स. १५०१ ते १७५०]




संपादक :

श्री. वा. सी. बेंद्रे

डायरेक्टर, इतिहास संशोधन मंडळ.

१९६६

संपादक :

श्री. वा. सी. बेंद्रे,
डायरेक्टर, इतिहास संशोधन मंडळ

आवृत्ति पहिली, मार्च १९६६.

किंमत : २० रुपये



प्रती : १०००

मुद्रक :

श्री. पु. गो. पाटील,
व्यवस्थापक, सत्कार प्रिंटींग प्रेस,
१२१२, टिळक रस्ता, अलिबाग, जिल्हा कुलाबा.

प्रकाशक :

श्री. वा. वि. भट,
प्रमुख कार्यवाह, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय,
१७२, नायगांव क्रॉस रोड, दादर, मुंबई–१४.

# निवेदन

जुनीं मासिकें, त्रैमासिकें वगैरेंतील ऐतिहासिक साधनें आतां संदर्भार्थ वापरूं म्हटलें तर दुरापास्त झालें आहे. कांहीं मासिकें सध्यां इतस्ततः तरी मिळूं शकतात. परंतु तींहि कालांतरानें उपलब्ध राहतीलच असें नाहीं. मात्र पूर्वीं मासिकें त्रैमासिकें यांतूनच विशेषतः ऐतिहासिक साधनें व लेख प्रकाशित होत असल्यानें हीं महत्त्वाचीं साधनें त्या मासिका–त्रैमासिकांबरोबर इतिहासाभ्यासास अंतरत आहेत. जीं ऐतिहासिक कागदपत्रें प्रसिद्ध केलीं गेलीं त्यांची मूळ अस्सल हस्तलिखितेंहि त्या त्या लेखकाबरोबर अस्तंगत झालीं आहेत असें म्हटले तरी चालेल. अशा परिस्थितींत हीं महत्त्वाचीं साधनें मिळतील तितकीं एकत्र करून प्रसिद्ध करण्याचा इतिहास संशोधन मंडळानें संकल्प केला व या कामास सुरुवात केली. जवळ जवळ चारशें नियतकालिके पाहिलीं. या सर्वांचे सर्व अंक मिळाले असें नाहीं. शिवाय इ. स. १९२५ नंतरच्या मासिकांतून पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेल्या साधनग्रंथांतून घेतलेल्या कागदपत्रांचा भरणा अधिक असल्याचें आढळून आलें. त्यामुळें त्यांतील ग्रंथरूपांत पुनर्मुद्रित झालेलीं कागदपत्रें वगळून शिलकी संग्रह प्रसिध्यर्थ तयार करावयाचा तर तें काम अधिक मेहनतीचें असल्यानें, तो शोधाचा भाग मागें राखला. जुन्या मासिकें वगैरे नियतकालिकांतून आलेल्या कागदपत्रांवाच यांत समावेश केलेला आहे. वृत्तपत्रांतील कागदपत्रें यांत आलेली नाहींत. त्याकरितां दुसरा असाच मोठा साधनग्रंथ तयार करावा लागेल. ज्या मासिकत्रैमासिकांच्या अंकांची पहाणी केली त्या बाबत सर्व माहिती पहिल्या विभागांत येणार आहे. आमच्या सुरूवातीच्या अंदाजाप्रमाणें असा संग्रह– ' ऐतिहासिक कागदपत्रांच्या संग्रहां 'तील कागदपत्रें सोडलीं तर– फार तर हजार-बाराशें पृष्ठांत सहज सामावता येईल असें होतें. परंतु तो अंदाज चुकीचा ठरला. निरनिराळया ठिकाणीं जुनीं नियतकालिकें उपलब्ध होऊं लागली. इतकेंच काय पण पुष्कळ वैज्ञानिक नियतकलिकांतहि असलीं साधनें क्वचित आढळूं लागली. तेव्हां प्रथम हा हजारावरील साधनांचा एक संग्रह तीन भागांत छापण्याचें ठरविलें आणि राहिलेली साधनें नंतर दुसरा साधनसंग्रह म्हणून तयार करण्याचें ठरवून हा तयार झालेला संग्रह प्रथम प्रकाशित करीत आहोत.

ह्या दुसऱ्या विभागांत इ. स. १५०१ ते १७५० पर्यंतचा म्हणजे शाहू महाराजांच्या मृत्युपर्यंतचा कालखंड आला आहे. तिसऱ्या विभागांत त्यानंतरचा म्हणजे इ. स. १७५१ ते १८५८ पर्यंतचा पत्रव्यवहार येणार आहे. हा तिसरा खंडहि बराच छापून झाला आहे. लौकरच प्रसिद्ध होईल. त्यानंतर प्रथमखंड छापावयास घेतला जाईल. या प्रथम खंडांत प्रस्तावना, वापरलेल्या मासिक–त्रैमासिक वगैरेंची सूचि, निवडक ऐतिहासिक महत्त्वाच्या स्थलांची व व्यक्तींची सूचि, वंशवेली–हकीकती–याद्या, शकावल्या, मेस्तकें यासारखीं साधनें, आणि शेवटीं इ. स. १५०० पर्यंतचे मराठी ताम्रपट वगैरे येतील. तोहि विभाग याच विभागासारखा मोठा होईल. तो

विभाग संदर्भार्थ लागणाऱ्या माहितीचा असल्यानें त्याची पूर्णता हे दोन्ही साधनग्रंथ छापून तयार झाल्याविना होऊं शकत नाहीं. अभ्यासूंना साहजिकच हा संदर्भ ग्रंथ मिळण्यास थोडे थांबावें लागेल. परंतु कागदपत्रांची मांडणी कालानुक्रमानें केली असल्यानें, पहिल्या खंडाच्या अभावींहि हा साधनखंड उपयुक्त ठरेल यांत शंका नाहीं. पहिला खंड निघाल्यावर संदर्भाचें कार्य सुलभ होईल इतकेंच.

आजच्या छपाईच्या महर्गतेच्या काळांत एवढा मोठा ग्रंथ छापून काढणें कठीणच झालें असतें. हा ग्रंथ केवळ इतिहासाभ्यासू व लेखक यांच्याच 'संदर्भ' म्हणून उपयोगाचा असल्यानें या ग्रंथाच्या विक्रीपासून कांहीं विशेष प्राप्ती होऊन खर्च भागेल असेंहि नाहीं. परंतु ही मोठी अडचण महाराष्ट्र राज्याच्या 'साहित्य आणि संस्कृति मंडळ' यांच्या रु. ९९७५ च्या अनुदानानें बऱ्याच प्रमाणांत दूर झाली. हें अनुदान मिळालें नसतें तर हा ग्रंथ तयार करण्याची कल्पना मूळांतच सोडून देणें भाग पडलें असते. परंतु उपरनिर्दिष्ट अनुदान मिळण्याचा संभव वाटतांच हे काम हातीं घेतां आलें. अर्थात मंडळाच्या या उदार साह्याबद्दल आमचें इतिहास संशोधन मंडळ त्यांचे ऋणी आहे.

१७२, नायगांव क्रॉस रोड,
दादर, मुंबई–१४.

**वा. सी. बेंद्रे,**
डायरेक्टर, इतिहास संशोधन मंडळ

जुन्या मासिकत्रैमासिकांत

प्रसिद्ध झालेलीं

# महाराष्ट्रेतिहासाची साधनें

## विभाग दुसरा

२६ सप्तेंबर १५०७ ]　　　( – १ – )　　　[ आश्विन वद्य ५
शके १४२९

( फारशी दोन ओळी )

साक्षी कामाक्षा तथा हानुमानू [ नांगराचें चिन्ह ]

॥ छ श्री स्वस्ति श्री साकु १४२९ वरीखे परभा वछेरे आस्विनु वादि पचमी आद्यातवारु तेया दिवसी करुवे थाल देको पाटैलु बीन इनाएकु पाटैलु वा खेळो पाटैलु वा नेगो पाटैलु बीगकरु वा वाटगुडी पिसळ वा साईदे पाटैलु वा तुकतेऊ वा रामीदेऊ वा सोनुगुडी वाडिका वाडिगागुडी पु... हे मुख्य करुनु सामास्ता पाटैलु गिजरेया भानाभट गोविदभटें सी वींतीपत्र जोतिक आमचे गांवी ची जैसी पूर्वी आमाचां वडिले तुम्हा सी दिल्ही होती तैसी ची आम्ही दिल्ही ते तुवा आपुळी-( या ) लेकुराच्या लेंकुरी चालावीजे हे आमा ची सत्या हेया बोला मि आन्यथा नाही

गोही

कोनोजी मरारजी चोरडे　　　एकोजी केसोजी साळीवा सा निगुडी
मादा उदोबा सेटी करुवे　　　पा सातारे
मायी नाईक करुवे　　　पुरखादेऊ मोईगुडी सा करुवे
लाक्ष्मण बाळो सुतारु करुव　　　बाबू डोईगुडू तारळू करुवे
भाई सेटी याई सेटी सोनारु कारुवे　　　माळ दुदुर्मी सेटी मेहतरी कारुवे
राघो तुकदेऊ पा सेडे तळघाट्

खंडो पीलदेऊ कुळकर्णी रामरामे नगरकुलकर्णी का कॅऱ्हाड सही
मालिक चंदन साहेबु हवल करुवे
गुडे अंतोबा निसिंदा कारूवे
लिखिते मोनाबा राघोबा
कुळकरणी कारुवे

पत्राप्रमाणें साक्ष्य अतो लाहीदेऊ

[ फारसी शिक्का ]

भा. इ. सं. मं. तृतीय संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. १२, पृ. १३.

९ ऑगष्ट १५२९ ]　　　( – २ – ) [( भाद्रपद शुद्ध ) ५ सोमवार
[ ताम्रपट ]　　　शके १४५२, इहिदे, जिल्काद ३

पत्रा १ बाजू १

समापत्र वीकृत नाम संवतसरे श्रीसके
१४५२ सूरसन ईहीदे माहे जीलकाद[1] ती-

---

१. हिंदु महिना न देतां हिजरी महिना दिला आहे.

थ पचमी सोमवार पुनरवस नक्षत्र घ-
टीका ४८ पळे ४२ सोमे घटीका ३७ पले
४८ शुळयोग घटीका २८ पलें ४५ तत्का-
ळ वब करने तेरीछ ३ ते दीवसी आम्ही
भाऊ चौघे जन बसोन वीचार केला जे
कृस्णानदी व देवद्वार खडकेस्वर व
मौजे खेडकी ते जागा बोलने केल जे भी-
का परीटाने पाटीलकी आपली चोरडे
यास नीभे देऊन पाटील केला. आपना-
स परगदा केले. चोरडे जोरावार जेस-
(वंत?) व गोरखोजी चोरडे हे दोघे जन मी-
(ळू)न आपनास गावातुन मोकासाई या-
च्या बळे दीवानदारी करून बळ देऊन
परगदा केले. आपनास आपले आडना आ-
ळके मुलकात सागावयास लाज वाटो ला-
गली. चोरडे जोरावार बहुत, दद... दावा
व मारा ऐसेयास भीत नाहींत ऐसे सी-
रजोर म्हनऊन आपन गांव टाकून
परगदा जालो. मग आम्ही चौघे भाऊ
मीळोन एके ठाईं बैसून वीचार करू
लागलो. वीचार करून एकमत होऊन ए-
क तह केला जे वीज्या ( पूर पादशाहा )
च्या दरबारास जाऊन ( फर्मान काढावा )

पत्रा १ बाजू २

ऐसे एकदील जालो वड ... ... ...
बीन कान्हो व हीरो बी ( न आपो व ना- )
गो बीन आपो व राघो बीन कडतो या
चौघांत दोघे व पाऊ पाटनी व(र)साचा
तह केला जे परसो व राघो हे नेमस्त
केले तेथ जो पैका पडेल तो राघो-
न पुरवावा दोघे जनी वीजापुरी
पातशाही फर्मान काढावा यैसा
तह केला व बाईस पैका पडेल तो
परसोने पुरावावा यैसे बसोन

(चौ)घी भावानी समापत्र केले. स-
… ले ते ती जागा जाव व पैका तीघान
पुरवावा ऐसे श्रीकृष्णेचे तीरी व ख-
डकेस्वराचे पेंडीवरी हात ठेऊन श्री-
कृष्णाकडे हात करून ईमान केले मौजे
खडकीत. यास बेईमान होईल त्यास
श्रीकृष्णानदी व खडकेश्वर दूर क-
रील व सत्यानास करील. हे ईमान आ-
पले वडीलवडील बेताळीसांचे
पुरवज गाजतील व नरकी पचतील.
येन्हप्रमान तीघानी चालावे हे ईमान
लीहीले पत्र. सही समा रामाजी वीठल
कुळकर्नी मौजे खडकी गोही हरजी
बीन बाळजी पाटील खडकी[१]
[ तीन नांगराच्या खुणा ]

विश्ववृत्त, व. १, अं. ३, जून १९०६, पृ. २५ ते ३०.

१३ मे १५४०] (–३–) [(वैशाख) शुद्ध ७ गुरुवार
[ताम्रपट] शके १४६३ मोहरम

पत्रा १ बाजू १

समा कबूलकतबा लिहिले ऐस जे
सके १४६३ पलवग[२] नाव सवतछरे मा-
हे मोहरम[३] सूध ७ वार ब्रसपत
वार घटीका ३५ पळे ५४ ऊतरा-
शाढा घटीका २२ पळे ३५ गर्गयो-
ग घटीका ३८ पळे ५४ ततकाळ व-
नीज करन घटीका ३० तेरीछ ६ रोज।
लिखीत जे पातशाही फर्मानास
खर्च होन हजार एक १००० व वाई-
चा खर्च होन ३०० तीनसे व परीट

१. हा ताम्रपट मोडी लिपींत कोरलेला आहे
२. पलवग=प्लव, प्लवंग नाही.
३. हिंदू महिना न देतां हिजरी महिनाच दिला आहे.

मारीला यास दीवानदंड होन १००
एकसे एकून होन चौदासे १४००
खर्च जाहाला. हा खर्च जाला तो राघो बीन
कडतो यान्हे पैका आपला खर्च
केला व परसोन आपले तर्फेन ए-
क रूका दीधला नाही. पैकीयासि
मुदती केली मग पैका मुदतीस

### पत्रा २ बाजू १

ही नाही मग राघोन दोही दीधली
जें आपला पैका भरील तो नाग-
राचा खावंद होन व परसो म्हनो
लागला जें आपन वडीलपनाचा ना-
चा[१] नागराचा मान माझा आहे तो मज
देन. त्यास राघोन दोही दीधली
जे पैके माझे चौदासे होन १४००
भरील तरी नागरास धनी होन
नाही तरी आपन देत नाही. मग ही-
सोजी बीन आपोजी व नागोजी बीन
आपोजी या दोघान कबूल केले
कतबा दील्हे सां महीनीयाने पैका
देऊन म्हनऊन कबूलकतबा ली-
हून दील्हे जें तुझी तीसरी तकसी-
मेचा पैका वजा करून दो तकसीमी-
चा पैसा ऊरला तो सा महीनीया दे-

### पत्रा २ बाजू २

ऊन. जरी सा महीनीया पैका मुद-
तीस न देऊन तरीं तुज नीमचा
तकसीम देऊन पहीले तीसरी
री तकसीमीचा सीर करून नी-
मेचा कतबा देऊन जरी सा मही-
नीया पैका दील्हा तरी पहिले तुज
तिसरा तकसीम आहे तेनेप्रमा--

---

१. हीं 'ना चा' अक्षरें चुकीचीं पडलीं आहेत.

न च चालेन तुमचे आमचे ई-
मान जाले आहे श्री कृस्णानदीचे
च खडकेस्वर देवाच व आपल
वडिलाचे ईमान आहे तो च
तुम्हास आम्हास आहे तेन्हे प्र-
मान दोघं जन चालेन कबूल-
कतबा आपला सही सभा सी-
दो गोवीद कुळकर्नी मौजे ए-
रडे मौजे मजकूर चौदासे होन पाडळी
नीत्य खर्च जाहाला गाय जे येईल ते तीघा तीघा द्या[1]

हरी चाभार मोजे मजकूर सोननाक समाजदार बेगारी मौजे मा

विश्ववृत्त, व. १, अं. ३, जून १९०६, पृ. २०–२४

३ मार्च १५४३ ] (– ४ –) [ फाल्गुन वद्य १३ शनवार शके १४६४

साक्ष कामाक्षी वा हनुमंत वा
कृस्णाभागीरथी

मल्हारजी गोदाजी सही [ निशाणी नांगर ]

॥ छ स्वास्ति श्री सके १४६४ वरीख सुभकृत नाम संवछरे फळगुण वदी तेरसू वारु सणी तदीनी मौजे कसबे थळ गोदाजी बिन देको पटैळू वा ... को पटैळू बिन वासुदेउ पटैळू वा रवळ जयेक बिन कान जयेक वा नमादेऊ बिन रमागुडी वा चिळोदेऊ बिन कमालगुडी वा माद पुजगुडी बिन ऐळूगुडी च कान्ह जयेक बिन एळूगुडी वा मादगुडी बिन डाईगुडी वा एकेदेऊ बीन रूपगुडी हे मुख करुनु समस्ती क्रिसणा भट भान भट गीजरें सी लिहून दिले ब्रीतीपत्र ऐसे जे तुमच्या वडिले सी आमचेया वडिलानी पूर्वानिपूर्वी जोतिसब्रीती दीली होती तैसी ची आता आम्ही तुज दीली असे. तुवा आपुले लेकुरा चे लेकुरी वीर्ती चालविजे हे आमचया वडिला चें सत्या भाव हेया बोला सि अनेथा नही.

गोही

| | |
|---|---|
| जाया बिन लखमण सुतारु करुवें | लाहिया नेमदेऊ न्हावी करुवें |
| तान्हा बिदू डोईगुडी तरळ करुवें | सेदा दरणे बीन पोमा दरणे करुवें |
| भीकु लाहीया अहीर करुवें | माळ दरणे बीन रीवा दरणे करुवें |
| तुका बीन साया गाव्हर करुवें | साया लूया गाव्हरु करवें |

१. हा ताम्रपट मोडी लिपींत कोरलेला आहे.

मीया आबास साहेबू हवाल करुवें
क्रीस्णोबा नरसोबा सेणवी मौजे करुवें
लिखिते पिलोबा भानोबा कुळकर्णी करुवें
चंदन मादा मादई जमादारु करुवें
... ... सेटी बीन दामो सेटी
... ... ळ कसबे करड सही

भा. इ. सं. मं., तृतीय संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. १२, पृ. १३-१४.

१५ नवंबर १५५७] (-५-) [कार्तिक वद्य १० सोमवार
शके १४७९

यासी साक्ष कृष्णाभागीरथी

॥छ श्री सके १४७९ वरीखे पिगळ नाम संवछरे कार्तिक वदि दसमी सोमुवार तदीनी देसाईयानि वा सेटिये वा माहाजनानि वा मोकदमानि पाा करहड यानि क्रीस्णभट वा पिलंभट वा संभुभटजी गिजरेयासि लिहुन दिल्हा माहजर ऐसा जे बीर्ती गाव ५ बिा

मौजे कारुवे सेरिये मौजे वडगाऊ
मौजे कोडवली मौजे दुसेरिये

जोतिस वा उपादिक हरि गंगाधर जोइसीयानी तुमचे वडिल रामेस्वरभट गिजरेयासि आपुले आत्मसुखें पाय धुनु दिले ऐसे आमचे वडिला चे मुखे आइकिले हा माहाजर सही ह्या वृती हरि गंगाधर जोइसी याचिया ऐसे आमा सी ठाउके आसे. मोर्तब

हरीजी कान्होजी यादव देसाई पाा सकरहड [ शिक्का[१] ]
जायनायेक हरिनायक सेटिया पाा करड (निाा तागडी)
... ... ... ... ... ... ...
जोग सेटी बाबी सेटी चिखले माहाजन काा करड
चौड्रोबा नारोबा सराफु करड
कुख पटैलु बिन नागदेऊ पटैल मौजे कायेवी
बहिरो चौगुला (निाा नांगर)
ठनको पटैल बिन वासदेऊ पटैल मोकदम मौजे
करुवें पाा मजकुरु
पिलोबा भानोबा कुळकर्णी कारवे

१. शिक्का— 'साक्षी भु । हरी ज्रुजीबी न । कानोजी देसायी। पाा कराड.'

हरीगुडी बिन रमागुढी चौगुला मौजे मजकुरु
नारुजी काळू साऊ माहाजन का करड
नाराजी
खंडोबा चाटे का करड
गोदोजी बिन ... ... ...
पटैल ... ... ... [ निा नांगर ]
दमाजी राम कुलकर्णी मौजे मजकुर
चिळगुडी बिन कमलगुडी मोकदम मौजे मजा
मौजे कोडवली
लखामण पटैल बिन कोया पटैल पटैल
सीदोजी बिन चगोजी चौगुला ठेउला [ निा नांगर ]
गोदुजी बिन चगोजी पटेल
सदू पटेल वा बिन काया पटेल
गोदो पटेल वा सभो पटेल वा मलो पटेल मौजे सेरिये [ निा नांगर ]
रामाजी पटैलु बीन गोदजी पटैलु का कऱ्हाड [ निा नांगर ]
कमलाजी पीलदेऊ कुलकरणी का कऱ्हाड मौजे रेंटरे पिपलादेवीचें
भैरोजी खेळूजी मोकदम माजे मजकुरु
पटुमोबा चौडोबा अष्टाधिकारी मौजे मजकुरु [ निा नांगर ]
राघो एवतो पधरे कुलकरणी जोइसी मौजे रेंटुरे बुा
हरीगुडा पटैल पटैल बिन लाहीगुडा पटैल मौजे दुसेरे [ निा नांगर ]
साईगुढा खटिंग चौगुला मौजे दुसेरें

भा. इ. सं. मं. तृतीय संमेलनवृत्त, स्वी. ग्रं. क्र. १२, पृ. १४–१५०

२६ जून १५७८ ] ( – ६ – ) [ २० रबिलाखर तिसा सबैन

[ फारशी शिक्के तीन ] [ फारशी मजकूर ]

अज दिवाण रखतखाने खास बजानेबु हुदेदारानी व खोतानि हाल व इस्तकबाल व मोकदमानि व रयान कसबे वोतूर समत जुनेर बिदानद सुा सन इसने सबैन व तिसा मया (१५७१–७२ इ.) नरसीहभट बीन वीस्वनाथभट व केसवभट बीन नरसीहभट विद्यार्थी केसव चैतन्य माहानभाव सो कसबे मजकूर बंदगी हजरती मालूम केले जे जमीन चावर येक नजीक मठ व झाडें मठाजवळील का मा केसव चैतन्य माहानभाव यासी बा हुजती रा हजरती मीरास्याहा बुऱ्हानसाहेब इनाम आहे केसव चैतन्य माहानभाव जीत असता हा इनाम आपणास

दुबाला आहे. आपण त्याचे विद्यार्थी मठी सेवा करीत आहो. आतां तीही समाधी घेतली. तरी आपले नावे हुजतीची रजा होये मालूम जाले बाा इसारती दीवाणआला जमीन चावर. येक व झाडें नजीक मठ दर संवाद कसबे मजकूर बाा हुजती राा मीरासा बुऱ्हान जैसे ताा सन इहदे (१५७०--७१ इ.) केसव चैतन्य माहानभावासी चालत आहेत तैसेच अज इाा सुाा सन इसने (१५७१--७२ इ.) सालमजकूर पासुनु नरसीह्भट बीन वीश्वनाथभट व केसवभट बीन नरसीह्भट विद्यार्थी केसवचैतन्य मजकूर यासी चालवीजे उजूर न कीजे दर हरसाल खुर्देखताचा उजूर न कीजे तालिक लिहून घेउनु असेली भट मजकुरापासी असो दीजे. मोर्तब सुद

रुजु सुद रुजु सुद सुरु नीस रुजु सुद

तेरीख २० माहे रबिलाखर तीसा सबैन

...असफखान

...सुद तालीक × × ×

...दसरखाना

बार सुद बार सुद बार सुद बार सुद बार सुद

तालीक असेली

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १-४, क्र. ५-८, पृ १५३-१५४.

(तुकाराम महाराजांची गुरुपरंपरा, पृ. १४६-१४७ पहा.)

२४ आगष्ट ते २२ सप्टेंबर] (–७–) [सुाा समानीय तिसामया,
१५७९ रजब

(फारशी एक ओळ)

(मह)जर ब्रिहुजर हाजीर मजालसी मामले तळिया बिते माहे रजबु

सर मुतालिक हजर नरवोगजी साहेब (कार)कुनु मामले मजकुरु [शिक्का]

(अ)लावदी समसदी माहाल-(दा)र पाा हास मसाला तह(सी)ल बाराछडिया [बाण]

... याजि मखदुन माहालदार मसाला तहसील नचा जिरातदिना [तलवार]

... यातान्हा कालाचा (माम)ले-मजकुरु [कट्यार]

काजी हमीद हकीमसरा मामले मजकुरु

हाबाजी बाबादी माहालदार पाा हास मसाल तहसील मुल्गे [तलवार]

फकी माहामद बिन फकी हुसेन खतीब कसबे मजकुरु [फारसी सही]

वीरोजी होनजी नाईकवाडी किले मजकुरु सही [हींच दोन अक्षरें बालबोध]

गोरखोजी येसवतराउ नाइकवाडी मामले मजकुरु [त्रिशूळ]

(दे) साई मामले मजकुरु राउजी बीन रंगोजी [नांगर]

नाखुदा अली अदीकारी पाा हवेली [नांगर]

ई पाटैलु अधीकारी पाा बाहसेटि अदीकारी पाा मादरड [नांगर]

वर सेटो सेटिया (सो)नार कसबे मजा [चिमटा]

गणसेटी व करसेटी दरजी कसबे मजा [कातरी]

रामेस्वरभट भंडारी कसबे मजकुरु दतो विनायेकु तै किर्वती गरीब मुकासाई किर्वती मामले...लीक बिा ७

बाबा पटेलु अधीकारी पाा देरेवली [नांगर]

आहामदजी अदीकारी पाा देईगौ [नांगर]

पील चौधरी सेटीया व काल कसबे मजा [तागडी]

गोद मेहेतरी मुख्य करुनु समस्त गोलि कसबे मजा [कावडी]

कृस्ण जोइसी वीटल जोइसी टकले कसबे मजा

अंतभाटब्रहा (बालबोध अक्षरें)

मामले मजकुरू सुा समानीन व तिसा मैया महजरनामा यैसा जे उपाध्या कसबे मजकुरु मयती जाला. त्याची वृती उपाधेपण गोली व सोनार व वाणी व ... कसबे मजकुरु याचे घरिचे उपाधेपण जोइसी खाताति म्हणौन ठाणा मामुल जाहाले. वामन जोइसी कसबे मजकुरु हुजुरु बोला(उनु) बि हुजुरु हाजीर मजाल्सी सदरहु अम .. मुसी केली वामन जोइसी मजकुरें वृतीचा... चारु सांगितला जे गौली सोनार व वाणी .. कसबे म(ज)कुरु याचे उपाध्येपण सालाबाद आपले वडी(ल) चालवीत असती दरोवख्त आपले वडील ... ... ...

[पुढचा कागद फाटला आहे]

~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८ अं. ३, पृ. १५८ ते १६०.

२७ मे १५८५] (–८–) [७ जमादासानी हि. ९९२

ईश्वर सर्व शक्तिमान आहे.

महाराजाधिराज जलालुद्दीन अकबरशहा पादशहा गाझी याच्या फरमानाचें मराठी भाषांतर.

'माळवा प्रांतांतील मुत्सद्यांना विदित असूं द्या कीं आमची संपूर्ण इच्छा सत्कृत्य करण्याकडे आहे. आमच्या प्रजेचीं अंतःकरणें आमच्याकडे ओढून घेऊन त्यांच्या चित्तवृती प्रसन्न ठेवणें हेंच आमचें श्रेष्ट मनोरथ आहे. जो आपले जीवन पावित्र्यांत व्यतीत करतो, आपला संपूर्ण वेळ आत्मध्यानांत खर्चितो, ईश्वराच्या चिंतनांत मग्न असतो अशांच्या पूजादि बाह्य उपाधींकडे अवलोकन न करितां अंतरंग चित्तवृतीशी एकतान होऊन त्यांचें म्हणणें ऐकून घेतो. अशांची संगती
~~~~~~~~~

करण्याकरितां आमच्यांत तीव्र अनुराग उत्पन्न होतो. आणि अशा सत्पुरुषासाठीं असलें कार्य करण्याची आमच्या मनांत इच्छा उत्पन्न होतें कीं, जे कार्य ईश्वराचे घरीं रुजू होईल! गुजराथचे राहणारे हरिभजसूर (हरिभद्रसूरी) हे आपल्या शिष्यांसह हल्ली येथें आले असून त्यांचें उग्र तप व असाधारण पावित्र्य ऐकून आम्हीं त्यांना दर्शन देण्यासाठीं विज्ञप्ती केली आहे व ते आमच्याकडून सन्मानित झाले आहेत.'

'आपल्या देशास परत जातांना त्यांनीं आम्हांस खालील प्रार्थना केली आहे कीं, जर पादशाहा हा अनाथांचा रक्षक असेल तर त्यांनीं असा हुकूम आपल्या राज्यांत सोडावा कीं, भाद्रपदमासच्या बारा दिवसांत (ज्याला जैनीलोक पजूसण म्हणून पवित्र समजतात) कोणत्याहि प्राण्याची हिंसा करूं नये. अशानें बादशाहाची प्रशंसा सर्व दुनियेंत होईल.'

'ज्यांनीं आह्मांस ही प्रार्थना केली ते साधू दूर देशांतून आल्यामुळें, त्यांच्या विज्ञप्ती आमच्या धर्मास व शुभ कार्यास अनुकूल असल्यामुळें आणि त्यांच्या प्रार्थना आमच्या मुसलमानी धर्मांत उपदेशिल्या असल्यामुळें, त्या साधूंच्या प्रार्थना आम्ही मोठ्या संतोषानें कबूल करतो व सर्वत्र असा हुकूम सोडतो कीं भाद्रपदाच्या बारा दिवसांत (ज्याला पजूसण म्हणतात) कोणत्याहि जीवाची हिंसा आमच्या राज्यांत करण्यांत येऊं नये.'

'हा सनदी हुकूम नेहमीं आमलांत आणावा व सर्वांनीं तो पाळावा. धर्मकार्यासाठीं कोणालाहि दुःख प्राप्त होऊं नये. ही सनद मिती ७ जुमादुस्सानी सन ९९२ हिजरी.'

वंदेजिनवरम्, व. १, अं. ६, सप्टेंबर १९०८, पृ. ६–७.

३० जून १५८९ ] (–९–) [ २६ साबान तिसैन तिसामिया

[ फारसी शिक्के दोन ]

छ कौलनामा अज दिवाण ता। राजापूर सु॥ सन तिसैन वा तिसामया ताहां अंतो काइदेउ मुलिया मिरासी मोकदम वा नारो काइदेउ खोतु मौजे कसेळी दिल्हा कौलुनामा ऐसा जे तुजे बाबे देसायानी वा खोतानी ता। मजकूर अर्दास केली जे अंतो काइदेउ वा नारो काइदेउ खोतु मिरासी मुलिंचे मौजे मजकूर तपे मजकुरासी निंधे बदल एताती. त्यासी रहाविया घर नाही. घरें घरखाण याणी करणें. चुकूर होताती तरी बानारामधें सीयासन–रामयाचें जंगमाचे घर असे तो ठाउ घर बांधावया देणें वा पुढें सीयासनासी एकेंकडे ठाउ दिल्हा असे वा आगर गाउ पान पोकळ वा फणे वा नारेल विकावया कारणे घरापुढें दुकान बांधतील तरी साहेबी कौलु देउनु घरासी

ठार देणें म्हणौनु बराये इलतमेस… …खातिरेसी आणौनु… …घर बांधावयासी सीयासन रामया बाबे दरफ ठाउ दिला असे. घर वा दुकान बांधोन सुखे असिजे वा अंतो काइदेल खासनिवीस मारून आला ते वेळेसी घर बांधले म्हणौनु कोणी काही बोलतील तरी काही निसबत नाही. जाणिजे खातिरजमा करून सुखें असिजे.

तेरीख २६ माहे रुजू सूद

सा बा न . .

भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त, स्वी. ग्र. क. ८, पृ ४७.

६ एप्रिल १५९१ ] (– १० –) [ २० जमादिलाखर इहिदे तिसैन तिसामया

[ फारसी शिक्का ] [ फारसी मजकूर ]

.॥ छ कालुनामे अज दिवाण तपे राजापूर मामले मुजाफराबाद ता अंतो कांइदेउ … बाहीरवाडी मौजे कसेळी ता मजकूर सुहुरसन इहिदे तिसैन तिसामैया (१५९१–२ इ.) कौलनामा ऐसा जे तुवां हुजूर एउनू मालूम केले जे मौजेमजकुरी किटो हरडीकराचे आगराची पात… सेत जमीन वाडा आहे. तेथें बंदराजवळी… ते जमीन नाकीर्दी पाडिली असे. साहेबाचा कौलु जाहालेया तेथे कस्ट मस्याखती… नारेल मांडणी करीन तरी हुजरून हजरती न्याभीखान अलीस्यान दया हू साहेबी माहालासी कौलु सादीर केला ऐसे जे बनिसबत परगणे कुडाल … इस्तवा…… देउनु नारेल माडणी .. .. म्हणौन कौलु सादीर केले असेती. तेणेप्रमाणें आपणासी कौलु दिल्हे तरी…… सी नारेल माडणी करीन म्हणौनु (ए) बाबे देसाइयानी वा खोतानि तपे मजकूर इलतमेसी केले मग बराए इलतमसी खातिरेसी आणुनु जमीन बाबती किटो मजकूर नारेल माडणी करावेया दिल्ही असे. इस्तवा मुदती २५ साले इस्तकबिल सन इसने तिसैन (१५९२–३ इ.) तागायत सन सीत असर अल्फ (१६१५–१६ इ.) दिल्हे असे इस्तवा भरे तव निघा

मुदती १० साले इस्तकबिल सन इसने तिसैन तिसा मया तागाइत सन इहिदे अलफ (१६०१-२ इ.) एक हजार माड बैसती इतुके जमीनेसी दर साल होन .॥. एकुनु लारी ३ प्रमाणे देणे मुदती १० साले इा सन सबा अलफ (१६०६–७ इ.) सन सीत असर अलफ (१६१५–६ इ.) एक हजार माड

मुदती ५ साले इस्तकबिल सन इसने अलफ (१६०२–३ इ.) तागाइत सन सीत अलफ (१६०५–६ इ.) एक नारेल बैसती इतुके जमीनेसी दर साले होन १ एकुनु लारी ६ प्रमाणे देणे

बैसती ते जमीनेंसी दर साले ।होन २
एकुनु लारी १२ प्रमाणें देणे

हेणे प्रमाणे इस्तवा दिले असे. इस्तवा दिल्हेवरी पेस्तर दर सदे १०० माडांसी लारी १० दाहा साल दर साल देणे. याची माफजाती करावया माडामध्ये कुणबी वा ... वा गावीत जे कोणी घरे बांधौन असतील यांसी मुदती पांच साले इा सन इहिदे तिसैन (१५९१-२ इ.) ताा सन सन सीत (१५९५-६ इ.) वेठ वा बेगारी वा पाणीदाम कुली माफ असे. मुदती गुदरलेयावरी... ... घरे ५ पाणीदाम माफ...असतील तरी दर घरासी पाणीदाम लारी १ हर साल बसाल देणे. हेणे प्रमाणे परगणे कुडाल विलायतीस कौलु असे. तरी सदरहू जमीन नारेल माडणी करून बाा सदरहू इस्तवा प्रमाणें देउनु सुखे असिजे. इस्तवा भरलेयावरी सदरहू प्रमाणें रकम देउनु सुखे असिजे लारी ६ कौलु तेरीख २० माहे जमादिलाखर.

[फारसी शिक्का]

भा. इ. स. मं. द्वितीय संमेलनवृत्त, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. ४८-४९.

**९ आक्टोबर १५९१] (-११-) [१ मोहरम इसने तिसैन तिसामया**

माहाजरू बतेरीख १ माहे मोहरम इसने तीसैन तीसा मेया बहुजुरू सरसमत बा कारकुनानि वा देसायानि

खाने अजम समखान नामजाद पाा रायेबाग [फारसी शिक्का]

मीर माहामद सरसमत देहाये मामले विजापुरु

आपाजि पंडीत बीराजर संगरस पंडीत हेजीब मुतालिक हुचमळ नायक मोकासाई मौजे तागडी

खंडेराऊ पंडीत मुश्रीफ पाा रयेबाग [फारसी शिक्का]

रंगो तिमाजी मजमदार पाा रायेबाग [फारसी शिक्का]

मरमदेउ देसाई वा बसवणा परसनायेक देसाई पाा रायेबाग [नांगर]

माहामद येळा वदि माहाळ दर मुताळिक खाा खाने आलिशान हैदरखान गोसावी [नांगर]

ळिगोजी देसाई मामले विजापूरु [नांगर]

मोकदमानि

देहाये मामले विजापुरु

परव रेडी पटेल मौजे हळगेरे [नांगर]

टांकदेउ चौगला मौजे मदबावी

नारो पंडित कुळकरणी मौजे अथणी

काडगोड पटेल मौ गुडेवाडी [नांगर]

नागोजी पटेल मौजे जंबगी [नांगर]

नेगोजी पटेल मौजे मगसूळी [नांगर]

ळखगोडा पटेल मौजे सींदनहाळ [नांगर]

सटवगोडा पटेल मौजे सुरगूंडी [नांगर]

सोमगोडा पटेल मौजे हुळगबळ [नांगर]

देहाये मामले मुबारकाबाद

ळखमगोड पटेल वा हणमगोड चौगळा मौजे महीसाळ [नांगर]

जखणा कुंभार मौजे सोरगूपें [चाक]

देहाये पा रायेबाग

होनगोडा पटेल वा मनगोडा मौजे सेडबळ [नांगर]

परमगोडा पटेल मौजे उगार खुर्द [नांगर]

सीदगोडा पटेल मौजे कीतुरु [नांगर]

नागोडा पटेल मौजे सीरगुरु [नांगर]

जखगोडा पटेल मौजे निंाळज [नांगर]

मळगोडा पटेल मौजे हि-ण'[नांगर]

देबगोडा पटेल मौजे मोळवाड [नांगर]

परमगोडा पटेल वा सगोडा चौगळा चौगळा मौजे कुसमहळ

सुाा सन आर्बा समानिान तिासा मया (१५८३–४इ.) जहळा महाजरु यैसा जे मौजे यैनापुरु पाा रायेबाग वा मौजे तांगडी मामले विजापुर दोही गांवांसि सिविंचा करकसा ळागळा होता पाा मजकुरीचे कारकुन वा मोकदम हजरत खाने आळिाशान हैदरखान साहेब गोसाविा यांचे बंदगिासी विजपुराासि गेळे होते ताग-डीकरानि फिरियाादि केली त्यावरि सरसमत... देहाये विाजापुरु वा पाा मजकुरिचे कारकुनासि रजा फरमोविाळिा जे मोकदमानि देहाये विाजापुरु वा पाा मजकुरु बोळाउनु सिवेच्िा मुनसफि बराये खोदा निावाडा करणे म्हणौनु वा हक जवार जैसे विाळे करीळ तैसे देहिा गाविाचेनिा राहावे अैसं कतबा घेतळी त्यावरि हक जवार देहाये विाजापूर वा बाज सरसमत वा कारकुन वा देसाई मिाळाले छ २९ माहे जीळ-हेज रोज जमा तरफैन मजाळसि समस्ता सिवैसिा आळ दोही गाविाचे पटेलासि विचारिाळे जे तुमचि तुमचि सिव कोठूनु हदमहदुद कोठूनु दाखवी त्यावारी अैनापूरकरानि सिाव आपुळिा हद महदुद माहात कदम होये म्हणौनु दाखविाळे उतरे होंउनु दक्षणेसि निाशान

| | | |
|---|---|---|
| पहीलें निशान | दुसरें निशान | तिसरें निशान |
| तीरळें केरें | धोडा १ असे | आगरणी वा कृष्णेचा संगम |

येणेप्रमाणे तकरीर लिाहुनु दीळही वा तकरिरेंत लिाहिले जे हे सिव माहात कदम आमची होये त्यावरि तागडीकरानि‍ा सिव दाखवीळी दक्षणे होउनु उतरेसि संगम आगरणि‍ा वा कृष्णेचा धरुनु नीरा वाहाळे वाहाळ कड परीयेती आपुलि‍ा सिव माहात कदम होये म्हणौनु तकरीर लीहुनु दीळही मग सरसमत वा कारकुनानि‍ा हक जवारिचे मोकदमासि‍ा विचारिळे जे दोहीं गाविचीनी सिव दाखनिालि‍ा वा तकरीर लिाहुनु दिळही पूर्दे होये नव्हे याचा निघा कैसा याबरि हक जवारिचेनि‍ा दोहि‍ा गाविचे मोकदमासि‍ा विचारिळे जे यासि‍ा साक्ष काये त्यावरी ऐनापुरकार बोलिाळें जे अमचि‍ा सीव अम्ही जेवितो तागाईत अमचा भोगोटी असे त्यावरी तागडीकरासि‍ा विचारिळे तरी ते बोलिळे जे आमचि सिव अैनापूरकरांनि‍ा घेतलि‍ा आसे मजाळसि‍ा बोलिळे जे अैसीयासि‍ा साक्ष आणा मग तागडीकरासि‍ा साक्ष नाहि‍ा मग समस्त मजळांसाने मनासि अणीळे जे साक्ष नाहि‍ा तरी रवा होणें अैसें मोकरर केळें यावर मजाळसिानें विचारिळे जे यांत सादक कोण त्या वरि समस्त बोलीळे जे अैनपुरकार सीव भोगोटा करुनु जेवीताती तागडीकार आपुली सिव म्हणौनु पाठो धरीताति‍ा तेधवा तागडीकर सादक सादकानि रवा काढावा अैनापुरकार साजक त्यानि‍ा पाठीसि हात ळावावा अैसि‍ा सर्ता केळी शनिावारि मजळसी बैसौनु तागडीकर परमा पाडेवार मिारासि‍ा मेहतरीचा हात धुउउनु नाखे काढउनु पिास वित हात घातळा वा... ... ...पाडेवार मेहतरी मीरासि मौजे अैनापुरु त्याणे पाठीसी हात ळावावा त्याबद्दल त्याचाहि‍ा हात धुउनु पिासाविात हात घातळा सिाके केळें दोघे पाडेवीरासि‍ा तागडीकरानि‍ा सिवेसि माडव घातळा होता तेथे तरफैनाचे कमाणदार राखण ठेवाळें रात्रि‍ा तेंथे राखण होती आदीत्यवारि उदेक तरफैन मजळसि‍ा सिवेसी बैसोनु मिार माहामद सरसमत देहाये विजापुर मौजे मदबाविचे बाबा हुददारासि कीताबति‍ा लिाहुनु बराबरी सेख ळावदि‍ा माहामद माहाळदार रा मो पाठवीळे तेथुनु तेळ ८८.॥॥. वा ळोणी ८८.॥॥. वा चरवि‍ा तेळ... बाविासा वा तपेळे घेऊनु अळें बखरी

| | | |
|---|---|---|
| ळोहार नाबर भानजी | भतेसहीत भानजी बीन कळा | कोनेरिाभट बीन तीमणभट जोइसी |

हे मदबावि‍ा होऊन आळें त्यावारि समस्त मजाळासीने दोहीं गाविचे मोकदमासि विचारुनु तेळ तावाविाया निरोपु दिळहा तेळ तापळे दोघे पाडेवारानि‍ा आग ळाउनु परमा सादक तागडीपूर्दे वा... पाडेवारु साजक मौजे यैनापुरु मागें दोघे पत्र माक घेउनु सादक मडळे अळां दुरु सातवे भडळा जवळि‍ा उभा राहीळा आगीवरीळ चरवि‍ा तूळ तेळ तपेळयांत उतीळ रव्याचा खडा सादकासि‍ा दाखउनु तेळात घातळा मजाळसिान सादकासि बोलिाळे जे रवा कादि‍ा सादकानें तेळात हात घाळावा तव

येकायेक तेळातून दिवे सारिखि अगी निघाळि ते देखोनु सादक परमा खेत हात घाळूं न सकतां उगांचि राहीळा आणि होतां होतां थोरळि जहालि तास १॥ दीढा परीयेत तपेळ्यांत जाळ होतची होती तेळ झडती जळोनु गेले वा तपेळे बुडी रसमानेसि जोरी घाळिता ती ते घातळी होती ते जळोनु गेळी यावरी कारकुनानि वा सरसमत समस्त हक जवारासि विचारीळें जे या खेची काये सनद कैसें अमळ असे तरी मजाळसि हक जवार समस्त बोळी जे खा ळागळा तागडीकरानि सिव हारवीळी यैसा बोळ जाहाळा मग तागडीकर पटेळ वा कुणबी तमाम कारकुन वा हक जवारासि नेणतांची नीघोनु गेळे असे परि तागडीकरानि सिव हारीवीळी अैनापूरकरानि खेने सिव जितळी हदमहदुद सदरहु निशान प्रमाणे सिव यैनापुरीची होये माहजर सही मोर्तब "

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ७ ते १०

३० एप्रिल १५९३ ] (- १२ -) [ ८ साबान सलास तिसैन तिसा मया

[ फारशी शिक्का ] [ फारशी मजकूर ]

अज दिवाण...... बजानेबु कारकुनान परगणे पुना व हुदेदारान व मौजे राजूरी परगणे मजकूर बिदानद...... देखील कडबा बा अनामत दर बाबती अत जोसी बिन गोविंद .. ... सि बा हुजती बसिके खास होते ते हुजती गुम जाले आहे. दरीविला .. ... करुनु देवीजे. दरबाब आकीं जमीन चावर दरसवाद मौजे मजकूर ... सलास तिसैन व तिसा मया (१५९३-४ इ.) दरवज इनाम बो अंत जोशी बिन गोविंद जोसी... ... यासि चावर मजकूर मुकरर केले अहे ता इहिदे जे... ... चालत असेली तेणेप्रमाणे सालमजकूर... ... हुजती गुम जाले यासी इसकील न कीजे .. ... खुर्देखताचा उजूर न कीजे. तालीक घेऊनु असल फिरा... ... खुर्दे बसिके खास येकदर खमस तिसैन रू ८ माहे शाबानु... ... सवाददप्तर खास चावर दोन (फारशी मोर्तब शिक्का) मोर्तुब.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७ अं. १-४, पृ. ४९.

३१ दिसेंबर १५९६ ] (- १३ -) [ २१ जमादिलावल सबा तिसैन तिसामया

[ फारसी दोन शिक्के ]

अज रख्तखाने राजेश्री मालोजी राजे दामदौलत हू बजानी हुदेदारानि हाल व

१. बाळबोध व मोडी यांमधील दुवा दाखविणारें हें पत्र आहे. -हस्वदीर्घ 'इ' वगैरेंचा भेद यांत दाखविला आहे.

इस्तकबाल व मोकदमानि कसबे पेडिगाऊ पा मजकुर बिदानद सु सबा तिसैन व तिसा मैया (१५९६-९७ इ.) अकोबा गोसावी बिन गोदोबा गोसावी बडवे पुजारे श्री विठलदेउ कसबे मजकुर हुजुर येऊनु मालुम केले जे आपणास इनामबदल सदकोबाची जमीन चावर येक १८ गज सरायेनी प्रजा ... .. बाबाजी चिकलठाणा नामाजी चिकलठाणा चावर निम .. ... ·।।· चावर निम ·।।·

छ नख्तयाती ता ठाणे व ता देहाये कुलबाब कुलकानु व बाजे पटिया वेठी व बेगारी .. ... ब सिके खास व भोगवटे व तसरूफाती कारकीर्द दरकारकीर्द दर सवाद कसबे मजकूर ता सन सीत (१५९५-६ इ.) चालिले आहे सन सीता. मधे वणगोजी .. ... आपलिया कदीम हुजती फर्मान व भोगवटे गेले आहेती. साहेबी सदरहू इनाम चालवावेया खुर्द खत होये मालुम जाले. अकोबा गोसावी बिन गोदोबा गोसावी बडवे पुजारी श्रीविठलदेऊ कसबे मजकूर यास इनाम बदल सदका चावर येक गज सरायेनी प्रजा २ ता

नामाजी चिकलठाणा
बाबाजी चिकलठाणा
चावर निम ·।।·
चावर निम ·।।·

छ. नख्तयाती ता ठाणे व ता देहाये कुलबाब कुलकानु व बाजे पटिया व वेठी बेगारी .. .. ब सिके खास व भोगवटे व तसरफाती दर सवाद कसबे मजकूर कारकीर्द दर कारकीर्द ता सन सीत चालिले असेलि... ... प्रमाणे चालविजे. दरम्यान सालगुा हुजती व भोगवटे फितरते (?) ... ... करितां गे(?)ले ये बाबेचा उजुर न कीजे औलाद व अफलाद चालविजे दर हर साल ताजे खुर्द-खताचा उजूर न कीजे. तालिक घेउनु असलि खुर्द खत इनामदार मजकुरा-पासी दीजे.

[फारसी शिक्के दोन]

तेरीख २१ माहे जमादिलावल जमादिलावल

भा. इ. सं. मं. षष्ठ-संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २४, पृ. ८८--८९.

२७ मे १५९९] (- १४ -) [जेष्ट शुद्ध १३ रविवार संवत १६५६

[शिक्का[1]]

श्रीवालेर माहा वीक्रम दूरंग
माहाराजा अध्यराज माहार
णा श्री दूरंग बाजी वींजेराज
आदेशा मौज आकलकुवो
गाम दादाजीने राजे कृष्णा

१. शिक्का- 'श्री वालेर।...। दूरगंजी.'

जसवंतजी
रपण कीधू छे जा लगे वाले
रनु राज रेहे अम्हारा वशम हे
गाम लो पोतेनी माउपेरे गध-
डो जाय छे जेष्ठ शुद १३ रवउ
सवंत १६५६ वरखे[२]

भा. इ. सं. मं. अहवाल, शके १८३४, स्वी. ग्रं. क्र. ४, पृ. ६.

९ जुलै १५९९ ] (-१५-) [सलास तिसैन तिसामया, २५ जिल्हेज

[फारसी शिक्का] [फारसी मजकूर]

अज दिवाण रस्तखाने खास बजानेब कारकूनानी समत जुनर व मुकासाइयानी व हुदेदारानी हाल व इस्तकबाल व मोकदमानी कसबे उतूर समत मजकूर बिदानद शहूर सन सलास तिसैन व तिसामया (१५९२–३ इ.) नरसिहभट व केशवभट विद्यार्थी केशव चैतन्य माहानभाव सेकिन कसबे उतूर बंदगी हजरती मालुम केले जे हर्ची जमीन चावर एक व झाडें नजीक मठ केशव चैतन्य दरसवाद कसबे मजकूर बरहुकुम हुजत हजरती मिराशाह बुऱ्हानसाहेब सबा सितैन (१५६६–७ इ.) कारकीर्दी हजरत बिबिसाहेब बिमान केशव चैतन्य दिधले होते तेणेप्रमाणे तागायत इहिदे सबैन (१५७०–७१ इ.) चालिलेयावरी केशव चैतन्य माहानभाव येही समाधी घेतली. इसने सबैनी (१५७१–२ इ.) आपले नावें हुजती बसिके खास जाहाली आहे तेणेप्रमाणें सालाबाद तागायत इहिदे तिसैन भोगवटा तशूफात चालत आहे. सन इसने कारणे आमानत केले आहे. इनामाचे बाबे परवानगी वर्क सादर आहे. जे कारकीर्दी हजरती बिबिसाहेब ब्राह्मण व हिंदू यासी इनाम असेल तो करार करणे. चावर व झाडें नजीक मठ बाबत आमानत बर निसबत हुजती कदीम मोकरर करणे. फर्मान मऱ्हामत होये मालूम जाहाले बरहुकुम इशारती दिवाण आला बा इलतमश देखविले नरसिहभट बिन विश्वनाथ भट व केशवभट बिन नरसिहभट विद्यार्थी केशव चैतन्य माहानुभाव सेकिन उतूर यास इनाम जमीन चावर एक व झाडे नजीक मठ दर सवाद कसबे मजकुर बरहुकुम हुजत कदीम मोकरर केले असे. तागायत इहिदे तिसैन (१५९१–२ इ.) जैसा भोगवटा तशूफात चालत असेल तेणेप्रमाणे दुबाला कीजे. अवलाद व अफलाद चालविजे. दर हरसाल खुर्द खताचा उजूर न कीजें तालिक लेहुन घेऊन असल फिराउन दिजे. मोकरर बा परवानगी वर्क एकंदर ब्राह्मण व हिंदु

२. हें पत्र गुजराती लिपी व भाषेंत आहे.

सलास तिसैन छ २५ जिल्हेज सन आलफ (९ जुलै १५९९) बरहुकुम सवाद दफ्तरखास चावर एक. तेरीख १८ माहे जमादिलावल.

भा. इ. सं. मं. त्रै., व २, अं. १–४, क्र. ५–८, पृ. १५४–५.

२९ नवंबर १५९९] (– १६ –) [२१ जमादिलावल, अलफ

अज रख्तखाने राजेश्री परसोजी राजे साहेब तुलीददामदौलतहु ता हुददारानि कसबे पेडगौ पा पाडिया पेडगौ सु अलफ बिदानद देवस्थाने विठोजी व नरसिह जे देवस्थाणे असतील तेथील दीपवाते व विठोजीचा भक्त अकोवा गोसावी त्याची अडसेरी दरोज चालविजे व दीपवातीस तेल दररोज ०॥० ४ व अडसेरी रोजाचा रोज देत जाइजे. मोर्तब [फारसी शिक्का]

तेरीख २१ माहे जमादिलावल जमादिलावल

भा. इ. सं. मं., षष्ठ संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २४, पृ. ९०.

इ. स. १६०५ पूर्व] (–१७–) [ ?

[अकबर बादशहाचे पत्र]

माझ्या प्रियपुत्रा. — माझ्या मतें कोणताही सिंहासनस्थ राजा, मृत्युलोकांतील परमेश्वराची प्रतिमा होय. सर्व प्राणिमात्रांमध्यें कोणत्याही प्रकारचा भेदभाव न ठेवितां, त्यांजवर समदृष्टि ठेवणें, म्हणजेच जगन्नियंत्याची कृपा संपादन करणें अशी माझी समजूत आहे. दुसऱ्यांस दुःखांतून मुक्त करावें, हेंच माझ्या श्रेष्ठपणाचें लक्षण आहे. जगदीशानें जे जे कोणी माझ्या सत्तेखालीं दिले आहेत, त्यांजवर मीं निरंतर दया आणि प्रसादच केला पाहिजे. सर्व मनुष्यजातीलाच नव्हे, तर परमेश्वरानें निर्मिलेल्या यच्चयावंत् प्राणिमात्रांना सुद्धां, उपद्रव देण्याचा मला अधिकार नाहीं. मग एखाद्याचा छळ करण्याला, किंवा त्यास उपद्रव देण्याला, मी कोणत्या बरें आधारावर परवानगी द्यावी ?

शिवाय, मनुष्यांच्या सहा जातींपैकीं–हिंदु म्हण–किंवा इतर कोणी म्हण–पांच जाती आहेत, असें आपल्या शास्त्रांतही सांगितलेलें नाहीं काय ? त्या सर्वांचें आजपर्यन्त मी दयार्द्रदृष्टीनें पालनपोषण करीत आलों, आणि आज केवळ तुझ्या मागणीवरून, विनाकारण, मी आपल्या मनांत विकल्प आणून त्या सर्वांचे शिरच्छेद करवावेत, हें मला उचित आहे काय ? ह्याकरितां मी अत्यंत पोक्तपणाचा विचार करून ठेवला आहे. तो हाच कीं, त्या सर्व लोकांस एकदम बंदमुक्त करून सोडून द्यावेत. आणि हेंही पण विसरतां कामा नये कीं, ज्या लोकांविषयीं आपण वाटाघाट करीत आहों, ते लोक आग्र्यांतील लोकांप्रमाणें माझी रयत आहेत. त्यापैकीं कोणी

शास्त्राभ्यास करणारे असतील, कोणी कुशल कारागीर असतील, कोणी अनेक तऱ्हेच्य सुधारणा करून मानवजातीचा फायदा करून देणारे असतील, आणि कोणी तर, आपल्या बुद्धिवैभवानें उच्च प्रतीस चढून राज्यकारभारास अत्यंत महत्त्वाची मदत करणारे असतील. हा त्यांचा सामान्य उपयोग काय ? ह्याकरितां नाना जातींचे, नाना तऱ्हेचे, व नाना धर्मांचे लोक जसे ह्या शहरांत आहेत, तसेच पृथ्वीच्या पृष्ठभागावरही आहेत. आणि ते तसेच असावेत हेंच इष्ट.

केरळकोकिळ, व. ८, अं. १, जानेवारी १८९४, पृ. १४-५.

१६०५-६ इ. स. ] (-१८-) [ ?

[जहांगीर बादशाहाचा जाहीरनामा]

१ जमीनदार लोक आपल्या हद्दींतील रयतेपासून स्टांपाचे व जकातीचे कर घेत असत, ते बंद करावे. २ प्रवासी लोकांच्या चोऱ्या होत व दरवडे पडत ते बंद करून त्यांजकरितां रस्त्यांवर ठिकठिकाणीं धर्मशाळा व विहिरी बांधाव्या. ३ व्यापारी लोकांचा माल रस्त्यांत कधींही उघडून पाहूं नये. तसेंच कोणीं इसम मरण पावल्यावर त्यास वारस नसल्यास त्याची जिंदगी सरकारांत जमा होत असे, तो प्रघात बंद करुन वारस न मिळाल्यास, त्यास अशी निवारसी जिंदगी लोकोपयोगी कामांत खर्च करावी. ४ राज्यांत मद्य तयार करूं नये व तें विकूं नये. ५ सरकारी नोकरांनीं किंवा इतरांनीं दुसऱ्यांचीं घरें आपल्या उपयोगासाठीं घेऊं नयेत, आणि राज्यांत गुन्हेगारांचे नाक कान कापण्याच्या शिक्षा सर्वथा मना करण्यांत याव्या. ६ जमीनदारांनीं अगर सरकारी नोकरांनीं रयतेच्या जमिनी त्यांजपासून आपल्या लागवडीस घेऊं नयते. ७ प्रत्येक मोठमोठ्या शहरीं रोग्यांच्या सोयीसाठीं इस्पितळें बांधून, त्यांच्या औषधपाण्याची तजवीज करण्यांत यावी. ८ माझ्या जन्मदिवसापासून वयाच्या वर्षांइतके दिवस, व प्रत्येक गुरुवार व रविवार ह्या दिवशीं राज्यांत कोणत्याही प्रकारचा पशुवध होऊं नये. ९ दर रविवारीं सूर्योपासना करण्यांत यावी. १० फौजेंतील व खासगीकडील सर्व नोकरांचे पगार सवाईपासून दुपटीपर्यंत वाढविण्यांत यावे. ११ वतनदारांची सर्व वतनें त्यांजकडे बिनतक्रार चालविण्यांत येतील. १२ किल्ल्यांतून व तुरुंगांतून फार दिवसांचे कैदी पडून राहिले आहेत, ते सोडून द्यावे.

सुमन, व. २, अं. १, जानेवारी १९२४, पृ. १२-१३.

इ. स. १६०६ पूर्वी ] (-१९-) [ —

[घृष्णेश्वराच्या मंदिरांतील शिलालेख]

१ सेवक येकोजि जैतोजि भोसळा

२ दास माळोजि बाबाजि व विठोजि बाबाजि भोसळे

३ सेवक आउजि गोविंद हणवत्या.

४ श्रीशके १६९१ विरोधिवत्सरि माघसुदि नाग बुधदिनि (३१ जानेवारी १७७०) होळकर कुलालवाल-कल्पवल्ली श्री अहल्लाबाइने श्रीतीर्थराज शिवालयाचा जीर्णोद्धार केला असे. श्रीरस्तु शिवमार्केल्पं.

विविधज्ञानविस्तार, व. ६४, अं. ४, एप्रिल १९३३, पृ. १२४.

२२ जुलै १६०७] (-२०-) [७ रबिलाखर, समान अलफ

[फारसी शिक्का]

अज रख्तखाने खुदायवंद मलिक साई मलिक अंबर खुली दयामदौलतहू बिजानेब [शिक्का][1] कारकुनानि समत जुनेर व हुदेदारानि अजहत मुकासा ई हाल व ईस्तकबाल व मोकदमानि ... मौजे आ(रवी) समत मजकुरू बिदानद सुा सन समान अलफ. फर्जद व बिराजर नारायण भट बिन अलंभट नाा ... ...

दामोधरभट फर्जद नारायेणभट गोविंदभट बिन अलंभट बिराजर

हुजूर मालुम केले जे आपणासी इनाम हक धर्मादाऊ जमीन चावर येक १८ दर सवाद मौजे मजकूर देखील नख्तयाती कुलबाब कुलकानु बाा हुजती ब सिके खास व भोगवटे वजिरानी व मुकासाई कारकीर्दी दर कारकीर्दी सालाबाद चालीले आहे. हाली साहेबाचे खुर्दखत होये मालुम जाले बराये मालमाती खातिरसी आणौनु भटजी नाा २

दामोधर भट फर्जद नारायेण भट गोविदभट बिराजर नारायेणभट

यासी इनाम जमीन चावर येक १८ दर सवाद मौजे मजकुरू देखील नख्तयाती व कुलबाब कुलकानु बाा हुजती ब सिके खास व भोगवटे वजिरानी व मुकासाई कारकीदा सालाबाद तसरूफाती चालीले असेली तेणेप्रमाणे चालवीजे. दरहरसाल खुर्द खताचा उजुर न कीजे. तुम्ही तालीक घेउनु असली फिराउनु दीजे. मोर्तब सुद

[शिक्का]

तेरीख ७ माहे रबिलाखर

रूज सुरूनीस रूजुसुद बारसुद सुरूसुद

भा. इ. सं. मं. षष्ठ संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २४, पृ. ९५-९६.

---

१. शिक्का-। जौहर+अकबरी। मुर्तझा मुंहमद ख्वाजा...।

१४ दिसेंबर १६०७ ] (–२१–) [ ५ रमजान, समान अलफ

[ फारशी शिक्का ] [ फारशी मजकूर ]

अज रख्तखाने खास बजानेबु कारकुनानी व देशमुखानि जुनर ... ... व हुदेदारानी हाल व इस्तकबाल मुतालिक ... ... साई व अमानत व मोकदमानी कसबे उतूर मामले मजकूर... ... सुहुर सन समान अलफ भटानी जुनारदार बीद्या... ... (के)शव चैतन्य माहानुभाव सो। कसबे उतूर नफर ।२ बाप ... ... मालूम... ... भट बीन नरसीह्भट मालुम केले जे बीतपशील.

| | |
|---|---|
| ... भट बीन नरसिह्भट मालुम केले आपला वालिद नरसिह्भट (बीन) वीश्वनाथभट | कासीभट बीन केशवभट मालुम केले जे आपला वालीद केशवभट बीन नरसिह्भट |

नाम जमीन चावर येक व झाडे नजीक मठ केशव चैतन्य दर ... ... कसबे उतूर मामले मजकूर बा। हुजती बासीके खास कदीम ... ... कारर कारकीर्दी बा। बुर्हान निजामस्या सन सलास तीसन (१५९२–३ इ.) (कार)कीर्दी बा। बाहादूर निजामस्या सन सीत तिसैन (१५९५–६ इ.) आहे. तेणे......भोगवठा व तसरूफाती सालाबाद ता। सन सबा अलफ (१५९६–७ इ.) ... ... हे हाली नरसीह्भट बिन विस्वनाथभट परिवक्त (जाले). केशवभट बीन नरसीभट मयेती जाला आहे. तरी आपली... ... हुजती मन्हामती होये मालूम जाले. बा। इशारती दीवाण ... ... इल्तमेसी देवविलें नरसीह्भट बीन वीस्वनाथभट... ... भट बीन नरसीह्भट वीद्यार्थी केशव चैतन्य माहानुभाव कसबे उतूर यांसि इनाम जमीन चावर येक व झाडें नजीक मठ केशव चैतन्य बा। हुजती सदरहुप्रमाणे आहे तेणे प्रमाणे ... ... ता। सबा अलफ (१५९६–७ इ.) चालत आहे. नरसीह्भट परिवक्त ... भट मयेती जाला आहे हाली यांचा इनाम यांचे फर्जंद ... ... ल... ... भट फरजद नरसीह भट काशीभट फर्जंद केशवभट करार केला आहे ता। सबा अलफ (१५९६–७ इ.) बीनाम नरसीह्भट व केशवभट भोगवटा व तसरूफाती चालीले असेली तेणे प्रमाणे ... ...ला कीजे. औलाद व अफलाद चालवीत जाइजे. दर हरसाल खुर्दखताचा उजुर न कीजे. तालीक घेऊन असली फीराऊन दीजे. बसीचे खास येकंदर इनामदारानी सन सबा अलफ छ ५ माहे रमजान झाडे नजीक मठ केशव चैतन्य जमीन चावर.

भा. इ. स. मं. त्रै., व. २, अं. १–४, क्र. ५–८, पृ. १५६.

६ मार्च १६१० ] (–२२–) [ २० जिल्हेज, असर अलफ

[ फारसी शिक्के दोन ] [ फारसी मजकूर ]

० ॥ छ कौलनामे अज दिवाण ता। राजापूर अजपूजा श्रीसरस्वंती सुहुरसन असर अलफ ता। जानो काइदेउ वा नारो काइदेउ बिराजर अंतो काइदेउ कुलक-

रणी वा मुल्यिा मोकदम मौजे कसेळी तॉा मजकूर दिला कौलनामा ऐसा जे तुमी हुजूर एउनु मालूम केले जे जमीन घाट बाबती केळकर पडिले होते तेथें पेसजी नवेदर माडणा करावेया कारकीर्दी दिलावरखान आगर रुकाई बारा माडणी करावे. इस्तवा मुदती बारा साले रकम दर रुकायासी लारी २ । ४ प्रमाणे देणे ऐसे कौलु सन इहिदे समानीन ( १५८०–८१ इ. ) कारणे घेउनु सन इसने (१५८१–८२ इ.) कारणे जे काही जमीन होते तेथे आगरमाडणी केले. तेणे चि प्रमाणे मौजेमजकूराचें माहाजनाचे कौलु वा देसायाचे कौलु महालीचें कौलु वा हुजूरचे कौलु घेतले. पुढा अंतो काइदेउ ताा मजकुरीचे निघावाना हात माहालीचे निधेबद्दल मोकासाई माहालासी आले. अंतो काइदेउ काही सक धरून बाहीर गेला आगर सिपणे विण मेले. मागुते मौजेमजकुरासी आलेवरी हुजूर एउनु अहवाल सांगोन मुदती ५ साले इस्तवा करुन मुदती १७ सतरा सालाचे कौलु घेउनु आगरासा कस्ट मस्याखती केले. इस्तवा भरला साहेबी मेजजावेया पाठविले आगर पोलि ३१९ दर सदे रुकाई ९ एकून रुकाई ६ । १५ जमीन जाहाले. आता साहेबी हेयासी पाती जगल पालक करून दर रुकायासी लारी २ । ४ एकून लारी १४।।७ मोकरर करून कौलु मरामत केलेया पेस्तर मस्याखती करावेया उमेद होईल म्हणौन वा दरीबाब देसायानी अर्दास केले जे जानो काईदेउ मौजेमजकुरीचा कुलकरणी वा मुल्यिा पूर्वापारी दिवाण नफराईस तकसीर करीत नाही. याणे नवी मांडणी करून आगरासी मस्याखती केले असे वा महाजनाचे वा देसायाचे वा माहालीचे वा हुजुरचे कौल घेतले असे साहेबी खातिरेसी आणून सदरहूप्रमाणे आगरासी पातीपालक करून दर रुकायासी रकम लारी २।४ प्रमाणे कौलु मरामत करणें म्हणौन बिनाबरा इलतमेस खातिरेसी आणून वा कौलु खातिरेसी आणून आगरासी बदल पाती

| | |
|---|---|
| किता निवई झिरगांची | किता सावरीचे काटे |
| कुडे ८१॥. | कुडे ८१॥. |

किता आगराचे मुळवरु

जमीन ८१

एकून कुडे ८४ पातीस पालक केले असे अगर सदरहू रक्कम रुकाई ६।१५ दर रुकाइयासी लारी २।४ एकून लारी १४।।७ अज अज इस्तकबिल सा तिसा अलफ. दर साल झडती करून आगरासी कीर्दी माहामूरी करून सुखे असिजे. कुलबाब मस्त करून दिले असे. नकदयाती वा तडतकसीम बाहातरी पाले माफ असे. मूल रकम सदरहू साल दरसाल झडती करून आगराची मस्याखती करून सुखे असिजे. मो। तो। २० माहे जिल्हेज

~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. ५१–५२.
~~~~~~~~~~~~

इ. स. १६१०–१६११ ] (–२३–) [ इहिदे असर अलफ

[ आरंभीचा आठ दहा बोटें कागद फाटला आहे ]

... ... ... ... ... ... ... ...

पाटील मोकदम वणी ( नांगर
+ऊ सेनीसेटीया कासार का वणी (तुले) ०
बाब मेहतरी मेहतरीया तेली का ऊणी
+ जावा सराफ का मजकूर
++ जी मेहतरीया सुतार का मजकर
( किकरें ) वासली
धुबा मेहतरीया
एकोजी वलद मो+णी भोपे गुरव
छत्रसिंग बीा ॐ
( दोन तीन नांवें अस्पष्ट )
नाऊ बीन सारंगो भोपा सप्तशृंग

नारायण भट मुलीया का वणी नारायण जोसी
बकाई सेटीण बकाल का उणी ( तागडी)
माऊ सेटी सेटीया सोनार का मार ( चिमटा )
(बापू भोजदेऊ
++
धाऊजी व नाऊ लोहार का मजकूर ( सांडस
पा नारायेन भट
साळो चांम्हार मेहतरीया का मा ( इंगा ) पा नारायेनभट
जनकोजी बीन दादू धरणा भोपा सप्तसिग ( धुपाटणें )
रंगो बीन दादू भोपा सप्तशृंग जाखो ( दो? )बीन ताजू भोपा सप्तशृंग

सुा इहिदे आसर अलफ ( १६१०–११ इ. )महजर केला ऐसा जे गोपालभट बीन विठल भट पुजारी सप्तशृंगीचे जगदंबेचा सेकिन का वणी लखमण राऊता जावलनू कोल्हाईची तकसीम पैकी रुके ८६ विकत घेतली होती ते खात आले. यावरी लखमण राऊता जवळून नकोव (?) भिऊजी भोपे गुरव जाऊ... ...सीं काहीं पैके देऊनु त्याचे लिहिल आणिले जे आपण पूजा तकसीम रुके ८६ गोपालभटी जवली गाहाण ठेविली आहे. त्यावरून गुरव भोपे मजकूर गोपालभटीसी करकसा करीत. यावरी गोपालभट मजकूर ठाणा मालूम केले त्यावरून भोपे बोला लाविले ते न येतीच. वाडी किले अहिवंत तथें जाऊनु राहिले आहेती. ये बाबे बदबी हजरती–साहेब छ माहे अर्दास इरसाल केली व गोपालभट व भोपे गुरव पैकी भिऊजी व सुरजो जोसीची(?) माय हे हुजूर जाऊनू हजरती साहेबांचे बदर मजकुरासी फर्माविले जे हर्दोंजण लखमण राऊतास हुजूर घेऊनू मुनसिफी ज( न )विले लागेल. त्यावरून भट मजकूर गावास आला. भोपे वाडीस गेले. अर्दासेचा जासूद छ–माहे–सादर साहाला+माहाली हरयेक मुनसिफी करून विले लाविले म्हणौन रजारजे लिहून गोपालभटास फर्माविले जे तू व भोपे मार ऐसे लखमण राऊती जवली जाऊनु त्याचे लिहिले घेऊनु या. त्यावरून विले लाऊनू. मग गोपालभट का कनासी विलायेती बागुलाणे तेथे जाऊनू लखमण

राऊतास कनासीच्या कारकूनानजीक नेले व भिऊजी व रगोजी व सुराजाई भोपे गुरव हेहि तेथे गेले. यावरी कनासीच्या कारकुनी व देसमुखी महाजनी बैसोनू मुनसफी मनासी आणितां लखमण राऊतास लिहिले जे तुवा कोल्हाई जवलुनू रुके ८६ विकत घेतले ते गोपालभटास विकिले आहेती आणि भोपे गुरव यासहि कागद लेहोन दिधला आहे जे गाहाण आहे म्हणौन. तरी हे काये खबर आहे ते साग. यावरी लखमण राऊते सांगितले जे आपण कोल्हाईचे तकसिमे पैकी रुके ८६ होन दोनीसे देऊन विकत घेतली होती. यावरी आपणासी खर्चाची खरमहा (?) याबदल गोपालभटीसी होनं एकसे वीस १२० किमती करून विकिला. पैकी होन आपणासी होन १९॥ पावले बाकी होन १००॥ पावले नाही याबदल आपण दखाल करून भोप गुरव यासि गाहाण म्हणौन लेहोन दिधले म्हणौन तकरीर केली. मग गोपालभटास पुसता तेणे तकरीर केली जे होन १२० हे बेबाकी पावविले येक रुका बाकी नाहीं याचे गोही आहेती. त्यांवरून लखमण राऊत व गोपालभट हे राजी होऊनू जाऊजी लोखडीया मोकदम मौजे जौळके पा ऊणी तो गोही देईल तेणे प्रमाणे कबूल असो. यावरून कनासीचे कारकुनी जाऊनीं जऊली माणूस व किताबती पाठविलीयावरी जाऊजी मजकुरे सव खाऊनू गोही लेहोन पाठविली जे आपण आपले गुजारती लखमण राऊतास होन येकसेवीस पावविले. ऐसी सडी पाठविली. यावरून लखमण राऊत खोटा जाहाला. गोपालभटे खरीदी करून घेतले हे खरे जाहाले. यावरी महजर करून गोपालभटास देऊनु हर्दो जणासी राजश्री प्रतापशाहापासि किले मोरेरेसि पाठविले तेथे रकाने दौलत माहाजन मोरेरीचे त्याचे हवाला करून मुनसिफी हर्दो जणाची खातरेसी आणिली. लखमण राऊत खोटा जाहाला. गोपालभटे खरीद केली हे तहकीक जाले. लखमण राऊतें भोपे गुरव यांसिं गाहाण लेहोन दिधले होतें ते दुरोख भोपे गुरव यासि काही समधू नाही. गोपालभटीचे रुके ८६ गोपालभटीस दिधले. महजर करून दिधला सदरहू मुनसीफी मसू......हजरती गोपजी नरसिख (ह ?) हेजीब मुकामी बागुलाणे त्याहुजूर निवडले. त्यावरून पडीत मशारनिहीलेन हजरती साहाबाचे बंदगीस अर्जदास्त लिहिली जे लखमण राऊत खोटा जाला गोपालभटे रुके ४६ सहा तक्सीम कोल्हाई लखमण राऊते खरीद केली होती ते लखमण राऊतास होन येकसेवीस १२० देऊनू विकत घेतली हे सही. आतां लखमणराऊतास व गोपालभटास समधू नाही. गाहाण म्हणौन लखमण राऊते भोपे गुरव यासि लेहोन दिधले होते ते दुरोख गोपालभटीचे रुके ८६ गोपालभटे खाणे ऐसी अर्दास दिधली. सदरहू अर्दास व महजर ऐसे घेऊनू गोपालभट मा याणी यासि आला भोपे गुरव वाडी किले अहिवंत तेथे गेले. यावरी गोपालभट मजकुरे महजर व अदर्मास ठाणा बखल दिधले केव्हां... ... लखमण राऊत गोपालभटास दिधले व हाली लखमण राऊते गोपालभटासी लिहिले दिधले ते ऐसे तमाम मनासी आणूनू रुके ८६ हा म ता केल्हाईची लखमण राऊते खरीद केली होती...गोपालभटास होन १२० येकसेवीस किमती करून विकत दिधली ते सदरहू दोन येकसेवीस लखमण राऊतास रुकियाचा

रुका पावविले. आतां गोपालभटें रुके ८८६ लेकराचे लेकरी खाणे लखमण राऊतास व गोपालभटास समधू नाही व लखमण राऊतें गुरवास गाहाण म्हणौन लिहोन दिधले होते तो कागद रद्द असे. आतां रुके ८८६ खाऊनू गोपाळभटे जगदंबेची पूजा कीजे. यासि जो कोण्ही भोपा होऊनू हिलाहरकती करील तो दिवाणीचा गुन्हेगार व जे व सराफ का उणी तेणें गाऊजी भोपा त्याचे तकसीमेपैकी रुके ८४॥ गाऊजी पासूनू विकत घेतले ते जैतोवा मजकुरे गोपालभटचे हवाला जेतोंवान केले आहेती येकूनू रुके १०॥ गोपालभट खाणे. सदरहूप्रमाणें रुके साडेदहा घेऊनू जगदंबेची पूजा करूनू असणे. सदरहू रुके साडेदाहासी व भोपे गुरव यासी अर्थाअर्थ समधू नाही. हा महजर सही मोर्तब [ फारसी शिक्का ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १-४, पृ. ६७-६९.

१६१३-१४ इ. स. ] (-२४-) [ आर्बा असर अलफ

[ फारसी शिक्का ]

छ अज रख्तखाने खोदायवंद खान अलिशान हईबतखान खुली दाम दौलतहू [ शिक्के दोन ] ता। कारकुनानि पा। पुणा बीशा हर्चा (?) सु॥ आर्बा असर अलफ ( इ. १६१३-४ ) सेत पाचुद प्रज पदमाजीराम होनप व कुरण नदी किनारें दरसबाद मौजे ब्रेहरवडे पा। मजकूर सेत पाचुद प्रज पदमाजीराम होनप रकम गला

४।३॥ कुरण सेत नदी किनारें माहासूल नख्तयाती नकद कटबाण रकम टकें ३२

बा॥ इनाम गणो गबाजी तबीब सेकीन को। मजकूर बाबनु औवलियाद आफलादु बमेजीव भोगवटा खुदर्खत रख्तखाने मोकरम दर साल गुां छ ५ रजब बा। माहासूल नख्तयाती वा बाजे बाबहाये मुतैन रवा अस्त बायेद की येशा जाहात (?) सनतल मजकूर बा॥ सालगुा दिल्हे अहि. दुबाला कीजे तालीख लिहुन घेऊन असली परतोनु दीजे. मो।

तेरीख २० जमादिलाखर इसने असरीन अलफ ( २२ एप्रिल १६२२ ).

भा. इ. सं. मं. त्रै., व. १, अं. २-३, क्र. २-३, पृ. ३४.

१६१३-४ इ. स. ] (-२५-) [ आर्बा अशर अलफ दुमद

अज रख्तखाने खुद मा॥ सर्क मा॥ अंबर दाम दोलत हू बजानेबु कारकुनानी ता॥ रोहिडा बिदानद सु॥ सन अर्बा अशर अलफ ( १६१३-४ इ. ) बजानेबु

कान्होजी नाईक जेधे देशमुख तो बोर ता मजकूर याणी मालुम केले जे मौजे कारी हा गाऊ इसाफत रकम टके ४० चाळीसा टके रकमेचा आम्हाकडे दरोबस्त पेसजीपासोन चालत आहे. तो गाऊ आम्ही व आमचे वडिलानी हाशम लोक आमचे तर्फेचे आमचे वडिलांचे व आमचे उपयोगी पडूनु ता मजकुरीची देशमुखी मिळऊनु दिल्ही. त्याबद्दल हासमवाले यांसी इमान प्रमाण श्रीरायरेश्वर देवाजवळ क्रिया हिंदुधर्माची होऊन ता मजकूरचे गांवगन्नापैकीं देशमुखी वतनाबद्दल निमे हक कुल बाब देऊ असा करार जाला. ते कराराप्रमाणें देणे. देसमुखीचें वतन दिवाणातून मिळाले वचना प्रा हासम लोकांस गांवगन्ना पा निमे वतन द्यावें तरी वतनाचा बखेडा होतो. याजकरितां सारे हाशम लोक आमचे तर्फेचे जमा होऊनु त्याची समजूत काढिली ती अशी कीं सारे लोकांस सदरहु मौजे कारी हा गांव आमचे इसाफतीचा होता यात सारे लोकानीं समजावें. याजवरूनु सारे हाशन लोक प्रभु बाबाजी व फडणीस सु राजी होऊनु कारी गांव हावाला करूनु घेतला. तेवेळीं आमचे वडिलानी व हाली आम्ही ठरविलें कीं आम्ही आपले एक घर बांधुनु मो मजकुरी राहूं. याचे कारण आमचे जिन्हे हाशम लोकांनीं पेसजी वाचविले तैसे पुढेंही वाचविले पाहिजेत. याजकरितां एक घर बांधुनु राहूं. आमची चाकरी हाशम लोकांनी शिरस्ते प्रो तरवारेची करूनु आम्हांस सांभाळावें मा मजकूरीचे शेतें, तळे, वाटा व गाऊ रानांत व डोंगरांचे माथा ...पटींस असामदाराचे मिरासी सेतांत वगैरे जागीं आम्हीं व आमचे वंशी सेते करणार नाहींत. शेते करूं तरी आम्हास व आमचे वंशास सफत श्रीनागोबाची असे. तुमची तुम्ही सेते करावी व सारे हाशम व लोक याणी कुल बाब कुल कानू अवलाद अफलादीचे फर्जदाचे फर्जदाची करुनु वतन खावे. अवलाद अफलादीस फर्जंद नसलियास त्या असामदाराचे आसामीवर दुसरा जदीद असामदार कायम करण्यास व बेहडा कायम राखणे ही मालकी हाशम लोकाची. आम्हाकडे मालकी चाकरी घेण्याची या प्रमाणें व आमचे देशमुखीचा एक हक लाजिमा एकंदर यक कारी मजकूरचा... ... हक करुनु दिल्हा असे. हे नरसप्रभु फरजंद दाद प्रभु देसकुलकरणी व गाउ-कुलकरणी दुतर्फी किले मजकूर यास पेशजी आमचे वडिलानी व हाली आम्ही.... ... प्रो देशकुलकरणी व गाऊकुलकरणी हे लढाईचे प्रसंगांत ठार जाले ते वेळेचे देणे वसूल... ... टके ५॥ चालत आहेत. त्याप्रमाणेंच पांच टकियाची हद मौजे मजकूर व मौजे अंगसोळेची सीव पान व हाळ कारी पैकीं आपली वाटणी वहाळ--अंगसोळ पैकीं या (हदी) ची याचे मधील ( वहाळ ) दिल्हे. याबद्दल डावे पाण... ... ती बद्दल बांधाचे खाली आंबे वहाळेतील खडकाचे पाणी या पाण्याचे खालून सीव ओढ्या पलीकडे बुडकुंबा गडघूवरुनु तपे हिरडस मावळची... ... नाग धोंडे डोंगराचे दांडीने पाणलोट आले त्या शिवेचे नजीक कोंढाळकर ठाकर याचे मिराशीचा हादीपासोन सारा ... ... जी प्रभु हे मा तुमचे वडील याची दांड शेताचे... ... येकंदर पुरवणींचे रानसुद्धां टके पांच याची हाद टका ॥.

येकूण साडे पांच टके बक्षिस मौ मजकूर पैकीं जिल्ह्यांत व याचे हक लाजिमा वगैरे कुलबाब कुलकानू कायदे त्याचे...... कीने अनभवतील व .... फर्जंद येसाजी नाईक जेधे यांचे इनामदार व एकंदर हशम लोक मिळोन टके २४॥ खेरीज बाजे वतनदार टके ७॥ जमाबंदी प्रमाणे दिवाणी बाब वगैरे हशम लोक याणी देऊनु आपलाले बाबे...... वतन कुल मोकदम...... एकंदर मानपान वगैरे दिवाण...... म्हैस...... टका लग्न एका...... वगैरेसुधां...... याप्रमाणें आमचे तर्फेने देरोबस सदरहु हाशम लोकांकडे चालत आहे म्हणोनु मालुम केले. तरी सालाबाद ...... मार्फती कारकीर्दी दर कारकीर्दी वतन (इसन्ने अशर) (१६११-२ इ.) चालिले आले. साल गुदस्त सन सलास (१६१२-१३ इ.) या सालांत कारकुनी इस्कील केली आहे. साहेबी हाक मन्हामती फर्मावुनु त्याचे दुमाले करूनु खुर्दखत मन्हामती होय म्हणोनु मालुम केले. तरी देशमुख तर्फेने मौजे मजकूर यासी व ...... सदरहु प्रमाणें एकंदर इसाफती आपली व देशमुखीचा हक लाजिमा ... ... दरोबस्त आहे. खेरीज देशकुलकरणी व गाऊकुलकरणी प्रभु आमचे इनाम व हाक लाजिमा वगैरे बाबी व बाजे वतनदार याची व बाबची फर्जंद येसाजी जेधे याचे टके व दिवाणचा दस्त जे चालत असेल ते एकंदर खेरीज करूनु सदरहु हाशम लोक वगैरे याजकडे... तसरूफाती कारकीर्दी दरकारकीर्दी ...चालिले असेल तेणें प्रमाणें चालविणे. कुल हाशम लोकांस फिराऊन दीजे. मोर्तब सुद[1]

रूज सुरू नवीस माहे जिल्हेज

सहविचार, व. ७, अं ३, डिसेंबर १९२८, पृ. ११४-११६; विविधज्ञानविस्तार, व. ६१, अं. १, जानेवारी १९३०, म. पृ. २-३.

११ आगष्ट १६१४ ] (- २६ -) [ १५ रजब, खमस असर अलफ

हजरती बुऱ्हान निजाम शाहा मासाहेब

[ फारसी शिका ]

अज महाल मो अजम अकरांन हजरत ......दांम हसमत हू व जी दौलत हु ता कारकुनानी हाल व इस्तकबाल व मोकदमानि कसबे पेडगौ पा पाडिया पेडगौ बिंदानद की सुा सन म स असर अलफ दरवझे बदल साद बालमुर (?) हजरत खिलफत व खुलीदत व खिलफत... कुलींद खिलफत हु बेस्मी गोपाल विठल ती मौलादाद यासी जमीन चावर नीम गज शराई ॥ मुजेरदार (?)...... व बाहासुल व देखील नख्तयाती.

तालुके ठाणा व तालुके देहाये व पाटिया हाली व पेस्तर कुलबाब कुलकानु इनमा अजमन्हामती केले असे. दुबाल कीजे. अवलाद व आफलाद चालविजे. नालत

१. हें पत्र बालबोधींत आहे.

२८ सप्टेंबर १६३९ ] (-५५-) [ १० जमादिलाखर, आर्बैन अलफ

मा बा राजश्री हुदेदार मौजे परिंचे पा पुणे यासि राजेश्री दादाजी कोंडदेव सुभेदार नामजाद किले कोंढाणा महालानिहाये विनती. सुा सन अर्बैन अलफ. रतनोजीन आपली तकसीम परीचकरास दिधली होती. याबद्दल दोघा जणा मधें करकर होती. यावरी समस्त गोत मिलोनु परीचकराचे होनु २२ पडिले ते रतनोजीस द्यायास मवसर नवती म्हणौनु आम्ही म्हटिले जे बावीस होनु देणे. त्या वरुनु कृष्णाजीन रतनोजीचे हाते बावीस होनु परिचकरास दिधले. महजर तरी कृष्णाजीन आम्हापासी दीधला आहे. आम्ही.........

[ शिक्का ] [ शिक्का ]

तेरीख १० जमादिलाखर

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ३९.

जानेवारी १६४१ ] ( – ५६ – ) [ आर्बैन अलफ, सन १०५०

हुवल जलील अल मुल्कलिल्लाहे

[ महमद इब्राहिम आदिलशाहाचा शिक्का ]

फर्माने हुमायन शरफे सुद्रयाफ्त बजानिबें उहदेदारान व कारकूनान् परगन जमखंडी मआमिले तोरगल अज शुहूर सने आरबाईन अल्फ ( १६३९-४० इ. ). बबसिलेहे बार याफ्तगाने दरगाहे सपेहरजा व अर्ज मुकद्दस रसीद के विरूपाकछ लिंगासस देसकुलकरनी परगनए मजकूर मोजेए कंकणवाडी परगनए मजकुर ब्रमूजेबे फरामीने शाही इनआम जारी व रवानअस्त अकनून बर कामगारी देसकुलकरनीए मजकूररा मजरए होनर मए पटेलकीए आन्जा इन्आम व दो रतबे फसकी व पटेलकी व तेल ब सुपारी व तमाखू व चौगी हरजिन्स व मस्क व बिसवा (?) थळमोड व थळ भरती व उमेमारग वगैरे कुल बाब व कुलजूहात अज कस्बे व दिहाये निस्फ देसक आनजा नजरे इनायत फर्मूदन्द देसकुलकरनीए मजकूर दो हजार होन पटेलकी तोफे ( नजराणा ) महल्ले जामदारखाने जकात दाखिल गर्दानीदा के देसकुलकरणीए मजकूररा फर्मान अशरफ आतेफत फर्मायन्द अर्जे आनहा ब खातिर आवर्दे मौजए कंकणवाडी इनआमे कदीम व मजे होनुर बा पटेलकीए अब्दी इनआमे जदीद अब्दी व इकरामे सरमदी दो रूतबे वगैरे कुलबाब व कुलउजूहात नवीश्त अससुद्र अज कसबे व दिहाये निस्फ देसक आन्जा देसकुलकरनी मजकूररा अज राहे मराहिमे पादशाहाने व फतें अबातिफे खुसरबाने फर्मान आतेफत दीवानी मरहमत फर्मूदा शुद्मीबायद्के कदीम व मजरएजदीद मजकुर दाखिले महसूल व नग्दि-

यात् व जमीए लवाजमात् मीशुद् व निगार फर्मायेष व जर् अबवावे वेठी सिक्के हुमायन वगैरे इमारत व बाजी बेठ बेगारी मुबारके मुतबर्रिके मअदनुलअम्र मंबटसुरूर व दो रूतबे देसाई नाडगौडा बाजे कुलबाब व कुलूजहात व साएर कानूनात् इस्मी व रस्मी कलमी व कादीमी नवदी व जिन्सी कैली व वजनी आनचे दर दफातिरे अआला सबत अस्त व पीशतर एहृदास खाहदशुद तमामी दुम्बाले नुमायन्द व दरीन् बाब ताकीदे बलीघे व कदगने अजीम लाजिम दानिस्ते अज फर्मूदए अशरफ इनहराफ न वर्जन्द बादे मुशारेइलै ब अवलाद व अहफाद उ जारी साजन्द व उजे फर्माने हस्साले नकर्दे सालबसाल बहमानि् फर्मान इनायत खानदारन्द व नकले नविश्ते गिरिखते अस्ल फर्मान बाज देहन्द बरहुक्मे फर्माने अशरफ खन्द तहरीग फी तारिख पाञ्जदहुमे शहरे शव्वालुल मुकर्रम सनें १०५० परवानगीए हुजूरे खुर्शीद जुहुरे अशरफे अकदसे हुमायूनें आला [ तीन शिक्के ][1]

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १–४, क्र. ५–८ पृ. ७७–७८.

३० जानेवारी १६४३ ] (–५७–) [ १९ जिल्काद, हि. १०५२

[ आदिलशाही फर्मान–सारांश ]

काजी सअीद यानें जाणावें कीं, या वेळीं फर्जंद शाहाजी राजे भोसले यानें (मदुरेच्या) त्रिमल नायकाची राज्यनिष्ठा व सत्सेवा यांची हकीकत सांगितली. म्हणून त्याचें उर्जित करून त्यास पंजाचें फर्मान पाठविलें आहे. आतां हें फर्मान शाहाजीकडे पाठवावें. आणखी असें कळलें कीं शाहाजीस त्याच बाजूस नियुक्त केलें आहे. फार चांगलें केलें. तो मदतीबाबत जें लिहील त्याप्रमाणें कुमक करीत जावी. म्हणजे तो त्या बाजूच्या गनीमांस नेस्तनाबूद करील.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २९५–६.

१७ मे १६४३ ] (–५८–) [ ज्येष्ठ शुद्ध ९, शके १५६५,
७ रबिलावल, बुधवार
सलास आर्बैन अलफ

[ कल्याण येथील ताम्रपट ]

पत्रा १ बाजू १

महरजरना–

पत्रा १ बाजू २

५ बाउबा व गोवीदपत १

१. शिका पहिला—‘ बन्देहे दरगाही महमद आदिलशाही आगा खुसरब सनें १०५० ’ दुसरा—‘ महमदखानी दुनया व दीन अमीन मुस्तफा ’. तिसरा—अस्पष्ट.

मा जमीदार
देसमुख देसपा-
डे थल आनले

चीहुजुर राजेश्री सावंत-
राउ आदीकरी ता हाय्ये
समत जुनर कानपाटी-
ळ आवारी मौजे तो न-

पत्रा २ बाजू १

रनदेउ तरफ भादे यास
बहीरपाटील सातव मो-
कदम नीमे मौजे मा सुर-
सन सळास अर्बईन आ-
ळफ लेहोन दीधले य

पत्रा २ बाजू २

यैसे जे मौजे माची नी
मे मोकदमी आपली या-
वरी आजीतागाईत दी-
वानीचा पैका उगवनी
करीता हाळ उरला

पत्रा ३ बाजू १

नाही पुढें कीर्दी करावया
समवसर नाही दिवान त-
री कीर्दी सोडी ना या बद-
ळ मौजे मजकुरीची नीमे
मोकदमी आपली आपन

पत्रा ३ बाजू २

तुम्हास वीकली तुम्हापा-
सुन होन १८/३० ८ आठरा/तीनरा घे
उन तुम्हास मीरासी क-
रून दीधली सुप्र लेक-
पूर्वी अहीरकराच्र नीम
च्यात्मीयाजानी

पत्रा ४ बाजू १

एही सकरळ सातव
राचे लेकरी पाने यास
जो कोन्ही इस्कीळ करी-
ळ त्यास आपन वारूने हे
ळीहीळे सह
[नांगर]

पत्रा ४ बाजू २

........................गौही

| | |
|---|---|
| मायापा- | बेउ पाटी |
| टील मोकद- | ळ फर्जंद को- |
| म मौजे अ- | ड पाटील घो- |
| नवले | गा मौजे येने |
| येमाजी | बुजरूष |

पत्रा ५ बाजू १

चाळप केदारि

| | |
|---|---|
| | पाल |
| चीपळा मौ- | काउ पाटील |
| जे सीवे | हुळवळा |
| रामजी धा | मौजे वाकडी |
| यभोर ग चौ- | प्रगने पुना |
| गळा तोरनदेउ | |

पत्रा ५ बाजू २

परस पाा बच्चा १५६५

| | |
|---|---|
| तेरीष ७ र- | नरस पाटील |
| बीळवळ | धोगा मोकद- |
| सके १५६५ | म मौजे यने |
| सुभान ना- | बुजरूषे |
| जावभट | औण्ये |
| भोमो | पाळु |

| पत्रा ६ बाजू १ | पत्रा ६ बाजू २ |
|---|---|
| म सवछरे जेस्ट सु- | यास मुजाहीम |
| ध नवमी बुधवार | होई तो गोताचा पो- |
| ळीहीळे सही नामा | टा दीवानचा गुनेगा- |
| माहार मेहत्रया | र पुर्वजाची शेफ- |
| | त असे |

प्रभात, धुळें, व. १, अं. ६, इ. स. १९०६, पृ. २-८.

२० आगस्ट १६४३ ] (-५९-) [१४ जमादिलाखर, हि. १०५३

[ आदिलशाही फर्मान-सारांश ]

फर्जंद शाहाजी भोसले याने जाणावें की, विश्वासू नरसिंगराव याच्या अर्जावरून ध्यानांत आलें की, यापूर्वी जमेत हजर करण्याविषयी अितर सरदारांप्रमाणें तुलाहि हुकूम सुटला असतां तू फिकीरींत पडला आहेस. तरी तूं समजावेंस की, अितरांप्रमाणें तुलाहि हुकूम झाला एवढेंच. हुकूम होईतो तुझें मन निर्धास्त होतें. कारण तुझा विश्वास व जमेतीचे ऐक्य कायम होते. आमचा विश्वास आहे की, तू हुजूरचा जुना चाकर आहेस. तूं जमेतीकडून सतत हुजूरचे काम करून घेशील. तुझी राज्यनिष्ठा, कार्यज्ञातृत्व, चाकरी व प्राणार्पणता हे गुण आम्ही जाणतों. तूं सर्व तऱ्हेनें संतुष्ट रहावें. फिकीर करूं नये. आमचें तुजवर वाढतें लक्ष आहे. नरसिंगरावाच्या लिहिल्यावरून तुजवर फार कृपा आहे असें समजावें.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २९६.

२८ मार्च १६४४ ] (-६०-) [ २८ मोहरम हि. १०५४

[ आदिलशाही फर्मान-सारांश ]

महाराज फर्जंद शाहाजी भोसले याने जाणावें कीं, तू पाठविलेला राज्यनिष्ठे-विषयीचा अर्ज ध्यानांत येऊन पसंतीस उतरला. नबाब खानबाबा शाहाणे आहेत व तू दूरदर्शी आहेस. म्हणून आम्ही नबाबांस हुकूम केला आहे कीं, त्यांनीं राज्याच्या हिताचें दिसेल तें करावें आणि सिवाप्याच्या विनंतीप्रमाणें योग्य दिसले तसा तह करावा. तसेंच राज्यहिताच्या इतर कामांत गर्क असावे. तुला हिताचें वाटेल तें तूं नबाबांचे नजरेस आणावें म्हणजे ते निर्णय देतील. तिकडील हकीकत नेहमी इकडे लिहून पाठवीत जावी.

इक्केरी येथें नबाबाकडून आले.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४९, पृ. २९६.

१ जून १६४४ ] (-६१-) [५ रबिलाखर, खमस आर्बैन अलफ

[ फारशी तीन ओळी ]

अज सुभा खुदायेवद खान अलीशाने खाने अजम रस्तुमेजमा कुलीदयाम दौलत [ फारसी शिक्का ] हु बजानेबु कारकुनानि हाल व इस्तकबाल व देसमुखानि व अदि-(कारि) यानि मामले मुर्तजाबाद ऊरुफ चेउल बिदानद सुा खमस अरबैन अलफ जमायत मोमिनानि कसबे चेऊल व जेमायत मोमिनानि वा पा (ठाण?) माहिमकर सा... नाबाद मा मजकुर हुजुर येऊनु मालुम केल जे आपणास सारा व बेगार फर्मासी व उलफ व बिराड व सायेर व दुर्ग र्व व दुर्गी (मुर्ग व मुर्गी ?) हरयेक माफ असे व अब्र रशीम व सूत व ताफता व पटा हरयेक जीस विणीताती सारा व महसूल व पटी हाये हरयेक बा फर्मान निजामशा का मलिकंअबर कारकीर्दी दर कारकीर्दी सालाबाद माफ असे. आपणास मद्र लाहारी ३६८ यासि क्षेत्री १८ व मोमीन १८ देत आहे. जाम हाये बा घाटवलास जकाती सालाबाद नाही व रेसीमासी जकाती दर मणं लाहर देत आहे. बा फर्मान निजामशा चालिले आहे व हाली फर्मानें हुमायून सादर आहे. नजरयैनाती फर्माऊनु मऱ्हामती होये ऐसे (?) मालुम केलें. तरी मोमिमान यासि बरहुकुम फर्मान निजामशाहा फर्मान..युन यासि सारा बेगार व फर्मासी उलफ उजुहाती व ब बिराडखाट व दुर्ग व दुर्ग ई. (मुर्ग व मुर्गी ?) माफ कारकीर्दी दर कारकीर्दी मलिकअबर ता चालत आले असेल तेणे प्रमाणेंच चालावीत जाणे व अब्र रेसीम व सूत व ताप्ता व पटा हरयेक जिनस मा मजकुरी विणतील यासि महसूल व पटिया कुलबाब कानु इसमी व रसमी व कलमी व कदमी भोगवटा तसरुफ माफ कारकीर्दी सालाबाद चालत आले असेल तणें प्रमाणें माफ करणें. मोमीन व क्षेत्री लाहारी ३६ क्षेत्री १८ व मोमीन लाहारी १८ दरहर साल सालाबाद प्रमाणें देत असतील तेणे ठाणा प्रमाणें उसूल करणे. अब्र रेसीमासी जकाती लाहारी ४। प्रमाणें घेत आले आहेती तेणे प्रमाणे घेत जाणे. जामा घाटवल व सुतास जकाती मोमीनास बा फर्मानें हुमायुन प्रमाणे नेघणे. यासि तसवीस नेदीजे. दरहरसाल खर्द खताचा उजर न कीजे. तालीक घेऊनु असल फिराउनु दीजे. पा ++ मोर्तब सुद [ शिक्का ]

तेरीख ५ रबिलाखर माहे रबिलाखर

रुजु दफ्तरखास रुजु शुरुनिवीस

भा. इ. सं. मं. त्रै., व. ३, अं. १, पृ. १५-१६, परिशिष्ट.

मे १६४४ ते मार्च १६४५ ] ( – ६२ – ) [ शके १५६६, खमस आर्बैन अलफ

चंडिका

छ श्री तीर्थस्वरूप राजश्री गणेशभट दीक्षित सो वणी प्रती राजश्री दताजि राजे दडवत विनति सुा खमस अर्बैन अलफ शक १५६६ तारण नाम संवत्सरे. तुम्हांस श्री चा जप सागितली आहे. जप पुजा करीत जाणे. सप्तसतीचे येक आवर्तन करीत जाणे. तुम्हांस वरूशासन रुपये १२० पुजा रुपये तीन ३० येकूनु रुपये १५० पंधरा देत जाऊनू. जप प्रत्यही व पूजा करीत जाणे [ मोर्तब-शिक्का ] [ शिक्का ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १ त ४, पृ. ७२.

१८ जून १६४६] ( – ६३ – ) [१४ जमादिलावल, सबा अर्बैन अलफ

माा हा राजमान्याविराजति राजमान्य
राजश्री चदरराऊ राजे गोसावि यासि

जाब सुद

॥ छ ॥ श्रीमत प्रहुडीप्रताप अखडित लक्ष्मी आलकृत परोपकार मूर्ती माहामेरु राजमान्य राजश्री......प्रति स्नहआकित गोमाजी नरसिह व रामाजी कृस्ण हवाले अफजलपूर महमूदशाही उरुफ का बावधान पा वाई रामराम विसेश. येथील क्षेम तो ध र्म श्री...गोसावि स्वकीये कुशल लिहि ती आज्ञा केली पाहिजे. विशेश पिलाजी मालोजी बिराजर देसाई इही वाडी कसबे मजकुरीची मारूनु वस्तभाव नेली व कुणबी २ धरूनु नेले होते. त्यास मार करूनु व गोणिया मधे घालूनु त्या पासूनु कतबे लेहोनु घेतले व जमान घेतले. तोवरी गोसावि यासि खबर लिहिली. त्या वरुनु त्यास लेहोन कुणबी सोडविले. परतु त्याची वस्तभाव दिधली नाही. जमानदारास तगादा करिताती तो जमादार येऊनु या कुणबियासि तगादा लावितो. यावरुनु रयेता बेदील होऊनु वाडी पडते. वाडी पडली म्हणिजे दुरी दराज लागेली. तरी राउळी त्यास कागद लेहोनु त्याचा कतबा व याच्या वस्ता पाठऊनु देविलिया पाहिजेती. गोसाविया मधे व हजरती साहेबा मधे धेगलीक नाही आणि [फारसी शिक्का] दरम्यान हे लोक यैसे अमल करुनु बदलाम करिताती. तरि त्यास ताकीद लेहोनु सदरहू गोष्टीचा तगादा तोडूनु टाकविला पाहिजे. या उतरा वरूनु हुजूर खबर लिहिणे लागेली ये विसी बहूत काये लिहिणे. गोसावि विवेकी आहेती. कृपा असो देऊनु कागदी पत्री साभाळित जाणे. छ १४ जमादिलोवल सुा सबा अर्बैन. अलफ हे विनति. मोर्तबु [ फारसी शिक्का–मोर्तब ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. ६–७.

३० आक्टोबर १६४६ ] (–६४–) [ १ सवाल, सबा आर्बैन अलफ.

[शिका][1]

अज रख्तखाने राजश्री सीवाजि राजे दामदौलतहू बजानेब कारकुनानि हाल व इस्तकबाल पा इदापूर बिदानद सुा सबा अर्बैन अलफ. बो संभाजि भोसले देसमुख पा मजकूर हुजूर एउनु मालूम केले जे आपणासि इनाम बा मोकदमी मीरासि कसबे मजकूर जमीन चावर जिराती ४॥।- पा उणे पाच दर सबाद कसबे मजकूर बा थल निमजपा अज चावर पाच पैकी बा फर्मान हद सिके खास देखील नख्तयाती ता ठाणे ता देहाये व बाजे पटिया व महसूल व ऊट'र कडबा व बाजे बाबा व वेठी बेगारी फर्मासी कुलबाब कुलकानू खा आहे. सालाबाद भोगवटे तसरूफाती चालत आले आहे. हाली साहेबासि मुकासा अर्जानी जाला आहे. माहाली कारकून ताजे खुर्द खताचा उजूर करितातीं. सरजाम होए मालूम जाले. तरी बो सभाजि भोसले देसमुख पा मा यासि इनाम बा मोकदमी मीरासि कसबे मजकूर जमीन जिराती चावर पा उणे पाच पैकी बा फर्मान हद सिके खास देखील नख्तयाती ता ठाणे ता देहाय व बाजे पटिया व महसूल व ऊट व कडबा व बाजे बाबा व वेठी बेगारी फर्मासी कुल बाब कुल कानू भोगवटे तसरूफाती सालाबाद चालिले असेली तेणे प्रमाणे दिधले आहे. दुमाले कीजे. औलाद अफलाद चालविजे. दर हर साल ताजे खुर्द खताचा उजूर न कीजे. तालीक घेउनु असली फिराउनु दीजे. मोर्तब सूद [शिका[2] ]

तेरीख १ माहे सौवाल सौवाल

सुरु सूद

भा. इ. सं. मं., चतुर्थ संमेलनवृत्त, स्वी. ग्रं. क्र. १८, पृ. ६८–६९

३० आक्टोबर १६४६ ] (–६५–) [ १ सवाल, सबा आर्बैन अलफ

[शिका[1] ]

अज रख्तखाने राजश्री सीवाजि राजे दामदौलतहू बजानेबु कारकुनानि हाल व इस्तकबाल व मोकदमानि देहाये पा इदापूर बिदानद सुा सबा अर्बैन अलफ. दरवज बदल इनाम बो सभाजि भोसले देसमुख पा मजकूर जमीन चावर २२८१५ ता

---

१. शिका–' प्रतिपच्चंद्र : रेखेव वर्धिष्णुर्वि : श्ववंदिता ॥ शाहसू : नोः शिवस्यैषा मुद्रा : भद्राय राजते ॥ '.

२. शिका–' मर्या : देयं विरा : जते '.

| जिराती चावर | बागाईत चावर |
|---|---|
| २२८ | ८१५ |

दर सवाद कसबे मजकूर बागाईत बा। भलई नजीक राजमळा बिघे पंधरा ८१५

दर सवाद गावगना पा। मजकूर जिराती चावर बावीस २२८.

| | |
|---|---|
| मौजे निरवागी चावर १८ | मौजे कलब चावर १८ |
| मौजे आथरूणे चावर १८ | मौजे सेलगौ चावर १८ |
| मौजे कोरटी चावर १८ | मौजे निरगुड चावर १८ |
| मौजे मदनवाडी चावर १८ | मौजे रूई चावर १८ |
| मौजे अकोले चावर १८ | मौजे कोळठण चावर १८ |
| मौजे अवणी चावर १८ | मौजे भोडगौ चावर १८ |
| मौजे गोतौडी चावर १८ | मौजे काठी चावर १८ |
| मौजे वडकुटे खुर्द चावर १८ | मौजे वडकुटे बु। चावर १८ |
| मौजे सेटफळे गंडे चावर १८ | मौजे सणसर चावर १८ |
| मौजे बाबुलगौ चावर १८ | मौजे खोरवची चावर १८ |
| मौजे सादलगौ चावर १८ | मौजे डाबीज चावर १८ |

सदरहू प्रमाणे अजराह रन्हामती दिधले असे. देखील नख्तयाती ता। ठाणे व बा। देहाये व बाजे पटिया व महसूल व ऊट व कडबा व बाजे बाबा व वेठी बेगारी व फर्मासी कुल बाब कुल कानू दुमाले कीजे. औलाद अफलाद चालविजे. दर हर साल ताजे खुर्द खताचा उजूर न कीजे. तालिक घेउनु असली फिराऊनु दीजे. मोर्तब सुद [ शिक्का [2] ]

तेरीख १ सौवाल माहे सौवाल सुरू सुद

भा. इ. सं. मं. चतुर्थ-संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. १८, पृ. ७०-७१.

२२ डिसेंबर १६४६ ] ( – ६६ – ) [ २४ जिल्काद, हि. १०५६

[ आदिलशाही फर्मान–सारांश

असदखानानें जाणावें की, बाजी घोरपडे यास अंबरखानाबरोबर मसलतीसाठीं कर्नाटक तर्फेस मुद्दाम नियुक्त केलें आहे. तरी हे फर्मान पावतांच तुजजवळ बाजी घोरपड्याचे भाऊ व जमाव असतील त्यांस निरोप द्यावा. म्हणजे ते ताबडतोब उपर्युक्त खानापाशीं जातील. याविषयी क्षणाचाहि उशीर लावूं नये.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २९६.

---

१. शिक्का– " प्रतिपच्चंद्र : रेखेव वर्धिष्णुर्वि : श्ववंदिता ॥ शाहसू : नोः शिवस्यैषा मुद्रा : भद्राय राजते ॥ "

२. शिक्का– " मर्या : देयं विरा : जते.'

२३ मार्च १६४७ ] (–६७–) [ २५ सफर, हि. १०५७

[ आदिलशाही फर्मान–सारांश ]

महाराज फर्जंद शाहाजी भोसले याने जाणावें की, तुझेजवळ असलले भेटीचे (नजरेचें) द्रव्य व हती आणि हुजूरची पागा यांस हुजूरकडे पाठवून द्यावें असा पूर्वी हुकूम केला होता. आता हुकूम होतो की, अजमखानावर जबाबदारी टाकून आणि स्वतःची जमेत व हुजूरपागा त्याजबरोबर देऊन भेटीचें द्रव्य व हत्ती यांसह मोठ्या हुशारीने त्यास बंगळूरच्या सरहद्दीपर्यन्त पोचवावे. तेथून तुझा मुलगा संबजी भोसले याने स्वतःची जमेत बरोबर देऊन द्रव्य, हत्ती व हुजूरपागा यांसह अजमखानास दरबाराकडे आणून पोचवावे. हा हुकूम पावतांच वरील काम समजेल तसें पण काळजीने व हुशारीने करावें.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २९६–७.

२० एप्रिल १६४७ ] (–६८–) [ २४ रबिलावल, हि. १०५७

[ आदिलशाही फर्मान–सारांश ]

बेचप्पा रघुनाथ याने जाणावें की, कुत्बशाहानें जो प्रदेश ताब्यांत आणला आहे त्यांतून दहा लाख होन व पंचवीस हती द्यावयाचे आणि मलिक अब्दुल बहहाब याने जो अधिक प्रदेश ताब्यांत घेतला आहे तो सोडून द्यावयाचा असा करारमदार पूर्वी झाला होता. यांत कोणाचाहि विरोध नव्हता. याच बाबतींत महाराज फर्जंद शाहाजी भोसले व अंबरखान यांनी जे करारमदार व शपथा केल्या असतील व करतील ते करारमदार व शपथा आमच्या आहेत असें समजावें. रायलवर करावयाच्या मोहिमेविषयीं आमच्या मनांत कोणताहि हेतु नाहीं. परंतु उपर्युक्त रक्कम व हती पाठविण्यांत दिरंगाई कां करतां ? आता जरूर आहे की, उपर्युक्त महाराज व खान यांनीं केलेल्या करारमदारांवर विश्वास ठेवून रक्कम व हती ताबडतोब पाठवून द्यावे. आपली निष्ठा व्यक्त करून स्वतःचें उर्जित करून घ्यावें.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २९७.

५ मे १६४७ ] (–६९–) [ ९ रबिलाखर, हि. १०५७

[ आदिलशाही फर्मान–सारांश ]

(हि. १०५७ रबिलाखर ९, श. १५६९ वैशाख शुद्ध १२, अि. १६४७ मे ५)

महाराज फर्जंद शाहाजी भोसले यानें जाणावें की, यापूर्वी जासुदाच्या सतरा जोड्या बंगळूर किल्ल्यापासून डाक बसविण्यासाठी लश्कराबरोबर पाठविल्या होत्या.

आतां त्यांपैकी बारा जोड्या जासूद व कासिदहि तुजकडे पाठविले आहेत. तरी जागोजाग डाक बसवून प्रत्येक जासूद जोडीस दरमहा सव्वातीन होन व मुक्कामावर असलेल्या प्रत्येक जासूद जोडीस दरमहा सव्वादोन होन, तीन दुवल व बेल येवढा तनखा जासूद खात्याच्या जाबत्याप्रमाणें देत जावा.

सह्याद्रि, व. ११. अं. ५, मे १९४५, पृ. २९७.

१६४६–१६४७ इ. स. ] (– ७० –) [ सबा आर्बैन अलफ

[ फारसी शिक्का ] कौलनामे अजरख्तखाने खोदायवंद खाने अजमे अकरमे हुसैन अलीखान साहेब सरगुरो मोकासाई कसबे पांवस मामले मुजाफुराबाद सुहुरसन सबा अरबैन अलफ. ताहा विश्वनाथ जोइसी वृतीवंत कसबे तपे मजकूर बाब कौलनामा ऐसा जे. तुम्ही हुजुर येउनु मालुक केलें जे आपले आगरवाडा महाजनी कसबा तेथे असे त्याचे मख्ता माहालून नकदेयांत वा बैजेउजुहाती मख्ता लारी २५ पंचवीस त्यामधें ला १० दाहा आपणासी आहे. ही इनाम दिले असे. ते साल व साल भोगवंट होत असे. वरकड झडती होत असे. आपणासी तकसीमात सालाबाद जोईसी म्हणोन माफ असे. येणेप्रमाणे सालाबाद भोगवंट चालत असे. तेणेप्रमाणे साहेबी कौल सादीर केले प्रमाणे साहेबासी द्वा देऊन असैन म्हणौन॰ मग बराय इलतमायेस खातीरैसी अणून तुमसी तकसीमात माफ केले असे. वरकड मख्ता साल ब साल देऊन सुखें असिजे. वरकड वावड मजकुराचे खुंटाचे असे. त्यामधें तुमचें अगराचें खुंट उणे केलें असे. तकसीमात कुल बाबी होती या निस्बत नाहीं. तुमाम्ही माफ केले असे. आगरासी कस्ट मशागती आपले जोतिसी वृत्ती कमाविस करून सुखें असिजे. दरबाब खातीरजमा करून असिजे. दरी बाब कौल असे. मोर्तब [ फारसी शिक्का ]

भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलनवृत्त, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. ७२–७३.

७ सप्टेंबर १६४९ ] (– ७१ –) [ ९ रमजान, सने १०५९

हुवल खलील

अलमुक लिल्लाहे

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2]

फर्माने हुमायून शरफे सुदुरयाफ्त बजानिबे आमिलाने हाल व इस्तकबाल व देसाइयान् परगणे पुणे आंके अज शुहुर सन तिसा अर्बइन व अलफ. दरिनविला मोरोबा गोसाई जुन्नारदार साकिन मौजे चिंचवड परगणे मजकूर बदरगाहे वालाजाह इलतिमास नमूद् के खुदरा इन्आम् व रूजमराह बमुजिबे फर्माने निजामशाह व फर्दखते

शुजाहत, व इज्जत दस्तगाह उम्दे दौलतखाहान बफकीश कुद्रऐ हवाखाहान, खैरअंदीश, जुद्रतुलक्कबायल, वल अवखान, खुलास तुल अमासिल वल अकरान रूकनुद्दौल तुल काहेरा महाराज फर्जंदे शाहजी भोसले खानस्त बेदीं तपसील.

मौजे चिंचवड जमीन व गल्ला
गल्ले येक खंडी नीम जमीन रकम हश्ताद बीघा जिराअत सी बीघा बागाते खारिज पंजाह बीघा मौजे पिंपरी नजदीके राहटणी जमीन रकम.
जिरायत नीम चावर यके शरई टकोन कास बागात कास दहमन येक खंडी सेरूब्रआ मिन जुमले कारपाती यकखंडी दोमननीम कारवपोळी दवाज्दह मन नीम.
मौजे ताथोडे जमीन नीमचावर टको कास हिजदह जितल (?).
मौजे मोरखळ ( मरकळ ) जमीन कास दवाज्दह जितल (?).
मौजे नेरे जमीन नरह कास सी जितल.

मिन जुमले जकाते तआल्लूक कसबे परगाणे मजकूर रोजीना तेल वजन नीम सेर नख्त दवाजदेह जितल (?).
मौजे चिंचोली रोजमरें रोजीन दवाजदह जितल (?).
येक चावर जमीन टक्के शरई (?)
मोजे रहाटणी जमीन कुरण टको कास रकम हप्त बीघा नीम.
मौजे पींपलेसौदागर थळ बाब्रत येक चावर जमीन टके शरई.
मौजे वाकडी थल पनवार मिन जुमले किश्त येक चावर टके शरई.
मौजे अकुरडी जमीन थल गूरचामी (?) अर्जी जुम्ले दहमन.
मौजे पिंपौरी नबद रोजीना दो जितल (?) टको सालीना हिजदह टक्के
मौजे पोपणगांव रोजीनो दो जितल (?) टको सालाने हिजदह टके.

---

१. शिक्का–दर्जीर नगीने शाहू : बशुद हस इकलीम् : शाहेनशाह दीन, महमद इब्राहीम. ( ज्याची सत्ता सप्तदीपा पृथ्वीवर चालते आणि जो धर्माचें पालन करणारा आहे असा महमद इब्राहिम. )

२. शिक्का–नादे अलिग्यन् आलियन मझ हरेल अजाएब थजद हो औम्रे लख्य फित्रे वा इब खुल्लो हम्मेन लकमेन व कअमेन सयंजलीह बे अजंमतक्या या अल्लाह, बिनबोवत्क्या या महमद् बे बिलायत्क्या या अली. ( मतलब–हे परमेश्वरा मजवर जीं संकटे व दुःखे येतील त्यांचें निवारण करण्याविषयीं मी तुला महमद पैगंबर व अली यांची शफत घालून प्रार्थना करतो. )

नजर एनायत फर्मूदे फर्माने अशरफ महंमत शवद के हुज्जत कवी बूदें बाशेद बिनाबरान् इलतिमास जुन्नारदार मुशारइलाहे बखातिरे मुबारक आला आवर्दै दरवज्हे इनाम गोसाई मजकुर जमीन व नकद हसबुलमसतूर् बेमूजिये फर्माने निजामशाह व फर्दैखते महाराज मोकरर् फर्मूदे दहानीदे शुदा अस्त, मीबायद के जमिने मजकूर दाखले महसूल व नगदियात व जमीए लवाजमात वे मिन व सकार व फर्मायेष व पटेलगी व पावपोसी मेहेरवानी व तबस्सुल व चक्रो ताजी व मोहिम व लवाजमेदारान य हकदारान व खारिजे ठाने व मुकासाई कुल बाब व कुल उजू दाह कानून कदीम व जदीद इसमी व रस्मि आंचे दर दफातीर आला सबत अस्त व पीश्तर् अहदास शवद दुंबाले जुन्नारदार मजकूर नुमायंद व नगद व तेल सदर, रोजीनें आदो मी कर्दै बाशंद व बादे उ बऔलाद व अह फादउ जारीसाजंद व हरसाल उजेरे फर्मान न नमूदे साल ब साल बहर्मी फर्मान रवान्दारंद् व हरके अज्मुसलमानान माने आयद मनाए इलाही मौइदाहिम गरदद व हरके अज हिंदवान खलल कुनंद दर कासी गुनाहे अजीम कर्दै बाशद व तआलुक नविश्ते गिरिफ्ते असल फर्मान बाजू देहन्द तहरीर फी नहोमे ९ शहरे रमेजान सने १०५९.

परवानगी हुजूर कुशीर्द जहूर अश्रफ

अकदस हुमायून आला

[फारसी शिक्का] [फारसी शिक्का].

अर्थ : – फर्मान परगणे पुणे येथील वर्तमान व भावी अमदलदार व देसाई यांजकडे अति शुभ हुकूम सुा सन सबा अर्बैन व अलफ दिला जातो कीं हाली मोरोबा गोसाई जुनारदार साकिन चिंचवड परगण मजकुर यांनीं परमथोर शाहाकडे नम्र विनवणी केली कीं आपणांस इनाम व रोजमऱ्हे निजामशाहाच्या फर्मानाप्रमाणे व शूरबहादर व इज्जतदारीने कारभार करणारा, पातशाहाचे वैभव चाहणारा, व पातशाहीला धक्का न पोचूं देणारा, सर्व पातशाही मदतगारांमध्ये श्रेष्ठ व पातशाहीचे हित करणारा, आपल्या जातभाईत व भाईबंदांत नेकीदार झालेला, दुनियेतील दुष्टपणापासून ज्याने स्वतःस अलिप्त ठेवले आहे, पातशाहीचा आधार, महाराज पुत्रतुल्य शाहजी भोसले यांच्या फर्मानाप्रमाण हलीं चालू आहे बितपशील.

आपणांवर मेहेरबान होऊन इज्जतदार फर्मान दिल्यास मेहेरबानी होईल व आपले हक्कास बळकटी येईल, असा एलतिमास जुनारदार मशारनिले यांनीं केला. त्यावरून बडेथोरांचे ध्यानांत आलेवरून इनाम प्रकरणीं गोसाई मजकूर यांस जमीन व नख्त त्यांचे इच्छेप्रमाणे व निजामशाहाचे फर्मानाप्रमाणे व महाराजाचे (शहाजीचे) पत्राप्रमाणे मोकरर करून देण्यांत येत आहे. सदरहू जमिनीवर महसुली घेऊ नये व नख्त व रोजमऱ्हे चालवावे.

लवाजमेदार व हकदार यांस यावर हक्क नाहीं. कुल बाब कुल कानू जुने व नवे सरकारने ज्यावर हक्क ठेवला असे व वहिवाटीप्रमाणे चाललेले व सरकारी दसरी चालू

असलेले सर्व माफ आहेत. जुनारदार मजकूर यांस त्याने मागण्यापूर्वी पावता करीत जाणे.

नख्त व तेल रोजीने त्यांस पावते करीत जाणे व पुढें पत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवावें. दरहरसाल नवीन फर्मानाचा उजूर न करणे. दरसाल हेच फर्मान चालत राहील. अगर मुसलमान होऊन मना करील तर त्यास खुदा मना करील व नतीजा पोंचवील व कोणी हिंदु होऊन हरकत करील तर त्यानें काशीस पाप केल्यासारखे होईल. नकल घेऊन असल फर्मान भोगवट्यास परतोन देणें. हे लिहिलें. ९ रमजान सने १०५९.

भा. इ. सं. मं. त्रै., वर्ष २, अंक १-४, पृ. ५९ ते ६२.

१६४९-१६५० इ. स.] (-७२-) [सने १०५९

[रणदुल्लाखानाच्या घुमटावरील शिलालेख]

दरवाजये शुमाल (उत्तर)

१ जहे रोजये पाके रनदूलाखान
ज अफजल बिना दर जहां शुद मसल
२ हवायश चु बागे इरम दिलकुशा
फजायश फराख चु कसरे अमल
३ पये नक्षे तारीखे आं हुक्म शुद
ब आशिक अजां किब्लगाहे दवल
४ दर अन्देशा बूदम के हातिफ जंगैब
बगुफ्ता बुगु रोजये (१०५९) बेबदल
५ चु आ मेहरे अनवर दरां शुद मुकीम
शुदः रोजा बैतुः शरफ चुं हमल

अर्थ :- रणदुलाखानाचा हा विशुद्ध घुमट किती तरी सुंदर आहे ?! पृथ्वींतील उत्तोमोत्तम इमारतींत ह्याची गणना आहे. ह्या घुमटाची हवा "इरम" नामक स्वर्गीय बागेंतील हवेसारखी अंतःकरण विकसित करणारी आहे. ह्याचे सभोंवतालच्या विस्तार आशेच्या आज्ञ्याप्रमाणें अत्यंत विस्तृत आहे. हा घुमट (पूर्ण झाल्या-बद्दलची) तारीख खोदण्याविषयीं आशक याला दरबारांतून हुकूम झाला, तेव्हा तारीख कोणती लिहावी ह्या विचारांत आशक मग्न असतां "रोझये बिबदल" (१०५९ हिजरी)[1] (हा रोजा अद्वितीय आहे) असें लिहिण्याविषयीं देवदूतानें येऊन त्यास सांगितलें. त्या प्रखर सूर्यानें, पक्षीं रणदुल्लाखानानें येथें येऊन कायमची वस्ती केली, तेव्हां हें इमारत मेष राशीप्रमाणें सुरम्य मंदीर बनली.

१. रोजा बांधून १०५९ हिजरी = १६४९ इ. स. त पुरा झाला.

दरवाजये माश्रिक ( पूर्व )

१ चु रनदुलाखां कूपत तब्ले अज्यल
खांशुद बजन्नत जफैजे अजल
२ यकी आंके रुस्तुम् जमा कूच कर्द ( = १०५३ )
शनीदम ज मिरां शुद–ई–नुक्ताहल
३ दिगर खतमे जूदस्त तारीखें ऊ
बकौले सुखुन गुस्तरे बिबदल
४ सियुम आंके आराम दाहक गिरिफ्त्
निदादाद हातिफ बगूशे जुमल
५ बहारुम इरम जाये रुस्तुम जमां
चेजीब्रा रकमजद खिरद बरमहल.

अर्थः–रणदुल्लाखानानें मृत्यूचें ढोलगें वाजविलें तेव्हां त्याचा आत्मा ईश्वराच्या पूर्वप्रसादामुळें स्वर्गास गेला. ( आपल्या वेळच्या रुस्तुमनें कूच केलें ) रुस्तुम जमां कूच कर्द हें वाक्य ( रणदुल्लाखानाचा गुरु ) मिरा त्याजपासून ऐकिलें तेव्हां रणदुल्लाखानाचे मृत्यूची तारीख कोणती ही अचडण दूर झाली. दुसरी तारीख 'खतमें जुद' ( दानशूरतेचा अंत ) ही होय. हें वाक्य एका उत्तम कवीनें गायिलेलें आहे. तिसरी तारीख 'आराम बाहक गिरिफ्त' ( ईश्वरा–सन्निध विश्रांति घेतली.) ही होय. ही वाणी देवदूतानें सर्वांच्या कानांत सांगितली. चवथी तारीख 'इरम जाये रुस्तुम जमां' ( = १०५३ हि. )[1] ( आपल्या वेळच्या रुस्तुमची पर्क्षी रणदुल्ला खानाची 'इरम' हें विश्रांतिस्थान झालें ) ही होय. कवीनें आपल्या बुद्धिचातुर्यानें हा किती तरी बहारीचा शेरा मारिला आहे बरें !

दरवाजये जुनूब ( दक्षिण )

१ हरांकस के अफजल शुद अन्दर अजल
बुबद अफजले अख दर हर अमंल
२ वजूदे अजीजश गहे इन्ते खात्र
ज नजमे कमालस्त बैतुल गजल
३ हमा सुल्हो जंगश बराये खुदास्त
बुवद जां मुजफ्फर बहर्यक जदल
४ गरज रा नबाशद बसूयश गुजर
के खुद चष्म बेहतर बुजद बि सब्रल
५ मुसख्वर शवद मुल्के हरदो सरा
मरांरा के बाशद ज हिंमत कुतल

१. रणदुल्लाखान १०५३ हि. त म्हणजे १२ मार्च १६४३ ते २८ फेब्रुवारी १६४४ इ. स. त. मेला. यांतील पहिली तारीख १०५१ हि. येतें. तेथें खोदण्यांत चूक असावी.

अर्थः— सर्व मानवजातीची भवितव्यता ज्या दिवशीं निश्चित झाली त्या दिवशीं जो मनुष्य सर्वोत्कृष्ट ठरला, तो कोणत्याहि वेळीं व कोणत्याहि कामीं सर्वोत्कृष्टच असतो. ही बहुमोल व्यक्ति निवडणुकीचे वेळीं सर्वांगपूर्ण अशा काव्यांतील उत्कृष्ट ओळीप्रमाणें शोभते. त्याचे सर्व तह व लढाया ह्या केवळ ईश्वराकरितां असल्यामुळें, तो प्रत्येक लढाईत यशस्वी होतो. त्याचे ठिकाणीं स्वार्थबुद्धीला कशी ती रीघच नसते. कारण डोळा हा रोगविरहित असणें चांगलें. धैर्यरूपी वारूवर जो आरूढ झाला तो इहलोक व परलोक हीं जिंकणारच.

दरवाजये मग्रिब ( पश्चिम )

१ ज मुलतां मुहमंद शहे जमसरीर
अजा याफ्त अफजल खिताबे अजल
२ के बस कल अहाये तिलिस्मात असास
ब कर्नाटकष गष्ता मफ्त होहल
३ ज दर्या ब दर्या सिपह रान्दः अस्त
किराबूद ई दस्ता गाहो अमल
४ बजूदो बलुत्फो बकुवत वहिल्म
शुदः काफ्ता काफो आलम मसल
५ रबूदः गहे इस्तेहां ताजेजाह
जमेहरो जसुबहो जबीरो जबल

अर्थ : ज्यांचे पाये जादूनें भारलेले होते असे कर्नाटकांतील पुष्कळ किल्ले ह्यानें हस्तगत करून घेतल्याकारणानें ह्यास ज्याचें सिंहासन जमशीदच्या सिंहासनासारखें होतें अशा सुलतान महंमदाकडून "अफजल' असा दिव्य किताब मिळाला. ह्यानें आपल्या फौजा समुद्राच्या ह्या टोकापासून तो तहत त्या टोंकापर्यंत नेल्या. एवढें सामर्थ्य व कर्तबगारी कोणाचे हातून घडली आहे बरें? दानशूरता, दयाळुत्व, सामर्थ्य व उदारमनस्कता ह्यांही तो जगविख्यात झाला. पक्षीं त्याच्या ह्या गुणांमुळें त्याचें नांव सर्वतोमुखीं झालें. ह्या चारी गुणांच्या परीक्षेमध्यें ह्यानें अनुक्रमें सूर्य, प्रातःकाल, हत्ती व पर्वत यांपासून यशाचा चांद हिरावून घेतला.[1]

भा. इ. सं. मंडळ, द्वितीय संमेलन वृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. २६५–२६८; चित्रमयजगत्, व. ६, अं. ३, मार्च १९१५, पृ. २१५–२१६.

१. हा लेख पूर्वी मुंबई सातारा गॅझेटियर ( पृ. ५४८–९ ) व भारतवर्षांत पंतप्रतिनिधींच्या बखरींत पृ. १९ वर टिपणरूपानें आलेला आहे.

इ. स. १६५० किंवा १६७२ ] ( –७३ – ) [ श्रावण शुद्ध ९ बुधवार, शके १५७२ परिधावी

वेदकृत साहित्यमकरंद अथवा शाहीमकरंद

ग्रन्थेस्मिन् रुचिरे मया विरचिता या शृंङ्खला निर्मला
नृत्याध्याय विधौ तदादिगदिता पुष्पाञ्जलेः पद्धतिः ।
अन्ते रागरसस्वरूपकथनं यस्याख्यया निर्मिते
तस्यादौ वितता प्रभोः सुललिता वंशावली लिख्यते ॥ १॥
सौराष्ट्रे पुण्यदेशे नरपतिरभवत् सोपि विख्यातकीर्तिः
सोऽपि श्रीसूर्यवंशाभरणमणिरभूत् सोमनाथैकभक्तः ।
पुण्यात्मा तन्नबर्यामतिकृपणतरो विप्र आसीत्तपस्वी
दिग्वासाः पाणिपात्रः तरुपतितदलैः प्राणधारी शमात्मा ॥ २ ॥
भूपो नित्यञ्च चक्रे विमलमणिमयीं भव्यपूजां स्वभक्त्या
विप्रोऽसौ वक्त्रपात्रे सुकलितसलिलं शीर्णकौपीनधारी ।
हस्ताभ्यां कस्यचिद्वा रुचिरतरतरोः पुष्पपत्राणि धृत्वा
चक्रे पूजां पुरारेः प्रतिदिवसमसौ मौनमालम्बमानः ॥ ३ ॥
एकस्मिन् दिवसे नृपाय विदितश्चक्रुस्तदीयार्चकाः
तच्छ्रुत्वा धरणीपतिः प्रकुपितः चारैस्तमाकारयत् ।
पप्रच्छ द्विजसत्तमं मणिमयीं पूजां मदीयामिमां
भङ्क्त्वां त्वं कुरुषे ( वृथा ) कथमथोच्छिष्टेन वक्त्राम्भसा ॥ ४ ॥
वृक्षाणां दलपुष्पजातिनिकरैः कान्तारजातैः पुनः
पूजान्तां कृतवान् द्विजो नरपतिं प्रत्युत्तरन्दत्तवान् ।
त्वं भूपोस्यहमस्मि भिक्षुकतरः त्वत्पूजनं तादृशं
रत्नानां निकरैस्तथा सुकुसुमैर्भोगैश्च नानाविधैः ॥ ५ ॥
पात्रं वा वसनं न वा वसु जनो मित्रञ्च मे वर्तते
वक्त्रं पात्रमिदं जलावहरणे पुष्पाहूतौ हस्तकौ ।
इत्थं शङ्करपूजनं प्रतिदिनं भक्त्या मया धीयत
रत्नैश्चापि महोपचारसहितैस्ते पूजनं भूयते ॥ ६ ॥
भूपब्राह्मणयोर्विवादसमये भूपेन निर्भर्त्सितो
विप्रः प्राह महीपते तदधुना पश्य प्रभावं मम ।
इत्येवं सति भूसुरं भटवतो भर्गस्य दूता मुनिं
संस्थाप्याशु विमानमम्बरपथं निन्युर्नृपेणेक्षितम् ॥ ७ ॥
इत्थं वित्तनिराशया क्षितिपतिर्दानान्यनेकानि च
चक्रे गोवृषवाजिमेषमहिषीदिग्दन्तिनां लीलया ।
वैराग्येण विहाय राज्यमखिलं यातो दिगन्तान्तरं
नोतत्याजमहेश्वरस्य भजनं संसारसारन्तु यत् ॥ ८ ॥

इत्थं भूमिपतिश्चकार वसतिं यस्मिन्गिरीशोगिरौ
कारुण्यैकनिकेतनो विधृतवान् भिल्लाकृतिं सुन्दरम् ।
तद्रूपान्वयजससको ऽपिसुकृती खेलोजिनामा नृपः
सर्वज्ञः शरणागतार्तिशमनः कारुण्यकीर्तिर्महान् ॥ ९ ॥
खेलो यस्य रणाङ्गणेति विदितः सन्नामधारी पुरा
खेलोजीति महाप्रतापनिकरो यस्सूर्यवंश्यो ऽभवत् ।
भानुर्भानुसहस्रकैः घनतमो यो नाशयत्याशु त–
न्नीतं येन समं महारिपुतमो हस्तद्वयेनादरात् ॥ १० ॥
तत्पुत्रः परसोजिनाम विदितो येनारयो निर्जिताः
सङ्ग्रामे शतशः पुरो रिपुमुखं नालोकितं सङ्गरे ।
हस्ते यत्कलितं सितासिफलकं तस्यान्तराले मुखं ।
स्वीयं तेन विलोकितं रणभुवि प्रायेण तत्सम्मुखम् ॥ ११ ॥
तस्या मजो भूमितले प्रसिद्धे बाबाजिनामा परिपूर्णकामः ।
यस्यारिनारीनयनाम्बुधारा वारान्निधि (र्व्याह) रतीव वृद्धि (त्त) म् ॥ १२ ॥
तस्यात्मजो मल्ल इति क्षितीशः परोऽभवद्विठ्ठलभूमिपालः ।
ईशावतारश्च परो मुरारेरंशावताराविव भूमिपालौ
उमेति नाम्नी किल धर्मपत्नी मल्लारिराजस्य सुतावसूत ।
षडाननः शाहमहीपनामा परः शरूजीति गजाननोऽसौ ॥ १३ ॥
धात्रीचारुतरालवालविलसन्मूलोच्छ्रितायानिशं
वल्गत्कोमलपाणिपल्लववते काशद्यशः पुष्पिणे ।
स्वछायाश्रितलोकसंसृतिमहासन्तापविच्छेदिने
श्रीमच्छाहमहीपकल्पतरवे दीर्घायुराशास्महे ॥ १४ ॥
कलौ युगे षण्मुखतां विहाय षाड्गुण्यमास्येषु कृतं विधात्रा ।
जानामि दण्डायुधकैतवेन तच्छाहभूपालविलोकितं ते ॥ १५ ॥
पुरा पुरारेः परिपूजनेन जाने फलन्तद्विमलं प्रसिद्धम् ।
यशोविशेषेण परेशभक्ति गोभूमिदेवावनमात्मबोधम् ॥ १६ ॥
सौराष्ट्रदेशात्समुपागतोऽसौ श्रीसोमनाथः प्रमथाधिनाथः ।
अधित्यकां वीक्ष गिरेर्विशालां चकार वासं किल चन्द्रचूडः ॥ १७ ॥
डयी(सुशी )ल भक्तस्य च भक्तितुष्टः तत्राधिवासस्य महादयालुः ।
न तत्र नीरं न तरुप्रचारः न कोऽपि लोके वसतिं करोति ॥ १८ ॥
तत्रापि शंभुर्निजभक्तलोभात् कैलासवासम्मनुते महेशः ।
तस्मिन्स्थले सूर्यकुलावतंसो मालोजिनामा कृतवान् तटाकम् ॥ १९ ॥
गभीरनीरं भगवान्स्वमौलिगङ्गातरङ्गौ परिपूरयन्तत् ।
विभाति यस्मिन् कमलानि मीनास्तीरे तरूणां परितोधिवासः ॥ २० ॥
पुन्नागचाम्पेयकपुष्पवासः कदम्बजम्बूपनसादि वृक्षः ।
नानाविधाऽन्येपि महीरुहास्ते येषां न नामान्यपि वेत्ति कोऽपि ॥ २१ ॥

सुकृतमिवतटाकव्याजमासाद्य नीरैः
तरुभिरपिविचित्रैस्तत्फलाद्यैर्वितेने ।
स जयति भुवि कीर्त्या तत्सुतश्शाहनामा
विततमतितटाकं येन पूर्णं व्यधायि ॥ २२ ॥
विततविमलकीर्तिर्मन्मथाकारमूर्तिः
परकरिहरिरूपः शाहनामामहीपः ।
व्यरचितदभिधानाद्ग्रन्थ एषो विशेषात्
स जयति मकरन्दश्चारुसङ्गीतपूर्वः ॥ २३ ॥
धर्मस्त्वं भीमसेनस्तदनु शुचियशोदेहकान्त्यार्जुनोऽसि
श्री शाहप्रौढकीर्ते नकुलविरचिता वाच्यतेति प्रसिद्धिः ॥
श्री शंभुर्देवदेवस्सह भवति महादेवनामासि स त्वं
ये दुष्टाः कौरवास्ते तव निशितशरैः नाशमेष्यन्ति सद्यः ॥ २४ ॥
श्री शाहक्षोणिपाल प्रतिभटदलन त्वत्प्रतापाग्नितापात्
श्रुत्वाब्धेश्शोषवार्तां शरणमनुगतः कुत्रचित्कोऽपि भीत्या ।
चन्द्रं कीर्त्या ( चन्द्रः कीर्तौ ) सुधास्ये त्रिदशतरुवरः पाणिपद्मे चकोरी
लक्ष्मीः क्ष्वेडं च खड्गे जलधरकुसुमं वैरिकान्तादृगन्ते ॥ २५ ॥
॥ इतिप्रतापवर्णनम् ॥

अथकीर्तिवर्णनम्

दृष्यन्पृथ्वीधरहृदयदरीदारयान्मित्रवक्त्रां
भोजश्रेणीं विधुन्वन्नतिथिजनसरः पूरयन् जीवनेन ।
मेरोःश्रीशाहभूपाद्विबुधजनगृहाद्विस्तृतः कीर्तिगङ्गा
स्वोघः पाथोधि मा स ( शु ) प्रसरति पुरतश्चित्रमेताद्विचित्रम् ॥ १ ॥
॥ अथदानम् ॥
चलच्चलदलपाणिभिः सुराणां तरुरयमाचरतीव दानदीक्षाम् ।
नरवरमकरन्द शाहगुञ्जन्मधुकरमङ्गलमन्त्रपाठपूर्वं ॥
अस्मात्पूर्णशशीकरात् सुरतरु : सौध्येतोन्मथो ( ? )
वीर्याद्वैरिगणोस्ति यद्यपि जितोभूपालचूडामणे ।
श्रीमच्छाहमहीपयुद्धमधुरत्वद्दानमद्देन्ययोः
(अन्तंने)त्युभयोरिदं तु विदितं भूयादिदानीं स्फुटम् ॥ २ ॥
श्री शाहभूपालसुतस्य गेहे श्री शम्भुनाम्नो निजगाद वेदः ॥
सङ्गीतशास्त्रे गहने विधेयः कोपि प्रकाराशुनटप्रतिज्ञाम् ॥ ३ ॥
तदादरो देवकृतो विशेषः
सतां मुदे श्रीमकरन्दभूपतेः ।
गोपालसंज्ञोऽखिलतालविज्ञः
तत्प्रत्ययानामपितत्त्ववेत्ता ॥ ४ ॥

सोऽशिक्षयत्कहब्रमात्मपुत्रं बभूव सोपि प्रवरःप्रयत्नात् ॥
यो नर्तनें गतिविशेषसमुद्र एष स्तेनाभिधानमभवत्
गतिसागरोऽयम् ॥ ५ ॥
मौलौ बभार बिरुदङ्किल पीतवर्णं
लक्ष्ये तथा कठिनकर्मणि साधकत्वात् ॥ ६ ॥
यत्तातो गणनायको भगवती मातातथाम्बा जग–
न्माता तेन कृतो जगत्सुखकृते हेतुश्च सेतुर्महान् ।
दुर्बोधं विदुषां महामतिमतां सङ्गीतरत्नाकरो
विख्यातो मकरन्दनामविदितः सङ्गीतपूर्वश्शुभः ॥ ७ ॥
अम्बापुरी पूरितसर्वकामा योगेश्वरी यत्र मनोऽभिरामा ।
तीरे जयन्त्या दुरितं हरन्त्याः करोति लोकं हतसर्वशोकम् ॥ ८ ॥
तस्मिन्पुरे यस्य बभूव जन्म कुले विशाले विमलेऽमलस्य ।
प्रसादमासाद्य गुरोस्सकाशात् गीर्वाणवाणी कवितावदाता ॥
सङ्गीतमकरन्दोऽयं मकरन्दमहीपतेः ।
श्रीशाहस्य प्रवीणस्य मुदे वेदेन निर्मितः ॥
[Colophon :—]
इतिसङ्गीतमकरन्दे वेदकृतौ नृत्याध्यायस्समाप्तः ॥
शके १५७२ परिधाविसंवत्सरे श्रावण शुद्ध नवमी बुधवारे[1] (?) लिखितम्

भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष १० अंक ३, क्र. ३९, पृ. १३८–१४१.

२३ आगष्ट १६५१ ] (–७४–) [ १६ रमजान, हि. १०६१

[ आदिलशाही फर्मान–सारांश ]

महाराज फर्जेंद शाहाजी भोसले याने जाणावें की, तुझ्या सुभ्यांतील तंबाकू (नांवाच्या करा) चें हशील, लश्करावरोबर असलेले हत्ती, घोडे, उंट व अितर यांच्या चराअीसाठी दिलें आहे. तरी तें वसूल करून तंबाकू खात्याचे मुतालीक सांगतील त्याप्रमाणें व्यवस्था करावी.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २९७.

१. शके १५७२ श्रावण शुद्ध नवमीला (२७ जुलै १६५०) बुधवार नसून शनिवार आहे व संवत परिधावी नसून विकृत आहे. परिधावी संवताच्या श्रावण शुद्ध नवमीला बुधवार (२४ जुलै १६७२) आहे. परंतु शक १५९४ येतो. हस्तलिखितांतील १५७२ हा शकाचा आकडा चुकीचा असावा.

इ. स. १६५१-५२ ] (-७५-) [ इसन्ने खमसैन अलफ

[ फारसी शिक्का ]

छ. कौलनामे अजदिवाण तपे बंदर माहामदाबाद वा बंदर तपे संगमेश्वर मामले मुजाफराबाद सुहूर सन इसने खमसैन अलफ. ताहारीर यापत बेस्मी वीटसेटी बिन दादसेटी व हरसेटी बिन गणसेटी सोनारान टकसाली बंदर मजकूर दीला कौलनामा ऐसा जे. दरीविला तुम्ही हुजूर एउनु अर्ज केले जे बंदरमजकुरी टकसाल लाहारीया वा खुर्दा नौ करावेयाचें उमेद धरितो. दरी बाब हुजरून फर्मान हुमायून सादीर आहे वा परवाना किबलगाहीखाल अलीशान बुलंदमकान साहेब सादीर आहे. बमोजीब साहेबी सचणी करून टकसाल नौ घालावेया कौल मन्हामती करणे वा हाशीलबाबे टकसाल माहाजूर होए तहअसान करणे. दरीबाब देसाईयानी व मोकदमान तपे मजकूर इलतीमास केले. अह्वाल खातीरेसी आले. तरी टकसाल नौ बदर मजकुरी घालावेयासी तुम्हासी कौल मन्हामती केले असे. तुम्ही उमेदवार होउनु रूपे आणुन रासकर्दन लाहारिया कीजे वा तावे आणून खुर्दा खुरसी कीजे. तुम्हासी हासील लाहारिया रासकर्दन कराल दरसदे लारी १ वा खुर्दा दर मणे लारी २ मोकरर केले असे. मुदती ५ साला टकसाल माहामूर होये तव हेणेप्रमाणे देत जाणे. दीवाणचे हाशील व उजरती सोनारा जील जे अज टसा होईल त्यासी दुमले दीजे. त्यासी हासील नाहीं. बाजद टसा बेरीज लाहारीया वा खुर्दा वजन होईल त्यास सदरहूप्रमाणे हाशील देत जाणे. पेस्तर टकसाल माहामर जाहाले. दर हाशील दर नीसबत बंदर हशील देत जाणे.

रासकर्दन लाहारीया रूपा खुद हशेली देऊनु एक कस्फजील कीजे वा खुर्दा दुने खुर्दे देऊनु खुर्दा पाडीत जाणे. चाली बाजे येह तमाम होईल. जाणिजे. मोर्तब [ शिक्का ]

~~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. षष्ठसंमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २४, पृ. १३५-६०.

१६५१-१६५२ इ. स. ] (-७६-) [ इसन्ने खमसैन अलफ

[ शिक्का ][1]

ई कौलनामा अज रख्तखाने राजश्री सीवाजी राजे दामदौलत हू बजानेबु [शिक्का][2] माल पाटील व बाजी पाटील व अदिकारी तपे बीरवाडी सु॥ इसने खमसैन अलफ बादे कौलनामा ऐसा जे. बीरवाडी खालील देह चंदरराउ खात होते. तेथील आदिकारपण आपलें आहे. यैस्यास चंदररायामधें व आपणामधें बरेपणा नाही हाणौउनु. सदरहु गांवीचें अदिकारपण चंदरराउ खात असेति त्यांसीं जरी आपण

---

१. शिक्का– 'प्रतिपचंद्र : लेखेव वर्धिष्णुर्वि : श्ववंदिता ॥ शाहसू : नोः शिवस्यैषा मुद्रा : भद्राय राजते ॥'

२. 'शिक्का– श्री शिवन : रर्पति हर्ष : निदान साम : राज मतिम : त प्रधान'.
~~~~~~~~~~~~~~~

कुसुर करावा तरी ते सब्ल आपण कमजोर. या करितां आपण गै करित गेलो. हाली सदरहु गांव चंदररायें किले कांगोरी खाले दिधले आहेति हे खबर आपण आइकोनु साहेबांचे सेवेसी आलों आहो. तरी आपण मिरासीदार नफर आहो. साहेबीं आपणास हाती धरूनु आपला अदिकारपणा आपणास देउनु मिरासीवरी बैसविले पाहिजे. सालाबाद हक लाजिमा जो गांवगना असेली त्याप्रमाणें आपण खाउनु चाकरी अदिकारपणाची करूनु. जे वख्तीं साहेबांस मसलतीचें कांम पडेल ते वख्ती जैसे मावले देसमुख आपले लोक घेउनु मसलतीस साहेबापासीं येताहेती तेच हर निसबतीन जे वख्ती मसलतीचे काम साहेबास पडेल ते वख्ती आपण दाहा १० लोक बराबरी घेउनु साहेबांचे सेवेसी येउनु दरोज रोजमुराबदल अडसेरी रुके ८६ सा दर नफरे घेउनु मसलती जो वरी असेली तोंवरी साहेबकांम करूनु मसलतीचें कांम जालियावरी साहेब रजा देतील तेधवं गांवांस जाउनु म्हणौउनु मालूम केले. बराये मालुमाति खातिरेसी आणौउनु साहेब तुम्हांवरी मेहरबान होउनु सदरहु गांवांचें अदिकारपण तुमची मिरासी तुम्हास दिल्ही असे. तुम्ही अदिकारपण खाउनु अदिकारपणाची चाकरी करणे. हक लाजिमा व गांव खंडी व किरकोळी हक निा बलुते व बाजे हक खाउनु लेंकराचें लेंकरीं खाणे व जे वख्तीं मसलतीचें काम पडेल ते बख्ती तुह्मी दाहा लोक १० बराबरी घेउनु साहेबापासीं येत जाणे. जोंवरी मसलतीचे काम असेल तोंवरी दाहां लोकांनसी चाकरी करूनु दरोज रोज रोजमुरा दर नफरे रुके ८६ प्रमाणें साहेबां-पासुनु घेत जाणे. मसलती जालियावरी साहेबाची रजा घेउनु गांवांस जात जाणे. ये बाबे कौल असे. [ शिक्का– मर्याः देयं विराः जते ]

भा. इ. सं. मं. तृतीय संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. १२, पृ. १६७–१६८.

१६५१–१६५२ इ. स. ] ( –७७– ) [ इसन्ने खमसैन (अलफ)

श्रीगजाननप्रो.

[ फारसी शिक्का ]

अज रख्तखाने राजेश्री जिजाईबाईसाहेब दामदौलतहू बजानेबु हुदेदारानी हाल इस्ताकबाल व मोकदमानि मौजे वेहरवडे पा पुणे बिदानद सुा इसन्ने खमसैन अलफ. दरोविलां गणो गबाजी तबीब सो कसबे पुणा हुजूर येऊनु मालुम केले जे आपणास इनाम दरसवाद मौजे वेहरवडे पा मजकूर

जमीन सेत पाचुद प्रज पदमाजी होनप कुरण सेत नदी किनारे महसूल व नक्त-रकम गला खंडी च्यारी खंडी आठ मण याती नक्त कदुबाण रकम बत्तीस ३२८ सा पाइली ४। ३॥

सदरहूप्रमाणें बा। फर्मान बसिके खास व भोगवटे वजीरानी कारकीर्दी दर कारकीर्दी व खुर्दखते माहाराज साहेब चालत आले आहे व सीउबाचेहि खुर्दखत बनाम कारकून पा। पुणा सु॥ समान अर्बैन अलफ छ ७ जिल्हेज (२४ दिसेंबर १६४७) सादर आहे. तेणेप्रमाणें ता। साल गु॥ चालत आले आहे. सालमजकुराकारणें चिरंजीव राजेश्री राजे याचे खुर्दखत सादर जाले आहे कीं इनामती अमानत करणे. त्यावरुनु आपली इनामती अनामत केली आहे. मौजे मजकुरी हुदेदार ताजे खुर्दखताचा उजुर करिताती. दरीबाब खु॥ म्हणौनु मालूम केले. बराये मालुमाती खातीरेस आणौनु गणो गबाजी तबीब सो कसबे मजकूर यास इनाम मौजे मजकूर

| | |
|---|---|
| जमीन सेत पांचुद प्रज पदमाजी होनप | कुरण सेत नदी किनारे महसूल व नक्तयाती |
| च्यारी खंडी साडे आठ मण ४। ३॥ | व नक्त कटुबाण रकम टके बत्तीस ३२८ |

सदरहुप्रमाणें बा। फर्मान बसिके खास व भोगवटे वजीरानी कारकीर्दी दर कारकीर्दी व खुर्दखते माहाराज साहेब व तसरफाती जैसे चालत आले असेली तेणेप्रमाणें ता। साल गु॥ जैसे चालिले असेली तेणेप्रमाणें चालविजे. दर हरसाल ताजा खुर्दखताचा उजूर न कीजे. तालीक लेहोनु घेऊनु असेली खुर्दखत इनामदार मजकुरापासी फिराऊनु दीजे. चिरजीव राजेश्री सीउबाचे खुर्दखताचा उजुर न करणे.

[शिक्का] [1]

भा. इ. सं. मं. त्रै., व १, अं. २–३, पृ. ३७.

१६५१–१६५२ इ. स.] (–७८–) [इसन्ने खमसैन अलफ

| | |
|---|---|
| देसमुख व देसकुलकर्णी प्रा। पुणें | ढमाले देसमूख ता। बारणे ऊर्फ पौडखोरे |
| देसमुख बालाजी नरसिंगराऊ विठोजी ना। | राघोजी राऊतराऊ येसाजी राऊ बाजी |
| सिताले देसकुलकर्णी | नाईक बादलदेसमुख हिरडस मावळ |
| ...ल मोरदेऊ गोविंदराम व मुकुद कान्हो | सिलबकर देसमूख ता। गुजणमावळ |
| चाफजी गभीरराव दसमुख ता। मुठेखोरे | बापूजी हैबतराऊ हबाजी हैबत राऊ |
| बाबाजी झुझारराऊ व मरल देसमुख ता। कानदखोरे | बाबाजी अढलराऊ देसमूख वेल्हवडखोरे |

सुहुर सन इसने खमसैन अलफ कारणे महजर केला येसा जे. साबाजी बिन बाजी इस्मफ कृष्णाजी येसवंतराऊ पासलकर (व) धर्माजी बिन बालाजी नाईक पासलकर हे हरदूजण ता। मोसेखोराचे देसमुखीबदल भाडत राजश्री—साहेबाचे बदगीस आले. यावरी साहेबी आपणा हुजूर गोत बैसऊन बारहक मुनसफी मनास आणितां पासलकर देसमुख ता। मोसेखोरे याचा मूलपुरुष गोरखोजी त्यास दोघी

१. या पत्राचा ब्लॉकहि छापला आहे.

स्त्रियां त्यापासून सतती वडील श्री बिनाम बाईजी तीस तीन जण होते. वडील येसजी. त्या धाकटा सोनाजी. त्या धाकटा रुपाजी. दुसरी श्री बिनाम लखमाई तीस पाच जण होते. येक बाजी. दुसरा रुद्रोजी. तिसरा जोगोजी. चवथा हरजी. पाचवा जेतजी. यैसे-प्रमाणें मुलपुरुपाचे ८ जण लेक. यापैकी लखमाईजीचे पोटीचे पाच जण व गोरखोजीचा धाकटा भाऊ बाबाजी त्याचा लेक तान्हाजी येसे सा जण याची समजावीस केली आहे. याचा बयाज तपे मजकुरी देखील कर्याती अट गौ अजदेहे ७१ यापैकी ... बाद इनामती सरदेसमुख मौ कादवे देहे १ बाकी ७० यापैकी निसबत कडू व निंवगणे देहे २२ बिता

| निा कडू देहे ११ | निा निंवगणे देहे ११ ताा |
|---|---|
| १ कुरण बुा | १ रुले |
| १ माझेरी | १ रानवडी |
| १ चिखली बुा | १ आंबी |
| १ आबेगाऊ खुर्द | १ भानसघर |
| १ बुलपघर | १ कुरण खुर्द |
| १ कावेथी | १ वांजलवाडी |
| १ कोसिबघर | १ ढिडिली |
| १ चिखली खुर्द | १ निंवगणी |
| १ घोडीखल | १ माणगाऊ |
| १ पवले बुा | १ खानु |
| १ कुर्तवडी | १ चादेरी |
| ११ | ११ |

यागावी रकम होनाची कास आहे. त्या दर होनास देसमुखीस हक नागराखाले रुके ८९ नव देऊन वरकड देसमुखीचा हक कडू खातातीती.

या गावी रकम होनाची कास आहे. त्या दर होनास देसमुखीचा हक बिा दसरा बकरा रुके ।।९ तेतीस आहेती. त्यापैकीं नागराखाले देसमुखीस रुके ।६ देऊन बाकी हक निंवगणे खातील.

बाकी देहे ४८ यांपैकी तकसीम गगाजी व हिरोजी पासलकर हे गोरखोजी मूलपुरुस सदरहू त्याचा चुलता वाघनाम होता. त्याची औलाद यासिं मौजे मोसेखुर्द देहे १ बाकी देहे ४७ यापैकी लखमोईजीचे पाच जण लेक व तान्हाजी बाबाजी यासि देहे १० बिा

| पाचा जणा भावास देहे ८ बिा | | तान्हाजी बाबाजी देहे २ ताा | |
|---|---|---|---|
| १ आबेड | १ कातवडी | ठाणगाऊ | मेबटमाल |
| १ कुरवटी | १ वडघर | १ | १ |

| | |
|---|---|
| १ आंबेगाऊ बु॥ | १ गीसरी |
| १ धडिवली | १ वडवली |
| ४ | ४ |

येणेप्रमाणे सा जणाची समजावीस पहिलेच करून दिल्ही. त्याप्रमाणें हालीं बाजीचा भानजीचा सांबाजी व रुद्राजीचा गोरखोजी व बाबाजी व जागोजीचा बाजी व कृष्णाजी येणे प्रमाणें आहेत हे खातातीं. सदरहु सां जणांपैकी हरजी व जेतजी व तान्हाजी यांचे संतान नाही. हली तिघाची औलाद आहे. तेच सदरहू बाबगाव खातात. बाकी देहे ३७ सततीस देखील इनामती इसापती विस्वा व पत्रकेणी व मधुलोणी व हाटबाजार व बाजे नागराखालील कमावीस भोगवटा बाईजीचा पोटीचे गोरखोजी मुल पुरुषाचे, लेक येसजी व सोनाजी व रुपाजी याचे समाईक राहिले. वाटे जाले नाहींत. परयेतु गोरखोजी असताच वडील लेक येसजी जाऊन मौजे तोव कर्याती अठगौ तेथें राहोनु अठगौपैकी बापभावास देऊन उरले गावीचा हकलाजिमा गावखड खात असे. मोझ्यामधे सोनाजी व रुपाजी असती. गोरखोजी माघारे सोनाजीन देसमुखी केली. सोनाजी व रुपाजी पडिल्यावरी सोनाजीचे दोग बेटे वडील भीकाजी धाकटा नवलोजी त्यामधे भिकाजीन देसमुखी केली. भिकाजी पडिल्यावरी त्यास संतान नाहीं व नवलोजी ल्याख. नव्हता म्हणौउन रुपाजीचा लेक वडील सूर्याजी देसमुखी करु लागला. त्यावरी येसजीचा लेक गोरखोजी त्यास सात जण लेक साबाजी बाजी कृष्णाजी कान्होजी रामाजी नागोजी बाबाजी.

यांमधें व सूर्याजीमधे देसमुखीच्या वडीलपणाबदल व नागराबदल करकशा लागला. भाडत भाडत सूर्याजी पडिल्यावरी विठोजीमधे व बाबाजीमधेहि कुसुर होता. यावरी साहेबास मुलक अर्जाना जाला. सूर्याजीचा लेक विठोजी देसमुखी करीत होता. त्यावरी भिकाजीचा बिराजर नवलोजी त्याचा लेक बालोजी उभा राहिला. यावरी राजश्री दादाजी कोडदेऊ सुभेदार किले कोढाणा व माहालनिहाये याणी बालाजीची व विठोजीची मुनसफी मनास आणिता विठोजीहून बालाजीचे घर वडील व बालाजीहून येसजीचे नातू याचे वडील घर हे सिक्या नागराचे धणी होती. परयेतु बालाजीचा व विठोजीचा निवाडा जाला ते वख्ती हाजीर नव्हते म्हणौउन विठोजीहून बालाजीचे घर वडील याबदल विठोजीची समाजावीस केली. बिता

देसमुखीचा हकलाजिमा व गावखंड याचे देहे ९॥ ता

| | |
|---|---|
| १ निगडे | १ जावली |
| १ वरसगाऊ | |
| ·॥· साइब बु॥ | १ साईब खुर्द |

इनामती मा देहे ३ ता

| सिरकोली | तोवं | पाथरसेत |
|---|---|---|
| १ | १ | १ |

पैकी मौजे पाथरसेत देहे १

लग०

| | |
|---|---|
| १ बादइनामती | १ भालवडी |
| देसकुलकर्णी ता। | १ कसेली |
| चौथी बाकी | १ घोल |
| १ दाबसरे | १ भोईंगी |
| ३॥ | ६ |

येणेंप्रमाणें विठोजीस देऊन समजावीस केली आणि बालाजीचे दुमाल। देसमुखी केली. ते वख्ती वडील घर येसजीचे. त्याचा नातू बाजी येसवतराऊ यासि बोलाऊनु मुबिलवार वडिलाचे वडीलपण त्याचे त्यास देऊन धाकट्यास तकसीमवार देऊन कुल अवघियाची समजावीस ... करीता सवेच बाजीन बालाजीसी देसमुखीच्या वडिलपणाचे व नागराचे भाडण लाविले. यैसे भाडता बाजी यसवतराव पडिल. त्यास सतान नाहीं. बाजीचा वडील भाऊ साबाजी होता त्याचा लेक हाली तुळाजी आहे. तोही नाईकी त्यास नाही. म्हणोउन साहेबी कृस्णाजीस बाजीचा किताब देऊन बाजी येसवतराऊ नावें ठेविले होते तोहि पडिला. बालाजीहि पडिला. देसमुखीचा करकसा तुटला नाही. हाली साबाजी येसवतराऊ व धर्माजी पासलकर हे हरदूजण साहेबाचे सेवेसी निवाड्याबद्दल उभे राहिले. यावरी साहेबी हाजीर मज्यालसी गोत बैसऊन बारहक निवाडा केला. साबाजी येसवतराऊ याचे घर वडील नागर निशाण व मानमानतुक देसमुखीचा महार साबाजीचा. धर्माजीचे घर धाकटे. यास वरकडी बापभाऊ जैसे समजाविले आहेती तैसीच याची समजावीस करावी. नागरासी वडलिपणाचे मानमानतुकेसी धर्माजीस (स)मध नाही यैसे जाले. यावरी धर्माजी तकसीम दिधली बिता

यैन इनामती देहे ३ बिता।

| सिरकोली | पाथरसेत | तोवं |
|---|---|---|
| १ | १ | १ |

पैकी विठोजी पाथरसेत देहे १ बाका देहे २ पैकी मौजे सिरकोली देहे १ पैकी निमे गाव

मौजे सिरकोली ·॥·
पेठ सोनापूर हाटबाजार सेव पसके व बसक व धणगर व कोस्टे व तेलीघाण मुखु(?) नि॥ तेली
पेठ मजकुरी कुलबाब कुलकानु दा॥ बलुते

देसमुखीचा हकलाजिमा व गावखड याचे गाव

| | |
|---|---|
| १ उसाडे | १ सागरूण |
| १ गोवे दि॥ बालते | १ डावीजे |
| १ पाणसेत | १ भिवडी |
| १ घोरसेत | १ महुरी |
| १ पोले | १ पवल बु॥ |
| १ पवले खुर्द | १ उरवली |
| ६ | ६ |

येणे प्रमाणे धर्माजीस दिधले असे. धर्माजीन खाऊन सुखे आसावे. कल्हो कुसुर न करावा. साबाजी यसवत राऊ याणे नागर सिका करावयाचे निसबतीस देसमुखी भोगवटा बिा

ऐना खासा साबाजी यसवतराऊ
इनामती
सिरकोली तोव देहे
-॥- १
दफर्त
३ हक लाजिमा गावखड याचे देहे
१ मोसे बुाा
१ सांडोघर
१ मुगाऊ
३
विश्वादेव घाट व उभामार्ग

१ हक निाा कड्ड
१ हक निाा बिबगणे
१ मधुलोणी
१ पत्रकेणी
१ तेलवाणबूड निाा तेली खेरीज पेट सोनापूर
१ हक गैरमहसूल सेव भोई मासापे
१ हाटबाजार खेरीज सोनापूर नवा वसेल तो सबब
१ ठोकरा थडवा नदीसगम (संगम) वा सागरुण
१३

साबाजीचे चुलते व बाप भाऊ यासि गवागनाचा हकलाजिमा गाव खड्या
५ निाा तुळाजी बिन साबाजी
१ वरदेऊ उर्फ धामणवहल
१ उगवली
१ कोलासी
१ साखरी
१ पडलघर
५
१ कान्होजी नाा दासवे
१ रामाजी नाईक गडल
१ नागोजी नाईक पलसे
१ बाबाजी नाईक अडमाल
९

येणेप्रमाणे निवाडा केला आहे. सदरहू तकसिमा प्रमाणे आपलाले गावीचा लाजिमा व गवापड्या ज्याच्या त्याणी खाणे आणि वरकड कमाविसदाराही बलुते व माहार व किरकोली कमाविस नागराखाले वडीलपणास भोगवटा साबाजी येसवत राये खाणे. बेकुसूर होऊन आवधियानी नादावे. मौजे मोसे बुाा व साडोघर हे दीवाणीचे

नख्त महसुलाचा गाव. तेथे दाईजा गोत्रजास बापभावास सेते इनाम म्हणऊन कुसूर करावया कारण नाहीं. ज्याणे सेत वाहावे त्याणे सेताचा हिसेबी पैका होईल तो द्यावा. नाही तरी मोझ्यात कोणास सेत करावया समध नाही व पाने व लुगडी व मानमाननुक आधी खेरीज कर्याती अठगौ तूपे मजकुराकडे साबाजी येसवतराऊ आधी त्यामागे धर्माजी नाईक पा त्याचे मागे बिठोजी ना पा त्या मागे साबाजी भानजी पासलकर त्यामागे कडू त्यामागे निवगर्णे त्यामागे देसकुलकर्णी त्यामागे सरखोत मग बाजे खोत पाटील येणे प्रमाणे जाल्यावरी कर्याती अटगौ आधा तुलाजी नाईक त्यामागे देसकुलकर्णी त्यामागे सरखोत मग बाजे खोत पाटील येणेप्रमाणें ठीक व विडा केला आहे. त्याप्रमाणे निवाडा केला आहे. याप्रमाणे अवघी जणी वर्तणे. यासि जो कोण्ही हिला हरकती करून कुसुर करील तो गोताचा अन्याई दिवाणीचा गु(न्हे)गार. त्याणे दिवाणात होनु पा ५००० (५५०० ?) पाच हजार पाचसीसे दीजे. हा महजर सही

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १–४, पृ. १०६ ते १११.

४ फेब्रुवारी १६५३ ] ( – ७९ – ) [ २५ रबिलावल हि. १०६३

[ आदिलशाही फर्मान–सारांश ]

महाराज फर्जंद शाहाजी भोसले याने जाणावे की, चिकबाळापूरचा मोकासा तुला दिला असतां वझीरे हुकूमत खान मुहम्मद मुबारिझुद्दीन याने अडथळा केला आहे. तरी चिकबाळापूर तुजकडेच कायम करून तसें उपर्युक्त खानास कळविलें आहे. तूं त्याजवर ताबा चालवावा.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २९७–८.

१८ फेब्रुवारी १६५३ ] ( – ८० – ) [ फाल्गुन शुद्ध १ शुक्रवार, शके १५७४

श्री

वेदमूर्ति गोपालभट बिन श्रीधरभट वास्तव्य श्री माभलेस्वर

[ शिक्का ] [१]

स्वस्ति श्री शके १५७४ नंदननाम संवछरे फाल्गुन सुध प्रतिपदा रविवासरे [२] [ शिक्का ] ते दिनी गोसावी यांप्रती विद्यार्थी सिवाजीराजे दंडवत विनंती उपरी.

१. शिक्का– ' प्रतिपच्चंद्र : लेखेव वर्धिष्णुर्वि : श्ववंदिता ॥ शाहसू : नो: शिवस्येषा मुद्रा : भद्राय राजते ॥'.

२. फाल्गुन शुद्ध प्रतिपदेला रविवार नसून शुक्रवार आहे. प्रतिपदेऐवजीं तृतीया धरली तर रविवार येऊन ता. २० फेब्रुवारी १६५३ येईल.

स्वामी भले थोर आनुस्ठाते, सूर्यउपासनी, पद्महस्ती यैसे जाणोन, आपण, जिजाबाई आऊसाहेब व वेदमूर्ति प्रभाकरभट उपाधे यांच्या विद्यमानें, स्वामीपासून मंत्रउपदेश संपादिला. स्वामी आपले गुरु. स्वामीस आपण आपले आभ्योदयार्थ सूर्यप्रीत्यर्थ अनुष्ठान सांगितले. प्रतिवर्षी वर्शासन द्यावयाची मोईन आसे. बिता

वर्शासन

| | |
|---|---|
| नख्त होन पा॥ | गला नवसेरी बारूले |
| १०० | मापे खंडी |
| वजन टकबंदी | ४ तांदूळ |
| ·। ४ तूप | ४ नागली |
| ·। ४ तेल | |
| ·।। ३ | ८ |

सूर्येप्रीत्यर्थ आनुस्ठान प्रतिवर्षी करावे त्यास सामग्री व पूजा.

| | |
|---|---|
| आरक्त वस्त्रे २ | वजन चंदन |
| आनुष्ठानसमई नेसावयास व आसन | ८८५ सुभ्र |
| १ पीतांबर | ८८५ आरक्त |
| १ शाल | |
| १ आसन | ८।· |
| ३ | |

येणेप्रमाणे होन पा येकसे व गला नवसेरी बारूले मापे खंडी आठ, वजन टकबंदी सवा आठरा मण आरक्त वस्त्रे दोनी, पितांबर येक व शाल येकप्रमाणे वरंशासन व पूजासामग्री मोईन दानपत्र करून दिल्हे आसे. स्वामींनी आमचे आभ्योदयार्थ सूर्यप्रीत्यर्थ प्रतिवरसी अनुष्ठान उत्तरोत्तर करावे व मंत्रउपदेशही स्वामीचे वंशपरंपरेने आमचे वैशपरंपरेस करावा. आपण संकल्पपूर्वक प्रतिवरसी वरशासन दानपत्र करून स्वामीस दिल्हे. हे आपले वैशपरंपरेने उत्तरोत्तर चालवावें. यास आन्यथा करूं तरी श्री माहादेव साक्ष. स्वामींनी निरंतर देवापांसी आमचे कल्याण इच्छावें. लेखनालंकार [ शिक्का- मर्यादेयं विराजते ].

भा. इ. सं. मं. षाण्मासिक अहवाल, शके १८३४, भाग २, स्वी. ग्रं. मा. क्र. ४, पृ. ३२६-८; विविधज्ञानविस्तार, पु. ४२, अं. ८, आगष्ट १९११, पृ. ३५८-३५९; व चित्रमयजगत्, व. २, अं. ७, जुलै १९११, पृ. १३५. पत्राचा फोटोहि छापला आहे.

१६५३-१६५४ इ. स. ] (-८१-) [ आर्बा खमसैन अलफ

[ शिका [1] ]

(अज रख्त )खाने राजेश्री सीवाजी राजे साहेब दामदौलतहू बजा(नेबु हुदे-दा)रानि हाल व इस्तकबाल व मोकदमानि मौजे वेहरवडे पाा पुणे बिदानद सुाा अर्बा खमसैन अलफ दरीविला (गणो)गबाजी तबीब सो काा पुणा हुजुर येऊनु [ शिका ] [2] मालुम केले जे आपणासि इनाम दरसवाद मौजे मजकूर जमीन बा... व कुरण सेत नदी किनारे येाा बिताा

| | |
|---|---|
| जमीन सेत पाचुंद प्रज पदमाजी होनप | कुरण सेत नंदी किनारे महसूल |
| रकम गला खंडी व्यारखडी खंडी | नख्तयाती व नख्त कटुबाण |
| आठ कुडो ४। ३।। | रकम टके बतीस ३२ |

सदरहूप्रमाणे बाा फर्मान बहसिकेखास व भोगवटे वजीर कारकीर्दी दर कारकीर्दी व खुर्दखत माहाराज साहेब प्रमाणे ताा सालगुदस्तां चालत आले आहे. हाली सालमजकुराकारणे मौजे मजकुरीचें हुदेदार ताजे खुर्द खताचा उजुर करिताती. दरीबाब संरजाम होये मालुम जाले तरी गणो गबाजी तबीब सो काा पुणा यासि इनाम दर सवाद मौजे मजकूर

| | |
|---|---|
| जमीनसेत पाचुंद प्रज पदमाजी होनप | कुरण सेत नदी किनारे महसूल व नख्त- |
| रकम गला खडी च्यार खंडी......आठ | याती व नख्त कटुबाण रकम टके |
| कुडो ४।३।। | बत्तीस ३२ |

सदरहुप्रमाणे बाा फरमान बहसिके खास व भोगवटे वजीर कीर्दी दर कारकीर्दी व खुर्दखत माहाराज साहेब व (आईसाहेब) सालगुदस्तां जैसे चालिले असेल तेणे प्रमाणे साल दर साल चालवणे. दर हरसाल ताजे खुर्द खताचा उजूर न करणे. तुम्ही तालीक लेहोनु घेऊनु असल खुर्दखत इनामदारा पासी परतोनु देणे. [ शिक्का-मर्या : देयं विरा : जते ].

भा. इ. सं. मं. त्रै., व. १, अं. २-३, पृ. ३८.

२७ जानेवारी १६५५ ] (-८२-) [ १५ रबिलावल, आर्बा खमसैन अलफ

श्री

आज्ञा पत्र राजश्री जानो निळकंठ सुभेदार प्रांत चेऊल सुाा आर्बा खमसेन व अलफ ( १६५३-५४ इ. ) आज्ञा ऐसीजे. ईहीदे खमसेनात ( १६५०-५१ इ. )

---

१. शिका—' प्रतिपचंद्र : लेखेव वर्धिष्णुर्वि : श्ववंदिता ।। शाहसू : नोः शिवस्यैषा मुद्रा : भद्राय राजते ।। '.

२. शिक्का—' श्री शिव न : रपति हर्ष : निधान साम : राज मतिमः त प्रधान. '

बिघावणी करून कुळारावार नावनिसीची नावनिसीस कीर्द लावून माहालोमाहाल ताकीद पत्र सादर करून लिहिणे. गुंता न पडता रइती कुलाचे संतोषे करून मधें खोत पाटील यांचा गुंता न पडे त्याची जबरदस्ती कुलावर न होय ते रीतीनें लिहिणें. सुभास मनास आणुं म्हणोन आज्ञा होती. त्याप्रमाणें माहालोमाहालचे जमीदाराही माहालकरी याचे अनुमते लिहिणें. उगवून हुजूर समजाविशी केली. ते पाहून उत्तमसे भासले. त्यासी सांप्रत सारे महालोमाहालचे देशपांडे यांहीं येथें प्रार्थना केली कीं महाराज सेवक स्वामीचे. परंतु शेव ...न पुत्र पौत्रादि वंशपरंपरे स्मरण राही असें अन्न द्यावे. त्यावरून स्वाम ( स्वामी ) धनी कृपालु होऊन आहद वेसवी तहद तर्फ ब्राह्मणगांव पर्यंत महाल येणेंप्रमाणें. बी तपसील –

| | |
|---|---|
| १ वेसवी | १ तुडुल |
| १ श्रीवर्धन | १ निजापूर ( निजामपूर ) |
| १ माडले | १ चऊल |
| १ दिवे | १ बिरवाडी |
| ४ | ४ |

| | | |
|---|---|---|
| १ गोरेगांव | १ ह्मसळे | १ टाणें गोवेल |
| १ तळे | १ नांदगांव | १ घोसाळे |
| १ खेडे | १ पालवण | १ ब्राह्मणगांव |
| ३ | ३ | ३ =१७ |

एकूण सतरा महालचे देश कुळकर्णी यास गाव कुळकर्ण वतन करून दिल्हे असे. तरी तुम्ही माहाल पाहून गाव कुळकर्ण असाम्या निसबत देशकुळकर्णी यासी दोनचार पाच सात पावेतो असाम्या देऊन बिघावणी कुळ झाडा पाहून दर खंडीस लहारी दोन सरकारी जमे धरून गांव कुळकर्णी दर असामी वेतन लहारी ९६ शहाण्णव करून देऊन उत्तम लिहिणें. याप्रमाणें देशपांडे यासी संतोषी करून लिहिणें. हवाला करणें. देश कुळकरण व गांवकुळकरण चाकरी कुळकर्णी मजकुरापासोन सालोसाल महालोमाहालचा हिशोब वसूल बाकीचा जाब घेत जाणें. या खेरीज त्याचीया सनदा हके इसाबती त्यास देऊन गांव कुळकरण ज्या असाम्या असतील तेणे प्रमाणें वतन माहाल पाहून आदा करवणे. ते पुत्रपौत्रादि वंशपरंपरा अनुभव घेतील. साल दरसाल सुभाहून फुरसीस शोध करून हिशेब सुभास घेत जाणें. फीतफाद न पडतां येणें प्रमाणें काम चालविणें. याचा जाब कुळकर्णी मजकुरापासून घेत जाणें. ऐशिया सनदा माहालोमाहाल देणें. या हतरोख्याची नकल घेऊन हा हातरोखा मदनाजी कुळकर्णी यास भोगवट्यास देणें. रवाना चंद्र १७ माहे रबिलावल...रूजू.

पैवस्ती चंद्र २६ माहे रबिलावल ( ५ फेब्रुवारी १६५४ ).

कायस्थ मित्र, व. १, अंक ११, फेब्रुवारी १९३१, पृ. ५–६.

२ एप्रिल १६५४ ] (-८३-) [ चैत्र वद्य १० रविवार, शक १५७६; २३ जमादिलावल. आर्बा खमसैन अलफ

सक १५७६ जये नाव सवछरे चैत्र वदी दसमी वार अदितवार छ २३ [ शिक्का ] जमादिलावल सुा अर्बा खमसैन अलफ तदिनी वेदमूर्ति गणेस दीक्षित बीन विठ्ठल दिक्षीत सो वोणी यासि राजश्री त्रिंबकजी राजे भोसल लेहोनू दिधले ऐसे जे. आम्ही तीर्थयात्रेस समसुर्गास आलो होतो. ते वख्ती तीर्थपुरोहित मनास आणिता परंपरागत तुम्हीं तीर्थपुरोहितपणा करीत आले आहा. त्यावरून आम्हीही तुम्हांस तीर्थपुरोहितपण दिधले असे. जो आमचा वंसीचा येईल तो तुम्हास पुजील. त्याचे तीर्थपुरोहितपण तुम्ही करणे. हे लिहिले सही.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १-४, पृ. ७२.

२३ एप्रिल १६५४ ] (-८४-) [ १५ जमादिलाखर, हि. १०६४

[ औरंगजेबाचें अबुल हसन यास फर्मान-गोषवारा ]

ज्या हेतूनें स्वाभाविक दया व औदार्य या गुणांला वश होऊन आम्हीं उच्च नीच सर्व दर्जाच्या लोकांच्या कल्याणाकरितां व उन्नतीकरितां आमची अपरिसीम शक्ति व धर्मानुगत इच्छावृत्ति नियोजित केली आहे, त्याच हेतूनें आमच्या दयेस व अनुग्रहास पात्र आबुल हासन यानें जाणावें कीं, आमच्या पवित्र नीतीप्रमाणें असें निश्चित ठरविलें आहे कीं, पुरातन कोणतेंही मादेर उद्ध्वस्त करण्यांत येणार नाहीं; तसेंच कोणतेंही नवीन मंदिर बांधण्यास परवानगीही देण्यांत येणार नाहीं. आमच्या पवित्र व गौरवमय दरबारांत बातमी लागली आहे कीं, कांहीं कांहीं ( मुसलमान ) व्यक्ती द्वेषानें पछाडल्या जाऊन वाराणसीनगरींत व आजूबाजूचें तीर्थाचे ठिकाणीं हिंदु रहिवाशांवर व मंदिर रक्षक ब्राम्हणपुजाऱ्यांवर जुल्म करीत आहेत ..म्हणून राजकीय महत्वाचें हें फर्मान प्रसिद्ध करण्यांत येत आहे कीं, इतःपर दुसऱ्या कोणीही ( मुसलमान ) मनुष्याने हिंदु किंवा ब्राम्हण रहिवाशांवर अत्याचार करतां कामा नये. हे सर्व हिंदु आपल्या पदावर प्रतिष्ठितपणें राहून ईश्वरानें दिलेल्या आमच्या ह्या साम्राज्याच्या स्थायिकत्वाबद्दल प्रार्थना करीत राहतील. ही आज्ञा जरूरीची समजून अंमलांत आणावी. १५ जमादियस्सानि हि. १०६४.

विविधज्ञानविस्तार, पु ५२, अं, ८, आगॅष्ट १९२१ पृ. २८०; इस्लामधर्म-त्रैमासिक, भिलवडी, व. २, अं. १, जानेवारी १९२५, पृ ९२-९३.

९ आगष्ट १६५४ ] (-८५-) [ ६ सवाल, खमस खमसैन अलफ

श्री

मसरूल हजरत अखंडित लक्ष्मी राजमान्य राजेश्री निळकंठराऊ प्रति सीवाजी राजे दंडवत उपरी. तुम्ही राजेश्री बाबाजी नाइकास बराबरी पत्र पाठविले ते पावोन लिहीले प्रमाणें सविस्तर वर्तमान कळों आले व कितेक सुखवचने नाईक माइले हाती सांगोन पाठविले तेही तीही सविस्तर सांगितले व नाईक बोलिले की आम्ही त्यांसी तह केला आहे की जैसे काही राऊगोसावी साहेबासीं वर्तत होते तैसेच याचेही चालवावे. एसा निश्चय करून आपण आलो असो म्हणऊन बोलिले. तरी जें काही राजेश्री बाबाजी नाईक तुम्हासी निश्चय केला तोच आमचा निश्चय असे. जैसे काही राऊगोसावी आम्हासी वर्तत होते तैसेच तुम्हीही आम्हासी वर्तत जाणे व आम्ही जैसे काही राजेश्री राऊ गोसावी याचे चालवीत होतो तैसेच तुमचेही चालऊन. ए विशई आम्हास श्री–ची व राजेश्री महाराज साहेबाच्या पायांची व सौभाग्यवती मातुश्री साहेबांच्या पायांची आण असे व ये विषई श्री–चा दवणा पाठविला असे. तो घेणे व जो पर्यंत तुम्ही आम्हासी इमानें वर्ताल तो पर्यन्त आम्हीही तुम्हासा इमाने वर्तोन. तुम्हा पासोन इमानास अंतर पडिलीया आमचाही इमान नाही. छ ६ सौवाल सुा खमस खमसैन अलफ.

~~~~~~~~~~~~~~~~

सहविचार त्रैमासिक, व. २, अं. १, आगष्ट १९२३, पृ. ३८–३९.

१६५४–५९ इ. स. ] (-८६-) [ ७ सफर...खमसैन अलफ

अजरख्त खाने राजश्री शिवजी राजे साहेब दाम ( दौलतहु )... साबाजी येशवतराव पासलकर देसमुख तो ( मोसेखोरे )... सुा सन... खमसैन अलफ बाबे [ शिक्का ] कौलनामा यैसा जे. तुझे बाबे... व रामाजी व नागोजी व बाबाजी बिरादर बाजी ये(शवंतराव) व हुजूर येऊन अर्ज केला जे पेशजी बाजी येश (वत... )... लानी नवलोजी पासलकर यामधे तपे मजकुरी ( वडी )लपणाच्या नावानिशाणाबद्दल गरगसा होता. निवाडा जाहला नाहीं तोच मयेत जाला. देशमुखीचा निवाडा... म्हणून वडिलपणाबदल तुलोजी फर्जंद साबाजी येशवत... जी फर्जंद कृष्णाजी मजकूर व आपण चौधे भाऊ. धर्माजी बालाजी नवलोजी तो देसमुखी खात होता. त्यास वडीलपणाच्या नावानिशाणाबदल भाडत साहेबाचे बंदगीस हु( जुर ) उभे राहिलो. यावरी साहेबी हुजूर हजीर मज्यालसी बा(जी साबाजी दे ) समुख ( स ) गत बसऊन धर्माजी बालाजीची व माहली मुनसफी मनास आणिली. आपले घराणे वडील होये. नावानिशाण देशमुखीचे वडीलपण आपले होये. धर्माजी बालाजीसी वडीलपणासी निसबत ( नाहीं ). जैसे आणीक भाऊ तकसीमा खाऊन
~~~~~~~~~~~~~~~~

आहेत तैसेच धर्माजीनेंही तकसीम खाऊन असावे, यैसे केले. नाव निशाण देशमुखी आपल्या (घरा)णियास देवविली. ते वख्ती आपण बाजीचे चौघे भाऊ सा(बाजी) येशवंतरावास पुसिले जे तुमचे वडील घराणे होये यैसियास बाजीस संतान नाही. देशमुखीचे नावनिशाण वडीलपण कोणास द्यावे. यैसे साहेबी आम्हावरी टाकून पुसिले. यावरी आपण चौघी भावी तुळाजी फर्जंद साबाजी येशवतराव हा बाजीहून वडील भाऊ होता. त्याचा बेटा असता गलथ विचार करून तुळाजीस मागे करून कृष्णाजी बाजीहून धाकटा भाऊ त्याचा लेक साबाजी पुढे केला. त्यास साहेबी देशमुखीचे वडीलपण नावनिशाण सिका नागर दिधला. त्यासि साबाजी इस्तकबिल सुा सन इसने (१६५१-२ इ.) तागाईत सन खमस (१६५४-५ इ.) च्यार साले देशमुखी करीतो. तो अमच्या समाधाने वर्तत नाही. मनास वाटते तैसी राहाटी करितो. भावाबंधाची मने दुखऊन रंजीस केले आहे वं रयतहि राजी नाही व दिवाणकामासहि ल्याख नाही. बदरवेसी वर्तणूक करितो. (याचे ढ)ग बरे नाहीत. तरी साहेबी तुळोजी साबाजी येसवंतराव याचा बेटा अवधियाहून वडील आहे व रयतहि यास राजी आहे व दिवाणकामास ल्याख आहे. तरी साहेबी याची देशमुखी नागर सिका नावनिशाण वडीलपणाची मानमाननुक व पाने व लुगडी यांची यास देऊन साबाजी कृष्णाजीस दूर करून जैसे आम्ही बरकड भाऊबंद तकसीमा खाऊन आहो तैसेच तकसीम साबाजीस देऊन ठेविला पाहिजे. नावनिशाण सिका नागर देसमुखीची पाने व लुगडी वडिल्या भावाचा लेक तुळाजी वडीलच याची यास दिधली पाहिजे म्हणून अर्ज करून तुज हुजूर आणून उभे केले. त्यावरून साहेबी बरहक मनास आणिले. तू साबाजी येशवतराऊ बाजीहून वडील भाऊ त्याचा बेटा यैसे खातरेसी आले. तपे मजकुरीचे मिरासीदार देसक रयत तुज राजी आहे. दिवाण कामा ल्याख आहेस व अवघियाहून वडील होसी. यैसे खातरेस आणून तुझे वडीलपण देशमुखी सिका नागर नावनिशान मानमाननुक पाने लुगडी तुझी तुज दिधली असेत, साबाजी कृष्णाजी हा बाजीहून धाकट्या भावाचा लेक व गैर ल्याख. रयेतही राजी नाही. दिवाणकामा ल्याख नाही. बदरवेस वर्तता त्याचे ढंग बरे नाहीत. त्यासी देशमुखासी व सिक्यानागरासी व पानामानास लुगडियासि काही समघ नाही म्हणौउन दूर केला असे. जैसे बरकड धाकटे भाऊ तकसीमा खाऊन अहेत तैसाच साबाजी मजकूरहिं तकसीम खाऊन असेली. तुझे वडीलपण देशमुखीचा सिका नागर करुन देशमुखी खाणे. पानमान लुगडी तुझे तुज दिधले असे. तुवा देशमुखीचा नागर सिका करून देशमुखी खाणे, पानमान लुगडी तुवा घेत जाणे, येणेप्रमाणे तुझे तुज दिधले असे, याबदल हुजरून तुझे सिरी सिरणी होन पाा ४५० साडच्यारीसे मोईन केली. यापैकी पेशजी साबाजी कृष्णाजी माा देशमुखीच्या हकलाजिमापैकी उगवणी केले होनु १५० दीडसे हे सदरहूपैकी मजुरां असेत. बाकी

खाली होतु ३०० तीनसे उगवणी करून सुखे देशमुखी खाणे. नावनिशाण सिका नागर करीत जाणे. पानमान लुगडी आधी तुवा घेत जाणे. कोण्हे बाबे तालुक अंदेशा न करणे, सुखें असणे. कौल असे. छ ७ सफर [ मोर्तब ]

बार  सुद

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. १११-११२.

२८ मार्च १६५५ ]  ( -८७- )  [ चैत्र शुद्ध १, बुधवार शके १५७७

[ फारशी मजकूर ]

शके १५७७ मनमथ सवत्सरे चैत्र सुध (प्रती)पदा वार बुधवार ते दीवसी राजेश्री गुडाजी ( बीन नरसीं )ह कुलकर्णी व देसकुलकर्णी शहर हवेली अहमदनगर या( सि ) चांदजी बीन कान्होजी भुपतराय देसमुख पा। कडेवलीत व पाडीया पेडगाऊ व मोकदमी कसबे माडोगण पेठ कातराबाद लेहून दीधले ऐसे जे. आपले वतन देसमुखी पा। मजकुरीची आहे परंतु आपणास भोगवटा कीति मुदती तो नाही. हाली आपण तलाश करावा तरी आपण नातवान आहो. या करिता आपणास ईलाज होत नाही आणी दरम्यान कोन्ही वतनास खलेल करील तरी तुम्ही ब्राह्मण आहा आणी बहूत दीवस पा। मजकुरीचा कारबार करीता. तुमचा लौकिक आहे. या निमत्य आपण तुम्हास देसमुखीची तकसीम मीरासी करून दीधली असे. तुम्ही दोनी हीसे घेने. आपण एक हीसा घेऊनु. तरी तुम्ही देसमुखीचा तलाश करून अमल चालता करणे व दीवाणातील सनद परवाने करून घेने व मानमाणनुक पुढील मोह(रप) तुम्ही घेणे व मागे आपण धेणे. बी तपसील.

| पुढील मान गुंडाजी नरसीह घेने | | मानेमान भोपतीराय घेने | |
|---|---|---|---|
| १ आपले नांव पुढे लीहींणे | १ लुगडी पुढे घेने | १ आपले नाव मागे लीहणे | १ लुगडी मागे घेने |
| १ नीशान आपल्या नावाखाले करणें | १ पाने पुढे घेनें | १ निशान आपल्या नावाखाले करणे | १ पाने मागे घेनें |
| | १ भेटी पुढे ठेवणे | | १ भेटी मागे घेने |

सदरहूप्रमाणे मोहरप तुम्ही घेने. माघाड मान आपण घेऊनु. या कामास वेच खर्च दरबारी लागेल त्यासि तुम्ही आपणापासुनु रुपये हजार एक खर्च करणे. त्याची तकसीम आपण नेऊ. या खेरीज खर्च लागेल तो तकसीमप्रमाणे दोनी हीसे तुम्ही देने. एक हीसा आपण देऊनु व दीवाणातून पा। मो। ईनाम त्यावर करून घ्याल त्यासि तकसीमप्रमाणे तरफाचा ईनाम तरफेमधे करून घेणे. अधीक सोधी हर एकीकडे जाला तरी तकसीमप्रमाणे व्राटून घेऊनु. याखेरीज तुमची ईनामती पहीली मौजे नादे व पीपरखेडीची वाडी

आहेती. ते तुमची तुम्ही खाणे. त्यासि आपणास समंध नाही व आपला ईनाम मोकदमीचा कातराबाद माडोगणी आहे तो आपण खाऊनु. त्यासि तुम्हास समंध नाही व परगणे मजकुरी जे उतपण व सायेरबाब होईल ते तरफेचे तरफे खाले घेने. या खेरीज ईजारदाराच्या मुळे उतपण होईल ते तकसीमप्रमाणे वाटून घेने व चाकीचे जत्रेमधे जे उतपण होईल ते आम्ही घेऊनु. आणी देवाचा प्रसाद तुम्हास देतील तो तुम्ही घेणे. आम्हास देतील तो आम्ही घेऊनु व पाा माच्या तरफा ३ त्यापैकी तुम्हास तरफा २ दोनी दीधल्या असेती. बी तपसील

| तरफ अकुलनेर | | तरफ कडे | |
|---|---|---|---|
| १ अकुलनेर | १ सेंडी | १ कडे | १ अठवड |
| १ कामरगाऊ | १ पोखर्डी | १ सेरी खुर्द | १ चीचोंडी |
| १ चास | १ अरनगाऊ | १ सेरी बुा | १ नांदूर मांळी |
| १ नेपती | १ बुरुडगाऊ | १ केरुळ | १ पींपळे |
| १ वोल्हेगाऊ | १ पदमपूर | १ पारगाऊ जोगे-श्वरी | १ अभोरे |
| १ नागापूर | १ खंडाळे | | १ हीवरे |
| १ वडगाऊ गुपीत | १ खडकी | १ जांबगाऊ | १ पीपरखेड |
| १ अमीनाबाद | १ वालकी | १ वाळुंज खुर्द | १ कारखेल |
| १ पीपलगाऊ मालवी | १ सीराढोण | १ पाटोदे | १ गहुखेल |
| १ जेऊर | १ पारगाऊ कोल्हा | १ डोंगगाऊ | १ साल वडगाऊ |
| १ इमामपूर | १ वाळुंज | १ अरनगाऊ | १ उबरदेल |
| १ पीपलगाऊ उजेनी | १ ईसापूर | १ सीराळ | १ देवळे सीमलेमान |
| १ मांडवे | १ नारायण डोहो | १ दहीटणे | १ घाटदेऊळगाऊ |
| १ सांडवी | १ उकडगाऊ | १ रुई | १ साबरगाऊ |
| १ मधडगाऊ | १ दसमे गव्हाण | १ नांदे | १ सेडाळे |
| १ बदी सारोले | १ टाकळी | १ भीबरगाऊ चोभा | १ माणीकदौड |
| १ रगत वडगाऊ | १ मेहेकरी | १ टाकळी अमया | १ बेलदुरी |
| १ देवगाऊ | १ कोल्ही | १ सीरीपुरे | १ देवळाली रामकाली |
| १ खांडके | १ अगडगाऊ | १ सांबळखेडे | १ घाटपींपरी |
| १ जांब | १ रांजनी | १ चींचोली | १ घांटे |
| १ पीपलगाऊ लांडगा | १ माथनी | १ धानोरे | १ दादेगाऊ |
| १ पारगाऊ ताा (नांदुर) | १ कौडगाऊ | १ वडगाउनीपानी | १ डोंगरगण |
| १ भातोडी | १ भातोडी | १ खराटी वडगाऊ | १ धामनगाऊ |
| १ पीपलगाऊ घाट | १ केल | १ कानडी खुर्द | १ जाटदेवळे |
| १ सोनवाडी | १ वडगाऊ | १ पीपलगाऊ काजी | १ कारखेल बुा |
| | १ बाद खेल | १ पुंडी | १ सुरोडी |
| | | १ खुटेफळ | १ बावी |

१ खुंटेफल खु॥
१ बनवाडी
१ वाघलूज
१ सागवी
१ पाटण
१ खीलद
१ किन्ही
१ डाईठाणे
१ नींबोडी
१ नींबगाऊ देवी

बाकि तरफ कातराबाद देह ५९ हे आपले तालुक असेती.

१ माडोगण
१ वडघोल
१ गुडगाऊ
१ रालेगण
१ देऊलगाऊ सीदी
१ गुणोघडी
१ वडगाऊ
१ तांदली
१ वाटेफल
१ खुटेफल
१ माही जलगाऊ
१ सुलतानपूर
१ पीपलसुटी
१ नागमठाण
१ रुई
१ मढपीपरी
१ कोयाल
१ लोणी
१ साकद बुा
१ साकद खुा
१ दहीगाऊ
१ हतवलण बुा
१ हतवलण खुर्द
१ बनपीपरी
१ तरडगव्हाण
१ चवरसागवी
१ हींगणी
१ अबीली
१ औरंगपूर
१ बेरोडी
१ पारवाडी
१ थोबल सागवी
१ थेटे सागवी
१ धोरगाऊ
१ येहखेल
१ चीचोली
१ बागडें
१ खडवी
१ कोंडागे
१ गुरोपीपरी
१ खलगाऊ
१ गोदडीं
१ कापसी
१ कोंडाणे
१ नीबगाऊ गागडा
१ नीबीगाऊ घोडकी
१ वोही
१ थेरगाऊ
१ मादली
१ धुमरी
१ पीपरी
१ कानडी
१ बेलगाऊ
१ बाकी
१ तीकी
१ मीरजगाऊ
१ खरडगव्हाण
१ ... ...

सदरहू तरफा तुमचे तरफेचें उतपण जे होईल ते तुम्ही खाणे. आमचे तरफेचे उतपण जे होईल ते आम्ही खाऊन. या खेरीज जदीद गाव व पेठ ज्याजती वसाहतीने तरफेस होईल त्याचे त्याणे उतपण खाणे व तरफ चाभारगांदे व ता कडेवलीत पेडगाऊ वगैरा देह आहेत त्याची तरतुती करून देसमुखीचा अमल चालता करणें. त्याचे उतपण जे होईल ते सदरहु तकसीम प्रमाणे वाटून घेणे. दोनी वांटे तुम्ही घेणे. एक वाटा आपण घेऊनु. यासि खर्चवेच जी लाभेल तो तकसीम प्रमाणे देने. सदरहु प्रमाणे तुम्हास आत्मसंतोषे कागद लेहोनु दीधला. आपण दीधला असे. तुम्ही व आम्ही सदरहु प्रमाणे देसमुखी लेकरांचे लेकरी खाणे. यासि अनसारीख करून तरी आपणास साक्ष श्री असे. हे लीहीले सही. चादजी भोपतीराऊ दसखत सही. वरी लीहीले ते सही

बी कलम त्रीबक रखमागद कुलकर्णी कसबे माडोगण पेठ कातराबाद

| | |
|---|---|
| माडवगणकर | गोही |
| चाऊजी मोकदम कसबे मा | सभेराऊ सेठे पेठे मा सही |
| बालजी खीला चौगला | मलमाली मेहतर |

बापुजी चौधरी मोकदम मोज हतवळण बुा.
फिरोंजी व बकाजी मोकदम मौजे थोबळसागवी.
जेतजी व मोहाजी मोकदम मौजे हतवळण खुर्द.
बालाजी मोकदम मौजे औरंगपूर उरुफ हतवळण खुर्द.
बी. भानजी व बीठोजी गोवीद कुलकर्णी व जोसीदेह मो देह ४
यमाजी मोकदम मौजे बागडें बीा मोरजोसी कुलकर्णी

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शक १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १४–१७.

१६५६ इ. स.? ] (– ८८ –) [ ?

श्री

अखंडीत लक्ष्मी प्रसन्न परोपकार मूर्ति राजमान्य राजश्री निळोपंत गोसावी यांस. ॥ छ ॥ सेवके दियानतराऊ नमस्कार विनंति उपरी. मौजे उझाडें किल्हे वंदन माहताजी गांव चालत असतां साप्रत नूरखानास खा जालाह होतां. यावरी हुजुर मालूम होऊन महातीचे देहे माहालास मोकरर केले असे. तरी मौजे मा किल्हेचे किल्हेस दुबाला केले पाहिजे. पहिले नूरखानाचे विषयीं लिहिलें होतें. त्यावरी नच जातो. किल्हे मजकूरास दुबाला करणें. पुढें नूरखानाचे विषयीं लिहिलेयां त्यास दुबाला न करणें. माहाताजी गांवाविषयीं विनाजी कान्हेरीपंत सांगतील त्या सारिखे परिपत्य देतील पाहिजे. किल्ले वंदन आमचे वतनस्थल आहे त्यास मदत करावयास अंतर पडो न देणें. बहुत लिहिणे न लगे (मोर्तब सुद)

सद्विचार त्रै., व. १, अं. ४, मे १९१३, पृ. १७०–७१.

१२ जानेवारी १६५७ ] (– ८९ –) [ माघ शुद्ध १३ सोमवार, शके १५७८

श्री सके १५७८ दुरमुख नाम सवछरे माहो सुध त्रियोदसी वार सोमवार तये दिसी बालाजी हरी मेंडजोगी कुल(क)र्णी मौजे वडगौऊ नेपरज पा पुण यासि तये दिनी मुधाजी बापूजी अत्रे जोसी व कुलकर्णी कोढीत खुर्द व भिवडी व सोमलवाडी पा मजकूर लेहोनू दिधले यैसा जे. आपले जोतीस व कुलकर्णी मौजे कोढीत बुा का सासवड हे आपली मिरासी हाये. सोनाजीपत आपले गोत्रज खात होता. तो गगथडीस आपले लेकीस भेटावया गेले. तेथेच राहिले. तिही आपणासी सागोनू

पांठविले की आपले म्हातारपण आहे गोदातिरीच राहोनू. तरी तुम्ही मोजे मजकुरीचे जोतीस व कुलकर्ण खाणे. तुमची मिरासि आहे तुमची तुम्ही खाणे. यावरी आम्ही आपला पुतन्या विठोबा चालवया ठेविला. सोनाजीपताचा भाचा रुद्राजी होता, तोहि गगथडीस गेला. विठोबा आमचा पुतन्या चालवीत होता. हे गावीच्या मोकदमासिही ठाऊका आहे. यैसे असोनू रामाजी देसकुल(क)र्णी का सासवड त्याणे आपले माणूस ठेऊन कुलकर्ण मौजे मजकुरीचे चालऊ लागला. आम्ही रामाजीसी बोलावे तो आम्ही आपले पोटाच्या व्यासगी गुतलो. याकरिता राहिले. तरी तुम्ही मौजे मजकुरीचे जोतीस व कुलकर्ण तुम्ही सोडवणे आणि तथे जे पडली ते बचणे आणि कुलकर्ण तुम्ही मिरासि करूनू खाणे. जोतीस आम्हास देणे. सदरहू प्रमाणे जोतीस व कुलकर्ण सोडवणे. कुलकर्ण तुम्ही खाणे व जोतीस आम्ही खाऊनु. आम्हास कुलकर्णासी समधू नाही. यासि आन सारिखे करू तरी आम्हास आपलीया पूर्वजाची आण असे. हे लिहिले सही. या लिहिलीयासि आपला कोण्ही भाऊबद व दाईज गोत्रज व हरकोण्ही हिला हरकती करील त्यासि आपण निवारूनू. तुम्हास व यासि समधू नाही. तुम्ही गावकुलकर्ण लेकराचे लेकरी खाणे. जोतीस आम्ही खाऊनू. हे लिहिले सही. बी कलम

गोही

| | |
|---|---|
| बापाजि नरसिगराऊ सिताले देशमूख पाा पुणे [ शिक्का ] | विठोजी नाईक सितोले देसमूख पाा पुणे [ शिक्का ] |
| विठल मोरदऊ देस कुलकर्णी पाा पुणा | बाऊ पाटील बिन बाजी टील कानगे |
| सूर्याजी बडघे व बाजी जरढे मोकदम मौजे मजकूर [ नांगर ] | मोकदम मौजे चाबिली पाा पुणे [ नांगर ] |
| काऊंजी बडघे मौजे मजकूर [ नांगर ] | मलोजी राजविडा चौगले मौजे मजकूर |

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १-२, पृ. १०३-१०४.

१९ मार्च १६५७ ] (-९०-) [ १३ जमादिलाखर, हि. १०६७.

[ आदिलशाही फर्मान—सारांश ]

महाराज फर्जंद शाहाजी भोसले याने जाणावे की, तू त्या मनुष्याची (?) राज्याविषयींची निष्ठा व शुद्ध हेतू सांगितलेस ते पटले. आता तू त्याशीं जो करार करशील त्याप्रमाणें व्यवस्था व उत्कर्ष फर्माविला जाईल. त्या राज्यनिष्ठानें तू सांगशील त्याप्रमाणें सेवा बजावावी यांतच त्याचा उत्कर्ष आहे.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २३८.

२० जून १६५७ ] (–९१–) [७ रमजान हि. १०६७

[ आदिलशाही फर्मान–सारांश ]

महाराज फर्जंद शाहाजी भोसले यानें जाणावें कीं, सरकार चाकरींतील हेजीब नरहर तिमाजी यास हुजूर बोलाविलें होतें. आतां त्यास परत तुजकडे पाठविलें आहे. तरी तुझ्या सुभ्यांतील हकीकत व बातमी त्याजकडून लिहवीत जावी. सरकार चाकरींतील भानजी व्यंकटाद्रि अमीनराव यास हुजूर पाठवून द्यावें तंबाकूच्या इशीलपैकीं भानजीस द्यावा लागणारा अर्धा होन रोंजमरा नरहर तिमाजीस देत जावा.

साह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २९८.

२७ मे १६५८ ] (–९२–) [४ रमझान, हि. १०६८

[ आदिलशाही फर्मान–सारांश ]

महाराज फर्जंद शाहाजी भोसले याने जाणावें की, शिवाजी भोसल्याचा राज्य-द्रोह व उन्मतपणा यामुळे तुझे मनांन सध्या भय उत्पन्न झाल आहे की, कदाचित् त्याचे कसूरीचा दोष आपल्या माथी लादला जाईल. तरी तूं असे समज की शिवाजीचे अयोग्य आविष्कार व कार्यें आम्हांस पूर्ण माहीत आहेत. म्हणून शिवाजीच्या कसूरीशीं तुझा कांहीहि संबंध नाहीं. त्याची कसूर व गुन्हे यांची जिम्मा त्यावर आहे. एतदर्थी तुझे मनास पूर्ण समाधान असूं द्यावें. तुजवर पूर्वीपेक्षांहि अधिक कृपा आहे याचे गमक म्हणून पूर्वीची सर्व जागीर तुला बहाल करतों. तीमध्ये थोडाहि बदल होऊं नये. बंगलूर किल्ल्याच्या आसपासचे मनेवारांनी तुजबरोबर संबंध ठेवावे असेंहि फर्मावितों. तुजविषयी कोणी कमजास्त सांगेल त्यावर आमचा गहजब होईल.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २९८.

१ आक्टोबर १६५८ ] (–९३–) [१३ मोहरम, तिसा खमसैन अलफ

श्री

मशरुल हजरत कृष्णाजी भास्कर देशाधिकारी व लेखक प्रात बारा मावळ यांसि प्रत राजश्री सिवाजी राजे दंडवत सुा तिसा खमसेन आलफ. मौजे कलबोली ताा पौनमावळ व मौज रावडे ताा पौडखोरे या हरदो गांवाचा सिंवेचा कथला लागला आहे म्हणोन पूर्वी तुम्हास आज्ञापत्र सादर केले होते. त्यावरून तुझी मौजे मारास जाउन कथळा मनास आणिला. त्यांसि आरजोजी ढमाला हा ह्मणो लागला कीं आपले गांवीची सीव खरी. आपण दिव्य करून. त्यावरून सर्व देशक मेळउन

दि..चा तह दिल्हा. इतकियामधे दुसरे दिवसी आरजोशी ढमाला देश......ता पौड खोरे (गैरहजर?) जाला......सबब नरहरी दिवाकर देशकुलकर्णी ता पौनमावळ व हावजी पा मौजे कलबोली ता मार याणी हजुर पुरधरचे मुकामी (येउ)न विदित केले. त्यावर साहेब करणाटक प्रांती मसलतीस गेले. त्या प्रांताहून आलियावर जो निवाडा करणे तो करितील. तो परियेत मौजे कलबोली ता पौनमावळ व मौजे रावडें ता पौडखोरे या हरदो गांवामधे टकियाचे कासेची जमीन आहे ते आमानत असो देणे. या पत्राची प्रती घेउन असल नरहरी दिवाकर देशकुलकर्णी ता पौनमावळ याचें हावाला करणे. जानिजे. छ १२ माहे मोहरम-

[ मोतब्र सुद शिक्का ]

रुजु सुरननीस सुरु सुद बार बार

भा. इ. स. मं. चतुर्थ संमेलनवृत, स्वी. ग्रं. क्र. १८, पृ. ७९.

२९ नवंबर १६५८ ] (-९४-) [ १३ रबिलावल, तिसा खमसैन अलफ

अज दिवाण ठाणे ता हवेली पा पुणा ता मोकदमानी देहाये ता मजकूर सुा तिसा खमसन अलफ बा खुर्दखत रा छ १३ रबिलावल तेथे रजा, जे बा राजेश्री गोसावीं चिंचवड यासी. चिंचवडानजीक हमशाही गाव आहेत. तेथील रयेती दरसाल गवत काढून देत असताती म्हणऊनु हुजूर मालुम केले. तरी सालमजकुरा-पासून साहेबी हुजरून तह ऐसा केला आहे की राजेश्री गोसावी यांसी पा माहून दरसाल गवत ५०,००० पनास हजार काढून देववावे. तरी चिंचवडानजीक भोवताले आसपास गाव असतील त्यापैकी तुम्ही सिस्त करून देणे. जे पनास हजार गवत दर-साल काढून चिंचवडी राजेश्री गोसावियापासी पावतीत जाणे. जैसा काही बरकड इनांमतीची रयेसी आहे तैसीच खेसीने सदरहू गवताची सिस्त जाणऊन तेणेप्रमाणें चालवीत जाणे. सदरहू गवत जे गावी असत जाईल ते गावीहून काढून देवीत जाणे. दरहरसाल ताजा खुर्द खताचा उजूर न करणे. तालीक घेऊनु असिली खुर्दखत रा गोसावा यापासी परतोन देणे. रा पंताजीपंत चिटणीस म्हणऊनु रजाका रजा अमल करणे. मोतब सुद.

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ५९.

१३ मे १६५९ ] (-९५-) [ १ रमजान, तिसा खमसैन अलफ

मा अनाम बाज प्रभु प्रती राजेश्री सिवाजी राजे सुा तिसा खमसैन अलफ, जासजा कासलोड गड हिरडस मावळामधे आहे. तो गड ऊस (ओस) पडला

होता. याने नाव मोहनगड ठेउनु किला वसवावा यैसा तह करुनु किल्यास मसुरल [शिका][1] अनाम पिलाजी भोसले यासि किले मजकूरचा ह्वाला देउनु पाठविले असेत व मााईले बराबर किलाचे संगनातीबदल लोक २५ पाठविले असेत. तरी तुम्ही मााइलेस व पंचविसा लोकास बराबर देउनु मोहनगड गडावरी मशारनिलेस व पंचविसा लोकास किल्यावरी ठेवणे आणि किलाच्या ह्वालदारास घ(र) व लोकास अळंगा मजबूद करुनु देणे. घर व अळंगा करुनु द्याल त्या पाउसाने अजार न पावे यैसा करुनु देणे. नाहीतरी सजवंज करुनु द्याल आणि किल्यावर लोक राहतील त्या अजार न पावे यैसे ह्वालदारास घर व लोकास अळंगा व येक भारवल मुस्तीद करुनु देणे. तुम्ही सदरहु प्रमाणे काम विलेग्रार लाउनु द्याल म्हणउनु साहेबास भरवसा आहे. याबदल तुम्हास लिहिले असे. तरी सदरहु लिहिलेप्रमाणे किला मजबूत करुनु देणे. मग तुम्ही किल्याखाले उतरणे. छ १ रमजानु. मोर्तब सुद [शिका–' मर्यादेयं : विराजते ']

सुरु सुद

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. ४, पृ. ४४.

१४ जुलै १६५९ ] (–९६–) [ ४ जिल्काद, हि. १०६९

बिसमिल्ला हिर्रहूमा निरंहीम

लिल्लाहि अल्लाह ईजद्

[ फर्माने अबुज्जफर मोहिउद्दीन मोहंमद औरंगजेब बहादूर आलमगीर बादशाह गाजी ]

[ शिका [2] ]

जुबदतुल् अभसाल वल् अक्रान, खुलासतुल् अरबाह् वल् अअयान, काबेलिल मर्हमत वल् एहसान; मुतिउलइस्लाम, सीवाजी बइनायते पादशाहाना उम्मीदवार बुदह बिदानद के कादिरे बीहमता तआला शानहू बराये इशाअते खैरात व

१. शिका–' श्री शिवनरपति हर्षनिदान सामराज मतिमत प्रधान '

२. शिका—मधील मोठया वर्तुळांत–' अबु जाफर मुहिउद्दीन : मुहंमद औरंगजेब : बहादूर अलमगीर : बादशाह गाजी : सने अहद १०६९.'

भोवतालील दहा वर्तुळांत–(१) ' इब्ने अमीर : तैमूर साहेब : किरान; ' (९) ' इब्ने : शाहजहान : बादशाह; ' (८) ' इब्नें : जहांगीर : बादशाह; ' (७) ' इब्ने : अकबर : बादशाह; : (६) ' इब्ने हुमायून : बादशाह ' (५) ' इब्ने बाबर बादशाहा; ' (४) ' इब्ने : उमर शेख मिर्जा; (४) ' इब्नें : सुलतान अबू सैद; ' (२) ' इब्ने : सुलतान : मुहंमद मिर्जा; ' (१) इब्ने : मिरान : शहा.'

इफाजते मबर्रात व रफए मरासिमे अद्‌ल व इनसाफ व हद्‌मे मबानिये जोर व एअतेसाफ लिवाये दौलत व रायते सल्तनते मा रा बेमंजुके जफर व नुसरत आरास्तेह व औजे कैवान रसानीद व दुश्मनाने साहिब मुकनत व अअदाये दीनोदौलत रा के हर्यक खियाले इस्तिकलाल दर् सर् व सौदाये इस्तिब्दाद दर खातिर दाश्तंद मनकूब व मकहूर गर्दानीद व बसाबिकये इनायते खुद् रोजे यकशंबा २४ रमजाने मुबारक औरंगे खिलाफत व जहां बानी रा बजुलूसे मैमनत् मानूसे मा जीबोजीनत बख्शीदह अबबाबे सआदत बर् रूये रोजगार कुशूद व जमामे महाम्मे अनाम व मसालेहे जमहूरे खास्सो आम रा बकबजये इक्तेदारे मा मनूत व मर्बूद फर्मूत व रूउसे मनाबिर व बुजूहे नुकूद रा बनाम व अल्काबे अश्रफ अकदस् अर्फअ हुमायूने मा रौनक व रिवाज अफ् जूद अल हमदो अला आलायेही अर्जदाश्ती के दरीं अय्यामे खुजिस्ता आगाज फरखुंदा अंदाम मसहूबे मुलाजिमे खुद बबार्गाहे अजमता जाह् इर्साल दाश्ताबूद व विसाबते वाकिफाने पायसे सरीरे खिलाफत् मसीर अज नजरे मुकद्दस् मुअल्ला गुजश्त व मुकद्दिमाते मारूजा मालूमे राये आलम आरा गश्त बायदके वर्जादये कवीमये दौलतखाही व खिद्‌मत्‌गुजारीये दर्गाहे आस्मान्जाह के बिहीने वसीलये हुसूले अमानी व आमाल अस्त साबित् व राखिख बूदेह ब इक्तिजाये खैर सिगाली व सलाह अंदेशीये उमदतुलमुल्करूकनुस सल्तनतिल् अलिय्या मोतमिनुद्दौलतिल् बहिय्या मुरीदफिदवी साहेबपरस्त सआदत् निशान् अमीरूलउमरा के अज पेशगाहे खिलाफत बखिदमते सुबादारीये सुबजाते दकन ब इस्तिकलाले तमाम सरफराज गश्ता व रत्को फतके मोहिम्मात व हल्लो अक्दे मोआमलाते आंजा ब राये रजीने आं आजुदुल खिलाफ मनूत गर्दीदा कार कुनद व अज सवाबदीदे आं मौरिदे मराहिम बिरूंनखद् व सई नुमायद् के मुकद्दिमाती रा के तअहहुद् नमूदा ब वजहे पसंदीदा सूरत पिजीर गर्दद्र व मुतरस्सिदे इनजाहे मुल्तसेमाते मकून व सबाब बूदा बाशत बहमदे वलमिन्नाके जलायले उमूर व अजायमे महाम के पेशनिहादे खातिरे मल्कूत नाजिर बूद ब‌अहसने वजह सूरते तमशीयत याफ्ता वकारे मुल्क व दौलत इस्तिकामते तमाम पिजरिफ्ता व अजहीच जहत् बगिरानी नमांदा व इनायते मुतआल् व नैरंगीये इक् बाले अदूमाल बिशुकूहे शकावत पिशह् बजजाये अअमाले खुद गिरिफ्तार शूदा बा अहल् व व अयाल दर सरहद्दे भक्कर असीर व दस्तगीर गश्ता व इनशा सुजाये हक नाशिनास नीज अनकरीब मुस्तासल खाहद् गर्दीद इंनायते अश्रफ रा शामिलेहाले खुद दानिस्ता दर खुरे नीको खिदमती उमीद्‌वारे महाहिमे पादशाही बाशद् बराये सरफ्‌राजीये ऊ खिलअते फाखिरा इनायत फर्मूदीम बतारिखे, ४ झीकादा सनये अहद् अज जुलूसे मुबारक मुबाफिके सनये १०६९ हिजूरी तहरीर यापत ५

सहल वसल्

भाषांतर

समकालीन व बरोबरीच्या लोकांत श्रेष्ठ, उमराव मंडळांत अग्रेसर, कृपेस पात्र, इस्लामचा आज्ञांकित, बादशहाचा कृपाकांक्षी शिवाजी यानें जाणावें कीं, सर्वांत श्रेष्ठ

व अतुल असा जो सर्वशक्तिमान परमेश्वर त्यानें सत्कृत्यें व दानशूरता यांचा प्रसार करण्याकरितां, न्यायाचा स्तंभ उभारण्याकरितां व जुलमाचा पाया खणून काढण्याकरितां आमच्या राज्याची ध्वजा विजयाच्या अवतंसानें सुशोभित करून शनीच्या कळसास पोहोंचविली; व आमचे करवीं सामर्थ्यवान शत्रूंचें व ज्यांच्या डोक्यांत स्वातंत्र्याचें वेड शिरलें होतें व जुलमाचें वारें भणाणत होतें असे जे धर्माचे व राज्याचे द्वेष्टे त्यांचें निर्दालन केलें. आपल्या पूर्वीच्या मेहेरबानीस अनुसरून आम्ही शुभ रमजानच्या २४ व्या तारखेस आदितवारी (५ जून १६५९) खलिपाच्या सिंहासनाला आपल्या बसण्यानें आलंकृत केलें व सुखाचे दरवाजे सर्वांस खुले केले. तुम्ही या सुखसमयीं आपल्या नोकराबरोबर अर्जदास्ती पाठविली ती खलिपाच्या सिंहासनाच्या पायथ्याशीं उभे राहणाऱ्या आमच्या नोकराचे द्वारां आमच्या पवित्र व ऊच्च नजरेखालून जाऊन त्यांतील आशय जगाला सुशोभित करण्याऱ्या आमच्या मनाला विदित जाला. गगनाचा भेद करणाऱ्या आमच्या या दरबाराच्या उंबरठ्यावर राजनिष्ठा व सेवा यांहीं निश्चयपूर्वक पायरव करून श्रेष्ठ अशा या राज्याचा आधारस्तंभ, विश्वासपात्र, ईश्वराचें भजन करणारा, सुखाचीं चिन्हें असणारा असा सरदारश्रेष्ठ उमदतुलमुलुक ज्यास दक्षणची सुभेदारी देण्यांत आली आहे व ज्याला पूर्णाधिकार देण्यांत आल्यामुळें जो उच्चपदाला पोंचला आहे त्याच्या मर्जीनुरूप तो सला देईल त्याप्रमाणें तुह्मीं काम करावें. आमच्या कृपाछत्राखालीं असणाऱ्या त्या अमलदाराच्या सल्याबाहेर तुह्मीं वागूं नये. जीं जीं कामें तुमचेकडे येतील त्यांचा तुह्मीं उत्तम रीतींनें फडशा पाडावा आणि अर्जांचा निकाल करण्यांत न्यायाचें परिपालन करावें. अदृश्य सृष्टीचें पूर्णत्वानें अवलोकन करणाऱ्या आमच्या अन्तःकरणापुढें जीं जीं कामें आह्मीं ठेविलीं होतीं तीं तीं चांगल्या प्रकारें पार पडून राज्याची इमारत भरभक्कम उभारली गेली. ईशकृपेनें व नशिबानें आमच्या अभागी शत्रंस केल्या कर्माचें फल मिळालें व ते मुलांबाळांसह भकरच्या सरहद्दीवर पकडले गेले. कृतघ्न सुजाचीं पाळेंमुळें लवकरच खणलीं जातील. आमची अति श्रेष्ठ अशी मेहरबानी तुमचेवर आहे, असें जाणून योग्य ती नोकरी बजावून आमच्या कृपेची वांछा धरून असावें.

तुमचा दर्जा वाढविण्याकरिता तुम्हास पोशाख पाठविला आहे. ता. ४ जिलकाद सन १०६९ हिजरी.

भा. इ. सं. मं. चतुर्थ संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. १८, पृ. ७५-७८.

## ३० सप्टेंबर १६५९ ] (– ९७ –) [ २२ मोहरम, सितैन अलफ

[ शिक्का ]

कौलनामा अज सरसुभे खान अलीशान येकबाळ निशान सिपेहसालार दौरानी बादज तारीफ खाने अजम अफजलखान महमदशाही हाल दअयामदौलतहू तां

शिवाजी फर्जंद कानोजी जेधा देसाई ताा भोर मालूम बाद सुाा सितैन अलफ बाबे कौलनामा यैसाजे. तुमचे बाबे मशहुरुल दौलत अमाजी आनंदराऊ किले रोहिडा येही मालूम केलें व लिहिलेवरून येकबयेक मालूम जाहालें. तरी तुमचा बाप व बिरादर दाहा वीस वरिसे शिवाजी भोसलेचे चाकरी करिताती हे मालूम आहे. तुम्ही त्या बातेचा उजूर न करितां हुजूर येणे. त्याचा इलाखा तुम्हास नलगे. तुम्ही दौलतखाहा असा. कांहीं शक अंदेशा न करितां खातीरजमा राखून दरहाल स्वार होऊनु हुजूर येणें. येथें आलेवरी नियेत बरनिसबत सरंजामी व सरफराजी होईल. येकीन जाणून सिताब येणें. हा कौल असे. पाा हुाा.

तेरीख २२ मोहरम

भा. इ. सं. मं. त्रै., व ७, अं. १–४, पृ. १०४.

१६५९ इ. स. नंतर] (–९८–) [?

रहिमतपूर येथील कबरीवरील शिलालेख.

मश्रिक (पूर्व)

अफ्जलखान मोहम्मदशाही<br>
खुदोकर्द अफ्झल ब लुत्फ्उम्मीद<br>
झजुम्ल खवानीन् मशूहूरे ऊशुद्<br>
चु जालिअ नीक् दाश्त तब्रदीरेखीश्<br>
नीक् गर्द् अझ् ऊ जुम्ल आलम् उम्मीद

अर्थ :— महम्मदशाही अफझलखान ईश्वरानें केले (तो) (स्व)कृपेनें श्रेष्ठ (झाला) सर्व खानांत तो प्रसिद्ध झाला. (ज्या अर्थी) दैवाचें दैव चांगले होतें (त्या अर्थी) त्याच्या योगानें सर्व जग चांगले झालें.

शिमाल (उत्तर)

ब दौरे महंमदशाह आसान् शुदो<br>
हमाँ काफिर मुर्ताइ मुसलमान् शुदा<br>
ब दौरे खुसरवै आदिल मोहंम्मद शाहीदकन्<br>
कामदार व अदालत् अप–झले बुत्शिकन्<br>
तारीख दर रोंझई अव्ल अस्ते

अर्थ :— मोहम्मदशाहाची कारकीर्द सुखकर झाली. सर्व काफिर इस्लामचे बन्दे झाले. दकनचा न्यायी राजा महम्मदशाह (हा) सुदैवी, न्यायी, श्रेष्ठ, मूर्तिभंजक

होता. याच्या कारकीर्दीतील तारीख पहिल्या रोज्यांत आहे.[1]

भा. इ. सं. मं. त्रै., व ७, अं. १-४, पृ. ३८.

३ मार्च १६६० ] (-९९-) [ १ रजब, हि. १०७०

[ आदिलशाही फर्मान-सारांश ]

यकोजी भोसले याने जाणावें की, मुहम्मदी धर्माचा प्रसार करणें हा आमचा हेतु असल्याने आमचा नेहमी जय होतो. उदाहरणार्थ, सध्या काफिर हरामखोर सीवा यानें बंड उभारल्यामुळे सीदी जौहर सलाबतखान यास लश्करासह त्याचा नाश करण्यासाठीं पाठविलें. तो रवाना झाल्यावर सीवाच्यानें त्याशीं लढणें शक्य न होऊन तो पळाला व त्याचें लश्कर विस्कळित झालें. आता अिस्लामी लश्कर त्याचा पाठलाग करीत असून थोडक्याच अवधीत त्यास कैद अथवा नष्ट करील. हें ऐकून तूं बादशाही दैवाचे आभार मानावेस.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २२८.

१६६० पूर्वी ] (-१००-) [ १५ जमादिलाखर

श्री

महजर बा तेरिख १५ माहे जमदिलाखर
श्री हुजुर हाजीर मजालसी सदर राजश्री
सिवाजी राजेसाहेब मुकाम प्राा पुणें
काजी अब्दुल बीन काजी महमुद हकीम
शराव काजी नायेब काजी प्रांत पुणें
रत्खाना.

| | |
|---|---|
| माा हजरत राजश्री | राजश्री वासुदेव बालकृष्ण |
| शामराज नीलकंठ | मजमदार |
| पेशवे रा ईाा | राजश्री माहादजी शाम |

१. अफझलखान हा किताब रणदुल्लाखानालाहि होता. महंमद आदिलशाहा इ. स. १६५६ च्या नवंबरांत वारला व रणदुल्लाखान इ स. १६५३ त वारला व त्याची कबर इ. स. १६५६ त बांधली. त्याच्या कबरीवरील लेख अन्यत्र आलाच आहे. महमद आदिलशाहाच्या उल्लेखावरून हा शिलालेख इ. स. १६५६ पूर्वीचा असला पाहिजे. परंतु श्री. आतार यानीं अफझलखानाच्या दुसऱ्या कबरीवरील म्हणून मानला आहे. इस्लामी धर्माप्रमाणें एकाच माणसाच्या दोन कबरी होत नसाव्यात. अफझलखान वधप्रसंगीं म्हणजे इ. स. १६५९ त अली आदिलशाहा तक्तावर होता.

| | |
|---|---|
| राजश्री सोनाजी– | राज मुसनीस. |
| विस्वनाथ डिबीर. | राजश्री सामाजी हरी नामजाद. |
| राजश्री बाबाजी नाईक | राजश्री सामराज पद्‌भनाभ. |
| पुंड मजालसा | सबनीस पावलोक. |
| माणकोजी दाहा तोडे | राजश्री रघुनाथ बलाल |
| सरनोबत रा ईा | सरसबनीस राा. ईा. |
| मुरबेग सरनोबत | |
| पावलोक. | |
| राजश्री आबाजी माहादे | |
| उ हेजीब व महाला निहाये. | |
| दफ्ते | |
| प्रांत पुणें | प्रांत सिरवल. |
| कारकून. | मलाहरजी यशवंत राव निगडे देशमुख |
| राजश्री सिवजी किले केसो आनंदराऊ | मजमदार. |
| नामजाद हवेली. | महादाजी राम देशपांडे ताा. खेडेबारे |
| देशमुख. | देशमुख. |
| मालोजी जसिंगराव सितोले | बापुजी बिन तुलाजी कोंडे |
| विठोजी नाईक सितोले. | मालजी नाइक कोंडे |
| विठ्ठल मोरदेव व गोविंदराव | नारो बापुजी देशकुलकर्णी, हिरडस मावल. |
| मुकुद काय देउ देसकुलकर्णी | रायाजी बिन बाजी नाईक बांदल देशमुख |
| विठ्ठल मोरदेव कुलकर्णी प्रांत पुणें. ताा. | फुलाजी व बाजी प्रभु देशकुलकर्णी ताा |
| बाये उर्फ पौड | कानदखोरे |
| रामाजीराऊतराऊ ढमाल देशमुख. | साबाजी झुंजाराउ देशमुख. |
| मलहर साबाजी प्रभु देशकुलकर्णी ताा | तुलजी यशवंतराउ देसमुख |
| मोसे खोरे | ताा वेलवंड खोरे |
| गोज प्रभु व तीम प्रभु देशकुलकर्णी | बाबाजी आढलराऊ देसमुख. |
| मालप्रभु देशकुलकर्णी. ताा मुठे खोरे | मोरो विठल देशकुलकर्णी. |
| चाहुजी गंभीराव मारण देशमुख | |
| वीस प्रभु देशकुलर्णी ताा. गुंजनमावल | |

महाराष्ट्र साहित्य, व. १, अं. ३, सप्तेंबर १९१९, पृ. १०३–०४.

२८ जानेवारी १६६१ ] ( – १०१ – ) [ ७ जमादिलाखर, इहिदे सितैन अलफ

श्री

[ फारसी शिक्का ]

.॥ छ अज रख्तखाने खोदायबंद सैद साहात सैद अशफ हवालदार कसबे

कर्यात मीठगवणे कुलीदयामदवलतहू ता भानाजी हरी हुदेदार व देसाईयानी व कुलकर्णी व खोत गावडेयानीं जरीबे मीठागर का मा बिदानद के हर्ची सुा इहिदे सितैन अलफ. दरीविले कृष्ण माहाजनी व नार माहाजनी बिन गोविंद माहाजनी देसाई का मा यासी बदल तश्रीफ इनाम नमक अगर अदवणा नजीक मळी मीठागर तें मन्हामत केलें असे. त्याचे दुमाले कीजे. सदहू अगर खराब पडिले असे. मशाखती करून कमावीस करून खातील. यासी व याचे अवलादी व अफलादीसी इनाम दर साला चालवीत जाईजे. तालीख लेहून घेऊन असल मिसली परतून दीजे. दर बाब ताकीद असे. [ मो फारसी ]

तेरीख ७ जमादिलाखर.

भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त, शके १८३६, पृ. ७८.

३० एप्रिल १६६१ ] (– १०२ –) [ ३० एप्रिल १६६१ (N. S.)

Dutch factor to Hague, dated 30 April 1661

[ भाषांतर ]

यादवी युद्धानें विजापूरच्या राज्यास झालेल्या जखमा अद्याप पूर्णपणें भरून आल्या नाहींत. विजापूरच्या बादशहानें पन्हाळ्याच्या जबरदस्त किल्ल्यासमोर सैन्यासह येऊन पोंचल्यानंतर मोठ्या बंडखोर शिवाजीशीं तडजोड केली. पुढें सेनापति जोहार सलाबतखान याजकडे बादशहानें वेंगुर्ला वगैरे समुद्र किनाऱ्याचा प्रदेश सोंपविला आणि कानडा प्रांतांतील वेंटप नायक यांजबरोबर युद्ध करण्यासाठीं किंवा त्याला जबर खंडणी देणें भाग पाडण्यासाठीं, मोठ्या सैन्यासह जोहाराची रवानगी करण्यांत आली. त्याप्रमाणें तो तिकडे जाऊं लागला, पण त्याच्या मनांत काय असंतोषाचा विचार आला असेल तो असो. तो सैन्यासह विजापूरपासून सुमारें १४ मैलांवर असलेल्या रकसगी–तंगडगीकडे परत आला आणि त्यानें ' मी विजापूरकरांचा ताबेदार नाहीं; तर मोंगलांच्या तर्फेचा सेनापति आहे ' असें जाहीर केलें. आणि असें म्हणून त्यानें विजापूरकरांची सर्व निशाणें व पताका मोडून त्यांच्या ऐवजीं नवीन मोगली पद्धतीचीं निशाणें उभारली. या वेळीं वेंगुर्ल्याकडे मिर्जा फते मलीक नांवाचा नवा हवालदार विजापूरकरांनी रवाना केला. तो वेंगुर्ल्यांत नोव्हेंबर १५ तारखेस येऊन पोंहचला. पण सलाबतखानानें वर सांगितल्याप्रमाणें घोटाळा केला असल्यामुळे वाटेल तेव्हां पळून जातां येईल अशा तयारीने तो राहिला. यामुळें हें बंदर पुनः खवासखानास देण्यांत येईल असें दिसतें. विजापूरच्या म्हाताऱ्या राणीनें आम्हांस (डच व्यापाऱ्यांना) असें कळविलें होतें कीं, " जानेवारी महिन्यांत इराणास निघण्याचा बेत मी तडीस नेणार आहे. ते हां

माझ्याकरितां एक जहाज तयार ठेवा.'' पण कप्तानानें ही गोष्ट मान्य केली नाहीं.''

भा. इ. सं. मं. त्रै., वर्ष ९, अं. ३, क्र. ३५, पृ. १९–२२, खंड इ. स. १६६१ चा, डाग रजिस्टर ( डच रेकॉर्डस ), पृ. ९६–९७.

२२ डिसेंबर १६६२ ] (–१०३–) [ पौष वद्य ८, शके १५८४, २१ जमादिलावल, सलास सितैन अलफ.

श्री सप्तशृंग

श्री सकलतीर्थस्वरूप वेदमूर्ती गणेश दीक्षित सो श्री... यासि राजेश्री जाधवराऊ राजे दंडवत विनति सुा सलास सितैन अलफ सके १५८४ शुभकृत संवछरे पूस वदी अस्टमी. आपले श्री क्षेत्रीचे तीर्थपुरोहितपण तुम्हास दिधले असे. आपले परंपरा वौशीचे तुम्हांस मानीत जातील. [ मोर्तब ]
[ शिक्का– ' कामनाजी : .. चार :... ' ]
ता. २१ जमादिलावल

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १-४, पृ. ७३.

२९ आगष्ट १६६३ ] (–१०४–) [ भाद्रपद शुद्ध ७ गुरुवार, शके १५८५ रुधिरे

श्रीगणेश प्रसन्न

श्रीगणेशायेनमा श्रीस्त्रस्वतीयेनमा श्रीगुरूभे नमा वीनायकं गुरूमानं ब्रम्ह-वीस्णं म्हयेस्वर सरस्वती प्राणमाधव सर्वकार्यार्थी सीधीये. स्वस्ती श्री–नृप साह ळीवाहान सकु १५८५ ( १६०५ ? )[१] वरूसे वर्तमान नाम संवसरे रूधिरे वडीग्रामे बैसळे ग्रामपुरूसे नाग काबळी याचा कान काबळी गण काबळी याचा तारू काबळी सोम काबळी यांचा फट काबळी देम काबळी याचा भीव काबळी आळपुजारेचा रामा पुजारा वा बाम पुजारा वातीक वाघार पुजारेचा जानपुजारा वातीक वा वीट सेणवी याचा भाग सेणवी वा भाद्र सेणवी याचा कुस्ण सेणवी कुळकर्णी वा साई भुया-ळाचा रागो भुयाळ येवं मिळाले. ग्रामपुरूसे येरा चुकले. ग्रामपुरूसाचेनी अनमते मिळोन केले, कृत गावपण यैसा जे. तथां गामे कादळगावीना रामकुस्ण

१. शकाचा आकडा चुकला असावा. जर रुधिरोद्गारी संवत्सर धरला तर शके १६०५ पाहिजे. त्याचप्रमाणें भाद्रपद शुद्ध ७ मी गुरुवाराचा मेळ १५८५ शक किंवा रुधिरोद्गारी संवत्सराला बसत नाहीं.

जोसी कानजोसी याचा पासी लीहून दीधले पटेचे क्रमु यैसा जे. क्षेत्रपाळ देवाजवळील भुमका बा। रागो वाळकी त्याचे चतुरसीमा पूर्व दीसे पाणलोटचे मेर। दक्षीण दीसे पुजारेचे देवसुवाची मेर। पछीम दीसे व्हळाची मेर। वुतर दीसे कोनीचे व्हळाची मेर। ऐसी चतुरसीमामधील भूमका तुमासी वुर्णजना करावेया जळमंतभासे इनामत दत करून दीळे आसे. ते भुमकेमधे नारगीळ माड वा बाजे हर जीनस झाडे बैसवुन क्रीद माहामुरी करून सुके भोगवटा करणे वा राजेश्री क्षेत्रपाळ देवासी कार्तीक मासी सोमवाराचे दीवसी अपसेक करणे. आता तुमी वा तुमचे जाले जातेनें ते भुमकेमधे भोगवटा करणे. आमी वा आमचे जाले जातेने पाळणे. वाचादत मनोदत धारादत मढीये ते ते नर नदकाये ती यावच्चंद्रदीवाकराः ॥ छ छ ॥ भाद्रपद सुध सप्तमी ब्रिस्पतवारीः निशाणी केसोदास रजपुत सीलेदार रा हजरती साहेब मोकदम मौजे मजकूर.

रामसेणवी
राकूदखजी काबळी
कान काबळी
तात काबळी
भीव काबळी
फट काबळी
निशाणी वार्तीक
ललल
दस्तुर कुलकर्णी

श्रीसरस्वती मंदिर, व. ८, अं. २, क्र. ३६, वैशाख शके १८३०, पृ. ३४-८; भंडारीविजय, व. ५, अं. ७-८, जुलै-आगष्ट १९२४, पृ. १०१-१०२.

२५ आक्टोबर १६६३ ] (– १०५ –) [ ३ रबिलाखर (फ.) सन १०७३ सुा सलास

गुमास्ते जागीरदारानी व देसमुखानी व देसपाडियांनी व मोकदमानी व सेटे महाजनानी व रया पाा पुणे व महालनिहाये सुा सलास सन १०७३. श्री मोरोबा गोसावी सोा मौजे चिचवड पाा पुणे मालूम केले जे अपणास इनाम बाा मदतमाश चाा परवाना बमोहोर व सनद असनाद आहे. नख्त व जिनस व जमीन चावर ताा तपसील जेले नख्तयाती व महसूल व बाजे बाबा व पायेपोसी व खर्च ( देह !)पटी व बाजे पटिया हाल व पेस्तर

| जमीन | नख्त व गला वगैरे |
|---|---|
| जिराती | नख्त वगैरा सालिना |
| चावर ६।· कास रूके अटरा | रोजिना नख्त टके ? |
| ०।६ | रोजिना तेल ७॥ ज्वारा |

रूके शेर हुला ? खंडी
.॥ १० ८८२ १०

कास गला खंडी
३॥.

आबा गवत हजार
पेड १ ५००००८

बागाइत जमीन बिघे गला मण
५० .॥.

कोठी तलकोकणात व मावलात व हर येक जागां जाईल ते वख्ती जकाती ने घेणें

पा पुणें

| जमीन | | नख्त वगैरा | |
|---|---|---|---|
| जिराती १ | बागाइत | रोजिनानख्त | सालिन्या |
| चावर कासरूके | जमीन बिघे | वगैरे | नख्त वगैरे |
| ४। ०। ६ | ५० | नख्त तेलवजा टके | |
| कास खंडी | गला मण | रूके न ७॥ | गवत |
| ३॥. | .।. | ०। ६ ८८१ | हजार. |
| | | | ५००००८ |

| | | | |
|---|---|---|---|
| मौजे चिंचवड | पा मजकुर | मौजे चिलोली | ना कीनहै |
| जमीन कास | | जमीन चावर | रोजमुरा |
| जमीन बागा | गला खंडी | १८ | दररोज रूके |
| इत टके | १॥ | | बारा .।. |
| ५० | जिराती बिघे | मौजे पिपडी | ना राहाठणी |
| | ३०८।.। | जमीन | चाकर २।० |
| मौजे ताथाडे | जमीन कास | जिराती कास | बागाइत जमीन |
| रूके ०। ६ | यकूण चावर. | खडी १॥। सुा | मण |
| | १ | चावर .।. | .॥. |

मौजे अकुलडी जमी
न कास गला रूक ८३ यकू
ण, गला .॥ यकास रूके
८३

मो खंडी १॥।

मौजे रहाटणी बा ? कुरण
नदी टके ७॥.

मौजे कुडदेळ जमीन का
स रूके. .।.

मौजे पिपलेसौदागर जमीन
चावर येक १८

मौजे वोकड चावर
येक १८

मौजे नेरें जमीन कास रूके
८६

मौजे बोपगौ रोजीना
नख्त रूके ८२
कसबे पुणे रोजीना जका
ती पैकी दरोज

मौजे भिवरी रोजीना नख्त
रूके ८२
गवत गांवगंना सालिन्या
मोइन हजार पनास
५०००० ८

जकाती रूके तेल वजन
हसील दे ? सेर ८८१

पा। सुपें

जमीन चावर ८२
रोजिना
नख्त रूके ८६ तेल वजन ८८१

ता।

कसबे सुपे
मौजे कुमारलवण
जमीन चावर येक १८

जिराती जमीन
चावर येक १
रोजिना बा।
जकाती
नख्त रूके ८६
तेल घाणेबुड पैकीं सेर ८८१
तपे पौड वगैरा

कारकीर्द तान पाटील

तपे पौड भात बारीक
सालिना खंडी १८

तपे पौन मोजै उरसें
आबा पेड १

सदरहू बदस्तुर साबिक चालिले आहे. हालीहि दुमाले करणे. उजूर न करणे, दरीबाब ताकीद दानद.

मोर्तब सुदु

तेरीख ३ माहे रबिलाखर सन १०७३

---

भा. इ. सं. मं. त्रै., व. २ अं. १–४, पृ. ६३–६५.

१६६४ इ. स. पूर्व ] (–१०६–) [ १६ रजब ?

श्री

मशेरूल हजरत राजमान्य राजश्री निलोपंत तथा शंकराजी व विसाजीपंत तथ त्रिंबक पंडित प्रती माहाराज राजश्री शहाजी राजे दंडवत उपरी. राजेश्री (महादजी) निलकंठरायास देवाज्ञा जाहली म्हणून चिरंजीवाने लिहीले. तरी बहूत अनुचीत जाहले. श्रीच्या करणीस कांहीं चालत नाही. तुम्ही विवेकी आहां. आपले समा-

धान आसो देणे. चिरंजीवे तुमच्या सरंजामीचे बाबे लिहीले होते. तरी तुमच्या कंठाली पाठविल्या आहेती. त्या घेणे व लुगडीही पाठविली आहेत ते घेणे. राजश्री राऊ गोसावी जैसे कांहीं समाधाने व स्नेहे करून चालत होते तेच रीती तुम्ही वर्तणे. तेणे करून तुमचे उत्तरोत्तर उर्जीत आहे. कोण्हे विषई चिंता न करणें. सकलाचे समाधान करणे. राजश्री भट गोसावी व रघुनाथ बहुता रिती तुमचे विषई सांगितले. तरी तुम्ही सूज्ञ आहा. भले आहा. कोण्हे विषई तुम्हापासून आंतर पडणार नाही. तुम्ही सकळ विशई आपले समा(धा)न असो दीजे. मोर्तब सुद. रा छ १६ रजब.

सहविचार त्रैमासिक, व. २, अं. १, आगस्ट १९२३, पृ. ३५.

१६६४ इ. स. पूर्व ] (-१०७-) [ ?

[ आदिलशाही फर्मान—सारांश ]

शाहाजी राजे यांनी सुखी असावे. लिहिलें होते कीं, बहलूलखान व आम्ही यांत सल्ला झाला. आपणास कळावें की, त्यामुळें आम्हास आनंद झाला. फार चांगले झालें. दोहोंमधील प्रेम वाढो. नबाबाबरोबर एकदिल होउन राज्याचे कल्याणाबाबत प्रयत्न करावा. विरूद्ध जाउं नये.

सह्याद्रि, व. ११, अं. ५, मे १९४५, पृ. २९८.

एप्रिल १६६४ ] (-१०८-) [ क्रोधी संवत्सर माधव शुक्ल

श्रीगणेशाय नम : ॥ श्रीसीतारामचंद्राय नम : ॥ स्वस्ति श्रीमत्पंचधाम्यस्तत्राप्युदितसदाचारत्वरणेंषु जैमिन्याम्नातमहाशास्त्रपारावारानेकधुरीणेषु दृगंघ्र्यानननाब्जाविर्भूतानेकतर्ककल्पपादपनिबिडारण्यानीककंठी( सिंह )रवेषु क्षोणीभरोद्वहनालंकर्मीणकुंभीनसैकनाथजिव्हायुग्माभिपूर्णाननविषमसमुद्गीर्णवर्णरत्नावली भ्राजत्सानुशास्त्रगिरिभिदुरधिषणेषु महामुनिकपिलाचार्योदितविद्याचुंचुषु सांख्यशास्त्रकुशलसंख्यावदग्र्येषु महानुभावयाज्ञवल्क्याद्यनेकस्मृतिव्याख्यातृविज्ञानेश्वरमाधवादिरचितनानानिबंधालोकनप्रत्यक्षीभूतानेकलोकाचारपथेषु कृष्णद्वैपायनास्यकमलनिसृतवेदांतशास्त्राधीत्यधिगतपरमार्थेषु राजन्वद्रजतपुरकांता ... ... ... पातुरस्थसमस्तकरहाटजातीयब्राह्मणेषु राजापुरप्रांतस्थसंगमेश्वरप्रांतस्थखारेपाटणस्थसंदलप्रांतस्थलांजेप्रांतस्थसैतवडेप्रांतस्थमुचुकुंदीतीरस्थकृष्णातीरस्थकरवीरस्थककुद्मतीतीरस्थसमस्तब्राह्मणानुष्ठितानेकसाष्टांगनतिततयो विलसंतु । क्रोधीसंवत्सरमाधवशुक्लपक्षत्यपक्षतमास्माकीनं भावुकमवबुध्य भवदीयभव्यलेखनेनास्मानानंदयितुमर्हथ । विशेषस्तुश्रीमद्भिस्तत्रत्योदंतपत्री दूतो-

स्मान्प्रेषितः तं गोचरीकृत्याततिरांतरस्मः स वेत्थं पुरा देशकालविप्लवेनात्रागतानां कतिपयानां राजापुरपट्टणदेशीयानां कोंकणाभिधानदधतां शेणवीति प्रसिद्धानां को धर्मः कीदृगाचार इति केचनात्र भृशमक्षिपत्यस्मान् अतः एतज्जातीया जनास्तत्र भूरिशो विद्यंते तेषां पूर्वपरंपरागत आचारो यथा वर्तते तथा लिखित्वा प्रेषयेलिम-स्तेनैवाचारपथेनैतान्वर्तयिष्यामः इति। तदुत्तरं तु

अस्ति प्रशस्तविभवोपगतप्रशस्तिविस्तारिणी भुवि शकाधिपराजधानी ॥
राजापुरीति विदिता नगरीमतल्लिपल्लीव भाति पुरतस्त्रिदिवोऽपि यस्याः ॥१॥
तस्यामभूद्विमलराजकुलांबुराशावुद्यत्प्रभूतशुभकीर्तिधनप्रकाशः ॥
लोकैः सदा हृदि धृतो गुणसंनिविष्टः श्रीशाहजीति नृपतिर्भुवनैक (शाह) रत्नम् ॥२॥
तस्यात्मज : शिव इति प्रथितप्रभावः सिद्धांगनाजनसमाजसमिद्धकीर्ति : ॥
दाने यमः सुकृतिनां क्षिपति स्म दैन्यं सैन्येन वैन्यसदृशः प्रतिभूपतीनाम् ॥ ३ ॥
यस्मिन्नसाधारणधैर्यशौर्यगांभीर्यसौंदर्यगुणैकधुर्ये ॥
गिरीन्द्रभीमानुजसिंधुराजस्मराश्च साधारणातां भजंते ॥ ४ ॥
दानाय द्रविणार्जनं जनपरित्राणाय वीरव्रतं
सत्याय प्रियभाषणं हरिपदध्यानाय चेतःस्थितिः ॥
यत्सख्येन च चक्रवर्तिपदवीं याता नृपा भूरिशो
दिल्लींद्रः क्षयमाप यस्य कलहाल्लंकेशतुल्योपमः ॥ ५ ॥
असौ शिवाजी रूचिरेण धाम्ना नाम्ना च रूपेण च संगतार्थः ॥
रोषातुरे चक्षुषि यद्विपक्षो नितांतकांतारसमाश्रितोऽभूत ॥ ६ ॥
विश्राणनेषु व्यसनं यदीयं विद्याप्रसंगेषु विनोदसौख्यम् ॥
यस्यावदातं च यशोवितानं दिग्मंडलीमंडपमातनोति ॥ ७ ॥

अयं शिवाजीराजा राज्यं प्रशासत्सवर्णाश्रमेतरायोनिवृत्तिधर्मलिंगासकरेण वर्तयन् कदाचिद्दिदृक्षया स्वजनपदानटसह्यप्रदेशवासिनः श्येनवीति प्रसिद्धान् द्विजवेषधरान् क्षेत्राजीवान नानाविधान्युपायनान्यादाय राजदिदृक्षया समागतान् एतान् कौकणादृष्ट्वा राजनिकटवासिनः सभ्यान्पंडितानेतद्देशीयभूधर्माधिकारिणश्च एषां को धर्मः कीदृगाचार इति समपृच्छत्। तत्र समायां स्थिताः पंडिताः। गागाभट्टस्त्वनूचानो निगमागम-वित्तमः। सभायां शुशुभे राज्ञः सुधर्मायां यथा गुरुः ॥ १ ॥ दीक्षितः शिति-कंठश्च रघुनाथो बुधाधिपः। कवीन्द्रः परमानंदो महादेवश्च पंडितः ॥ २ ॥ प्रभाकर-उपाध्यायस्तथा श्रीरंगशास्त्रिणः। नृसिंहशास्त्रिणश्चाथ भट्टविश्वंभरोऽपि च ॥ ३ ॥ अयाचितमहादेवः पंडिताग्र्यो विनायकः। सोमनाथो जगन्नाथो भट्टविष्णुस्तथैव च ॥ ४ ॥ भूगोपालाभिधोऽनंतोपाध्यायः पंडिताग्रणीः। शेषोपाख्यमहादेवः काशीस्थाः पंडिता अमी ॥ ५ ॥ सर्वशास्त्रांबुधेः पारदृश्वानो वेदपारगाः। विहितानुष्ठितिरता निष्सिद्धानां च वर्जकाः ॥ ६ ॥ कृष्णागोदावरी-निष्ठाश्च बहवो बुधाः। स्थिता नृपसभे तत्र तथैतद्देशवासिनः ॥ ७ ॥ धर्माधिकारिणोत्यर्थधर्मशास्त्रार्थकोविदाः ॥ तत्र धर्माधिकारिलक्षणं इष्टापूर्तं व्रतं प्रायश्चितं ज्योतिषमेव च। पुराणं प्राड्विवाकत्वं

राष्ट्रधर्मनिरीक्षणं ॥ अष्टधर्मस्य तत्त्वज्ञो नृपेणाधिकृतश्च यः । धर्माधिकारी विप्रेशो ब्रह्मदंडप्रभुर्हि सः ॥ अथोपाध्यायलक्षणं । तत्र मनुः ॥ एकदेशं तु वेदस्य वेदांगान्यथवा पुनः । योध्यापयति वृत्त्यर्थमुपाध्यायः स उच्यते ॥ याज्ञवल्क्यः ॥ स गुरुर्यः क्रियाः कृत्वा वेदमस्मै प्रयच्छति । उपनीय ददद्वेदमाचार्यः स उदाहृतः ॥ एकदेशमुपाध्यायऋत्विग्यज्ञकृदुच्यते । वेदस्यैकदेशं संहिताब्राह्मणं वा धर्मार्थमध्यापयति अपरिभाषितवृत्त्यभिसंधानेन व पूर्वोक्तमध्यापयति एते त्रयोऽप्युपाध्याया इत्यर्थ इति मदनपारिजाते ॥

राजापुरप्रांतें तु धर्माधिकारिणो गुर्जरोपनामकाः शिष्टा विद्यंते तथा तेषां ताम्रपत्रेऽपि आचंद्रार्कमहीधरान्वयभृतामाब्राह्मणः शासना... नैध्रुवगोत्रगुर्जरभुवां भूदेवपूज्यात्मनां । आचारादिषु देशमान्यपदवी वर्वर्ति लोकोतरा कश्चिल्लंघयितुं तु तां परिदृढीभूयाद्विधिस्तं दहेत् ॥ इति ॥

धर्माधिकारिणश्चैते गुर्जरा उपनामतः । महातपस्विनः पांडुरंगोपाध्यायसूरयः ॥ कुलीनाः सत्यवचना वेदवेदांगपारगाः । येषां वचःप्रसादेन देवदेवः प्रसीदति ॥ उपाध्यायो रघुनाथस्तथोपाध्यायकेशवः ॥ उपाध्यायो विश्वनाथस्तथोपाध्यायविठ्ठलः ॥ अष्टाधिकारिणश्चैते राजापुरनिवासिनः । उपाध्यायो गळवल्लीकरेऽनंतोऽभिधानतः ॥ धर्माधिकारी विप्रेशो संमगेश्वरराष्ट्रियः । सर्वेऽप्येते । धर्मशास्त्ररथारूढा वेदखड्गधरा-द्विजाः । निर्जिताखिलकादिशत्रवः तत्त्वदर्शिनः ॥ एते चान्ये च बहवः पंडिताश्च समागताः । कृत्वा समाजं सर्वे ते ग्रंथानादाय भूरिशः ॥ हेमाद्रिं माधवं व्याख्यां विज्ञानेश्वरयोगिनः । रत्नावलीं च मदनपारिजातं व चंद्रिकाम् ॥ पृथ्वीं चंद्रोदयं कल्पतरूं च स्मृतिकौस्तुभ । मयूखान् सागरान् सप्त गोविंदाद्यं महार्णवं ॥ तथा दिनकरोद्योतमपरार्कं च दर्पणं । मन्वाद्यनेकमुनिभिर्भाषिताश्च स्मृतीरपि ॥ मनुर्बृह-स्पतिर्दक्षो गौतमोऽथ यमोंऽगिराः । योगीश्वरः प्रचेताश्च शातातपपराशरौ ॥ संवर्तोशनसौ शंखलिखितावत्रिरेव च । विष्ण्वापस्तंबहारीता धर्मशास्त्रप्रवर्तकाः ॥ एते ह्यष्टादश प्रोक्ता मुनयो नियतव्रताः । जाबालिर्नाचिकेतश्च स्कंदो लोगाक्षिकोऽसितः ॥ व्यासः सनत्कुमारश्च शंतनुर्जनकस्तथा । व्याघ्रः कात्यायनश्चैव जातूकर्ण्यः कपिंजलः ॥ बौधायनश्च काणादो विश्वामित्रस्तथैव च । पैठीनसिर्गोभिलश्चेत्युपस्मृति-विधायकाः ॥ वसिष्ठो नारदश्चैव सुमंतुश्च पितामहः । विष्णुः कार्ष्णाजिनः सत्यव्रतो गार्ग्यश्च देवलः ॥ जमदग्निर्भरद्वाजः पुलस्त्यः पुलहः ऋतुः । आत्रेयाश्च गवेयाश्च मरीचिर्वत्स एव च ॥ पारस्करश्चार्षशृंगो वैजवाश्च तथैव च । एतत्प्रोक्ताः स्मृतीः । अष्टादशपुराणानि पल्लवानि च सर्वशः । संहिताश्चापि विविधाश्चित्रार्थी च बृहत्कथां ॥ एतानन्यांश्च विविधान् गंथानालोक्य भूरिशः । परंपरागतश्चैषां धर्ममालोक्य तत्त्वतः ॥ गागाभट्टप्रभृतयः कृत्वा निर्णयमुत्तमं । राज्ञे न्यवेदयिषुरू.........व्यलेखयत् ॥ तत्रत्यं सारमादाय किंचिदत्रापि लिख्यते । तत्र तावद्याज्ञवल्क्यः ॥ विप्रक्षत्रियविट्शूद्रा वर्णास्त्वाद्यास्त्रयो द्विजाः ॥ निषेकाद्याः स्मशानांतास्तेषां वै मंत्रतः क्रिया ॥ इति ।

तत्र ब्राह्मणधर्मा : ॥ प्रातःस्मरणशौचदंतधावनप्रसाधनप्रातःस्नानसंध्यावंदनौपासनाद्यग्निपरिचरणवेदाभ्यासशास्त्राधिगमसमित्पुष्पकुशाहरणादयः स्मृतितोऽवंगतव्या ॥ नरसिंहपुराणे ॥ दिवसस्याद्यभागे तु सर्वमेतत्समाचरेत् । इति ॥ दक्षः ॥ द्वितीये च तथा भागे वेदाभ्यासो विधीयते। वेदस्वीकरणं पूर्वं विचारोऽध्ययनं जपः ॥ तद्दानं चैव शिष्येभ्यो वेदाभ्यासो हि पंचधा। समित्पुष्पकुशादीनां सकलाः समुदाहृताः ॥ पूर्वाह्णस्यैव भागकल्पना ॥ अथ पोष्यवर्गचिंता। तत्र दक्षः। तृतीये च तथा भागे पोष्यवर्गस्य शोधनं। पोष्यवर्गस्तु। माता गुरुः पिता भार्या प्रजा दीनः समाश्रितः। अभ्यागतोऽतिथिश्चाग्निः पोष्यवर्ग उदाहृतः ॥ (मनुः) पिता माता सुतो भार्या भगिनी चाविवाहिता। अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत् ॥ (याज्ञवल्क्यः) उपेयादीश्वरं चैव योगक्षेमार्थसिद्धये। (विष्णुपुराणे) ततः स्ववर्णधर्मेण वृत्यर्थं च धनार्जनं। कुर्वीत श्राद्धकर्माणि यजेत पृथिवीपते ॥ सोमसंस्थाहविः संस्थापकतंस्थादिसंज्ञकाः। धनायत्ता मनुष्याणां यत्नेनैव धनार्जनेति ॥ धनमूलाः क्रियाः सर्वा यत्नस्तस्यार्जने मतः। दानं च रक्षणं भोग इति तत्र विधिः क्रमात् ॥ इत्यादिजीवनोपाया ब्राह्मणस्य च। अथापद्वृत्तिः। नैरुक्ते यास्कः। शकटः शाकिनी गावो जाल... .. । उदधिः पर्वतो राजा दुर्भिक्षे नव वृतयः इति। मनुः। अजीवंस्तु यथोक्तेन ब्राह्मणः स्वेन कर्मणा। जीवेत्क्षत्रियधर्मेण सह्यस्य प्रत्यनंतरः ॥ उभाभ्यामप्यजीवंस्तु कथं स्यादिति च भवेत्। कृषिगोरक्षमास्थाय जीवेद्वैश्यस्य जीविकाम् ॥ वैश्यवृत्या जीवन्तोऽप्यविक्रेयमाह। सद्यः पतति मांसेन लाक्षया लवणेन च ॥ त्र्यहेण शूद्रो भवति ब्राह्मणः क्षीरविक्रयात् ॥ इतरेषां तु पण्यानां विक्रयादिह कामतः। ब्राह्मणः सप्तरात्रेण वैश्यभावं सम ...... .. ॥ आपदी कृषि वृत्तिरंयुक्ता कालिकापुराणे। कृषिगोरक्षवाणिज्यं विप्रस्यापदि संमतं। तथाव्यनडुद्युग्माभ्यां कृषिं चैव समाचरेत् ॥ द्विगवाभ्यां द्विपट्काभ्यां प्रहरार्धप्रमाणतः ॥ द्वयोर्मांतरं चैव कारयेद्धर्मतो द्विजः ॥ पिण्याकतृणतोयं तु तेषां दद्यात्प्रयत्नतः। धूमकंडूयनं चैव कृत्वैवं कारयेत्ततः ॥ वैणवीमपि भूमिं तु अधोमुत्रगताय च। कुर्वन्नेवं न सीदेत कृषिं विप्रो महामुने ॥ राज्ञां षड्भागमुत्सृज्य पंचमं कर्षकस्य च ॥ शिल्पिनः प्रकृतीश्चैव दीनांधांस्तर्पयेत्ततः ॥ शेषमात्मनि भुंजीत खलु क्षेत्रेष्वयं विधिः ॥ पराशरस्तु। स्वधर्मनिष्ठस्यापि विप्रस्य कृषिकर्मप्रवृत्तस्य प्रातः स्नानहोमानंतरं हलेऽष्टवृषनियो......वाहयेद्दिवसस्यार्धं पश्चात्स्नानं समाचरेत् ॥ वृक्षं छित्वा महीं भित्वा हत्वा च कृमिकीटकान्। कर्षकः स्वल्पयज्ञेन सर्वपापैः प्रमुच्यते ॥ स्वयं कृष्टे यथा क्षेत्रे धान्यैश्च स्वयमर्जितैः। निर्वपेत्पंच यज्ञानां क्रतुदीक्षां च कारयेत ॥ हारीतः। अष्टागवं धर्महलं ष वं जीविकार्थिनां। चतुर्गवं नृशंसानां द्विगवं ब्रह्मघासिनां ॥ बालानां दमनं चैव वहनं च न शस्यते। वृद्धानां दुर्बलानां च प्रजापतिवचो यथा ॥ पुच्छोपघातनं नासौ वाहानां कारयेत्ततः। वृद्धं युग्मे न युंजीत जीर्णं व्याधितमेव चेति ॥ यानि तु– वैश्यवृत्यानुजीवंस्तु ब्राह्मणः क्षत्रियोऽपि वा। हिंसाप्रायां पराधीनां कृषिं यत्नेन वर्जयेत् ॥ कृषिः साध्वीति मन्यंते सा वृत्तिः सद्विगर्हिता। भूमिं

of the Emperor.

During the auspicious time it has come to our knowledge through the courtiers that Sayaji son of Parsoji says that since the commencement of our reign he has had as a jahgir the village of Nandanaj, Pargana Karoli, Sarkar Ahamadnagar, in the province of Aurangabad and that he has shown a good increase in the income and revenue of the village and with his good management has populated a new village named Alamgirpur, where in he now lives and requests that it would be very kind and quite in conformity with the laws of justice to bestow upon him the said village, we therefore grant the above request and order that Sayaji son of Parsoji be allowed to live with Nandnaj and Alamgirpur in Jahagir as is mentioned in the order. We further enjoin that the Mutasadin (मुत्सद्दियान) of the Mahal and their successors must never make any change herein and disobey our everholding good command and especially they ought to be very mindful not to go against the honourworthy Farman as given under our seal.

~~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ७२-७३.

२४ दिसेंबर १६६८ ते] (–११९–) [साबान, सुा सन १०७८
२१ जानेवारी १६६९

सरदेसमुख व देसमुख व देसपांडिये व मोकदमान व रया परगणे सुपे सुा साबानु १०७८ बिदानद की बमोजीब परवाना वजारत व येकबालपनाह मदारल मोहमी—अराजी व रोजीन पा मजकुर दरवाजे मदध व माश बोा मोरबा गोसावी सो मौजे चिचवड पा पुणे मोकरर आहे. बा सनद अराजी वगैर अजमाहाल कदीम बदस्तुर साबीक बशर्त कबज व तसरूफ मोइक बा फरज बा ! णे वा गुजारंद दरीबाबा हिलेहरकत न करने

हसबुल्मस्तुर मोकरर असे बि ता

| | | |
|---|---|---|
| जमीन गजशरई | नकद रोजिने वगैर | |
| चावर | नकद रूके | तेल |
| २ | ८६ | ८८१ |

ता गा
दर सवाद मौजे कुंभारवलन
पा मा दर जमीन गजशरई चा
१
~~~~~~~~~~~~~~~

दर सवाद कमा मजकर
जिराती जमीन गजशरई
१ वड रोजीन
जमीन चावर
१ रोजीन रूके
८६
तेल दर घाने दरजकाती
बुड रोजमोरो
सेर
८८१

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १–४, पृ. ६५.

२४ दिसेंबर १६६८ ते] (–१२०–) [तिसा- सने १०७८.
२१ जानेवारी १६६९

सरदेसमुख व देसमुख देसपांडिये व मोकदमान् व रया परगणे सुपे सुा तिसा सन १०७८ बिदानद की बमोजीब परवाना वजारत व येकबालपनाह मदारल मोहमी अराजी व रोजीने पाा मजकुर दरवाजे मदध व माश बोाा मोरबा गोसावी सोाा मौजे चिंचवड पाा पुणे मोकरर आहे बाा सनद अराजी वगैरे अज माहाल कदीम बदस्तुर [फारसी शिक्का][1] साबीक बशर्ते कबज व तसरूफ मोाईल बाा फरज होंणे वा गुजारद दरीबाब हिले हरकत न करने हसबल मस्तुर मोकरर असे बिताा ताा

| | |
|---|---|
| जमीन गजशरई | नकद रोजीने वगैरे |
| चावर | नकद रूकें ८८१ तेल |
| | ८०६ |
| | ताा गाा |
| दरसवाद मौजे कुमारवलन | दरसवाद कमा मजकुर |
| पाा माा हरजमीन गजशरई चाा १ | जिराती जमीन |

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अ. १–४, पृ. ६६.

१३ फेब्रुवारी १६६९] (–१२१–) [२० रमजान हि. १०७९

अलीफ

अमारत व अयालत पनाह बसालत व तहव्वूर दस्तगाह मालोजी राजः बुलंद दर्जः बहादर घोरपडः आदिलशाही आंके अज शुहूर सनः सितःसबैन व अल्फ

१. शिक्का— ' अनुपतराव बंदे दर्गाह. '

( १६६५–६६ इ. स. ) कै शुमा दर आदिलशाही बसा इज्जत व हुरमत हासिल नमूदः बरकार सरकार आमदः बिजारत हासिल कर्दः खिदमत सरकार अक्दस बुजुर्गान खुद व शुमा वफूर अरवाम अज यक तादिली बजा आउर्द दरीं बाब इज्जत दस्तगाह सीवाजी राजः भोसलः ईशां जाहर कर्द नीज बिलफेल आदिलशाहीरा अफघान हमदस्त कर्द:अंद दर आं मायां अफघानरा तंबीह कर्दन इराद: मुकरर नमूदः अम बायद दर ई शुमा उम्दः सरदार मरहटः इज्जत व हुरमत वालः बदस्त शुमा कलां व उम्दः कार बर आमद: अंद व पेश्तर शुमा बकुनंद ई अअतमाद सरकार दानिस्तः ई हुक्म सादिर कर्द अस्त के शुमा लाकसूर मअ फौज व सरांजाम गिरपतः तशरीफ आरंद चः तौर दर आदिलशाही रवां व इजर आमदः अस्त बदा मूजब खुदरा मअ दर्जः व मरातिब विजारत चदां के जागीर व मुल्क रवां आमदः अस्त बमूजबे आं दरीं जा रवां खाहद शुद के आदिलशाही ईशां शुमारा इनआम दाद: अंद आं मुल्क रवां खाहम कर्द खातिर जमअ दारद तहरीर फितारीख बीस्तुम २० माह रमजानुल मुबारक सनः १०७९ हिजरी मुकदस:

सारांशः—मालोजी राजे बहादर घोरपडे ( यांस पत्र ) कीं, सुहूर सन १०७६ ( १६६५–६६ इ. ) तुम्ही आदिलशाहींत पुष्कळ मान मिळविला आहे आणि सरकार कामास येऊन प्रधानकी मिळविली. आणि सरकार चाकरी तुमचे वाडवडील व तुम्ही एक दिलानें पुष्कळ दिवस केली. या बाबतींत शिवाजी राजे भोसले यांनीही जाहीर केलें कीं, सध्या अफगाणानें आदिलशाही हातांत घेतली आहे तेव्हां आम्ही अफगाणाला तंबी देण्याचा इरादा केला आहे. आपण मराठे इज्जतदार आहां. आपल्या हातून मोठी व उमदीं कामें झाली आहेत व पुढेही होतील. सरकारचा हा विश्वास जाणून तुम्हांस हुकूम सादर करीत आहों कीं, तुम्ही सरंजाम व फौज घेऊन बेशक इकडे या. आदिलशाहींत जे कांहीं चालू असेल त्याप्रमाणें प्रधानकीचे मरातब व दर्जा, तसेंच आदिलशाहींत जो मुलूख व जागीर चालू असेल ती, इकडे चालू राहील. खातिर जमा ठेवावी. हिजरी सन १०७९ रमजान २०

भा. इ. सं. मं त्रै., व. ११, अं. ३, क्र. ४३, पृ. १५–१६.

२८ मे १६६९ ]          (– १२२ –)          [ जेष्ठ शुद्ध ७ शुक्रवार शके १५९१

आलफ

[ फारसी मजकूर ]

दाा नारोजी सुर्याजी देसपांडिये प्राा मजकूर दसकत माहादाजी देसमुख सके १५९१ सौम्य नाम सवत्सरे जेष्ट श्रुध सप्तमी वार शुक्रवार ते दिवसी मीरासीपत्र त्रिंबक जोसी बिन मोर जोसी कसबे भींगार हवेली अहमदनगर यांसी

मोकदम ... ... ... ... चोगुले

१ अनसोजी बिन नागोजी पाटील गुरव मो
१ जाऊजी बिन काळोजी बाहसेर मो
१ एसाजी बिन जाखोजी काळे मो
१ लखमजी बिन म्हलोजी गोदळ
१ गोविंद बिन सखाजी काळा
१ दिपाजी बिन बगोजी काळा

व समस्त दाहीजन मौजे कवीठे पा नीवासे सा अहमदनगर सुबे खुदस्तेबुनियाद मिरासपत्र लेहोन दिधले ऐसे जे. मौजे मजकुरीचे कुळकर्ण तुम्हा पासुन रुा ६०१ सासे एक घेऊन विकत दिधळे असे. तुम्ही लेकुरांचे लेकुरी कुळकर्ण खाने. आपले गांवी कुळकर्णी मिरासदार होता. तो दुकळा काळे बुडाला. त्याचा कोण्ही वारीसदार नाही. मग गावास नातवाणी जाली. त्या मुळ आपण तुम्हास विकत दिधळ असें. सानीनहाल कोण्ही उभा राहेळ त्यास आपण समजाउ. तुम्हासी समध लागो न देऊ. तुम्ही कुळकर्ण मिरासी लेकुराचे लेकुरी अर्जानी करणे. कोणे बाबे शक न धरणे. घर व वाडी बा नरसोजी तकिया गतकुल त्याचे बुडाले आहे. ते देखील अडतेही मिरासी करून दिधले असे. यास हिलाहर्किती जो करील त्यास आपण वारु. तुम्ही आपळा हक व मुशाहरा व तेल व जोडा व चवाले वगैर हक घेत जाणे. यास आपण बेइमानी करून तरी आपल्या पूर्वजाची व कुळस्वामीची आण असे. हे मिरासपत्र लिहुन दिधले. सही. अधी पैका घेतळे मग महजर लेहून दिधळे. हे सही.

तेरीख छ० '५ माहे मोहरम
सन १०७९ हिजरी सन १०८०
मुताबिक सन १२

निशानी नागर

बिकलम जनार्दन यादव कुलर्णी मौजे चाद पा मजकूर

गोही

साक्षी आउभट खरवडीकर मूळे। भोजजी मोकदम मौजे चांदे। मल्हारजी पटारा चौगुला मौजे चांदे। एसाजी डांकिया मौजे चांदे। बिा नागोजी कुलकर्णी मौजे चांदे। एसाजी वलद संताजी हिगना मौजे मजकुर। सटवाजी बिन रतन पाटील बेरड का भिंगार प्रा हवेली अमधनगर। सभाजी वा तुलसोजी काले। सबाजी वा लखमजी। परसोजी वा जाउजी मुले मौजे सिराल। सितोजी बिन कान्होजी सुतार मौजे मजकूर। नागोजी मोकदम व समस्त दाही जन मौजे सिगवे तुकाईचे। यादवभट बिन नागभट मुळे मौजे मा। सितोजी सुतार बिन सान+ सुतार मौजे मा। बुबाजी गुरव राउत फड राजजी मोकदम मौजे चादे १। विठोजी सेटिया मौजे चादे १। बापुजी डाकिया मौजे चादे १। एमाजी दहतोजी मौजे चांदे १। कान गावडा वा जेबगावडा। कृस्णाजी मोकदम कसबे मिरी वृत्तीकार। पेम नाईक वा जाख नाईक माहार मौजे मा। भडारनाक १। तुलनाक १ बगाऊ मौजे मा। संता माग मौजे मा। बाद मेहतर चाभार मोकदम व वालोजी झिंपुर्डे मौजे राजन गौ प्रा सेवगौ। बिा बालाजी कुलकर्नी मौजे मा। तुकोजी पाटील मोकदम मौजे बुऱ्हाणपुर। काऊजी नाईकवाडी व लाडजी नाईकवडी प्रा नेवासे।

सेकोजी अहीर मोकदम मौजे म्हालसे पिपलगौ । बिा गोविंध भुतो कुलकर्नी मौजे माा । नरसोजी मोकदम मौजे करज गौउ । खडसेट वाा जानसेट मौजे पेडगांव । ब्रह्मनी वाा राउजी । मालजी वाा रमाजी ढवले । जमालखां मुल्लां खिजमत पीर दावल । जाख वरटा परीट । राय माहाला वरीक

सदरहु सभाकुळ मौजे मजकुर वगैर कुळकर्णाचा हक सुदामत प्रभान यासी मुकरार केळ असे.

बाा ताा- मुशारा गला दर चावरी मन पका १ एकुन २॥ ४ अडीच खडी च्यार मन अकी दोन खडी चौदा मन व नगद दर चावरी रुपय एक एकून रुपय ५४ चौपन करार सुदामत आहे. तेन प्रमाण तुम्ही खात जान. या सिवाय हुरडा व निबूर व वारपेंढी व गाडेवाहनी व सलई देखील वानवळ व चाभारा जोडा व तेलियाच्च तेळ सेर बारा ८।२ व साळ व कोस्टी व तांबोळ व माळ व धनगर व वानी व सिपी व सोनार व कासार वगैरे जो का काही जिनस होत जाईल तो सिरस्ता बमोजीब घेने. यास कोन्ही नबदिगर करील त्यास आपलेया पूर्वजाची आनी असे. आनी आपले कुळस्वामीची आण असे. हे महजर लिहिले सही.

भा. इ. सं मं. अहवाल, शके १८३४ स्वी. ग्रं. क्र. ४ पृ. ५६ व ५८.

१६ जून १६७१ ] (-१२३-) [ ज्येष्ठ वद्य ५ शुक्रवार शके १५९३.

सके १५९३ विरोधीकृत नाम सवछरे. जेस्ट वदी पचंमी सुक्रवार तदिनी [ फारसी शिक्का ] वेदमूर्ती गनेशभट दीक्षित साा वनी यासि राजेश्री नारोजी येसवताराऊ नमकार लेहोन दिधले ऐसजे. तुमचे प्रपिता मह गोपाल दीक्षित व तुमचे पिते विठल दीक्षित परंपरा तुम्ही आपले आश्रीत व तीर्थपुरोहीत स्थल सप्तसृगचे असा. ऐसे जाणोन आम्हीहि तुम्हास तीर्थपुरोहितपण दिधले असे व आमचे वंशीचे जो कोन्ही येईल तो तुमचा येजमान व तुम्ही त्यांचे तीर्थपुरोहित हे लिहिले सत्य. [ फारशी शिक्का ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अ. १-४, पृ. ७५.

१६ जून १६७१ ] (-१२४-) [ जेष्ठ वद्य ५ शुक्रवार, शके १५९३

श्रीरामजय

सके १५९३ विरोधीकृत नाम सवछरे जेष्ठ वदी पंचमी सुक्रवार तादिनी वेदमूर्ती [फारशी शिक्का] गणेश भट दीक्षित श्री सप्तश्रीग यास राज जानराऊ मंबाजी नमस्कार लेहोन दिधले ऐसे जे. तुमचे प्रपितामह गोपाल दीक्षित व तुमचे पिते विठल दीक्षित

परंपरा तुम्ही आपले आश्रीत व तीर्थपुरोहित आसा. एसै जाणोन आम्हीहि तुम्हास तीर्थपुरोहितपण दिधले असे व आमचे वंशीचा जो कोण्ही येईल तो तुमचा यजमान व तुम्ही त्याचे तीर्थपुरोहित हे लिहिले सत्य. [फारशी शिक्का]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १-४, पृ. ७५.

२६ जून १६७१ ] (–१२५–) [ २८ सफर, इसने सबैन अलफ

मशहुरल अनाम राजश्री तान्हाजी जनार्दन हवालदार व कारकून ता नीरथडी [शिक्का][1] पा पुणा प्रति राजश्री शिवाजी राजे सुहूर सन इसने सबैन अलफ. परिंचाचे पाटिलकीसी कान्होजी खराडे नसता कथला करून घर तेथे बांधतात. तरी कथला करू न देणे. वैकुठवासी (शाहाजी राजे) साहेबाचे व दादाजीपंताचे कारकीर्दीस चालिले आहे ते करार आहे. तेणे प्रमाणे चालवणे. नवा कथला करू ने देणे. व परींचा कान्होजी खराडि यास घर बाधो न देणे. छ २८ सफर मोर्तब सुद. [शिक्का–मर्यादेयं विराजते]

पौ छ ७ रबिलावल

सुरू सुद

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ४६.

२ सप्टेंबर १६७१ ] (–१२६–) [ भाद्रपद शुद्ध ९ शनवार शके १५९३

सके १५९३ विरोधीकृत सवतसरे भाद्रपद सुध ९ शनवार तदनी लिखितें [फारशी शिक्का] वेदमूर्ती गणेश भट बीन विठल भट दीक्षित सा। वर्नी यासि वेकटराऊ नरसिगराऊ देसपाडिये पा। आवसे नमस्कार लिहून दिधले ऐसे जे स्थल सप्तमृग येथील तीर्थपुरोहितपन आम्ही तुम्हास दिधले आसे. आपले वंशीचा जो कोण्ही येईल त्याचे तीर्थपुरोहीत तुम्ही असा. हे लिहिले सही. [फारशी शिक्का]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १-४, पृ. ७५.

२५ आक्टोबर १६७१ ] (–१२७–) [ १ रजब, इसने सबैन अलफ

सोपानदेव

श्री

अज रख्तखाने राजश्री सिवाजी राजे साहेब दयाम दौलत हु बजानेब कारकून [शिक्का] वानाये दिमत देमुशखानी व देशपांडे व मोकदमानी व रयानी कसब

१. शिक्का—'श्रीशिवनरपति हर्षनिदान। महादेव मतिमत प्रधान'.

सासवड कर्यात मजकूर सुा इसनें सबैन अलफ श्री. (सोपानदेव) याची समाधी कसबेमजकुरी सालाबाद आहे. बीं तपुसीलवार.

निा जमीन मुंजरी देवा भोवताली थळ भाडळे पैकी कास मण ८४॥ आहें ते देवाचे देवास दिल्ही असे. कुल बाब कुल कानु दुमाला केले असे. दुमाला कर्णे. यास काडीची तोशीस न लावणें थळकरी आगर हर कोण्ही हिसकील न कर्णें थळ पौ ८४॥. साडे चार मण बाब देणें. देवाचे देवास चालवणें.

निसबत जकातीवर व बाजारा पौ रोजिना मोईन सालाबाद प्रो चालवणे. जोरी नैविद्याकारणें केली मापी आधोली ८८॥. व तेला बदल दिवाबतीस वजन टकबंदी ८८॥. आछेर

सदरहु देवास दिल्हे आसे. दर हर साल चालवणें. ताजा खुर्दखताचा उजूर न करणे. हिंदु होऊन इसकील करील त्यास गायीची आण आसे व मुसलमान होऊन इस्कील करील त्यास सोराची आण असे. येणेप्रा चालवणे तालीक घेऊन आसल पत्र गोसावी रामानंद याजपासी परतोन देणें. परवानगी हुजुर [मोर्तब]

छ १ माहे रजब रुजु सुरनवीस

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७. पृ. १५९.

९ दिसेंबर १६७१ ] ( – १२८ – ) [ १६ साबान सन (जुलुस) १४

तुगरा [ फार्सीचा मराठींत तर्जमा ]

फर्मान अबुदल मुजफर मोहीयत दीन महमद आरंगज्येब आलमगीर [शिक्का][1] बादशाहे गाजी यांचे हुकुमावरून दिल्हेला निशाण आलिशानपात शाहाज्यादा महमद मो आजम

ह्या दिवसात दर्गा व फर्जदानं सैद शरीफ साहेब याचे बाबतीत पाठीवर लिहिले तपसीलबरहुकुम हुजुरास अर्ज पावला त्याजवरून बादशाहा याचा हुकूम सादर जाला की मौजे येकलाहारे दरोबस्त अमले पा संगमनेर कब्ज्यात व बंहिवाटीस असले वरून व खिजमत दर्गामजकूरची पूर्वील दस्तुप्रो पाठीवर लिहिल्याप्रमाणें यांस बाहाल व कायम केला असे की उत्पन्न तेथील निर्वाहास खर्च करून दर्गाची खिजमत करीत जाणे. यास्तव पाहिजे की मुतसदी लोक काम करणार हालचे व पुढे होतील ते तेथील याणी उत्पन्न मौजेमजकूरच खर्चास यास देणे व चालवणे व मुकरर करणे विसी या हुकुमास मान्य करून कोणत्याहि तऱ्हेने तगीर व बादल यास न करून सर्व हारकती दिवाणी व बादशाही कामाबा कतल्गा व नजराणा व जरीबाणा व

१. शिक्का— 'महंमद मोअजमः बीन आलमगीरः बादशाहे गाजी सन १०७३.

व महसीना व जाबताना व मोहोराना व दारोगाना व बेगार व सिकार व मोकदमी व कानुनगोइ व तकार जिराइती व हरसाल जप्त करणेबदल माफ जाणून दरसाल नवीन सनद व परवाना तलब न करणे व हासील न घेण्याबदल यास मुजाहीम न होणे व जर या सिवाय दुसरे माहाली काही असल्यास त्याचा इतबार न करणे या बाबतीत ताकीद जाणावी ता। १६ माहे साबान सन १४

---

मुकरर शेरा पाठीवरील यादीप्रा। जालेला ता। ११ रोज शुक्रवार माहे जाखर सन १४ जुलुस मुताबीक सन १०८२ हिजरी (६ आक्टोबर १६७१) ऐसा जे. रिसाल्यात सजावर इनायत व अतिफत शायस्ता लितर्फ वल मरहामत हाजीयासीन सदर व वाक्यानवीस कम तरी न बददांहा गुलाम महंमद यांची कल्मी होतो की ता। २८ माहे जावल (२२ सप्तेंबर १६७१) सनमजकूर दर्गा व फर्जंदान मगफीरत पन्हा सैद शरीफ यांचे बाबतीत अर्ज पावला की फर्मान हाजरत यांचा करार जालेला ता। ७ माहे शाहरयुर इलाही सन ९ (२० आगष्ट १६६६) बरहुकुम दोन माजे दरोबस्त त्यातून माजे कोनवसी आपलेप्रा। शेवगाव व मौजे येकलाहारे आपलेप्रा। संगमनेर सैद शरीफसाहेब यांस व यांचे कुटुंबाचे नावे मुकरर होते ते मैत जाल्यानंतर फर्मान कजाजी रयान पूर्वील जुलुसचा करार जालेला ता। १७ माहे जाखर सन १२ (२ नव्हंबर १६६९) बरहुकुम मौजे येकलाहारे बनाम दुर्गा व फर्जंदान की आपल्या बहिणीचा मुलगा घेऊन त्याला आपला चिरंजीव म्हणत होते. त्यास पूर्वील दस्तुरप्रा। यांस तनखा जाला. त्याबरहुकुम सनद मोहोरेनिसी इसलामखान यांचा करार जालेला ता। १७ माहे जिल्हेज सन ७ (२ जुलै १६६४) व सनद मोहोरेनिसी उमदतुल मुलक आमीरुल उमराव यांचा करार जालेला ता। २७ माहे राखर सन १०५९ ची (१ मे १६४९) व सनद मोहोरेनिसी सरकारचे मुतसुदी लोक यांचा मिळून हजरी यांचे यादीप्रा। मोहोरेनिसी आबदूस सलांम मुतवली यांचा जिवंत व कायम व कबज्यांत व वहिवाटीस आहेत म्हणोन दरीविला अर्ज करितो की निशाण आलिशान मरहामत व्हावा त्याजवरून हुकुम बादशाहा यांचा सादर जाल की मौजेमजकूर कबज्यात व वहिवाटीस असल्यावरून पूर्वील दस्तुरप्रा। मरहामत केला असे. यास्तव पाहिजे की मुतसदी लोक काम करणार हालचे व पुढे होतील ते माहालमजकूरचे याणी उत्पन्न मौजेमजकूरचे जिवंत व कायम व खिजमत दर्गाची करीत असल्यावरून कदीम माहालतील पूर्वील दस्तुरप्रा। यांस देणे व त्याचे हासिलाबदल मुजाहीम न होणे की उत्पन्न तेथील निर्वाहास खर्च करून असिर्वाद हामेषा दौलतीस देण्याची काळजी करीत जातील व दुसरे माहाली यासिवाय काही उत्पन्न असल्यास त्याचा इतबार न करणे व फर्दाबरील हाकीकत खरी लिहिली आहे व शेरा त्याजबरहुकुम खरी यादी लिहिली आहे. शेरा खताने साहेब रिसाला यांचा ऐसा जे दाखल वाक्यात करावा. शेरा खताने वाकेनवीस यांचा ऐसा जे वाकेप्रा। आहे. शेरा खताने विजारतपन्हा मदारुलमोहामी यांचा ऐसा जे दुबार अर्ज पोचवावा. शेरा खताने अर्जाचा दुबार ऐसा जे ता। २७ माहे जाखर सन १०८२ हिजरी मुताबीक सन १४

जुलुस (२२ आक्टोबर १६७१) यात दुबार अर्ज पावला शेरा दुसरा खताने विजारतपन्हा किफायत दस्तगाहा लायकुल इनायत बल यहैसान काबुली तर्फ बल इमतीनांन मदारल मोहामी शफीखान याचा ऐसा जे निशाण आलि शान कलमी खाम (ला?)

दोन मौजे दरोबस्त

येक मौजे कोनवसी आमले पा शेवगाव

येक मौजे येकलाहारे दरोबस्त पूर्वील दस्तुरप्रो॥

रिसाल्यात सजावार इनायत व आतिफत शायस्तालीतर्फ व मरहामत हाजी यासीन सदर यांचा

ता॥ ९ माहे जिल्काद सन १५ जुलुस ( २९ फेब्रुवारी १६७२ ) नकल सदरचे दप्तरांत पोचली

... ...

... ... नकल दिवाणाचे दप्तरात पोचली

निशाणवाला शान कलमी जाला

यादी प्रो कलमी जाला

ता॥ ... ... माहे जिल्काद सन ... ...

दाखल साह्यात हुजुरचे केला आहे

[ शिक्का ] [ शिक्का ]

ता॥ १८ माहे जिल्काद ( ८ मार्च १६७२ ) यात मोहोर केली असे ता॥ ९ माहे जिल्काद सन १५

[ शिक्का ]

ता॥ २६ माहे रमजान सन १५ जुलुस ( ६ जानेवारी १६७३ )

[ शिक्का ]

भा. इ. सं. म. वा. इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १८५-१८८.

१६७१-१६७२ इ. स.] (-१२९-) [इसने सबैन अलफ

श्री. ज्ञानदेव

अज रख्तरखाने राजेश्री सीवाजी राजे साहेब दाम दौलत हु सरकारकून ...देशमुखानी व देसपांड्योनी व मोकदमानी व रयानी प्रांत चाकण सुहुर सन इसने सबैन अलफ. श्री...याचे इनाम मौजे आळंदी प्रगणे मा॥री सालाबाद जि॥ जमीन मुजुरी सेत सवा दीडसे कारवे खंडी १८ २॥ येक खंडी अडीच मण देवाचे देवास दिधले असे. कुलबाब कुलकानु दुमाले केले असे. दुमाला करणे. यासी काडीचा तोसीस न लावणे. खल करी अगर कोण्ही इस्कील न करणे. सदरहू खल बाद ...

( घेणें ? ). देवाचे देवास चालवणे. साल दरसाल चालवीत जाणे. ताजा खुर्द खताचा उजूर न करणे. हिंदु होऊन इस्कील करील त्यास गाईची आण असे. मुसलमान होऊन इस्कील करील त्यास सोराची आण असे. लिहिले प्रो चालवणे. तालीक घेऊन असल फिरावून राजेश्री रामानंद गोसावी तपस्वी यापाशी देणे.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. ५५.

५ एप्रिल १६७३ शनवार ] ( – १३० – ) [ चैत्र १३ सोमवार शके १५९५

यादी[1] किले चंदी घेतली. राजेश्री यकोजी राजे त्याची भेट झाली. किले वेरोळ कोट घेतला. त्या स्थळीं शके १५९५ प्रमादी नामसंवत्सरे चैत्र बहुल त्रयोदशी भौमवासर ते दिवशी अंगास राजे स्वांमी यांचे आलि. पांच वटिका अंगांत होती. वाक्य भविष्य सांगितलें. श्रीचें वाक्य तपसील संक्षेप.

१ देशीचे राज्य ताम्र घेतील. रायगड जाईल. राजे संभाजी राजे सांपडतील, राज्य जाईल.

२ राजेश्री राजाराम राज्य करील. चदीचे राज्याकडून मागती राज्य देशीचे प्राप्त होईल.

३ पुढें राजा सिव मागती अवतार राज्य दिल्ली पावेतो घेतील. एक राज्य होईल.

४ पुढें २७ पिढ्या भोसले यांचे राज्य असे.

५ पूर्वी पूर्वजन्मी सिवाजी राजे याणीं सत्तावीस कावडी भागीर्थी उदक श्री. रामेश्वरास नेऊन घातले. २७ जन्मे श्री भवानीस श्रीकमळें वाहिली.

६ याजबद्दल २७ पिढ्या राज्य भोसले याचे असे. त्या उपर २७ वा राजा गर्भांध होईल. तो राज्य बुडवील.

सदरहू भविष्य राजीयाचे श्री भवानी वाक्य कथन केले. प्रश्न रघुनाथ नारायण हनुमंते त्याणी केला. दत्ताजीपंत वाकनवीस बाल परभू चिटनवीस त्याणी

जनसेवा, मासिक, व. १, अ. १२, मार्च–एप्रिल १९३५, पृ. ५५,

१. ही यादी पूर्ण पणे अविश्वासार्ह आहे. रघुनाथ नारायण हणमंते कर्नाटकातून कोंकणांत आलेच नव्हते. वार चुकीचा आहे. शिवाजी या लेखाच्या तारखेनंतर ३–४ वर्षांनी कर्नाटकाकडे गेले. एकोजीचे बरोबर नावहि या यादींत नाहीं. अंताजी रंगनाथ मळेकराची बखर जशी कथा थाटाची तचीच ही त्याची यादी काल्पनिक आहे.

वाक्य लेहून ठेविले होते. फर्द सुमारे २४ होते. रायगडी कागद लिहिले होते. त्याची संक्षेपे यादी आनाजी रंगनाथ मलेकर यापासी होती. त्याची तालीक लिहिली असे.

४ एप्रलि १६७४ ] ( – १३१ – ) [ ४ एप्रिल १६७४

नारायण शेणवी ते मुंबईकर इंग्रज, ४ एप्रिल १६७४.

गेल्या आठवड्यांत तारीख २४ मार्च मंगळवार रोजीं मी रायरी येथें पोंचलों, आणि त्याच दिवशीं निराजी पंतास भेटण्यास गडाचे पायथ्याशीं पांचाडास गेलों. तेथें चवकशी करतां त्यांचे वडील चिरंजीव प्रल्हादपंत यांची गांठ पडली. त्यानी 'आमचे वडील गडावर आहेत, आपण शिवाजी राजे यांचा आपणास वर जाण्याचा हुकूम येई पावेतों वाट पाहावी' असें सांगितलें. नंतर मी आपल्या चाकरापकीं एकास मी येथें दाखल झाल्याची वर्दी राजेसाहेबांस देण्याकरता वर पाठविला. तो त्याच दिवशीं 'शिवाजी राजे याचें कुटुंबास देवाज्ञा झाली आहे, सुतक फिटेपर्यंत आपण आमचेच घरीं राहवें' असा निराजीपंताचा निरोप घेऊन परत आला. म्हणून मी पांच दिवस काहिंएक न करतां तेथें स्वस्थ राहिलों. दरम्यान निराजीपंत वर्ष-प्रतिपदेस गुढीपाडव्याचे सणाकरतां आपल्या घरीं आले व दुसऱ्या दिवशीं त्यांनीं आपल्या बरोबर मला गडावर नेलें. व त्यांनीं ताकीद देऊन माझी सर्व व्यवस्था एका मोठ्या जागीं चांगली केली. तेथे मी आणखी पांच दिवस राहिलों.

काल तारिख तीन एप्रील रोजीं दोनप्रहरीं निराजी पंतानी मजबरोबर राजेसाहेबांचे दरबारांत येऊन माझी मुलाखत करून दिली. राजे यांणीं माझा चांगला सत्कार करून मला बरेंच आपल्या जवळ बसविलें व आपल्या व त्यांच्या परस्परांच्या स्वस्तिक्षेमाची विचारपूस झाली. ह्या विधी झाल्यानतर मी राजापुरप्रकरणाचे गोष्टीस सुरवात केली. व निराजीपंतानी आपणाबद्दलच्या नेहमींच्या प्रेमानें ही बाब आपले धनी राजेसाहेब यांचे पुढें माझे कल्पनेबाहेर ज्यास्त चांगल्या रीतीनें मांडली. तेव्हां लागलीच शिवाजी राजे याणी आपल्या कारकुनास या प्रकरणाची सनद लिहिण्यास हुकूम दिला. राजापूर प्रकरणासंबंधीच्या रकमेची फेड तीन हप्त्यानें करावयाची. २५०० होन राजापुरचे जकाती बाबद. २५०० होन येत्या सप्टेंबरचे पहिलें तारखेस पहिले पावसाचें सुरवातीस द्यावयाचे व ५००० होन दोन वर्षानंतर द्यावयाचे; ह्याप्रमाणें ठराव झाला. कागदपत्र होण्यास व हुकुम मिळण्यास तिन चार दिवस लागतील. सनदा तयार होऊन हाती येतांच आदिल मोदि माझे बरोबर आहे त्याचे हातीं आपणाकडे रवाना होतील. तो आपणाकडे सुखरुप येऊन पोचतांच येथील सर्व हकीकत तपशीलवार निवेदन करील. शिवाजीराजे यांची सनदापत्रें याच जासुदा बरोबर पाठवावी असा माझा विचार होता. परंतु कागद तयार होण्यास कांहीं दिवस लागणार असें दृष्टोत्पतीस आल्यावरून व रोजबेरोज

हकिगत तर पाठविल्याबद्दल आपली सांगी असल्यामुळें मुद्दाम इतक्या तडकाफडकीनें या इसमास रवाना केलें आहे. वास्तविक पाहतां आपणास सर्व हकिगतीचें पत्र पूर्वीच लिहावयास पाहिजे होतें. परंतु शिवाजीराजे यांचे बरोबर माझें बोलणें होई-पर्यंत कांहीं लिहूं नये अशी निराजीपंत यानी आपली इच्छा दर्शविली. या कारणामुळें उशीर झाला. आपण माफ करालच.

वेळ नसल्यामुळें इकडील खळबळ उडवून देणारी बातमी आपणास साद्यंत मला कळवितां येत नाहीं. परंतु मुळींच न लिहिणें गैरवाजवी होय. शिवाजी महाराज पुष्कळ सोनें व जडजवाहीर लाऊन एक फार भव्य सिंहासन तयार करीत आहेत. त्यांचा विचार येत्या जूनमध्यें नवीन वर्षारंभी राज्याभिषिक्त व्हावयाचा आहे. या समारंभाकरतां त्यानीं पुष्कळ विद्वान ब्राह्मणास निमंत्रण दिलें आहे; व ते या समई त्यास पुष्कळ हत्ती, घोडे व द्रव्य इ. रेलचेल देतील. परंतु ते स्वतः सिंहासनारूढ होणार कीं कसें हें नक्की समजत नाहीं. कारण त्याचें ताब्यांत एक निजामशाही वंशांतील राजपुत्र आहे. त्यासही ते तक्तनिशिन करतील अशी बोलवा आहे.

शिवाजी राजे यांच्या सैन्याच्या हालचालीसंबंधाची माहितीं आपणांस दुसरे-कडून मिळाली असेलच; परंतु थोडीबहुत खबर आपणांस मीही दिल्यावांचून चालणार नाहीं. बहादुरखानाचा विचार खालीं कोकणांत उतरण्याचा आहे. परंतु शिवाजीनीं रस्ते व डोंगरांतील चढावाचे मार्ग मोडून नाकेबंदी केल्याचें व अतीशय अडचणीचे जागीं सततचे पाहरे ठेवल्याचें समजल्यावरून तो आल्या जागीं परत गेला.

शिवाजीचें सैन्याची व बहलोलखान यांची दोन डोंगरांच्या मध्यें अंकुचित व अडचणीचे वाटेंत गांठ पडून चकमक झडली. या चकमकींत दुसऱ्या सैन्याची मदत वेळेवर न आल्यामुळें प्रतापराव दुसरे सहा घोडे स्वारांसह पडला व बहलोलाचा जय झाला. परंतु सेनापती प्रतापराव पडला तरी राग न करणें, त्याचे जागीं मी आहे ' असा निरोप आनंदरावानें शिवाजीस पाठविला. तेव्हां शिवाजीनें सैन्यास नवीन हुकूम देण्याकरतां व प्रतापरावाचे जागीं नव्या सेनापतीची योजना करण्या-करतां कुडाळाकडे जाण्याचा बेत केला व आनंदरावास प्रतापरावाचे जागीं व त्याचेच वेतनावर काम करण्याचा हुकूम दिला आणि शत्रूस अगदीं चित केल्याखेरीज जिवंत परत येऊं नये अशी आज्ञा केली. आनंदराव जातीचा-मर्द. शिवाजीची आज्ञा होतांच आपल्या सर्व घोडेस्वारांनिशीं तो बहलोला खानाचे सुगाव्यावर शत्रूच्या मुलखांत फार आंत घुसला. परंतु प्रताप-रावाचे मृत्यूची बातमी दिलेरखानास समजल्यामुळें तो लागलाच बहलोल-खानास मदत करण्याकरतां आपल्या सर्व सेनेसह निघाला. तो आनंदरावाशीं लढण्यास फार उतावीळ झाला. परंतु समोर दोन भारी शत्रू आहेत हें पाहून आनंदरावास त्यांच्याशीं सामना करवेना. तो पुढें व हे दोन

सरदार त्याचे पाठीवर, याप्रमाणें रोज ४०–४५ मैलांचे चालीनें आनंदरावानें कानड्याची वाट धरली. परंतु पुष्कळ दिवस पाठलाग करूनहि कांहीं डाव घडवून आणण्याची छाती न झाल्यामुळें दिलेरखान पन्हाळ्यास वेढा देण्याकरतां तिकडे गेला. तेथें फक्त पांच दिवस मुक्काम करून दिलेरखान आपले पहिले मुक्कामावर गेला व बहलोलखान कोल्हापुरास गेला. इकडे आनंदरावानें बरेंच आंत शिरून, बंकापूर पासून २५ मैलांवरील पेंट नांवाच्या बहलोलखानाच्या जहागिरीचा गांव लुटला व पुष्कळ लूट मारून ३००० बैल चांगले पक्के लादून भरून परत फिरला. ही खबर बहलोलखान व खिदरखान यांस लागतांच त्यानीं त्यांस बंकापूरनजीक गांठून आपल्या सर्व सैन्यासह आडवावयाचा बेत केला. तेथें मोठी निकराची लढाई झाली. खिदरखानाचा भाऊ म्हणजे बहलोलखानाचा भाचा कामास आला. आनंदरावानीं सर्व सैन्य लुटून ५०० पांचशें घोडे व दोन हत्ती पाडाव केलीं; शिवाय दुसरेही जिन्नस मिळाले. खिदरखान व बहलोलखान यानीं पळ काढला. आनंदरावानी परत येऊन लूट शिवाजीचे स्वाधीन करून तो पुन्हां बालेघाटाकडे मुलुखगिरीवर गेला आहे.

सिद्दी फत्तेखानाबरोबर तह करण्याच्या आपल्या इच्छेसंबंधें मी निराजीपंताशीं भाषण केलें; परंतु त्यानीं पुष्कळ उदाहरणें देऊन शिवाजी महाराजांचा या गोष्टीकडे कल नाहीं असें दाखविलें. तेव्हां या प्रश्नासंबंधें पुढें मी कांहींच बोललों नाहीं. निराजीपंत आपणांस याबद्दल परभारें लिहितील.

सिद्दी संबूळसंबंधें माझे कानावर आलेली बातमी आपणास थोडक्या शब्दांत कळवीत आहे. सातौळी नदींत दवलतखानाचे तरांड्याबरोबर ह्यानें लढाई केली. या चकमकींत सिद्याकडील शंभरावर लोक व दवलतखानाकडील चवेचाळीस लोक पडले. दवलतखानास जय मिळाला, परंतु भाला लागून तो जखमी झाला आहे. त्याप्रमाणेंच सिद्दी संबुलही जखमी झाल्याची व त्याचे हात जळल्याची बातमी (आली) आहे. सातौळी नदीच्या लढाईंत सिद्यास चांगला जय न मिळाल्यामुळें केसिंगजवळ हरेश्वरास तो गेला आहे. ही हकीगत शिवाजीनें स्वतः मला सांगितली आहे. तेव्हां यापुढें आपण सिद्यास आपलें बंदरांत शिरण्यास अगर त्याचे इसमांस किनाऱ्यावर येण्यास परवानगी देऊं नये असें माझे विचारास येतें. कारण आपणांस परवानगी नाकारणें सोयीचें वाटलें नाहीं तर शिवाजी राजे व आपणामध्यें बरेंच वैमनस्य उत्पन्न होईल. पहिलेच मुलाखतीचे वेळीं शिवाजी महाराजानें ही गोष्ट मला निक्षून सांगितली.

आपण हेन्री ऑग्झिंडेन यास, बराबर चांगला नजराणा देऊन, आतां त्वरित रवाना करावा. डोंगरांतील रोगट पाण्यामुळें मला ज्यास्त येथें राहातां येत नाहीं. नजराण्यासंबंधें निराजीपंतानीं माझेजवळ चवकशी केली. व मी त्यांस हेन्री आग्झीं-डेन हा आपल्याबरोबर एक मौल्यवान आरबी घोडा आणील, म्हणून सांगितले. परंतु ‘शिवाजी राजे यांस घोड्याची जरूरी नाहीं; त्याचे बदला त्यांचे राज्यारोहण–प्रसंगीं

कांहीं मौल्यवान जडजवाहीर-मोत्यें अथवा हिरे त्यांस वापरण्यालायक पाठवावी;' म्हणून निराजीपंतानीं आपणास लिहिण्याची आपली इच्छा दर्शविली. सबब आपण कांहीं पाणीदार हिऱ्यांच्या अंगठ्या, मोत्यें अगर मोत्यांचे कंठे-वडेलोकांचे वापरण्यांत येतात-असे पाठवावे अशी माझी इच्छा आहे. कारण इंग्रज जहाजांचा व्यापार करणारे, दर्यावर्दी, त्यांस मोत्यें वगैरे जडजवाहीर देणें जड वाटणार नाहीं, असें त्या लोकांस वाटतें. घोडा नजर केल्यास त्यावर ते कधींही स्वार होणार नाहींत, तर ते त्यास आपल्या एकाद्या नोकरास अगर स्वारास देऊन टाकातील. त्यांचे संग्रहीं तुर्की व त्यांचप्रमाणें अरबी घोडे पुष्कळ आहेत' असें निराजीपंतांनी आपणांस लिहिण्याची आज्ञा केली आहे. तेव्हां आपण सर्व विचार करून मर्जीनुरूप योग्य वाटेल तें करावें. आपले दरबारांतून एक इंग्रज मनुष्य आम्ही पाठवूं म्हणून आपण निराजीपंतांस पूर्वीच लिहून चुकला आहां, व ही गोष्ट राजे साहेबांचे कानावरही त्यानीं घातली आहे. करतां हेन्री आग्झींडन हजार बाराशें रुपये किंमतीचा आपल्या योग्यतेस साजेल असा प्रतिष्ठित नजराणा आल्यास सोयींचे होईल राज्यारोहण समयीं राजे साहेबांस कांहीं आहेर आपण करावा हें उचितच आहे. परंतु आपणाकडून आतां येणारा नजराणा सर्व कामास येईल. त्याप्रमाणेच तोरमल्लीचे पंचवीस खडे निराजीपंतास पाठविण्याबद्दल गिरधरदास यास स्मरणम करावें, म्हणून आपणास सूचनार्थ लिहीत आहे. ह्या खड्यांकरतां निराजीपंत माझा नेहमी पिछा पुरवतात. तेथून निघते वेळीं तुमचे मागोमाग नक्की रवाना करतों म्हणून गिरधरनें मला कबूल केलें होतं. ईश्वर आपलें रक्षण करो, हीच विनंती.

मुा रायरी ता ४ एप्रील सन १६७४ आपला नम्र सेवक,
नारायण शेणवी

भा. इ. सं. त्रै, ८, अं. १-२, पृ. २६ ते ३०.

१८ एप्रील १६७४ ] (-१३२-) [ १८ एप्रिल १६७४

मुरत ते मुंबई, १८ एप्रिल १६७४.

नारायण शेणव्याच्या पत्राच्या भाषांतराबरोबर ९ मिनहूच्या आपल्या पत्रास आज आम्ही उत्तर सादर करीत आहों. नारायण शेणवी याचे पत्रावरून राजापूर येथें कंपनीच्या व कंपनीच्या नोकरांच्या झालेल्या नुकसानीची पूर्ण भरपाई दहा हजार होन आपणास मिळून व्हावयाची, व याचे अटींची वाटाघाट आपण गेले सालीं करीत होतां तें प्रकरण बहुतेक त्वरित निकालांत निघणार, असें आम्हास दिसत आहे. आणि म्हणून हुबळी येथें कंपनीच्या नुकत्याच झालेल्या नुकसानीचाहि याच प्रकरणाबरोबर शेवट लागेल असें आम्हीं अनुमान केलें आहे. आपण या कामगिरीवर ऑग्झिडन यांस पाठवीत आहां. तेव्हां शिवाजी राजे यांचे मुलखांत आपल्य

व्यापाराकरतां ज्यास्त सवलती ते मिळवितील अशी आम्हास आशा आहे. नजराण्याच्या वस्तु त्यांचे बराबर जाव्या म्हणून शक्य त्या त्वरेनें पाठवाव्या असें आपण म्हणतां; तरी आम्ही आज दोन दिवस आपणास पाहिजेत असे जिन्नस पैदा करीत आहों; परंतु कानांतील माणीक व मौल्यवान माणकाची आंगठी हीं सध्यां मिळण्यासारखीं नाहींत. सबब रत्नजडीत कट्यार पाठविली आहे; तीहि दुसऱ्या वस्तूंप्रमाणें त्यांस मान्य होईल. खालीं नमूद केल्याप्रमाणें विगतवार वस्तु आम्ही रवाना केल्या आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| २ मोत्यें | वजन रती १० $\frac{१}{१०}$ | किंमत रुपये | ५०० |
| ४ मोत्यें | वजन रती १८ $\frac{९}{१०}$ | किंमत रुपये | ७५० |
| १ हिऱ्याची आंगठी बिलीयन | | ,, ,, | ४५० |
| १ हिऱ्याची आंगठी बिलीयन | | ,, ,, | ३२५ |
| १ ,, ,, परब | | ,, ,, | १३० |
| १ शिरपेच पिसाचे आकाराचा | | ,, ,, | ६८० |
| २ सलकडीं | | ,, ,, | ४५० |
| | | | ३२८५ |
| विमा उतरला त्याचे | | | २९। |
| | | | ३३१४। |

सर्व वस्तु तपशीलवारीसह मोहन धरमदास व वल्लभ लखमीदास सराफ यांचे मार्फत आपल्या जासुदा सोबत येणाऱ्या त्यांच्या काशिदाबरोबर त्यानी रवाना केल्या आहेत.

शिद्यास आपण आपल्या बेटाच्या हद्दींत हिवाळ्यांत गलबतें नांगरण्याची परवानगी देऊन आश्रय दिला, यामुळें शिवाजी फार रुष्ट झाले आहेत; व नारायणदास शेणव्यापाशींहि त्यानी आपला मनोभाव अगदीं स्पष्ट इतका केला आहे कीं आम्हासहि हें खरें वाटत आहे. आपण येथील दुसरे हितसंबंध कमी महत्त्वाचे आहेत असें समजूं नये. कारण, येथील सुभेदारास अथवा आपल्या जवळच्या बादशाहाच्या सेनापतीस, शिवाजी कडील राजकारणाची वकिलात, बादशहाचे शत्रुबरोबर झालेला तह व आपल्या बंदरांत गलबतें (आरमार) नांगरण्याची आपण केलेली बंदी या गोष्टी त्यांस कळतील व खचित त्या त्यांस कळून आल्यावाचून राहणार नाहींत, आणि असें झालें म्हणजे मोगल, आपण त्यांचे (मुळींच) स्नेही नाहीं असें ते आपणास समजतील. शिवाय कंपनीचें व्यापाराचें नुकसान झालें नाही तरी आपणास या योगें फार उपद्रव होईल

व नुकसान सोसावें लागेल. तथापि शिवाजींच्या सलोख्यावर अन्नसामुग्रीचा पुरवठा व व्यापार यांपासून होणारें आपल्या बेटाचें (मुंबईचें) कल्याण व सुस्थितिहि किती अवलंबून आहेत हें आपण आमचे दृष्टोत्पत्तीस कैक वेळां आणिलें आहे; त्याप्रमाणेंच त्यांच्या मुलखांत वखारी स्थापून आपला व्यापारहि चालू होईल हेंहि खरें आहे. करतां कंपनीचे त्यांच्या बेटांतील हितसंबंध व फायद्याच्या बाबी त्यास नाकारण्यापेक्षां, आम्ही येथें हे लोक (मोगल) आमचेवर जीं संकटें आणतील तीं आम्हीं शांतपणें सोसूं.

शिवाजी व दंडाराजपूरीकर शिद्दी यांजमध्यें तह जुळवून आणतां येईल याबद्दल नारायण शेणव्याचे म्हणण्यावरून अगदी थोडी आशा दिसते. तसेंच आम्हासहि हें काम सहज घडवून आणण्यासारखें सोपें नाहीं. असेंच आम्हास वाटतें. इतके दिवस चाललेलें युद्ध इतकें आकस्मित कसें मिटावें याप्रमाणें आम्ही आपले पत्रास जबाब दिला आहे. इकडील वर्तमान कळविण्यासारखें काहीं नाहीं. पत्र पुरें करून सह्या केल्या आहेत.[१]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १-२, पृ. ३०-३१. Surat fac. vol 87, f. 153-4.

११ मे १६७४ ] (-१३३-) [ ११ मे १६७४

रायगड ते मिस्तर हेन्री आग्झिडन, ११ मे १६७४

शिवाजी व आम्ही यांमध्यें घाटत असलेल्या तहावर आपल्या मंडळाच्या सभेमध्यें पुष्कळ वादविवाद झाला आहे. त्या प्रसंगी या कामीं आपल्या सतत सहायानें जी वाटाघाट व ज्या महत्त्वाच्या बाबी घडल्या आहेत, त्या आपणास ज्ञात आहेतच. तेव्हां आतां या तालिमनाम्यांत सूचनापत्रकांत अधिक खंडन करण्याची तसदी घेण्याचें कारण दिसत नाहीं. परंतु आम्ही कर्तव्याला सर्वस्वींच चुकूं नये म्हणून आपल्या अवलोकनाकरतां खालील सूचना करणें बरें वाटल्यावरून केल्या आहेत.

नामदार मंडळ व शिवाजी यांमध्यें राजापूर प्रकरणासंबंधें पूर्वी तेढ उत्पन्न झाली होती. परंतु या संबंधें आपसामध्यें करारमदार होऊन ही बाब आतां (पुरती)

१. पुढील मजकूर याच पत्राच्या दुसऱ्या नकलेंत 'ताजा कलम' म्हणून आहे. "खंजीर पाठविण्याचें आमचें ठरलें होतें. परंतु त्याचा मालक इतका चढून बसला आहे कीं शेवटीं भलती गैरशिस्त किंमत देऊन तो घेण्याची जरूर नाही असाच आम्ही विचार केला. आम्ही मुंबई बेटांतील नामदार कंपनीचे कार्यकारी मंत्री मंडळ व गवरनर यांनीं, शिवाजी राजे याजपाशीं होणाऱ्या तहाचा तालीमनामा (वाटाघाटीचे प्रसंगीं पाळावयाच्या सूचना) आपले प्रियकर मित्र हेनरी आग्झिडन यांस दिला.' मूळ पत्रव्यवहार भाग ३५ क्र. ३९६३.

भागली आहे. याची सविस्तर माहिती आपणांस पूर्णपणें अवगत आहे. आमची कामगिरी म्हटली म्हणजे हें आपलें बेट ( मुंबई ) व शिवाजीचे आमलाखालील सर्व देश यांमध्यें सुरक्षितपणें व फायदेशीर व्यापाराचा मार्ग स्थापण्याचा प्रयत्न करणें ही होय. हा डाव साधल्यास ही बाब आपल्या नामदार धनीसाहेबाचें फायद्याची होईल, ह्याबद्दल आमचा विश्वास परमेश्वरावर आहे. ही कामगिरी आपण ज्यास्त चांगल्या रितीनें पार पाडावी म्हणून रायरी येथील गडावर शिवाजीचे दरबारांत तुमची रवानगी करणें आम्हांस योग्य वाटत आहे. तेथें आपण यासोबत आपणाकडे पाठविलेली तहाची कलमें कायम करून घेण्यासाठीं जातीनें बोलणें करावें. अशा प्रसंगीं या पूर्वेकडील देशांत नजराणा देण्याची घातुक चाल आहे. म्हणून कंपनीनेंहि नजराणा देणें अपरिहार्य आहे. जगाच्या या भागांत या नजराण्यावांचून कांहींच करितां येत नाहीं.

एकंदरींत विचार करतां या प्रसंगीं आपण नेहमीपेक्षां ज्यास्त सढळ हात ठेवणें हें जरूरीचें व दूरदर्शीपणाचें आहे असें आम्हास वाटतें. ह्यामुळें शिवाजी व त्याचे मंत्री, यांजकडून कंपनीच्या योग्य मागण्या पुऱ्या करून घेणें, आपल्या राष्ट्रावरील प्रेम व प्रतिष्ठा जास्त वृद्धिंगत करून घेणें, व त्याचे बरोबर व्यापार करणें या गोष्टी साधून घेण्याकडे ह्यांचीं मनें जास्त वळवून घेतां येतील. म्हणून आपण तेथें गेल्यावर योग्य संधी पाहून शिवाजी, त्यांच्या मातुश्री, व चिरंजीव यांस नजराणे सादर करावे. हे रत्नजडित अलंकार व दुर्मिळ वस्तु, कोणास कसकशा नजर कराव्या हें त्यांचे संमतीनें ठरलेलें आहे. हे अलंकार जास्त पसंत होतील असें आम्हांस वाटतें. कारण नारायण शेणव्यानीं, दुसऱ्या एखाद्या वस्तूपेक्षां, त्यांस अशाच रत्नांची ( अलंकारांची ) ज्यास्त इच्छा आहे, म्हणून कळविलें आहे. शिवाजी राज्याभिषेक करून घेण्याचा बेत करीत आहे. तेव्हां हें करणें फार योग्य व ज्यास्त जरूरीचें आहे.

राजापूर येथें कंपनीच्या झालेल्या नुकसानीची भरपाई, बादशाही होन १०,००० देऊन, करण्याचें शिवाजीनें कबूल करून त्याबद्दलचा करार, शिक्का मोर्तब करून दिला आहे. या करारपत्रांत आम्हीं शिवाजीचे वकीलास कबूल केलेल्या ठरावापेक्षां कांहीं बाबी जास्त नमूद केल्या आहेत. पहिल्या हप्त्याच्या २५०० अडीच हजार होनांची फेड तितक्या किमतीचा माल आपण त्याजपासून विकत घेऊन करावयाची व त्याप्रमाणेंच दुसऱ्याहि हप्त्यांची भरपाई करावयाची असें आहे. परंतु आम्हांस अशी पोंचहि झाली नाहीं व आमची त्यास नक्की कबुलीहि नव्हती. ही रक्कम आम्हांस रोख मिळावयाची होती व त्यांचे जवळ बोलतांना आपण या बाबीवर विशेष जोर धरला पाहिजे. परंतु रोख रक्कम नाहीं म्हणून जर ते म्हणाले, व त्याबद्दल ते आपणांवर मालच लादावयास लागले तर तुम्ही बासा व पडून राहणारा माल न घेण्याची खबरदारी घ्यावी. मालाची किंमत अवाचे सवा लावली नाहीना हेंहि पाहिलें पाहिजे. सारांश, या व्यवहारांत कंपनीचा अंगर दुसऱ्या हितसंबंध्यांचा तोटा होऊं नये. आपण मिरीं, डुंगरी कापड, किंवा

छापील छिंट वगैरे युरपामध्यें चालेल (खपेल) असा माल मिळविल्यास फारच चांगलें. परंतु बाजारभावाची यादी आपण बरोबर घेत आहां त्याप्रमाणें आपण स्वतां योग्य किंमत केली पाहिजे. शिवाजीच्या जवळ पडित माल पुष्कळ शिल्लक आहे व तो त्यांस काढावयाचाहि आहे. तेव्हां शिवाजीस खूष करण्याकरतां म्हणून शिष्टाचारापुरतेंच अशा मालाकडे पाहिलें पाहिजे. कंपनीचा फायदा होईल, तोटा होणार नाहीं असे असेल तरच तो आपण घेण्याच्या भानगडींत पडावें, नाहींतर पडूं नये.

दुसरी बाब ह्या कलमामध्यें आपल्या अमलाखालील मुलखाच्या कोणत्याहि भागांत इंग्रजास वखारी स्थापण्याची मोकळीक असल्याचें शिवाजीनें कबूल केलें आहे. परंतु पेण व नागोठणे हीं स्थळें स्पष्ट शद्बांत समाविष्ट केलीं नाहींत, म्हणून आम्ही या भागांत वसाहत करावी व वखारी बांधाव्या असें कलम तुम्ही मान्य करून घ्यावें अशी आमची फार इच्छा आहे.' असें झालें म्हणजे वेळप्रसंगीं तुम्हांस (शिवाजीस)हि फार सोईचें होईल व त्या मुलखांत व्यापाराचें चांगले साधन होईल' अशी त्याचे (शिवाजीचे) मनाची तुम्हीं खात्री करून द्यावी.

तिसरी बाब शेवटच्या कलमांत इंग्रजांनी त्याच्या (शिवाजीच्या) मुलखांत माल आणावा, खरेदी व विक्री (आयात मालाची) करावी. परंतु कोणत्याहि मालाची आपल्या राज्याच्या हद्दीबाहेर निर्गत करावयाची नाहीं अशी बंदी केली आहे. यामुळें व्यापाराची फार गैरसोय व पायमोड होते हें तुम्ही त्यास (शिवाजीस) सांगावें. आजपावेतो आम्हांस कोणत्याहि राजानें आगर मांडलीकाने कधींहि अशी बंदी केलेली नाहीं म्हणून त्याच्या नजेरस आणावें. कारण हिंदुस्थान, दक्षिणेकडील मुलूख, इराण, अरबस्थान व दक्षिणसमुद्र या देशांत व जेथें जेथें म्हणून आम्ही व्यापार करतों त्या मुलखांत आम्हास फक्त मालाची जकात भरून निर्गतीचा व्यापार करण्याची मोकळीक आहे. म्हणून या कलमांत, सामोपचाराच्या व समजुतीच्य गोष्टी सांगून, त्यांचे (शिवाजी) कडून फेरफार करून घेण्याचा व दुसऱ्या मुलखांत जे आम्ही हक्क उपभोगतों ते आपणास बहाल करून घेण्याचा, तुम्ही आग्रह धरला पाहिजे. नाहींतर अगदीं पायमोड होईल व सवलत मिळाल्यावर व्यापार चालेल इतका सवलतीविना चालणार नाहीं.

'हिवाळ्यांत या बंदरांत सिद्दी आपली गलबतें नांगरतो' या गोष्टीमुळें शिवाजी स्वाभाविकच नाराज होईल अशी आमची अटकळ आहे. परंतु त्यांस बाहेर हांकून काढण्यास, आम्ही किती धडपड केली व त्यांच्या माणसांस (खलाशांस) आम्ही किती निष्ठुरपणें वागविलें आहे, हे तुम्ही शिवाजीस उघड करून सांगितलें पाहिजे. ह्या सर्व घडामोडी (व्यवहार) तुमचे समक्षच झालेल्या आहेत. आपल्या (शिवाजीच्या) देशांत वखारी उघडल्यामुळें व व्यापार चालू केल्यामुळें मोंगलांच्या मुलखांत अपरिहार्य झटापटी कशा कराव्या लागत आहेत याचें चित्र तुम्ही त्याचे पुढें उभें करून त्याची चांगली जाणीव करून द्यावी. म्हणजे, शिवाजी फार

शहाणा आहे तेव्हां आमच्या प्रामाणीकपणा बद्दल व आमची खरी आकांक्षा काय आहे याबद्दल त्याची निःसंशय पुरी खात्री पटेल याची आम्हास शंका नाहीं. सिद्याप्रमाणेंच तुमचीहि गलबतें हिवाळ्यांत आमच्या बंदरांत नांगरतां; तेव्हां जो स्नेहभाव आम्हीं तुम्हांस दाखवितों तो सिद्यास न दाखविणें हें आमच्या विचारास व दूरदृष्टीस येत नाहीं.

शिवाजीच्या मुख्य मंत्र्यांमध्यें विशेषेकरून तुम्ही स्वतां निराजीपंतांकडे लक्ष ठेवावें, त्यांनीं कंपनीच्या हितसंबंधाचे कामी असाधारण ममता व स्नेहभाव व्यक्त केला आहे. म्हणून तुम्ही आपल्या सर्व मागण्या व सूचना शिवाजीपुढें मांडण्यापूर्वी त्यास कळवाव्या. या प्रकरणाचा लौकर निकाल लागावा म्हणून शिवाजी राजे यांकडे आमची भलावण व मध्यस्थी करावी अशी तुम्ही आपली त्यास इच्छा दर्शवावी. निराजीपंताच्या सल्ला व संमती तुम्ही घेऊन तुम्ही त्याचे दुसरे मंत्री किंवा पेशवे मोरोपंत यांची मानमरातब सर्व प्रकारें उत्तम रीतीनें ठेवली पाहिजे. त्याच-प्रमाणें अनाजीपंताच्याही सत्कार झाला पाहिजे. वारंवार त्यांच्याशींच पत्रव्यवहार करण्याचे प्रसंग येतील. करतां त्यांची तुम्ही जितकी गाढ मैत्री संपादन कराल तितकें हितावह होईल.

दंडाराजपूरकर सिद्दी व शिवाजी या मध्यें जें युद्ध हल्लीं चालु आहे त्या पासून व्यापारास फार प्रतिबंध होत आहे, व हें जोखमाचें झालें आहे. तेव्हा कंपनीच्या हिताकरतां व आपल्या कर्तव्यास योग्य ( शोभेसें ) म्हणून आपण त्या उभयतांमध्यें तह जुळवून आणणें हें उचित आहे, व याकरतां आपण प्रयत्न केला पाहिजे. कारण या दोघांमध्यें सलोखा झाल्यास, हिंदुस्थानच्या बादशाहांचें आरमार ( जहाजांचा ताफा ) सिद्यास मदत करण्यास आतां रवाना झालें आहे, तें माघारें बोलाविलें जाईल व या प्रांताची नासाडी होणार नाहीं. म्हणून योग्य संधी दिसतांच तुम्हीं निराजीपंताजवळ ही गोष्ट मोठ्या आग्रहानें काढावी असें आम्हांस वाटतें. युद्धापासून ओढवणाऱ्या आपत्ती, व त्यास लागणारा खर्च, व तह झाला असतां त्यामुळें होणारे फायदे या गोष्टी तुम्ही त्यांस पटवून द्याव्या. शिद्दी फत्तेखानाबरोबर शिवाजीनें तह केला नाहीं तर हें युद्ध फार लांबवर चालू राहिल; निदान हे मोंगल बादशहा हयात आहेत तों पर्यंत तरी चालेलच. दंडाराजपुरी घेतल्यापासून शिवाजीचा जो फायदा होईल त्या-युद्ध असेंच चालल्यास त्याचें जास्त नुकसान आहे असें दिसून येईल, म्हणूनहि सांगावें. शिवाय अध्यक्षानीं तुम्हास एकांतांत दुसरे मुद्दे सांगितले आहेत. त्यापैकींहि कांहीं पुढें मांडावे. म्हणजे स्वताचे फायद्याकडे त्यांचें ( शिपाजीचें ) मन वळेल असें आम्हांस वाटतें. परंतु जर करतां ते या गोष्टीस प्रतिकूल आहेत असें दिसलें तर तुम्ही राजेसाहेबापुढें ही बाब मांडण्याचें सोडून द्यावें. अध्यक्षांची ईच्छा आपल्याला चांगला शेजार असावा व परस्परांत स्नेहभाव असावा इतकीच आहे. आपणा उभयतांमध्यें सलोखा राहावा हेंच त्यांनें म्हणणें आहे.

राजापूर येथें कंपनीस झालेल्या नुकसानीच्या बाबतींत भरपाईच्या ( शिवाजीचे वकील भीमाजीपंत यांच्या बरोबर केलेल्या ) करार पत्रांचे वेळीं केवळ निराजीपंताच्याच मध्यस्तीनें शिवाजीनें इतका चोख व सरळ निकाल केला. या फेडीचे रकमेंतून, या कामगिरीबद्दल निराजीपंतास पांचशें होन देणें बरें असें वाटल्यावरून, आम्हीं कबुल केलें आहे. त्यामुळें निराजीपंत ज्यास्त मिंधा होऊन यापुढें व्यापाराचे कामीं तो कंपनीस ज्यास्त उपयोगी पडेल. हें काम पार पाडून दिल्यावर भीमाजीपंत वकील यासहि त्याचे कामगिरीबद्दल शंभर होन देण्याचें कबूल केलें आहे. तेव्हां यदाकदाचित या रकमेबद्दल त्यांनें आपली इच्छा दाखविली तर तुम्हीहि आमचें म्हणणें (आमचा शब्द) कायम करावें. परंतु शक्य तों दुसऱ्या अगर तिसऱ्या हप्त्याच्या फेडीपावेतों पुढें ढकलण्याचा प्रयत्न करावा. परंतु पहिल्याच हप्त्याचें वेळीं त्यानीं विशेष आग्रहानें मागणी केल्यास नाकारूं नयें. कारण त्याच्याशी स्नेह राखणें आम्हास फार जरूरीचें आहे.

बालाघाट व दक्षणेकडील आंतील व्यापारी शहरें यामध्यें, तसेंच नागोठणें व मुंबई समोरील समुद्र यामध्यें व्यापाऱ्यास मालाची आयात निर्गत करण्याकरतां रस्ते चालू करावे म्हणून तुम्ही निराजीपंताजवळ वाटाघाट करावी. तुमचा देश संपन्न होण्यास व हा प्रांत सुरक्षित राखण्यास हें चांगलें साधन होईल म्हणूनहि त्याचे नजरेस तुम्ही आणावें. कारण आमच्या व्यापाराचा तिकडे एकदां बस चांगला बसला म्हणजे कोणत्याही शत्रूविरुद्ध ह्या प्रांताची मजबुती करण्यास आम्हांस त्यास (शिवाजीस) चांगली मदत करतां येईल. याकरतां तुम्ही मोठ्या कळकळीनें आग्रह करून हें काम त्याजकडून करून घेतलें पाहिजे. मार्ग चालू झाले म्हणजे त्यांच्या देशाचा फायदा लक्षांत येण्याजोगा होईल.

सर्व व्यापाऱ्यांस दक्षण प्रांताच्या शेजारच्या भागांतून माल आणण्यास व व्यापार करण्यास उत्तेजन देण्याकडे शिवाजीचें मन वळविण्याचे कामीं त्यांनीं आपले वजन खर्चावें म्हणून निराजीपंतास तुम्ही च्यार गोष्टी सांगाव्या. आपल्या नोकरांस, योग्य जकात घेण्याचे कामी फार दया दाखविण्यास लाविलें पाहिजे. अन्यायानें, जुलमानें पैशाची वसुली होते त्यापासूनहि सुटका झाली पाहिजे. या गोष्टींची फार जरूर आहे. कारण व्यापाराची ज्यास्त प्रगती दुसऱ्या कशानेही होत. नाहीं. या गोष्टी अमलांत आल्यावर पूर्वीपेक्षां आपलें व्यापारीबाबीचें उत्पन्न ज्यास्त वाढत्या प्रमाणावर आहे असें दिसून येईल.

या कामाचा निकाल लाऊन घेण्यास फार दिवस लागूं नयेत अशी आमची आशा आहे. परंतु मध्येंच काय भानगडी उपस्थित होतील हे कळणें शक्य नसल्यामुळें तुमच्या तेथील मुक्कामाची मर्यादा आम्हांस सांगतां येत नाहीं. तुम्हींच कायते ठरवावें. कारण हातीं घेतलेली कामगिरी चांगल्या प्रकारें तडीस लावल्यावांचून तुम्ही परत यावे असें आम्हांस वाटत नाहीं. कामगिरी पुरी होण्यास महिना चाळीस

दिवस लागावे अशी आमची अटकळ आहे. परंतु तेथील साद्यंत हकीगत नेहमीं आम्हांस कळवीत जावें. म्हणजे तिकडील बातमी कळतांच आम्ही आपणांस जरूर लागेल तसतशा ज्यास्त सूचना करीत जाऊं. ईश्वर आपणास सुखी राखो असें म्हणून पुरें करतो.

मुंबई ता. ११ मे सन १६७४ आपले प्रियकर मित्र

भा. इ. सं. मं. त्रै., व ८, अं. १-२, पृ. ३२ ते ३७.

९ जून १६७४ ] (-१३४-) [ जेष्ठ वद्य १ रविवार रा. श. १

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १ आनंदनाम संवत्सरे ज्येष्ठ वद्य १ भानु (भौम)[1] वासरे क्षत्रियकुळावतंस श्री राजा शिव छत्रपती स्वामी याणीं राजकार्यलेखनधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बाळाजी आवजी प्रभु चिटणीस यांसी आज्ञा केली ऐशीजे, तुम्ही स्वामिसेवा निष्ठेनें करून श्रम सहास पुरे केले. राज्यवृद्धीचे कामीं आला. यावरून तुम्हावर कृपाळू होऊन अष्टप्रधानांतील पद द्यावें मनीं धरलें असतां तुम्ही विनंती ( केली ) कीं आपणाकडे चिटणिसीचा दरक चालत आहे. हा अक्षय वतनी वंशपरंपरेनें संनिध व सर्व राज्यांतील चालवावा. कारखानिसी व जमेनिसी दोन धंदे राज्यांतील आपल्याकडे दिलें तें अक्षय असावें. यावरून चिटणिसी संनिधची व सर्व राज्यांतील वतनी करार करून दिली व कारखानीसी व जमनीसी राज्यांतील तुम्हाकडे दिली असे. स्वामिचे वंशींचा कोणीही अन्यथा करणार नाहीं. लिहिलेप्रमाणें सदरहू प्रयोजनाचे व्यापाराची सेवा करून पुत्रपौत्रानीं वंशपरंपरेनें धंदे सुखरूप अनुभविणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें. मोर्तब असे.

चां. का. प्रभूंच्या इति. साधनें, व. १, अं. १, आगस्ट १८८१, पृ. १३.

आक्टोबर १६७४ (-१३५-) [ १८ रजब खमस सबैन अलफ

श्री

श्रीसकलगुणमंडित-सौजन्यसिंधु-अखंडितलक्ष्मी अलंकृत-राजमान्य-राजश्री जिवाजी विनायक सुभेदार व कारकून हाल व इस्तकबाल सुभा मामले प्रभावली प्रति

१. भौमच्या ऐवजीं भानु वाचण्यांत चूक झालेली असावी.

[ शिक्का ][1] पोश्य मोरेश्वर पंडितराउ नमस्कार सुा खमस सबैन अलफ. वेदमूर्ति श्रीधर जोतीशी बिन विश्वनाथ जोतीषी सो कसबा ता पावस हे भले योग्य भले ब्राह्मण म्हणऊन धर्मार्थ देविले.

तांदूळ मोठे कैली कोठी वणी गाई पोटफोडीया च्यारी

४

मापे दाहा मण ।।.

एकून तांदूळ मोठे कोठी मापे दाहा मण रास देविले व वणी गाई पोटफोडिया च्यारी सोडविलिया आहे. तरी तुम्ही तरफमजकुरीहून तांदूळ मोठे कैली मापे दाहा मण देवणे व वणी गाई पोटफोडिया च्यारी सोडवणें. प्रतिवर्षी वेदमूर्तिचा समाचार घेऊन जोवरी वेदमूर्ति सुखरूप तोवरी तांदूळ आदा करणे व गाई खासगत असतील तरी एका पासून च्यारी पावेतो पालीत जाणे. दर हर साला ताजा खुर्द खताचा उजूर न करणे. तालीक लेहोन घेऊन असल फिराऊन देणे. छ १८ माहे रजबु [ शिक्का–' सुभं: भवतु ' ]

बा सूद छ ५ माहे जिलकाद सन खमस ( २२ जानेवारी १६७५ ) विज्ञप्ति बार पो छ १९ शाबान ( ८ नवंबर १६७४ )

भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त, खी. ग्रं. क्र. ८, पृ. ७३.

इ. स. १६७४–५ सुमार ] ( – १३६ – ) [ ?

श्रीरामसमर्थ

उत्तमगुणालंकृत रघुनाथभक्तिपरायेण परोपकार राजमान्या राजश्री रघुनाथभट गोसावी यांसी स्नेहपूर्वक सूचना. तुमचा निरोप घेउनु हेलवाकीहून स्वार जालो ते सुखरूप चाफलास पावलों. संकल्पाची सभारादना हि जाली. पुढें शरीराचा उपचार हि हलु हलु होतो, तुमचें मन मजवरी बहुत आहे. ते तुमचे आवडीच्या गुणे कल्याण होईल. ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें. आपण ते कर्कष सीतलाईमध्यें बहुत चि श्रम पावलो. तो माझा सकळ श्रम घेउनु मज निरोप दिधला. तो उपकार देव जाणे. येविसी चीत चमत्कारलें ते किती म्हणौनु लेहावे. माझे अरिष्ट तुम्ही घेउन मज उष्ण देशासी पाठविले. हा उपकार श्रीरघुनाथजीस जाला. मज रघुनाथजी वेगळें कोण्ही जिवलग नाही. आपण जाला समाचार रघुनाथजी —विदित केला. याउपरी माझे ठाई तुम्ही आहा. रघुनाथकृपेचा प्रत्यये तुम्हास आलियावरी प्रचीतीसी कलो येईल. बहुत काये लेहावें. वेदमूर्ती दिवाकर भट गोसावी तेथे आलियावरी तुम्ही माझा समाचार घेयासी ये प्रांतीस आले पाहिजे. स्नेह बहुत असों दीजे. हा पत्रार्थ हें इतुके म्या आवडीच्या कलवळ्याने लिहिले आहे. मने मन साक्ष असेल. परंतु तुम्हास उपचारसा वाटोन रजीस होल तरी न होणे. जैसा दिवाकर-

१. शिक्का: ' श्री: चितामणि च: रण शरण. '

भट तैसे तुम्ही. हा इत्यर्थ आहे. बरें कललें पाहिजे. तुमचा आमचा येकात प्रसंग जालियावरी मग ऐसे लिहिता न ये म्हणौनि थें संधीमधे प्रसग फावला पुढें फावेना म्हणौनि लाबे करून लिहिलें. वरकड इतर भाव मनामधे असेल तरी रघुनाथ साक्ष असे. तुम्ही रजीस न होणे आणि जे आहे ते लिहिलें. यामधे धे मिथ्या स्तुती नाही. तुम्ही सर्वज्ञ आहा, तुमचे जे काही आहे ते सकल माझें चि आहे, म्या मज माझ्या मनास येईल तैसे लिहिलें, येथें तुमचें काये गेल. काही चिंता न कीजे. तुम्ही आमचे चि आहा तुम्ही सकल देवाचें आहो, शरीरभेदावरी न जाणे. अतरस्थिति पाहिल्या उपरी कलो येईल.

भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. १६४–१६६.

## २४ फेब्रुवारी १६७६ (–१३७–)

[फार्सीचा मराठींत तर्जमा]

जिल्हे सुभानी साहेब
किराने सानी

फर्मान आलिशान क(ला ?) जाजिरयान हजरत यांचा करार जालेलां तारिख १७ माहे शहरयुर इलाही सन (१६६६) [शिक्का अबदुस सलाना इसलामखान] बरहुकुम दोन मौजे पाा शेवगाव बगैरे सरकार अहमदनगर सुभे दक्षण येथील निर्वाहाकरितां व खर्चाकरितां दर्गा सैद शरीफ साहेब राहणार अहमदनगर येथील यांस ब यांचे मुलेलेकरे यांस मुकरर होते म्हणोन दरीबिला ताा १२ माहे जिल्हेज सन १४ यांत हकीकत नवाबखा (?) मुस्तताब (?) मौला ,आलकाब ममालिक मदार गार्डेन इ का (ला ?) तेदार खुरसीद इस्तीहार याचे हुजूरास पोचली. [शिक्का—जेलीतफेः शाहेजाहाः...]

[शिक्का—दसबे खजेनआजःसिदिक शुददर बंदगीः शाहज्योहा]

त्याजवरून हुकुम दिल्हा की बाहाल ठेवावे वास्तव पाहिजे की मुतसुदी लोक काम करणार वर्तमान व भावी माहाल मजकूरचे याणी मौजेमजकूर पाठीवर [शिक्का] लिहिल्याप्रमाणे कदीम माहालातील पूर्वी ।.। दस्तुर प्रो वहिवाटीस मार-निल्हे याचे देणे कीं दर्गामजकूरास पूर्ववत प्रो खर्च करून व मुलेलेकरे सैदशरीफ साहेब यांची याणी तसीच खिजमत करून आसीर्वाद हमेषा दौलतीस दररोज बंदगानें हजरत सुलेमान मकानी खलिकी तुर रहीमानी यास देण्याची काळजी करीत जातील या बाबतीत ताकीद जाणून लवाडी न करणे. ताा १७ माहे जिल्हेज सन ९ (११ जून १६६६)...

मुकरर शेरा पाठीवरील यादीप्रमाणे मोहोरेनिसी सदारतपन्हा निजामुदींन आहंमद यांचा ऐसा जे निर्वाहाकरिता दर्गा सैद शरीफ साहेब राहाणार आहंमदनगर यांस वगैरे यांचे फर्जंदानास फर्मान आलिशान कजाजीरयान हजरत यांचा करार जालेला ता। १७ माहे शहरयुर इलाही सन ९ ( ३१ मार्च १६६६ ) बरहुकुम मौजे दोन दरोबस्त पा। शेवगाव वगैरे सरकार आहंमदनगर सुभे दक्षण येथील मुकरर आहे म्हणोन दरींविला ता। १२ माहे जिल्हेज सन १९ ची ( १७ फेब्रुवारी १६७६ ) हाकीकत नबाब मुस्तताब मौला आलकाबममाली मदार गर्दुन इलातेदार खुरसीद इस्तीहार यांचे हुजुरास अर्ज पोचल्यावरून हुकुम दिल्हा की बाहाल ठेवावे. यास्तव पाहिजे की मुतसुदी लोक काम करणार हालचे व पुढे होतील ते याणी माहालमजकुरात मौजे मजकूर कदीम माहालातील पूर्वील दस्तूरप्रो वहिवाटीस मारनिल्हे यांस देणे

शेरा दस्तखताने नबाब मुस्तबाव मौला आलकाबममालिक मदार गर्दून इलातेदार खुरसीद इस्तीहार यांचा ऐसाजे बाहाल ठेवावे

शेरा दस्तखाने बिजारतपन्हा मदारुल माहा मिदयानंत खांन यांचा ऐसा जे परवाना कलमी व्हावा

दोन मौजे दरोबस्त

| | |
|---|---|
| देहे | देहे |
| कोंनसी पा। शेवगाव सरकार | मौजे येकलाहारे पा। संगमनेर |
| आहंमदनगर सुभे दक्षण | सरकार दौलताबाद सुभे दक्षण |
| येथील येक मौजा दरोबस्त | येथील येक माजा दरोबस्त |

ता। १९ माहे जिल्हेज सन १९ (२४ फेब्रुवारी १६७६) नकल इस्तिफाचे दप्तारत पोचली. १८ ता। लिहिले असे... ...१७ माहे जिल्हेज सन १९ जुलुस

... ... ... ...

... ... ... ...

१९ माहे जिल्हेज ( २४-२-१६७६ ) यात इतल्ला जाला

भा. इ. सं. मं. वा. इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १९२-१९३.

२६ जुलै १६७७ ] **( - १३८ - )** **[ श्रावण शुद्ध ७ गुरुवार रा. श. ४.**

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ४ पिंगल संवत्सरे श्रावण शु॥ सप्तमी गुरूवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपति याणी यशवंतराऊ शहाजी कदम नामजाद कोट बालगुडानूर यासी आज्ञा केली ऐसी जे. कोट मजकुरी हस्मे नाभजाद आहे व एक जिन्नसही शिलक थोडा बहुत आहे. ऐसियासी त्याच्या लिहिणियासी लिहिणार पाहिजे. म्हणून त्यावरी तिमाजी नारायण यासी जमा करून पाठविलें आहे. तैनात

दर माहे होन प्रो ३ तीन रास केले असेत. इा प्रो पासून वजा वाटा उरेटी प्रो वजा करून बाकी बेरीज माहे दर माहे आदा करीत जाणे आणि त्याचे हातीं कोट मजकुरि लिहिणियाचें काम घेत जाणें. कागद बाब लिहिणिया माफक देत जाणें. मुजरा असे. लेखन सीमा [ मर्यादेयं विराजते. ]
[ शिका– श्री शिवचरणीं तत्पर त्र्यंबक सुत मोरेश्वर ]

सहविचार, व. १, अं. ४, मे १९१३, पृ. १७१.

१६७७–७८ इ. स. ] (–१३९–) [

वेंकट–कृष्ण–दीक्षित–विरचितः
नटेशविजयः
( प्रशस्ति )

[ इंद्रवज्रा ]

श्रियं कटाक्षाश्चिरमम्बिकायाः । तरंगयन्तूत्पलदामदीर्घाः ॥
द्रुमेऽपि सद्यस्तिलकाभिधाने । प्रणीयते यैः प्रसवांकुरश्रीः ॥१॥
भद्राणि पुष्णातु स रामभद्रो । भद्राकृति : स्वीकृतभद्रपीठः ॥
कल्पद्रुमो यस्य करादुदारात् । औदार्यमध्ये तु मिवान्वगास्ते ॥२॥
तस्यात्मनीनस्तनयोऽब्जयोनेः । पुरोहितोऽभूद्भगवान्वसिष्ठः ॥
अरुन्धतीनाम्नि यदीयमास्ते । पतिव्रताज्योतिषि भागधेयम् ॥३॥
गाधेय गर्वोदधिकुम्भयोनिः । यद्ब्रह्मदण्डो यमिताखिलास्त्रः ॥
ब्राम्हे चले क्षात्रबले च सारम् । निरिक्षितॄणां निकषोपलोऽभूत् ॥४॥
गाधेस्सुतः क्रूरतपोमहिम्ना । प्रसेदुषि ब्रह्मणि भाषमाणे ॥
अपि द्विजोऽसीत्यवृणीत यस्य । तथाप्यनुज्ञां द्विजभावपूर्त्यै ॥५॥
यस्यान्वये योगिवरस्य शक्ति । पराशरव्यासगुरुप्रधाना ॥
संजज्ञिरे सर्वजगत्प्रसिद्धाः । महर्षयोऽब्धौ मणयो यथाच्छाः ॥६॥
तस्यान्ववाये द्विजराज एकः । क्षीरोदधौ चन्द्र इवा( धि )कश्रीः ॥
सौम्यः सतां वर्त्मनि संप्रवृत्तो । बालाजिनामाजनि पण्डितेन्द्रः ॥७॥
अजायतास्मादरणेरिवाग्निः । दादाजिनामा तनयोऽग्र्यतेजाः ॥
विरोधिनोऽभ्येत्य विलोलहेतिम् । चापल्यतो यं शलभीबभूवुः ॥८॥
उमाम्बिकानामहुताशनस्य । स्वाहेव तस्याजनि धर्मपत्नी ॥
अजीजनद्धर्ममिवात्तदेहम् । गोपालनामानमसौ कुमारम् ॥९॥
उमाकुमारोऽयमुदग्रशक्तिः । बाल्यात्प्रतिक्ष्माभृदुरोबिभेत्ता ॥
दाद्राजिनेतुस्तनयो महात्मा । बालेन्दुमौलेरिव बाहुलेयः ॥१०॥

गोपालभूपालवरस्य तस्य । गुणौघमाणिक्यखनिः कनीयान् ॥
रामस्य सौमित्रिरिवातिमात्र- । प्रेमाश्रयो विठ्ठलपण्डितोऽभूत् ॥११॥

धर्मप्रतिष्ठापनतत्परस्य । तथाविधोऽक्रूरहितस्य तस्य ॥
सखाऽनघः शंकरपंडितोऽभूत् । गाण्डीवधन्वेव गदाग्रजस्य ॥१२॥

देवो द्विबाहुर्द्विजराजवंशे । गोपाल एवाजनि गोप्तुमाशान् ॥
चापासिहस्तः स्वयमेष तस्मात् । आस्ते विमुक्तारिररोगदश्च ॥१३॥

पुरा गृहित्वा पृथुकान्कुचेलम् । गोपाल एकं कृतवान्धनाढ्यम् ॥
अद्य प्रवादच्युतयेऽनुपायि । कुचेलसंघान्कुरुते कुबेरान् ॥१४॥

शापे च चापे च स रैणुकेयः । शान्तौ च कान्तौ च स शारदेन्दुः ॥
योगे च भोगे च स हैहयेन्द्रो । ज्ञाने च दाने च स चेद्दधीचिः ॥१५॥

प्रत्यग्रकर्णः प्रतिपादनेऽसौ । सत्ये हरिश्चन्द्रनृपो नवीनः ॥
वीरायिते नूतनविक्रमार्को । बोधे कलानां नवभोजराजः ॥१६॥

विरोधिसेनातृणवीतिहोत्रः । कवीश्वरस्तोमकलापिमेघः ॥
समाश्रितव्रातचकोरचन्द्रः । स राजते सज्जनपद्मभानुः ॥१७॥

स संचरिष्णुर्भुवि चापवेदो । दृशाधिगम्यो द्विजभाग्ययोगः ॥
दधार स स्वीकृतदेहबंधः । सचेतनः साम्बशिवप्रसादः ॥१८॥

राज्ञः शिवछत्रपतेः प्रसादात् । प्राज्ञस्तदीयामवलम्ब्य मुद्राम् ॥
चिंदंबरप्रांतभुवं चिराय । गोपायति ब्रह्मकुलानुकूलः ॥१९॥

बिभ्रद्धरित्रीभरमेव शेषम् । भुजेन बुद्ध्याप्यधरीकरोति ॥
सरोजलक्ष्मीं च सतामलक्ष्मीम् । निजेक्षणेनैव निराकरोति ॥२०॥

नीलालकश्चंद्रमुखोऽब्जनेत्रो । बिम्बाधरः कम्बुगलोऽद्विबाहुः ॥
कपाटवक्षाः स गभीरनाभिः । महोरुजंघो मदनो नु मूर्तः ॥२१॥

कांत्या त्वदास्येन जितः कृशीयान् । इन्दुर्भजत्यन्वहमित्युडु द्वे ॥
कर्णान्तिके कीर्तयतो धृतान्तः । छिद्रे नु मुक्ताछलतो मुदेऽस्य ॥२२॥

हयाधिरोहोचितवेषभूषे । हसन्मुखेऽस्मिन्सममश्ववारैः ॥
हयेन खेलत्यविराजमार्गम् । दृष्ट्वा विमुह्यन्त्यबलाद्विषश्च ॥२३॥

विहारधाटी विततोरुघोटी- । खुराग्रधूली कुहनाव्यपालिः ॥
विरोधिबालाविपुलाश्रुमाला- । नदीषु हेतुर्ननु तस्य नेतुः ॥२४॥

दुरासदोऽन्यैर्धृतमण्डलाग्रः । सोऽयं प्रतापेऽपरसूर्य एव ॥
खमुत्पतन्खड्गहतोऽस्य शत्रुः । भिन्ते यदेतद् भ्रमतोऽर्कबिम्बम् ॥२५॥

कराग्रखेलत्करवालमाया । कालाहिलीलाकबलीकृतेर्ष्यः ॥
प्राणानिलेषु प्रतिपक्षयूनाम् । आस्ते नरेन्द्रोऽयममोघमन्त्रः ॥२६॥

अनेककाष्ठाक्रमणादजस्रम् । जाज्वल्यमानाज्जपशालिनोऽस्य ॥
प्रतापवह्नेर्भृशमुत्थिताभिः । नीलं नभोऽभून्नियतं मषीभिः ॥२७॥
विसृत्वरैरस्य यशोवितानैः । आच्छादिते सन्ततमिन्दुबिम्बे ॥
चन्द्रोपलैर्ज्योतिपिकां कथंचित् । जानन्ति पक्षौ निशि शुक्लकृष्णो ॥२८॥
स्वमन्दिराभ्यन्तरचत्वरे स्यात् । वदान्यभावे वितते विचित्रम् ॥
कवीन्द्रबाहीकगृहाङ्कणानि । भवन्ति दानोदकपंकिलानि ॥२९॥
अनर्घकर्णाभरणाङ्गुलीय-- । चित्राम्बरोष्णीषसुकंचुकाद्यैः ॥
अलंकृता यस्य सभांतराले । दीव्यन्ति कल्पद्रुमवद्बुधेन्द्रम् ॥३०॥
यदीय विद्वज्जनयज्ञवाटी । माटीकमानेष्वमरेष्वजस्रम् ॥
वियोगखिन्नाविबुधायताक्ष्यो । हन्तायनं दक्षिणमर्थयन्ते ॥३१॥
विद्वज्जनो यस्य विभोस्सकाशात् । आसाद्य वर्षाशनमात्रहर्षः ॥
आविष्करोत्यात्मनि चातकत्वम् । दातुर्घनत्वं च दिगंतरेषु ॥३२॥
वदान्यतामस्य कथं वदामः । कर्णाय दातुर्मणिकुंडलस्य ॥
कल्पद्रुमेऽपि स्ववशे बलारिः । कर्णं ययाचे मणिकुंडलं यत् ॥३३॥
ख्यातिं गतो यः किल कुंडलेन । बुधेन्द्रमेकं परितोष्य कर्णः ॥
कथं न्वजस्रे तु स कुंडलानि । दत्वामुना तोषयता बुधेन्द्रान् ॥३४॥
स कौशिकोऽजायत शक्तिहीनः । कर्णात्स्वयं कुंडलमाददानः ॥
वसिष्ठ एषोऽजनि वृद्धशक्तिः । कर्णाऽर्पयन्कुण्डलमाददानाम् ॥३५॥
देहीति दीनध्वनिकंधराय । दत्तामुना रंगपुरे द्विजाय ॥
प्राज्ञेन कार्तस्वरकर्णभूषा । प्रश्नोत्तराख्या प्रथिता तदादि ॥३६॥
विद्वन्मणिश्रेणिविराजमानैः । मही परिष्कृत्य महाग्रहारैः ॥
ननु स्वयं नायकरत्नभूतो । विद्योतते त्रासविवर्जितोऽसौ ॥३७॥
जिष्णुः शुचिर्दंडधरस्सपुण्यः । जनः प्रचेताः शुभगन्धवाहः ॥
धनाधिनाथो द्विजराजमोलिः । आविष्करोत्यात्मनि दिक्पतित्वम् ॥३८॥
चिदंबरे द्राकछिवगंगवाग्भिः । यथा जनानां ह्रियतेऽत्र पंकः ॥
हन्तास्य तस्या अपि पंकहर्तुः । वयं कथं पावनतां वदामः ॥३९॥
कान्तेन साकं कलधौतशैले । विहारवा( र्ता ) हृदि विश्रमातुः ॥
व्यावर्तितानेन विहारहेतोः । आन्दोलिकामर्पयताभिरूपाम् ॥४०॥
सभेशसेवासमयानुशंडि । न्यनन दत्ते निनदत्यमन्दम् ॥
घंटामणौ मूर्ध्निकृतांजलिः स्वे । लोके वसिष्ठं हि विलोलतेजः ॥४१॥
तस्यानुकूलाऽजनि धर्मपत्नी । सखाम्बिका नाम सतीमणिर्या ॥
खनीव रत्नं कुलदीपमेनम् । खण्डोजिनामानमसूत सूनुम् ॥४२॥

स्वप्ने तमेनं शिवकामसुंदः । यासाद्य दिव्याभरणोज्ज्वलांगी ॥
चिदंबरेशार्पितचित्तवृत्तिम् । कदाचिदूचे करुणानुरूपम् ॥४३॥

वत्स प्रसन्नस्त्वयि विश्वनाथः । सुखी चिरंजीव शृणूदितं मे ॥
सरस्वती श्रीरिव भूरिव त्वाम् । स्वयं शिवानुग्रहतो वृणीते ॥४४॥

सारस्वतं सारमिह प्रयुंक्ते । क्षुद्रेषु देवेष्विरिणेष्विवेकः ॥
स्वातीघनः शुक्तिपुटेष्विवान्यो । धन्यो महत्स्वेव तु दैवतेषु ॥४५॥

नव्यं तदेकं नटनायकस्य । प्रणीय काव्यं पुरुषार्थहेतुम् ॥
रामस्य वाल्मीकिरिव त्रिलोक्याम् । आचंद्रतारं यश आप्नुहीति ॥४६॥

तत्रांतरे ताल्मृदंगतूर्य- । वीणारवैर्मागधरागभेदैः ॥
प्रबोधितोऽसौ वरदेवतायै । कृतांजलिः काल्यविधिं व्यतानीत् ॥४७॥

शिवार्चनानन्तरमेव सभ्यान् ॥ स्वप्नानुवादेन सभाजयित्वा ॥
तेषामनुज्ञामधिगम्य धीमान् । काव्यं क्रमादारभतैष कर्तुम् ॥४८॥

विशुद्धवाधूलकुलाब्धिचंद्रः । विद्वन्मणिर्वेङ्कटकृष्णयज्वा ॥
गोपालनेतुः कवने विनेता । प्राचेतसस्येव पितामहोऽभूत् ॥४९॥

(शार्दूलविक्रीडित)

श्रीमद्वैदिकमार्गखलनकलाशुद्धान्तरंगसुधीः ।
अद्वैतामृतलाभनिर्भरनिजानंदानुभूतिः सताम् ।
गोप्ता मेटकरीकुलैकतिलको गोपालभूपालके ।
काव्येऽस्मिन्क्रमशो नटेशविजये सर्गं मुदायं व्यधात् ॥५॥

इति श्रीवाधूलवंशभूषणस्य विबुधकुलोत्तंसस्य महोपाध्यायवेंकटाद्रिविपाश्चित्तनूभुवो वेंकटकृष्णाध्वरिवर्यस्य कृतौ नटेशविजयाख्ये काव्ये प्रथमः सर्गः ।

भवहर शिवशंभो पापनाश त्रिनेत्र ।
प्रमथनुत नटेश प्रार्थित नः प्रदेहि ।
पटुतरमिह शर्द्धं प्राणिना रत्न स... ।
प्रवरमिषतो न प्राणिरप्राणिनोऽपि ॥५१॥

इति श्रीवाधूलकुलतिलकस्य वेंकटकृष्णदीक्षितस्य कृतौ नटेशविजयाख्ये महाकाव्ये सप्तमः सर्गः ।

---

पुरुषार्थ, व. ९, अं. ८, शिवाजी अंक, मार्च १९३३. (Govt. Oriental Manuscripts Library, Madras, Ms. No. 1539 Palm leaf Ms., Granth Character.

१ नवंबर १६७८ ] (-१४०-) [ कार्तिक वद्य १२, शुक्रवार
रा. श. ५

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ५ कालयुक्त संवत्सरे कार्तिक बहुल द्वादसी भृगुवासरे क्षत्रीयकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति याणी राजश्री कोनेरी रुद्र [ शिक्का ][1] देशाधिकारी ता। मावळ यासी आज्ञा केली ऐसी जे. मुठाची पाटिलकी माहली येस पाटील व भिउजी पाटील व मालोजी पाटील करिताती. यांसी बाघोजी मराठा यास निसबती नसता खलेलास उभे राहिले आहेती की पाटीलकी आपली. तरी आजी नवा कथला कोण्ही करूं देत नाहीं. पेसजीपासून पाटिलकी माहाल खात आले असेती. दादाजी कोंडदेव याचे वेळेस चालिले असेल तेणें प्रमाणें चालवणें. पाटिलकी महालांची महालाचे हाते घेणें. मऱ्हाटे नवाच कथला घेऊन उठले आहेती. त्याला ताकीद करून हालखुद ठेवणें. करकर सर्वथा होवों ने देणें. लेखनालंकार [ शिक्का- ' मर्या : देयं विरा : जते ' ]

सुरु सुद

पौ। छ २५ सैवाल मार्गशीर्ष बहुल द्वादसी मंदवासर ( ३० नवंबर १६७८ )

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. ४१.

१ नवंबर १६७८ ] (-१४१-) [ २६ सवाल तिसा सबैन
अलफ

श्री

राजमान्य राजश्री बहिराजी बाबाजी परमु हवालदार व कारकून ता। मुठे खोरे यासी कोनेर रुद्र सुभेदार व कारकून सुभा माहालहाय ता। मावल आसिर्वाद सु॥ तिसा सबैन अलफ. राजश्री छत्रपतिस्वामीचें पत्र कार्तिक बहुल द्वादसी भृगुवासरीचें सादर जालें. तेथें आज्ञा कीं मुठाची पाटिलकी माहली येस पाटील व भिऊजी पाटील व मालोजी पाटील करिताती. यांसी बाघोजी मराठा यासी निसबती नसता खलेलास उभे राहिले असती कीं पाटिलकी आपली. तरी अजी नवा कथला कोण्ही करूं देत नाहीं. पेसजीपासून पाटिलकी माहाल खात आले असेती. दादाजी कोडदेव याचे वेळेस चालले असेल तेणें प्रमाणें चालवणें. पाटिलकी माहालाची माहालाचे हातें घेणें. मऱ्हाटे नवाच कथला घेऊन उठले असेती त्याला ताकीद करून हालखुद ठेवणें. करकर सर्वथा होऊ न देणें म्हणऊन आज्ञा. आज्ञे प्रमाणें माहालांची पाटिलकी माहालांचें दुमाला करुन पाठविले आहेती. तरी जैसे पहिलेपासून याचे हातें मोकदमीचें काम घेतां तैसै च घेणें. मऱ्हाटे हरकती ( करताती ) त्यासी बटा देऊन हालखुद ठेवणें. माहालासी एकदर

१. शिक्का—' श्रीशिवराजेंद्र : हर्षनिदान ॥ त्र्यंबक : सुत मोरेश्वर मुख्य : प्रधान.'

हरकती कथला करूं ने दणे. त्यासी पाटिलकीसी काही निसबती नाहीं. राजश्री स्वामीनें मनांस आणून पत्र दिले आहे. तेणें प्रमाणें वर्तणुक करणें. सदरहु पत्राची तालिक लिहून घेऊन असल फिराऊन देणें. छ २६ सौवाल मोर्तब सुद [ शिक्का—'श्री : जयते लेखन : सीमा' ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. ४१–४२.

१६७८ इ. नंतर ] (– १४२ –) [ ?

श्री महादेव

राजश्री मालोजी राजे घोरपडे यांसी :– छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य प्रति राजश्री शिवाजी राजे जोहार. उपरि. पूर्वी निजामशाहीतून आमचे बाप कैलासवासी महाराज इभराईम आदिलशाहा पादशाहाचे कारकीर्दीस इकडे आले. त्यास, इभराईम आदिलशाहाने पादशाही कारबाराचा मदार महाराजाचे सिरीं टाकिला. तेव्हां महाराजानें हा विचार केला कीं, पादशाही मदार आपले हातास आला असतां आधीं तों आपले जातीचे लोक मराठे यांला हातीं धरून सरदारकी करून पोटें भरितात ते पातशाही वजीर करावे, पादशाही कामें यांकडून करऊन नामोश होय, इज्जती थोर पावेत ते करावें. म्हणून तुमचे बाप बाजी घोरपडे सरदारकी करून होते ते आणून पादशाहास भेटऊन पादशाही वजीर केले. त्या दिवसापासून तुमच्या बापाच्या हातें व तुमच्या हातें पादशाहीचीं कामें होत आलीं. पादशाहांनीं तुमचे चालविलें. ऐशा तीन पिढ्या पादशाहाच्या, दोनी पिढ्या तुमच्या जाल्या, ऐशियास, महाराजानें तुमच्या बापास इतकें बरें केलें हें स्मरण न धरून, जेव्हां कांहीं मुस्तफाखाने महाराजास दस्त करविले तेव्हां तुमचे बाप बाजी घोरपडे हमी होऊन महाराजास दस्त करून मुस्तफाखाचें हातीं दिल्हें. त्या दिवसापासून तुमच्या घराणियाचा व आमच्या घराणियाचा दावा वाढत चालिला. तो कित्येक झगडियांत तुम्हीं आमचे लोक मारिले व आम्हीं तुमचे लोक मारिले. आदिकरून तुमचे बाप बाजी घोरपडे त्यांला आमचें लोकीं झगडियांत मारिलें. ऐसा दावा परस्पर चालिला होता. ऐशियास सांप्रती राजकारणवर्तमान तरी : दक्षिणेचे पादशाह तीन, निजामशाह, आदिलशाह, कुतुबशाह. त्यामध्यें निजामशाही पादशाही बुडाली ते समई, निजामशाही उमदे वजीर होते त्यार्णी आदिलशाही दरगाहासी रुजुवाती करून आपणास रोजगारास जागा केला. हाली आदिलशाही बहलोलखान पठाणीं घेतली, पादशाहा लहान लेकरूं नांवमात्र ते आपले कैदेंत ठेविले आलेत, आणि तख्त व छत्र व विजापूरचा कोट पठाणानें कबज केला आहे, कांहीं गुदारून मिळाला नाहीं. ऐशियास, दक्षणचे पादशाहीस पठाण जाला, हे गोष्टी बरी नव्हे ! पठाण बळवला म्हणजे एका उपरि एक कुली दक्षिणियांचीं घरें बुडवील, कोण्हास तगो देणार नाहीं, ऐसें आम्हीं समजोन हजरत कुतुबशाहा पादशाहा यांसी पहिलेपासून रुजुवात राखिली होती. त्यावरून सांप्रत हजरत कुतुबशाहानीं

मेहरवानी करून हुजूर भेटीस येणें म्हणून दस्तखत मुबारक व दस्तपंजियानसी फर्मान सादर केला. त्यावरून आम्ही येऊन हजरत कुतुबशाहाची भेटी घेतली. भेटीचे समई पादशाही आदब आहे कीं, शिरमोई धरावी. तसलीम करावी. परंतु, आम्हीं आपणावर छत्र धरिलें असे, ही गोष्ट कुतुबशाहास मान्य होऊन, शिरमोई धरणें व तसलीम करणें हें माफ केलें. पादशाहा तिकडून आले; आम्ही इकडून गेलों. पादशाहानीं बहुतच इज्जती होऊन, गळयास गळा लावून भेटले, आम्हास हातीं धरून नेऊन जवळी बैसविले. कितीएक मेहेरवानी जाहीर केली. आम्हीही जैसी रूजुवात करूं नये तैसी केली, आणि कुतुबशाहाचा व आपला घर्टी बरेपणा करून घेतला. याउपरि, राजकारणविषई हजरत कुतुबशाहानीं महादण्णापंतास व आम्हास एकचित्त करून ऐसा तह केला कीं, जो काय उभयवर्गी तह द्यावा तो आपण कबूल करावाच. ऐसा कुल मनसबा व मदार आम्हावरी टाकिला आहे कीं, आपली पादशाही जितकी वाढवूं ये तितकी वाढवणें, पठाणाची नस्तनाबूद करणें, दक्षणची पातशाही आम्हा दक्षणियांचे हातीं राहे तें करावें म्हणून. त्यास, हा मनसुबा ये प्रसंगीं आमचे हातास आलियाउपरि आम्ही हाच विचार केला कीं, जे कांहीं आपले जातीचे मराठे लोक आहेती ते आपल्या कटांत घेऊन कुतुबशाहासी त्यांची रूजुवात करावी, दौलत देवावी, त्यांचे हातें पादशाही काम घेऊन पादशाहाची पादशाही दराज करावी, आणि तुम्हा लोकांच्या दौलताही चालेत, घरें राहेत तें करावें. आपल्या जातीच्या मराठिया लोकांचें बरें करावें हें आपणास उचित आहे, ऐसें मनावरी आणून, तुमचा आमचा वडिलापासून दावा वाढत आला होता तो आम्ही मनांतून टाकून, निःकपट होऊन, तुम्ही मराठे लोक, कामाचे, तुमचें बरें करावें ऐसें मनीं धरून, हजरत कुतुबशाहाचा कौलाचा फर्मान घेऊन पाठविला आहे. तरी, तुम्हीं कुलीन, आमचा भरोसा मानून, देखत पत्र, हरएक उपायें पठाणापासून निघोन मजलदरमजल भागानगरास आम्हापासीं येणें. त्यास, तुम्ही तरी स्वार होऊन मजलदरमजल यालच ! परंतु, आपला कुलीखुलासा, नेखस्तमुदा व इतबारी हेजीब सत्वर पुढें पाठवून देणें कीं, तुम्हाहून पुढें चार दिवस आम्हापासी यावे ऐसा—पाठवून देणें. म्हणजे हजरत कुतुबशाहास आम्हीं अर्ज करून दौलतेचें नेमस्त करून, कौलाचा फर्मान दस्तपंजेमुबारक घेऊन, फर्मान व लुगडीं मोहताप तुम्हास पाठऊन देऊन. ते घेऊन, येऊन, आमचे हातें हजरत कुतुबशाहास भेटणें. ए प्रसंगीं ऐसें तुमचे दौलतेचे काम मजबूत करून देतों कीं, पुढें बहुत बरें केलें ऐसें तुम्हीं आठवावें, तुमचे पुत्रपौत्र आठवीत, व दौलत थोर होए, व हजरत कुतुबशाहाचें काम तुमचे हातें होऊन ये, ऐसा समय असे ! ऐशियास, तुम्हीं कदाचित् ऐसा विचार कराल कीं, आदिलशाहीचे आपण दो पिढीचे वजीर आणि आतां विजापूराकडून कुतुबशाहींत राजेयांचे बोले कैसें जावें ? तरी, जे समई खवासखान धरिला, विजापूराचा कोट पठाणें घेतला, विजापूराचा पादशाहा धाकटा आहे त्याला कैदेत ठेविलें, तेच समई पादशाही बुडाली ! विजापूर पठणाचे हातास गेलें ! आतां आदिलशाही कैची !! आणि उगीच तुम्हीं तेथें आपली आदिलशाही

आहे म्हणोन गुंतून राहिले आहां ! जरी पठणाचीच चाकरी करोन राहों म्हणाल, तरी, पठाण कांहीं तुम्हास थोर दौलत देणार नाहीं. आणि पठाणास, तरी, हजरती कुतुबशाहा व आम्ही व तमाम दखणी मिळोन चालोन घेऊन बुडवीतच आहों ! तुम्हीं मराठे लोक, आपले आहां, तुमचें गोमटें व्हावें, म्हणून पष्टच तुम्हास लिहिलें असे. जें काय तुम्हास पठाण देतों त्याची दुगुणी आम्ही कुतुबशाहापासून तुम्हास देवीतच असो; किंवा ह्याहून अधिकही होऊन येईल तरी करून देऊनच. सर्व प्रकारें तुमचें गोमटें करून. एविसीं, आम्हापासून अंतर पडे तरी, व मागील दावियाचा किंतु आम्ही मनांतून टाकिला ऐविसीं, आम्हांस श्री- देवाची आण असे. तुम्ही निःसंदेह होऊन येणें. हेजीब आपला पुढें पाठवणें. त्या हातीं, आम्हांसी घरोब्रियानें बरें वर्तावें, मागील दावियाचा किंतू मनांतून टाकिला, ऐसे, आपला आराध्य व कुळस्वामी असेल त्याचा शपथ लिहून, पत्र हेजिबा हातीं पुढें पाठवून देणें. आम्हीं सर्व प्रकारें तुमचें गोमटें करावयासी अंतर पडो नेदऊन. बहुत काय लिहिणें [ शिक्का- ' मर्या : देयं विरा : जते '. ]

[ शिक्का- प्रतिपच्चंद्र : लेखेव वर्धिष्णुर्वि : श्ववंदिता ॥ शाहसू : नोः शिवस्यैषा मुद्राः भद्राय राजते '. ]

श्रीसरस्वती मंदिर, व. ५, अं. ५, क्र. २१, मार्गशीर्ष-पौष १८२७ शके, पृ. ९-१३.

४ मे १६७९ ] (-१४३-) [ अधिक ज्येष्ठ शुद्ध ५, रविवार, रा. श. ५.

श्री

श्री सकलगुणमंडित अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री धर्मोजी नागनाथ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत फोंडा गोसावी यांसि पो मोरेशवर [ शिक्का ][1] पंडितराउ कृतानेक नमस्कार ( राज्याभिषेक ) शके ५ सिद्धार्थी संवछरे अधिक ज्येष्ठ सु ५ पंचमी रविवासर सुहूरसन तिसा सबैन अलफ. वेदमूर्ति अनंतभट बिन फटंभट सरजोतीसी वास्तवे मामले फोंडा वृत्तिवंत योग्य याची सरजोतीसपणाची वृत्ति होती. त्याचें हकवतन कांहीं राजगृहीं जमा जहालें. याकरिता हालीं अनुत्पनास तांदूल आठ सेरी पाइलेंनें कोठी मापें १८। येक खंडी पांच मण दिल्हे व प्रसूता गाई येक पासून आठांचा करभार सोडून वेदमूर्ति सर जोतिसी यांचे वंशपरंपरेस चालवणें, नूतन पत्राचा आक्षेप न करणें. मुख्य पत्राची प्रती लिहून घेउनु मुख्य पत्र वेदमूर्तीस देणें. रा छ ३ रबिलाखर. हे विज्ञप्ति. [ शिक्का-' शुभं : भवतु ' ]

बार सूद

चित्रमयजगत, व ४, अं. ११, नवंबर १९१३, पृ. ४०१.

---

१. शिक्का-' श्री : चिंतामणि : चरण शरण '.

५ जुलै १६७९ ]　　(– १४४ –)　　[　?

(रा. श. ६, सिद्धार्थीनाम संवत्सरे, आषाढ, शुद्ध ७ मंदवासर रोजीं शिवाजी महाराजांनीं कोन्हेर रुद्र देशाधिकारी तर्फ मावळ यांस लिहिलेल्या पत्रांतील उतारा (धडफळे संग्रह)

स्वामी धाकुटपणापासून या देशांत आहेत. मिरासदार कोण, गैरमिरासदार कोण हे जाणतात. माणसाचे माणूस ओळखतात. तूं वाईदेशाहून नवा सुभा करावयास आला आहेस. तुजला हे ठाऊके नाही. आणि उगाच एकाचे बोले एकासी कथला (तंटा) करतोस. हे तुजला कोणे सांगितले आहे. याउपर मिरासदाराचे कथले नसते नवे करसील म्हणजे आपले केले पावसील. हे जाणून सितोळी यासी कथला न करणें. पूर्वी मातोश्री आऊसाहेबीं मजरा (गांव) करावयासी सांगितले होते, ते प्रसंगी स्वामीने मान्य केले नाही. याउपर गोमाजी नाईक पानसंबळ यांनी त्यासी कुसूर केला. ते वर्तमान स्वामीस विदीत झाल्यावर, त्यास ताकीद केली. आजि तागाईत सुरळीत चालत आले आहे. हली त्याप्रमाणें सतोळे यांची पाटिलकी सुरळीत चालविणें. वाडी करंदीचा मजरा केला नाही. मातोश्री आऊसाहेब अगर कोणाचा कागदपत्र कुसूरामुळे नेला असेल त्यावरी न जाणें.

~~~~~~~~~~~~~~

पुरुषार्थ, व. १०, अं. ७, फेब्रुवारी १९३४, पृ. २५३.

१२ नवंबर १६७९ ]　　(– १४५ –)　　[ कार्तिक बहुल ५ बुधवार, रा. श, ६

स्वस्ती श्री राज्याभिषेक सके ६ सीधार्थी नाम संवत्सरे कार्तीक बहुल पन्चमी बुधवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा सीव छत्रपती यानी देसमुखानी व समस्त ब्राह्मण व प्रजा कसबे परली यासी आज्ञा केली दीलहे अभयेपत्र येसा जे, श्री ... ... देवस्थान येथे आंहे. क्षत्रीचा गाव. या करिता येथे स्वामीचे सेनेचे लोक आलीया कोन्ही उपद्रव करू नये. खंडनी घेऊ नये. येसी आज्ञा आहे. आजी परियंत कोन्ही उपद्रव दीधला नाही. पुढेहि देणार नाही. तुम्हास आभयेपत्र दीलहे आसे. आमचे लोक सेना या मार्गी येतील जातील. त्याकरिता तुम्ही गाव सोडून जाण्याची गरज नाही. सुखे गावी आसत जावे. बरा कौलाचा कागद त्याला दाखवीत जाणे. म्हणजे कोन्ही तुमचे वाटेस जाणार नाहीत. आभये आसे. जानीजे.

लेखनालंकार.

~~~~~~~~~~~~~~

युगवाणी, अमरावती, व. २, अं. ३, मार्च १९४७, पृ. ८६–७.

१६७७-१६७८ सुमार ] (-१४६-) [ ?

श्री महादेव श्रीतुलजा भवानी.

श्रीसहस्त्रायु चिरंजीव अखंडित लक्ष्मी आलंकृत्त राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री येकोजी राजे प्रति राजश्री शिवाजी राजे आशिर्वाद येथील क्षेम जाणोन स्वकीय--कुशल लेखन केलें पाहिजे. उपरि कैलासवासी साहेबी कैलासवास केला त्यास आजी तेरा वर्षे जालीं. महाराजाचे पैके व जडाव व हाती व घोडे व मुलख आवघेही राजश्री रघुनाथपंती तुम्हाला राज्यावरी बैसवून संपूर्ण राज्य तुमचे हातीं दिल्हे. यैसीयास आमचा अर्धा वांटा तेरा वष तुम्हींच खादला. आह्मी जरी तुम्हां जवळी मागावें तरी बहुत दूर होतो. बऱ्या बोलें तुम्हीं देणार नव्हतां म्हणून तेरा वर्षे सबूरी केली. मनामध्ये यसा विचार केला कीं, बरें, महाराजाचे पुत्र तेही आहेत. खाती तोवरी खात. मालाचे धनीच आहेत. ते समई आम्हांला फावेल ते समई आम्हीं वेव्हार सांगोन घेऊ. यैसे मनी धरून होतो. यैसीयास राजकारण प्रसंगे आम्हीं कुतुबशाहाचे भेटीस भागानगरास गेलो. तेथून कर्नाटकांत गेलो. चंजीस आलो. चंदी घेतली व येलूर तर्फेचा मुलख घेतला व सेरखानास झगडीयांत मोडून गर्देस मेलविलें. शेरखानाचे हातीं मुलख होता तेवढाही घेतला. त्यावरी मजल दरमजल कावेरीतीरास गेलों. हे भले लोक तुह्मांजवळी जाऊन बहुता रीती बोलिले कीं गृहकलह करू नये आपला अर्धा वाटा मागतात तो द्यावा यैसें बोलिलें. परंतु कपट-बुद्धि तुह्मीं यैसी मनीं धरिली कीं, या समयांत आह्मी बहुत थोर राजे जालों आहों. आह्मासी आपण खासा भेटीस येऊनु हलभल नरमी बहुत दाखवावी आणि आमचा वांटा बुडवावा. तेरा वर्षे सारें राज्य आपणच खादलें. पुढेंहि आपणच सारें राज्य खावे यैसी बुधी मनी धरून वाटीयांच्या निवाडीयाचा तह न करितां आपण खासाच भेटीस आलेस. आमची व तुमची भेट जाली. त्याउपरि आम्ही बहुतां रीती तुम्हासी बोलिलों कीं आमचा वांटा द्या. परंतु तुम्ही वाटा द्यावा हा विचार मनी धराच ना. मग जरूर जालें कीं तुम्ही धाकोटे भाऊ आपण होऊन आमचे भेटीस आलेस आणि तुम्हाला धरावे आणि वाटा मागावा हे गोष्टी थोरपणाच इजतीमध्यें ल्याख नव्हे. या निमित्य तुम्हांला चंजाउरास जावयाचा निरोप दिधला. तुम्हीं चंजाउरास गेलेसी याउपरीं गृहकलह वाढवूं नये. वाढविल्यानें पहिले युगीं पांडव कौरव बहुत बहुत कस्ठी जाले ते सारी भारताची कथा मनांत आणून गृहकलह वाढविल्यांत उभयपक्षों कस्टी होयेजे. सांगोन पाठविले कीं, तुम्ही व आम्ही वाटे करून घेऊन परस्परें समाधानें राहोन. परंतु तुम्हीं दुर्योधनासारिखा दुष्ट बुद्धि करून संधि न कराचयुद्ध करावे यैसेच मनीं धरिले. यैसीयास आम्हास रायेगड प्रांते बहुत कांही कार्य होते या निमित्य तोरगल प्रांतास आलो. तेथे यैसी खबर आइकिली कीं, तुम्हीं तुरक लोकांच्या बुद्धीस लागोन आमच्या लोकांसीं झगडा करावा, यैसे मनीं धरून आपली सारी जमेत येकवट करून आमच्या लोकांवरी पाठवून दिल्हेत. तुमचे लोक चालोन

आल्यावरी तुमच्या आमच्या लोकांत थोर झगडा जाला. तुमचें लोक पराजय पावले. किती येक लोक पलोन दाणादाण होऊन गेले. यैसा समाचार आईकिला. हे ऐकोन बहुत नवल यैसे वाटलें कीं कैलासवासी महाराज त्यांचे तुम्ही पुत्र बहुत थोर लोक यैसे असोन कांहीं विचार करीत नाहीं. यैसे असतां कस्टी व्हाल याच नवल काये.

दुसरा विचार करावा कीं, श्रीशिवाची व श्रीची कृपा त्यावरी पूर्ण जाली आहे. दुस्ट तुरूकाला ते मारितात. आपल्या सैन्यांतही तुरूक लोकच असतां जये कैसा होतो आणि तुरूक लोक कैसे वाचो पाहतात हा विचार करावा होता आणि युद्धाचा प्रसंग पडावा नव्हता. परंतु दुर्योधनासारखी बुधी धरून युद्ध केलें आणि लोक मारविले. जें जालें तें जालें. पुढें तऱ्ही तुम्ही हट न करणें. तेरा वर्षे तुम्ही सारे राज्य खादले ते खादले. या उपरि कितेक आमचे आम्ही घेतले असे. जे जागे तुमचे हातीं उरले आहेती ते आमचे लोकांचे हातीं देणें आणि नकद पैके व जडाव व हाती व घोडे यांचा अरधा वांटा देणें. यैसा विचार करून आम्हांसी संधि करणें. तुम्ही यैसा संधि निर्मलपणें केलिया आम्ही आपणांपासून तुम्हांला तुंगभद्रे अलाड पनाले प्रांतें तीनी लक्ष होनांची दौलत देऊन. अथवा आह्मां जवळील दौलत तुम्हांला मानेना तरी कुतुबशाहास अर्ज करून त्यापासून तुह्माला तीन लक्षांची दौलत देवऊनु. यैसे दोन्ही विचार तुम्हांला लिहिले आहेत. या दोन्हीमधील येक मनी धरून मान्य करणें. हटाचे हातीं न देणें. आपल्यांत आपण गृहकलह करावा आणि कस्टी व्हावे याचे कांहीं प्रयोजन नाहीं. याउपरि तऱ्ही आमचा आपला संधि व्हावा यैसी बुधी मनी धरून वांटीयाचा वेव्हार निर्गमून टाकणें आणि सुखें असणें. गृहकलह बरा नव्हे. आम्ही तरी वडीलपणें आजीवरी तुम्हांला सांगितले, आतांही सांगतों. ऐकाल तरी बरें. तुम्हीच सुख पावाल. नाईकाल तर तुम्हीच कस्टी व्हाल.

मुमुक्षु, व. २५-१०, अंक ११ वा, नवंबर १९३०, पृ. ११–२३.

१६७९ इ. स. ] ( – १४७ – ) [

श्रीयासह चिरंजीव अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री महाराज व्यंकोजी राजे यांशीं –

प्रति राजश्री शिवाजी राजे आशिर्वाद. येथील कुशल जाणून स्वकुशल लेखन करणें. उपरी तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. तुमचे कुशळ कळोन संतोष वाटला. असेंच क्षणाक्षणा आपलें कुशळ लेखन करून पाठवीत जाणें. विशेष ये प्रांतींचे वर्तमान दिलेलखान विजापूरची पादशाही कमकुरजबून देखोन जोरावारी धरून विजापूर घ्यावें या मतलबें विजापूरावर चाली केली. भिमानदी उतरून शहरानजीक येऊन भिडला. हे वर्तमान खान अलीशान मसऊदखान यांणीं आह्मास लिहिलें कीं, गनीमें जोरावारी बहुत धरिली आहे, येऊन मदत केली पाहिजे. त्यावरून आम्ही तेच क्षणीं स्वार

होऊन मजली दर मजली पनाळीयास आलों. सारी कुलजमेती जमा करून खासा लष्करानिशीं विजापुरा सन्निध गेलों. विचारें पाहतां गनीम कट्टा, त्याहीमध्यें पठाण जाती हट्टी. यासीं हुन्नरेच करून खजिल होऊन नामोहारम होय तो हुन्नर करावा म्हणून ऐशी तजवीज केली कीं, मुलखांत ऐसा बोढा लावावा. त्यावरून दिलेलखानास ती गांवाचे अंतरें सोडून भिमा नदी उतरून तहद जाहलनापूर पावेतों मुलूख तलफतामाज करीत चाललों. जालनापुरास जाऊन चार दिवस मुक्काम करून पेठ मारिली. बहुत मालमत्ता लागला. जालनापुरास म्हणजे अवरंगाबादेहून चार गांवें. ते जागा शाहाजादा असतां त्याचा हिसाब न धरितां पेठ लुटली. सोनें, रुपें, हत्ती, घोडे या खेरीज मता बहुत सांपडला. तो घेऊन तेथून स्वार पटागड आहे ते तर्फास येतां मध्यें रणमस्तखान व असतखान व जाबीतखान असेच आणीक पांचसात उमराउ आठदहा हजार स्वारांनिशीं आले. त्यांस जाहाबाजीच्या हुन्नरें जैसे तंबी करूंन ये तैसे तंबी करून घोडे व हती पाडाव करून पटीयास आलों. मागती लष्कर मुल्कांत धुंदी करावयास पाठविलें, व राजश्री मोरोपंत प्रधान यांस बागलाण व खानदेश प्रांतीं सत्तावीस किल्ले मोंगलांचे आहेत ते व मुलूख कबज करावयास पाठविले आणि आह्मी पटीयास मुक्काम केला. तों खान अल्लीशानाची किताबती आली कीं तुह्मी कित्येक गनीमांचे मुल्खांत स्वारी करून मुलूख खराब केला. बोढा लाविला. परंतु या जागाहून गनीम उखळत नाहीं. बहुतच बळ धरून कोटानजीक भिडला आहे. ये समयीं येऊन मदत करून पादशाही राखिली पाहिजे. त्यावरून मागती स्वार होऊन मजली दर मजली पनाळियास आलों. कित्येक द्रव्यानें व सेनेनें पहिलें साह्य केलें, व मागतीही द्रव्य मबलगा पाविले व सेना गनीमानें मुलकांत पैसली होती ते बोलावून आणून दिलेलखानावरी पाठकिली. त्याणीं जाऊन कांहीं कबाड मारून कुलसामानबांबें धरून आरोखून धरिला. त्याचे मदतीस औरंगाबादेहून रणमस्तखान व बाजे उमराउ अल्लीखान घेऊन सात आठ हजार स्वारांनिशीं येत होते. त्यांसही मारीत गर्देस मिळवीत पिटीत औरंगाबाद पावेतों नेलें. कित्येक शहरें लुटीत देश खराब करीत परतोन येऊन गनीमास धेरून बैसले. हें वर्तमान व राजश्री मोरोपंत त्या प्रांतीं पाठविले होते त्याणीं आहीवंत किल्ला घेतला. आहीवंत म्हणजे जैसा कांहीं पनाळा त्याचे बरोबरी समतुल्य आहे. दुसरा नहवागड बागलाणच्या म्यान मुलकांत आहे. तो बहुत कठीण. तोही घेतला. हे दोन्ही किल्ले नामोशाचे पुरातन जागे कबज केले. त्या किल्ल्यावरही बहुत मालमत्ता सांपडला व त्यांजबरोबर जमेत होती, ते मुलकांत पाठवून धामधूम केली. कित्येक मुलूक कबज केला हें वर्तमान व पहिलें आह्मी स्वारी केली, जालनापूर मारिलें, रणमस्तखान नामोहरम केला हें वर्तमान वरचेवर पादशाहास बालोबखल झाली. पादशाहाही बहुन खजील होऊन आहादीवर आहादी दिलेलखानास आले. ये जातीनें मुलूक खराब करून गड, कोट व देश कबज करून बोढा लाविला. आणि कमावजा धरून वरच्यावरी कांहीं कबाड मारून गनीम जेर केला. दिलेलखानासही ऐसें कळों आलें कीं, येथें राहिल्यानें आपली शाही कुल

बुडवतील. हें पुर्तें जाणून विजापूर सोडून दिवसास कोस दोन कोस मजली करून चालला. ऐसा गनीम जरखुर करून खट्टा करून उखळविला, व खानअल्लीशानेंही बहुतच शर्थ केली. जैसा कोट राखावयाची शर्त तैसा करून कोट राखिला. आह्मी या प्रकारें विजापुरींचे सहाय्य द्रव्यानें व सेनें करून ज्या उपायें गनीम उखळिये त्या उपायें उखळून विजापुरीचें अरिष्ट दूर करून विजापूर रक्षिलें. ते प्रसंगीं खानअलीशानाचा व आमचा सुलहा झाला. त्या करारबादामध्ये होसकोट व बेंगरूळ व आरणी व तंजाऊर आदी करून तुम्ही याची निसबती आम्ही आपणाशींच लावून घेतली. पेशकसी तोफा तुम्ही निराळा घ्यावा सतत निसबती आम्ही तुम्हासी लागावी ऐसें केले नाहीं. अवघे आम्हीच मान्य केलें. तोफाही आम्हीच तुम्हां देखील घ्यावा. ऐसा तहत प्रसगीं करून करारबाद करून सल्ला केला. या उपरी दिलेलखान आदवानी काखळ प्रांताकडे गेला होता. आमचा ही सेना पाठीवरी गेली व आम्ही विजापुरास जातां. काखळ प्रांताकडे राजश्री जर्नादन पंत ठेविले. त्याणीं तिकडे कित्येक पुंडपाळेगारांनीं फिसाहती केली होती त्यांस मारून काढिले व हुसेनखानाचा भाऊ कासीमखान दोन तीन हजार स्वारांनिशी आला होता, त्यास व त्याचें कबीला व हुसेनखानाचे दोघे लेक असे दस्त केलें व हती पांच व घोडे पांचशें पाडाव केले. या खेरीज पुंड पाळेगाराचा मुलुक व गडकोट कबज करून ठाणीं बैसविलीं. फते केली. याउपर दिलेलखान, सरजाखान व हुसेनखान येतो हे कळोन हेही याच साहा हजार स्वारांनिशीं गनीमावर गेले. मध्ये गनीम घालून जिकडे गनीम जाय तिकडें जाऊन जागां जागां गनीमास गोष्मार देऊन तिकडूनही मारून काढिला. सांप्रत भिमानदी उतरून पेडगांवास आपले मुलुकांत गेला. गनीमास ऐसे केले जे मागती विजापूरची वाट न धरावी. ऐसा खट्टा केला व राजश्री संभाजी राजे मोंगलाईत गेले होते, त्यांस आणावयाचा उपाय बहुत प्रकारें केला आणि त्यांसही कळो आले कीं, ये पादशाहींत अगर विजापूरचे अगर भागानगरचें पादशाहींत आपलें मनोगतानरुप चालणार नाहीं. ऐसें जाणोन त्याणीं आमचे लिहिण्यावरून स्वार होऊन आले. त्यांची आमची भेट झाली. घरोब्याचे रीतीने जैसे समाधान करूं ये तैसें केलें. हे सविस्तर वर्तमान तुम्हास कळावे म्हणून लिहिले असे. कळले असावें. मोर्तब.

महाराष्ट्र कोकिळ, पुस्तक ४, अं. ३, मार्च १८९५. पृ. १-४.

1679-80 A. D. ] (-१४८-) [ 1679-1680 A. D.

From the Journal de Boureau-Deslandes, Archives Nationales, Paris.

( 1679 A. D. ) The Raja Shivaji is a noble who revolted 25 to 30 years ago from the domination of the king of Bijapur and who has, since that day, made himself more dreaded than

one can say by those of the kingdoms of the great Mughal, the king of Bijapur, and the king of Golkonda. He has since his revolt, almost always made head against the former two, from whom he has gained great advantages and much territory, of which he is actually in possession.

His Kigndom— one may style it so, Shivaji having been some years ago crowned king—is at present of very great extent. He is a Hindu, and was declared 6 or 7 years ago one of the caste or race of Brahmans ( a mistake for 'twice-born' द्विज 'Kshatriyas'), which is the highest among the more than 80 castes of Hindus, that are in India. He is 55 or 60 years of age, a man of great judgment, very brave in his person, and very vigilant whose daily exercise is war. I believe that since the time, when he (first) revolted, he has never left his arms, very active, having always some design in his head and very fortunate in all his enterprises, he has got out of a multitude of dangers not so much by his resolution as by his good judgment, or he would have perished a thousand times.

He it is who twice pillaged the city of Surat, the most famous port in all India, from which he carried off immense riches. It is said that on that occasion he took more than 30 millions of Rupees, which is nearly 45 million livres of our money. He is so greatly feared that I have often seen the city of Surat in great agitation and all the people have deserted it at the least news that they had of the approach of his troops, although it is a city that is at present entirely enclosed by walls, which are quite strong for the country

The (French) Company has a house (comptoir) at Rajapur, where at present It has not much of trade, (not) so much because of the war which we had had for so long a time with the Dutch, who have hindered us from doing any thing as because all the country of the said Shivaji is full of troops who hinder liberty of trade. But if peace is made between Shivaji and the king Bijapur, as is rumoured at Court, the Rajapur French factory can do trade of more than seven or eight hundred thousand livres every year.

Rajapur is, however, at present very miserable and very badly fortified, because when Shivaji took it he ruined it entirely. As he took here large sums of money, he is accustomed to call at the 'City of Gold'. This prince is a great friend of our Compiny. He entertains correspondence by letter with the Directors-

general who are in Surat, and his principal ministers do the same. Hence it is that we have great liberty at Rajapur - much more than at Surat,- being, so to say, ( our own ) masters. He loves our nation above all others of Europe. The English had formerly a very large factory here, but they were there massacred by the command of Shivaji some days after he had made himself master of the city of Rajapur, he having learnt that the English had supplied grenades to the besieged. १

However, four or five years ago the English were re-established there. At present they are at war with Shivaji concerning a fort which he wants to build on a small island ( Khanderi ) lying at the entrance to the island of Bombay It is 30 or 40 leagues to the north of Rajapur. The English wish to hinder the construction of that fortress. Since then Shivaji has given orders not to allow the Englishmen in Rajapur, who number ten or twelve, to go out of it. The day after our arrival ( at Rajapur ) the chief of the English ( factory ) did me the honour to come to see me, in order to find out if we could not help them in getting out of the danger in which they were, which was assuredly great, especially if they challenged the naval force of Shivaji. I replied to him that being friends as we were of Shivaji, we could not do it openly; but if they found means to seize some sloop, even ours, provided that it appeared to have been done by force, and if they came on board our ship in the anchorage, we should receive them with great pleasure. He told me that he would do it; but in the meantime he received news that Shivaji had sent men to Bombay to treat for an accommodation, which would prevent the execution of his design. One cannot believe that Shivaji can succeed in constructing that fort, if the English persist in the resolution which they seem to have formed and which is required by their interests, ( namely ) to prevent it.

13th January, 1680.- We have not been able to sail yet. The Prince Regent ( Shambhuji ) has sent us some sailors on board to do us civility, saying that he did not know before that day that our ships belonged to the ( French ) Company, because as he had seen no one disembarking them he had concluded that they belonged to private persons; and complaining that we had not notified the fact to him; and finally testifying to us the esteem which he had for the Company.

१. The English were only imprisoned and not killed for having supplied grenades to the Bijapuris at the siege of Panhala.

I answered that, as we had come to that anchorage without any disign of doing trade, we had not for that reason set foot on land, but that in future we should come there to trade and should on that occasion renew the friendship which has always subsisted between him and our Company.

भा. इ. सं. त्रै., व. ३, अं. २-४, पृ. १०४-१०७.

१६ जुलै १६८० ] (-१४९-) [ श्रावण शुद्ध १ शुक्रवार, रौद्र संवत्सर

रौद्री नाम सवस्छाह श्रवण सुध १ सुक्रवार वितीपात परवकालनिमित्यर्थ वेदमूर्ती रुद्रभट गिजरेयासी बिडो भास्कर दानपत्र तुम्हास खरिदी हासी होनु ४॥ साडेच्यारी देउन तुम्हास दानपत्र दिल्हे असे. आमचे समंधीय कोण्ही तुम्हासी प्रसंग करण्यास संमंध नाही. पुत्रपौत्री कृष्णाअर्पण दिल्हे असे. हे विनती.

भा. इ. सं. मं. तृतीय संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क. १२, पृ. १५.

६ नवंबर १६८१ ] (-१५०-) [ कार्तिक शुद्ध ६ रविवार, रा. श. ८

श्री

[ शिक्का ]

स्वास्ति श्री राज्याभिषेक शके ८ दुर्मतिनाम संवछरे कार्तिक सुध शस्टी रविवासेरे क्षेत्रीय कुलावतंश सिंहासनाधीस्वर श्री राजा शंभु छत्रपती स्वामी यानी राजश्री कासी रंगनाथ देशाधिकारी व लेखक प्रांत जाऊली यासी आज्ञा केली ऐसीजे. वेदमूर्ती रामभट बिन गोपालभट अग्नहोत्री माभलेस्वरकर यानी हुजूर येऊन विदित [ शिक्का ][1] केले की अपले पिते गोपालभट बिन श्रीधरभट याजपासून महाराज कैलासवासी यानी मंत्र उपदेश घेऊन आपल्या अभ्योदयाकारणें सूर्येप्रीत्यर्थ अनुस्टान सांगितले. त्यास वर्षासन दानपत्र मोईन करून आमचे पिते यासि दिल्ही. तेणेप्रमाणे चालत आले आहे. सांप्रत महाराजे चालविले पाहिजे म्हणऊन विदित केले. तेणेप्रमाणे दानपत्र दाखविले व सुभाचे पत्र दाखविले. त्यास असल पत्रामधे लिहिले कीं स्वामी भले थोर अनुस्टाते सूर्येउपासनी पद्महस्ती ऐसें जाणोन अम्ही स्वामीपासून मंत्रउपदेश संपादिला. त्यावरून आपल्या अभ्योदयार्थ सूर्येप्रीत्यर्थ अनुस्टान सांगितलें त्यास वर्षासन प्रतिवरूसी द्यावयाची मोईन केली असे. बीा ता

वर्षासन

होन पातशाही शंभर गवा नवसेर बारूले

१. शिक्का- 'श्री शंभुभजनोत्कंठ: मोरेश्वरसुत नीलकंठ.'

| | |
|---|---|
| वजन टांा | मापे खंडी |
| ·।४ तूप | ४ तांदूळ |
| ·।४ तेल | ४ नागली |
| ·।।।३ | ८ |

सूर्यप्रीत्यर्थ अनुस्ठान प्रतिवरूसी यास सामोग्री व पूजा.

| | |
|---|---|
| अरक्त वस्त्रे. | वजन टांा |
| अनुस्ठान समई. | चंदन |
| नेसावयास व असन | ८८५ शुभ्र चंदन |
| १ पितांबर | ८८५ अरक्त चंदन |
| १ शाल | ८।· |
| १ असन | |
| ३ | |

येाा होन पाा येकसे व गला नवसेर मापे खंडी आठ व वजन सवा अठरा मण व अरक्त वस्त्रे दोनी व पितांबर येक व शाल येक व असन येक येणेप्रमाणे दानपत्र करोन दिल्हे. स्वामीनी अमचे अभ्योदयार्थ सूर्येप्रीत्यर्थ अनुस्ठान प्रतिवरूसी करावे व मंत्रउपदेशही स्वामीचे वौषपरंपरेने अमचे वौषपरंपरेस करावा. आपण संकल्पपूर्वक वर्षासन दानपत्र प्रतीवरूसी करून दिल्हे असे. आपले वौषपरंपरेने स्वामीचे वौषपरंपरेस उत्तरोत्तर चालवावे. यासि अन्यथा करून तर श्री माहादेव साक्ष. स्वामीनी निरंतर देवापासी आमचे कल्याण इछावे. ऐसे दानपत्र महाराज अबासाहेब [ शिवाजी महाराज ] कैलासवासी स्वामीनी भट गोसावी यास करून दिल्हे ते मनास आणून, व सुभाचें पत्र मनास आणून, त्यावरून राजश्री अबासाहेबाचे संकल्पित आहे ते चालवावे हे अम्हास अगत्य जाणोन, हाली वेदमूर्ति रामभट बिन गोपालभट यास वर्षासन सदरहू प्राा सनद करून दिल्ही असे. पूर्वी नख्त होन पाा १०० येकसे हुजूर पोतापैकीं पावत होते व वरकड जिनस सुभां पावत होता त्यास हुजूर ऐवज न पावे म्हणवून नख्त व जिनस सदरहूप्रमाणे सुभे मजकुरावरी देविले असे तेणेप्रमाणे भट गोसावी यास साल दरसाल पावीत जाणे. ताज्या पत्राचा उजूर न कर्णे. तालीक लेहून घेऊन असल पत्र भोगवटियास परतोन भट गोसावी यापासी देणें....

...( शिका—‘ मर्यादेयं विराजते ’ ].

भा. इ. सं. मं. षाण्मासिक अहवाल, शके १८३४, भाग २ रा, स्वी. ग्रं. क्र. ४, पृ. ३२८–३१; विविधज्ञानविस्तार, पु. ४२, अं. ८, आगष्ट १९११, पृ. ३६०–३६१.

१६८१-१६८९ ] (-१५१-)

संभाजी महाराजांचा एक शिक्का.

श्रीमच्छिवभक्त्युद्रेकादधिगतधरणीसमस्तसा-
म्राज्य-॥ शंभोः छत्रपतेर्मुद्रा मोदप्रदा जयति ॥ १ ॥

भा. इ. सं. मं. वार्षिक अहवाल, शके १८३२, पृ. ७१.

१६८३ इ. स. ] (-१५२-) [ १६८३ इ. स.

कोंद दे आल्व्होर, गोवा ते पोर्तुगालचा राजा, १६८३ इ. स.

" संभाजीचें सैन्य गोवा प्रांताच्या कित्येक भागांत असतांनाच एका प्रचंड सैन्यासह शहा अलम घाटाखालीं उतरून आमच्या शेजारीं डिचोलीस येऊन तळ देऊन राहिला. आणि तेथून त्यानें खलिता लिहून वकील पाठविला व कळविलें कीं, संभाजीच्या राज्याचा नायनाट करून त्याचा मुलूख आपल्या राज्यास जोडण्यासाठीं त्याला त्याच्या बापानें सैन्यासह पाठविला असून आणखीहि सैन्य निरनिराळ्या रस्त्यांतून येत आहे. आणि या कामीं पोर्तुगीज लोकांचें साहाय्य मागण्याविषयीं सांगितलें आहे. तेव्हां सुरतेहून, सामुग्री भरून येणाऱ्या गलबतांस पोर्तुगेज मुलखांतील नदी नाल्यांतून संचार करण्यास त्यास इस्तादानें परवानगी द्यावी व इतर मालमत्ता पुरवून साहाय्य करावें. या मागणीचा कौन्सिल भरवून विचार केल्यावर असें ठरविलें कीं, बरसातीच्या दिवसांत जर मोंगल सैन्य येथें राहिलें नाहीं तर संभाजीकडून राज्याच्या सुरक्षिततेस धोका येईल. तेव्हां धान्यसामुग्री पुरवून साह्य करावयाचें, परंतु, गलबतांना सर्व नद्यांत फिरण्यास परवानगी न देतां कायसूंव येथील खाडींतून ती जाण्यास मोकळीक द्यावयाची. याप्रमाणें मतलब करून व ' कायसूव ' येथील किल्ल्यावर असलेल्या तोफा वगैरे काढून तो मोकळा करून मोअझीम यास तसें कळविलें. तेव्हां तो अति गर्विष्ठ, वैभवशाली आणि मोठा सत्ताधीश राजपुत्र असतांहि फार आभारी होऊन त्यानें आम्हास नजराणा पाठविला. आम्हींहि त्याकडे पुढील कारस्थान ठरविण्यासाठीं वकील पाठविलेला आहे. सुरतेहून आलेल्या गलबतांतून गेल्या सालीं गोव्यास असलेला बादशाही वकील यंदांहि आला आहे व त्याकडे खुद्द बादशाहानें मुलाकडून आलेलाच निरोप सांगून पाठविला आहे. "

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १-४, पृ. ५७.

28 January 1684 ] (–१५३–) [ 28 January 1684

Letter from Richard Keigwin to King Charles II.
Dated 28th January, 1684. (O. C. 5071).

At the change of the Government (i. e. Keigwin's usurpation of the Government of Bombay) an ambassador of Shambhuji was prisoner to one of the Mughal's generals and (it) was intended to have cut off his head. But hearing (that) Bombay was proclaimed your Majesty's, he suspended the execution and sent the prisoner to me, whom I safely sent to Shambhuji.

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १–४, पृ. ३०.

११ जुलै १६८४ ] (–१५४–) [ श्रावण शुद्ध ८, गुरुवार
रा. श. ११

श्री शंकर

श्री सकलगुणमंडित अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री देवाजी विठल [शिक्का][1] देशाधिकारी व लेखक प्रांत राजापूर वर्तमान व भावी गोसावीयासी

पोष्य मोरेस्वर पंडितराई नमस्कार राज्याभिसेक सक ११ रक्ताक्षीनामसंवछरे श्रावण शुध अष्टमी ब्रस्पतीवार वेदमूर्ति हरिभट विश्वनाथभट पटवर्धन वस्ती मौजे पावस ता मा ब्राह्मण योग्य देखोन धर्मादाय देविले तांदूल कैली कौटी मापें मण ८२॥ अडीच. जोवरी वेदमूर्ति क्षेम पावतील तोवरी प्रतिवर्षी परामर्ष घेउनु प्रविष्ट करीत जाणे. प्रतिवर्शी नूतन पत्राचा आक्षेप न करणें. प्रती लिहून घेउनु मुख्य पत्र भट गोसावी याजवली देणे. रा छ ७ माहे शाबान सुा खमस समानीन. अलफ पा हुजूर हे विज्ञाप्ति [शिक्का—'सुभं भवतु']
बार सूद छ ५ जिल्हेजु सन तिसा समानीन (२१ सप्तेंबर १६८८) बार सूद
पो छ १९ जिलकाद : साल मजकूर (५ सप्तेंबर १६८८ किंवा १९ आक्टोबर १६८४.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. १७७–१७८.

15 September 1684 ] (–१५५–) [ 15 September 1684

Richard Keigwin &c. at Bombay to King Charles II.
Dated 15 September, 1684 (O. C. 5196,).

"We sent to Shambhuji, Capt. Henry Gary and Lt. Wilkins who have confirmed a peace with him and have his order for

१. शिक्का—'श्री : चिंतामणि च : रणशरण'.

the payment of 12,000 pagodas, which was an old debt of the Company's that they (neither) could nor would recover; and likewise his order to settle factories and build houses and traffic in any part of his dominions."

मा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १-४, पृ. ३०-३१

*1684 A. D.* ] (- १५६ -)

An order to Gopal Parsuram Subahdar and Mazumadar of Kolhaur Jurisdiction.

By the Governor of Bombay were sent Henry Gary and Thomas Wilkins for ambassadors and Rama Sinay interpreter, who being treated with much courtesy, manifested to me that they having goods in several places of Ghat which were violently taken away by Gopalo assistant in Ghat, and entered in the treasury to the value of 2590 pagodas Pateheris as appears by the list underwritten, desiring satisfaction for the same. Goods taken from Kolhapur amounts to 63 pagodas, viz.

| | |
|---|---|
| 36 pieces Europe cloth ... | 40 pgs. |
| 5 Covids scarlet ... ... | 20 |
| 6 Covids serge, 5 taken by the subahdar and 4 by Bimaran | 3 ,, |
| | 63 ,, |

When the army went to Raibagh there was taken away goods to the value of 217 pags, viz.,

| | |
|---|---|
| 3 Corge of Pattagens.. ... | 8 pgs. |
| Ready money from the broker | 117 ,, |
| 6 Baftas ... ... ... | 2 ,, |
| Ready money from Mr. Robinson | 30 ,, |
| | 217 ,, (sic.) |

| | |
|---|---|
| From Car calesty in money .. .. | 14 Pgs |
| ,, Kolhapur in money .. .. | 81 ,, |
| ,, Seganna taken by Dam Daracan .. | 337 ,, |
| | 432 ,, |

Goods taken in several places from the brokers amounts to 94½, viz.,

| | |
|---|---|
| 2 Horses .. .. .. | 25 ,, |
| 2 Rings .. .. .. | 16 ,, |
| 2 Pamareens .. .. .. | 13 ,, |
| 3 Covids scarlet 5 sarees and 5 Kamarbands | 12½ ,, |

| | |
|---|---|
| 1 Old Carpet .. .. .. | 1½ Pgs. |
| 3 Pieces of Bercaly and 5 Balelios | 6 " |
| 1 bag of Tobacco .. .. | 12 " |
| Copper Pots .. .. .. | 5 " |
| Garavances for the horses .. | 3½ " |
| | 94½ " |

Goods taken from Rajapur factory that was in Autany (=Athni), viz.

| | |
|---|---|
| 24 Pieces Europe cloth qt. 650 Covids at. pag ⅛. | 731 |
| 8½ Pieces of Serge qt. 300 Covids at ¾ pg. Covid | 225 |
| 19 Pieces Serge ... ... ... | 233 |
| 240 Swords at 1¾ pag. each ... ... | 420 |
| 1 Horse ... ... ... ... | 25 |
| 2 Kamarbands.. ... ... ... | 6 |
| 3 Rings... ... ... ... ... | 20 |
| 1 Sword and Belt ... ... ... | 30 |
| Ready money ... ... ... | 3 |
| 1 Cavar ... ... ... ... | 2 |
| 1 Small Cover and Tindal ... ... | 12 |
| In Gold and Silver ... ... | 50 |
| In Several Clotns ... ... ... | 20 |

Wherefore I having promised to restore what is entered in the treasurer's books do desire you to see in what year and after what manner these goods and moneys are registered, and that you find you may restore to the English (ready money excepted) you shall also send me a list of what goods disposed of declaring the day month year, as also what goods are remaining, and the just value of what ready money. That I may know how to decide this matter send me also a list of what goods you shall deliver.

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १-४, पृ. ३९-४०

*1684 A. D.* ] (-१५७-) [ग. श. १०

Copy of the Agreement and Contract sent by Shambhuji Rajah to the Worshipful Richard Keigwin, Governor. 1684,

In the 10th year of the reign (Rajyabhishek Shaka) of Shambhuji Rajah Chhatrapati, Captain Henry Gary and Thomas Wilkins

were sent by the Governor of Bombay for ambassadors, and Rama Sinay for Interpreter, by whom it was proposed to have their factories in th Karnatak places. The which I taking into consideration, made the following articles, viz.

1. That the English may place their factories where they please, and at present they shall settle in Tirangapate (=Tevenapatam), Gudaner (=Cuddalore), and Cannamer (=Conimer), and then where else they will, for which they shall have ground to build a house 60 covids long and 15 covids broad, and 2 high, and the thickness of the wall ½ covid and no more, and if they have occasion for more, they may build another house of the same dimensions in another place, and if that be not sufficient they may build shops as are built in the buzar by other merchants.

2. That the merchants dyers or weavers that shall have goods belonging to the English, the subahdar-havildar shall not molest them but shall give them all the assistance he can.

3. That the English may have coolies or other people to watch their goods in the importation or exportation of the same, so many as the quantity of goods shall require, the subahdar or other officers shall not hinder them, but if the English will keep more than is necessary it shall not be granted.

4. That if any robbery be made upon the English or their merchants that come into my dominions, trading in merchandize, the thief that shall be taken shall be carried before the subahdar or havildar, who shall cause restitution to be made, doing Justice uprightly.

5. That the goods that the English shall import shall pay 2½ p. cent custom, and when transported shall pay no custom nor have any molestation for the same.

6. That if any merchant or inhabitant of my dominions in buying any goods or merchandize from the English, shall become indebted to them or their merchants, the debtor shall be carried before the subahdar, or other officer who shall order the said debt to be paid if justly due, having no respect of persons.

7. That the English shall buy none of my people belonging to my dominions, to make them either slaves or Christians.

8. That it being proposed that no vessel, grab or boat that by storm are forced on shore in any of my ports and wrecked should be entered into my treasury books, requesting me to forrbid the same, the English shall have the same liberty as other Christ ans.

9. That it being proposed by the English that if any subahdar or havildar in my dominions will have any goods from them, they may refuse to diliver the same, unless he shall produce my letter, or from any of my principal officers, they may deliver them goods and not otherwise, unless having correspondence with them they shall deliver them merchandize freely on their own account.

10. That it was proposed by the English not to take toll (called Patty) from their servants, I will observe the same in this as with other Christians.

11. That it being proposed by the English that if I give more liberty to other Christians than here specified, they may have the same. The which I will do observing with them as with other Christians.

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १-४, पृ. ३७-३९

*1684 A. D.* ] (-१५८-) [रा. श. १०.

Agreements &c. with Shambhuji Rajah.

"In the 10th (i. e राज्याभिषेक शक) year of the reign of Shambhuji Rajah Chhatrapaty, by the Governor of Bombay were sent Cap. Henry Gary and Thomas Wilkins for ambassadors and Rama Sinay for Interpreter, and by them several matters communicated to me, which I taking in consideration did grant which is now declared as followeth.

1. That what difference or molestation the English has received before from me shall not be called into question nor to be taken ill from them, and I shall do the same. It being past and now the peace being concluded, which accordingly shall be conserved, and if any small matter happen we shall not take notice of it, and same are agreed.

2. That the English or their Merchants may come into my dominions and ports and there merchandize and may have their factories and what goods they shall import and export, shall pay usual customs, and the officers that assist in the custom house shall not molest them, and the same liberty my people are to have in the English dominions and so we agree.

3. That if any robbery be committed on the English or their Merchants that comes into my dominions to trade or merchandize the thief that shall be taken shall be carried before the Justice who shall cause restitution of the goods to be made doing justice uprightly and the same my people are to have in the English dominions and so we agree.

4. That what vessels, grabs or boats belonging to the English which shall be sent to any ports to fetch merchandize, if any of them in going out or returning back by reason of winds or storms, shall put into any of my ports, they shall have free liberty to come in, and to put to sea again, wind and weather presenting, without hinderance or molestation, either by demands of custom or otherwise and if it shall happen that by Tempest or storm any vessel shall be cast away in my dominions and the havildar or subahdars do seize upon them on my account as wrecks, it was proposed to me that it is customary if any vessel be cast away in any port she is to have all necessary assistance for the securing of her goods, and only to pay custom for which goods she shall import, giving them no molestation. I say therefore, that I shall observe the same rule in this as my father did, or according to the agreement that is between me and other Christians and so we both agree.

5. That the peace being made between me and the English, if any person shall raise any matter of difference, the same shall be examined, and the peace shall not be broken thereby, but on the contrary shall be conserved as it is, and so we agree.

6. That having continual war between me and the Mughal by which reason my people enter in and destroy his country, the English having factories in some parts thereof, if any of the said factories be plundered or goods taken away by the people, the Subahdar or Havildar of the army shall restore them their goods again, and if any of their people or brokers shall be imprisoned they shall be set at liberty without any molestation.

7. That whereas several vessels, groabs and boats belonging to me, as also to the Mughal, using the sea, if any of the Mughal's vessels be laden (= taken) by mine and shall find any goods therein belonging to the English with their marks, examining and finding the truth of it, they shall be restored, and the same the English shall do, if any of my people's goods are taken in any boats by them, and so we agree.

8. That what goods the English shall import or keep in Rajapore or in any other ports shall pay custom after the rate of 2½ p. cent, and when transported pay no custom nor have any molestation.

9. That it being proposed to me that the English shall pay custom as in Idalsha's time for what goods shall be transported from Rajapore to Balaghat, to which I say that I shall take no more than what is Customary.

10. That the English and other merchants may buy in my dominions and ports any goods from the inhabitants or merchants, at the just price of which the subahdar or other officers shall take no more then ( sic ) the due customs without any malice.

11. There is a war between the Portuguese and Dutch and my people shall neither help the English nor them by any means, and the Peace between me and the English shall be performed without any difference.

12. That in buying or selling goods of merchandize from the English by the merchants or inhabitants of my dominions if any of the inhabitants become debtors to the English, the person shall be carried before the subahdar, or any officer who is to do justice, and order the payment of the said debt, having no respect to any person, and the English shall do he same to my people.

13, That if any of the English or their officers for any fault shall fly into my dominions, he being sent for my officer that shall assist in that place shall deliver him without respect and the same t he English shall do with me.

14. That if any of my people violently shall enter tnto the English factory and make any quarrels, the subahdar examining the same shall punish him according to his fault, and if he find the fault in the Englishman, he shall keep the officer in irons, sending a letter to Bombay, and according to the answer he shall punish him or discharge him.

15. That the Island of Bombay wanting in wood I grant liberty to buy the same freely without custom and it shall be ob erved, as was agreed to in the time past, and it then custom was taken shall now do the same.

16. That the English formerly having their factoiy at Rajapore and sold several goods to the Rajapore merchants, for

which they became indebted to the English, therefore the havildar and subahdar shall examine the same, doing justice without any respect to the merchants.

17. That the English may erect a factory in Nagotan and Penn, which if they will, they shall pay custom for the goods they shall export or import to or from Ghat, as they pay in Rajapore, and they shall not be molested.

18. That the English shall buy none of my people belonging to my dominion, to make them slaves or Christians.

19. That for the goods taken from the English in Cudavantapur ( Khuda-banda-pur ) or other places, my father Shivaji Rajah promised to pay 10,000 pagodas Patchias, by agreement, and on this account he has expended some money on this factory house at Rajapur, which with more shall be paid out on the said house and what already paid being deducted, the remainder I shall pay the English in coconuts and betlenuts.

20. That the houses which the English shall build in any of my dominions or ports shall not exceed 60 covids in length and 15 in breadth, and 2½ high, the thickness of the wall ½ a covid- according to which proportion thay may build, their factories, not taking more ground than the aforesaid, and if that be not sufficient, they may build shops as in the bazar by other merchants, and be that presents a license from Capt. Richard Keigwin shall be granted leave to build a factory and no other person.

21. That the merchants, weavers or dyers that shall hav, any goods belonging to the English, the subahdar and havildar shall not molest them, but on the contrary shall give them all aid and assistance.

22. That the English may bring gold and silver and to coin money in the mint-house, and not in other places, for which they shall pay the usual interest.

23. That the English may have coolies and people to watch their goods shall require ( sic ), and the subahdar and other officers shall not hinder them, but if they will keep more than is necessary it shall not be granted.

24. That it was proposed by the English that if any subahdar or havildar in my dominions request any goods from the English they shall not deliver any except they produce my letter or some of my principal officers. To which I say if they produce my letters or any of my principal officers then they may deliver goods and

मावळ सुभा प्रांत मार यातून अंताजी बाजी यांनी चंदीचे मुकामीं स्वामीस विनंती केली कीं, तर्फ मजकूरचें देशकुळकर्ण सालाबाद पिढि दर पिढि भोगवटा चालत आहे. यैशास देशकुळकर्णाचे वतनास हक व इनामती व कुलबाब व कुलकानू मौजे गोवडी व नांदगाऊ ऐसे तीन गांव व किरकोल गावगना इनाम सेते ऐसे निजामशहाचे कारकीर्दिस चालत होती. त्यावरी देश कैलासवासी स्वामीस कबज जाली यावरी तमाम वतनदार लोकाच्या इनामती अनामत केल्या. त्याबरोबरी आपले गाव व सेते अमानत जाहाली. आपले पिते बाजी प्रभु याणी कलासवासी स्वामीपासी येकनिष्टपणें सेवा करून स्वामी कार्यावरी खर्च जाहाले. आपणही आवधीयानी सेवा येकनिष्टपणें स्वामीची सेवा केली आहे. स्वामी धर्मप्रभु वृत्तिवंताचे इनाम व हकाचे जिर्णोधार करून दिले. आपणही पुरातन वृत्तिवंत आणि स्वामींचे सेवेसी एकनिष्ठ आहों. तरी कृपाळु होऊन आमचे इनामगांव व सेते......पाहिजे म्हणून विनंती केली. यावरून देशकुळकर्णी हिरडस मावल हे स्वामीचे पायाशी एकनिष्ठेनें वर्तणुक करीताती व बाजीप्रभु कैलासवासी स्वामीचे वेळेस स्वामी कार्यावरी खर्च झाले व प्रस्तुत ईही स्वामीचे सेवेशीं तत्पर देखोन याजवरी कृपाळु होऊन यांचे इनामतीमध्यें दिवाण दस्तें टके २००० दोनी हजाराचा इनाम तर्फ मजकुरी देविला असे. बीतपशील

| | |
|---|---|
| गांव कुलबाब कुलकानु खेरीज इनामदार व हकदार मोईन टके १००० एक हजाराचा गांव एक कमाल दस्ते | गांवनना सेते इनाम दिवाण दस्तें कुलबाब कुलकानु मोईन टके एक १००० हजाराची कमाल दस्ते देणें. |

यैसी दोनी हजाराची इनामती यांस द्यावयाची निर्वाद करून हे पत्र तुम्हांस सादर केले असे. तरी पुर्वील इनामगांव व सेते यांची मनास आणून सदरहू पैकीं दोन हजारा टक्याचा इनाम एक गांव व सेते नेमुन देऊन यांस व याचे पुत्रपौत्रादि वोश परंपरेनें अवछीन इनाम चालवावया विशी प्रांत मजकूरचे देशाधिकारी यांचे नांवे सनद आपली करून देणें आणि इनाम चालेल ऐसें करणें. जाणीजे. बहुत लिहिणें तरी तुम्हीं सुज्ञ असा [ शिक्का–' मर्या : देयं विरा : जाते ' ]

महाराष्ट्र–साहित्य, व. १, अं. ३, सप्टेंबर १९१९, पृ. ९९–१०१.

## (–१८८–)

जिंजीचा वेढा ( १६९०–९७ इ. स. )

काव्याचा उपलब्ध भाग

श्री रघुवीर समर्थ ॥

वंदुनि आधी गजशुंडतुंडा ।

विद्यासमुद्रा सुमति प्रचंडा ।
निर्वीघ्न ग्रंथी करी कां कविते ।
चाले गिरा हे मज सीकविते ॥१॥

आरंभ काली नमि भारथी हे ।
होईल माझी कविभारथी हे ।
हंसासवी ब्रम्हकुमारिका तुं ।
अज्ञान दैत्यात्मक मारिका तुं ॥२॥

यानंतरे वंदीन सद्गुरूसी ।
ज्याचे प्रसांदे वरि सद्गतीसी ।
कृपा करावी कवि हर्षराया ।
वाचें करीं स्फूर्ति कवी कराया ॥३॥

पुर्वी सिवाजी वदला स्वभावे !
तो खेलवी बालक पुत्रमोहे ।
राज्याधिकारी सकला महीचा ।
हरील हा भार धराधराचा ॥४॥

ते सत्य जालें कवीता प्रसंगीं ।
सव्हारती तांब्र पुढे प्रसंगीं ।
वदेन ते कौतुक वाग्विलासे ।
श्रोते तुम्ही सादर सावकाषें ॥५॥

प्रार्थुनि येसें सकला जनाला ।
आनंदराये मग प्रस्न केला ।
मानु नका मीथ्य धनप्रमादें ।
सांगेन कौतूहल स्लोकबंधे ॥ ६ ॥

ज्या रामें अवतार पूर्ण धरिला पोटी सिवाचे पहा ।
आला या करनाटका विधिबलें चंदी वसे राम हा ।
तो जैसा उधिदौ प्रदेसि जठरीं लोका त्रिकूटा गिरी ।
पृथ्वीमाजि विशेष दुर्ग उपमा चंदी नसे दुसरी ॥ ७॥

विशेष तांब्र तो हटी ।
वसोनि दुर्ग नेहटी ।
आलंग चालवी बलें ।
दिसे जनासि आगले ॥ ८ ॥

बहुत लोक मावले ।
मीलोनी तें भलेभले ।

उगवलें पराक्रमे ।
धरूनि धैर्य विक्रमे ॥ ९ ॥

युद्धीं घोरपडा करीत खडा तो कानडा नाईकू ।
जोडा या न दिसे उडी तडतसें फौजेंमदें आलकू ।
होता सन्मुख भीम तांब्रमिलणी राहों शकें कोण हा ।
हाती खर्ग विराजतो बहिरजी भंगार नाईक हा ॥ १० ॥

खर्चासी नाही बहु कष्टताती ।
चेंदावरा हेजीब नित्य जातीं ।
कोनरिपंती बहु ख्याति केली ।
खर्ची बहु आणुनी पूरवीली ॥ ११ ॥

वसे दक्षिणेश्री बहु पुन्यराषी ।
महीं नाम साजे महाराज त्यासी ।
करी भोग देवेंद्र नाना विलासे ।
तसी संपती भोगी तो सावकासे ॥ १२ ॥

बहूत लोक प्रेसिले ।
विषेश द्रव्य धाडिले ।
करूनि साह्य ये रीती ।
बलाढ्य भाव दाविती ॥ १३ ॥

परंतु तांब्र विक्रमें ।
विरश्रीचेंनि संभ्रमें ।
अलंग जोर चालीली ।
मऱ्हाष्ट शक्ति मंदली ॥ १४ ॥

बहुती जणे ते बहु कष्ट केले ।
बहुतेक ते लोक युधी निमाले ।
पडेना पुरी सीणती सर्व तेथें ।
बलें वेढिला दुर्ग चत्वार पंथें ॥ १५ ॥

मार्गासि चाऱ्ही अवरोध केला ।
नाहीं जवादा त्रण घोडियाला ।
रात्रीच जाती मग वेंटवाला ।
धान्या लवणाज्य आणीत ज्याला ॥ १६ ॥

आलंग चाले चंन दुर्गपंथें ।
नाईड राखे बहु सीध तेंथे ।
आहार निद्रा तजिलीं तयानें ।
तो बैसला केवल साभिमाने ॥ १७ ॥

भांडी थोर विशाल दीर्घ उपमा देतां नसे दूसरी ।
दारू फार आपार येक समई गोले अलंगेवरी ।
मारा थोर कराल घोष उठतां कांपे महीचा सुतु ।
यैसा दुर्ग विचित्र शीवरचना चंदी महा पर्वतु ॥ १८॥

प्रती योजिलीं ते अलंगेसी यंत्रें ।
फिरंगी कसें लक्ष लावीत सुत्रें ॥
उडे कोट भीती बहु मार होतां ।
जनीं भावीलें पूर्ण प्राणान्त आता ॥ १९ ॥

पडाया अलंगेवरी सीहु जाले ।
बहुलोक रूद्रात्मज प्रेरियेले ।
बहु तांब्रसेनेसि होतांचि संगु ।
जसें भूस्मती आगि मूर्खीं पतंगु ॥ २० ॥

उठेना अलंगेसी सामर्थ्य गाढें ।
बहु धाडिले रामचंद्रासि जोडे ।
कस्या पत्रिका लीनता उतरांच्या ।
मती उपमे त्या न येती सुरांच्या ॥ २१ ॥

येताना रामराजा तजुनी विभवा तांब्र युद्ध प्रसंगे ।
सेना गेली दिशांगी आवचट उरलो थोडके लोंक संगे ।
धैर्य वीर्यें प्रतापा धरूनि मनि पहा राज चंदीस आला ।
मागे त्या रामचंद्रे शिववरदबले येत्न तो मांडियेला ॥ २२॥

लोकासी सांगे हित तो अमात्य ।
संपूर्ण देशासि करा निपात ।
करूनि यैसी उदरासि शांती ।
ह्या रामफौजा म्हणवा दीगाती ॥२३॥

पाटील सेटे कुणबी जुलाई ।
चांभार कुंभार परीट न्हावी ।
सोनार कोली उदमी फुलारी ।
यावेगळे लोक किति बिगारी ॥२४॥

ढाला कटार तरवार असंख्य भाले ।
घोडे बरे जलद बैसोनीया निघाले ।
सेनासमूह रचला विचरे समूदा ।
देय प्रजा करुनि उद्वस तांब्र बंधा ॥२५॥

आनी चार सेना विविधा प्रकारें ।
सेनापती दोघ समान वीरे ।

संपूर्ण घेति गड देष कोटा ।
विध्वंसिले बहुत लोक अनेक पेटां ॥२६॥

सेना सहस्त्र दशकें निधि मुख्य संख्या ।
दिल्लिस्वरासी करिती बहु त्रास मुख्या ।
ऐकोनिया प्रभुवरे सिवसूत राजे ।
पाचारिले निज दळ समयास का जे ॥२७॥

जाणोनि केवळ निदान अमात्य बोले ।
ज्याचे प्रतापमहिमेस्तव सैन्य चाले ।
स्वामीसहीत नगरी विपरीत काळ ।
ग्रासीन मी म्हणतसे अवघा भुगोळ ॥२८॥

स्वाना पुढे तो धनाजी स्वसैन्ये ।
वसुसंख्यं सेना असे उग्रसैने ।
तया पाठिसी धाविला वीर जाणा ।
सवें भूद्रिसंख्या सहस्रादि सेना ॥२९॥

धनाजी पुढे पावला सीघ्रतेनें ।
बहु सूटला धाक त्या तांब्र सेने ।
धरीले बळे सीघ्र ईस्माईलासी ।
करूनि सिमा भेटला त्या प्रभूसीं ॥३०॥

सह्याद्रि, व. ७, अं. १२, डिसेंबर १९४१, पृ. ९२२-९२५; तंजावर लाय. अनु. २०४१.

१७ फेब्रुवारी १६९३ ] (-१८९-) [माघ वद्य ८ शुक्रवार, रा. श. १९

श्री

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके १९ अंगीरानाम संवत्सरे माघ वदि अष्टमी भृगुवासरे क्षत्रीयकुलावंतस श्री राजाराम छत्रपति यार्णी देशाधिकारी [शिक्का][1] व लेखक वर्तमान व भावी सुभा प्रांत सातारा यांस आज्ञा केली यैसीजे. गणोजी बिन बाळाजी जाधव ये विशई राजश्री संताजी घोरपडे सेनापती याणी चंदीचे मुकामी सनिध येऊन विनंती केली यैसी जे गणोजी बिन बाळाजी जाधव यानीं स्वामींचे पायापासी येऊन येकनिष्ठता धरून देसीहून कर्नाटक प्रांतास चंदीस येऊन येकभाव सेवा केली. यांस येक गाव नुतन इनाम करून द्यावयास पाहिजे म्हणून विदित केले. त्यावरुन त्याजवरी कृपाळु होऊन मौजे कुसवडे...प्रांत सातारा

१. शिक्का-'श्रीराजाराम: नरपति हर्षनिदान: मोरेश्वरसुत निळकं: ठ मुख्य प्रधान.'

ह्या गांव नुतन इनाम करून देहे १ येक रास कुलबाब कुलकानु हलीपटी व पेस्तरपटी सहित हकदार व इनामदार करून गाव इनाम करून दिधला असे. याचे स्वाधीन करून याचे पुत्रपोंत्रादिवंशपरंपरा चालवणें. या पत्राची प्रति लिहून घेऊन मुख्ये पत्र इनामदार मजकुरास परतोन देणें. निंदेश समक्ष [ शिक्का ]. रुजु

तेरिख २१ माहे जमादिलाखर सन सलास तीसैन. बार बार

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ७८

२० मार्च १६९३ ] ( – १९० – ) [ फाल्गुन वद्य ९ सोमवार, रा. श. १९

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १९ अंगीरानाम संवत्सरे फाल्गुन वदि नवमी इंदुवासरे क्षत्रियेंकुलावतंस श्री राजाराम छत्रपती यांनीं देशाधिकारी व लेखक वर्तमान [ शिक्का ][1] [ शिक्का ] व भावि सुभा प्रा। सातारा यासी आज्ञा केली यैसीजे. जनाजी जाधव याचे विशई राजेश्री संताजी धोरपडे सेनापती याणी चेंदीचे मुकामी सनिध येऊन विनंती केली यैसीजे जनाजी बिन बाळाजी जाधव यानी स्वामीचे पायापासी येऊन येकनिष्ठता धरून देसींहून कर्नाटक प्रांतास चंदीस येऊन येकभावे सेवा करीत आहेती. यास यक गाव नुतन इनाम करून द्यावयास आज्ञा केली पाहिजे म्हणून विदित केले. त्यावरून येजवरी कृपाळु होऊन मोजे चिंचेनर ता। तारगड प्रांत मा। हा गाव नूतन इनाम करून देहे १ येकरास कुलबाब कुलकानु हलीपटी व पेस्तरपटी सहीत खेरीज हकदार व इनामदार करून गाव इनाम करून दिधला असे. याचे स्वाधीन करून याचे पुत्र–पोत्रादि वंशपरंपरेने चालवणे. या पत्राची प्रति लिहून घेऊन मुख्ये पत्र इनामदार मजकुरास परतोन देणें. जाणिजे. निदेश समक्ष. [ शिक्का—' मर्या : देयं विरा : जते ']

तेरीख २२ रजब सु॥सन सलास तीसैन माहे रजब

बार सुद सुरु सुद बार

भा. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ७८–७९.

१. शिक्का—' श्री राजाराम : नरपति हर्षनिदान : मोरेश्वरसुत निळकं : ट मुख्य प्रधान'.

१६ एप्रिल १६९३ ] (–१९१–) [ चैत्र वद्य ७ रविवार, शके १६१५

[ मालवण येथील शिलालेख ]

श्री गणेश प्रसन्न

श्री नारायणदेव

श्री रामेस्वरदेऊ

विनायकगुरूभान ब्रम्हा विष्णु मयेस्वर शेरस्वती प्रणीभादौ सर्वकार्यार्थसीधये ॥ स्वतीश्रीनृपशालिवाहानसके १६१५ वेव्हारिक श्रीमुखनामछेवसरें चैत्र वहुल सप्तमी रविवार मौजे मालवण ता मसुरें पा कुडाल सुा सलास तिसैन अलफ बैसकें श्रीदुर्गवाडी वडाखाली मिळाले ग्रामपुरूसे बिता

सोनगावडा बीन भुजगावडा

कृष्णागावडा बीन अतगावडा ए समत १

धाकगावडा बीन पीलगावडा मत १

गोमधुरी मत १

बळनाक धाननाक मत १

रामगावडा बीन पाकगावडा बइकर ए समत १

नागगावडा बीन पाकगावडा मत १

कानगावडा बीन एलगावडा मत १

कृष्ण घाडी मत १

जोगा बीन जमाल १

ऐसे मिलाले ग्रामपुरूसे वा येरा चुकलें ग्रामपुरूशाचे ० अनुमतें केलें कृतं गावपण ऐसे जे वेदमुहुर्ती दादसोजी बीन रामकृ जोसी गाडगील मौजे मजकूर यासि दिला. दत शाहासन इनामपटा ऐसा जे बाडी दुर्गाडी दुर्गादेवी भीतर आहे ते मोडून तुमास घर करून राहावेयासी दत करून दीले. त्याचे चतुर्सीमा पूर्वी दीसे व्हालाची मेर १ पछीम दिसे डोंगराचे गारेची मेर १ दक्षीण दीसे जानभट अभ्यंकराचे मोडणाची मेर १ उतर दीसे सोनगावडा गावकर याचे मोडणाचे मेर १. या चतुसीमामधील जमीन व्हावटा गलवाडौनु पडिली होती. त्यामधील माड व फणस व हरजीनस झाड आहेत व जी कराल ती व ते जमीन तुमास दत इनाम पटा करून चंद्रार्कवेरी दीधली आहे व ती जमीन खारीचे खाजन ते सेत दत्त इनाम करून दीधले असे. त्याचे चतुर्सीमा पूर्व दीसे भाग मेर १ दक्षेण दीसे बालसेणवी कुलकर्णी याचे सेताची मेर १. पछीम दीसे घाडियेचे सेताची मेर १ उतर दीसे दादगावडा याचे सेताची मेर १ या चतुर ( सी ) मामधील जमीन खार भरूनु पडिली होती, असाध देखौनु ते तुमास यार्कचंद्रवेरी दतपटा करून दीली आहे, सुखे भोगवटा करून खाणें. या दोनी उभयता जमी(नी)स दीवाण माहासूल धवडिले. त्यातूनपासून घे-वेया समध नाही. आमी गावी पाळू सदरहु तुमास जोतीसपणाची वृत आमचे वडि-लानी पूर्वीपासून दिलीच होती. तुमचे वडील चालवीत होते. ऐसेयास तुम्हास सेत बेडजर खाजन दिले होते. जे भुतबाधन तुम्हा समाधा( न ) नहवे देखौनु हाली मनास आणून घरभाट व सेतखार दीले असे. तुमचे जाले जातेनें खावे. आमचे जाले.

जातेने पालावें. जोसीपणाचे मान महत्त्व तुमी सुखे भोगवटा करून खाणे. हा गाउपटा. सही छ १९ साभान. कुसऊ गावडा गावकार नीशाणी गाऊकर

श्रीसरस्वतीमंदिर, व. ८. अं ३, क्र. २६ वैशाख शके १८३०, पृ. ४१–४२.

९ मे १६९३ ] (–१९२–) [ वैशाख शुद्ध १५ मंगळवार, रा. श. १९

॥ श्री ॥

[ शिका ][1] [ शिका ]

स्वस्ती श्री राज्याभिषेक शके १९ श्रीमुखनाम संवछरे वैशाख शुध पुर्णिमा भौमवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी सुभा पा वाई यांसी आज्ञा केली ऐसी जे. वेदमुर्ति विनायकभट बिन नारायणभट अफळे व समस्त ब्राह्मण वास्तव्य स्थल मौजे माहुली सा निब कृष्णवेणी सगम याचा विशी वेदमूर्ति हरभट बिन जनार्दनभट व विनायेकभट बिन येकनाथभट आफळे या उभयेतानी चदीचे मुकामी स्वामी सनीध येऊन विदीत केले की विनायकभट आफळे व समस्त ब्राह्मणास येदीलशहाचे वेळेपासून मौजे सा मजकूर हा गाव इनाम चालत होता. त्यावरि हा देश राजश्री कैलासवासी स्वामीस हस्तगत जाहला. त्या दिवसापासून ब्राह्मणाचे इनाम अमानत करून ब्राह्मणाच्या योग्यता व कुटुंबे पाहून त्या त्या योग्य ब्राह्मणास धान्य देविले होते. ते हा काल पावेतो चालत आले आहे. त्या अन्नेकडून ब्राह्मणाची अग्नहोत्रे व कुटुंब सवरक्षण होता बहुत प्रयास होऊ लागले. यास्तव स्वामीसनिध आलो आहे. ऐसीयास माहाराज धर्मप्रभु कितेक देवब्राह्मणाचे इनाम पूर्वप्रकारे चालते केले. तरी आपणांस इदलशहाचे वेळेस गाव इनाम चालत होता. त्या आलीकडे हा काळ पावेतो इनाम गाव न चालता भोगवटा तुटला आहे. तरी पूर्वप्रकारे इनाम चालवावया आज्ञा केली पाहिजे म्हणोन श्रुत केले. त्यावरून मनास आणिता विनायकभट अफळे व समस्त ब्राह्मण हे बहुत थोर जाले विद्यावंत कुटुंब व स्थल कृष्णातीरी वास करून राहाणार ऐसे जाणोन यास पूर्वी धान्य द्यावयाची मोईन आहे ते अमानत करून हाली नूतन इनाम मौजे माहुली सा मजकुर हा गाव १ एक कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी जल तरू पाषाण निधि निक्षेप झाड झाडोरा पडले पानसहित खेरीज इमानती व हकदार करून इनाम दिल्हा असे. तरी सदरहू वृती येदलशाहाचे वेळेस सर्वमान्य ब्राह्मणास होती ते समई ज्या ज्या ब्राह्मणी अणभविले असेल ते मनास आणून तेणेप्रमाणें त्याच ब्राह्मणास चालवणे. हे वृति यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. वर्ष प्रतिवर्ष नूतन पत्राची

१. शिका—श्री : श्री ॥ राजाराम : नरपति हर्षनिदान : मोरेश्वरसुत नीळक : ठ मुख्य प्रधान '.

अपेक्षा न करणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र विनायेकभट आफले याजवळी परतोन देणे. जाणिजे. निदेश समक्ष. [ शिक्का–' मर्याः देयं विराः जते ' ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत, शके १८३५ स्वी. ग्रं. क. ७ पृ. २३२–३.

२५ जून १६९३ ] (– १९३ –) [ १ जिल्काद, जुलस ३७

[ मोहरा दोन ][1]

वऱ्हाड सुभ्यांतील सरकार माहूर वगैरे प्रांतीतील हल्लीचे व पुढील अधिकारी देशपांडे रयत व शेतकरी यास कळावें कीं उदाजीराम याचे नांवें हुजूर दप्तराप्रमाणें सरकार मजकुरांतील देशमुखी मुकरर आहे. अलीशानच्या फर्मानामध्यें पूर्वापार वहिवाटिप्रमाणें रुसूम, पासोडी, सालीमखेडे व धान्य असें लिहिलें आहे. त्याचा तपशील दिला नाहीं. तरी खालीं दिलेल्या तपशीलाप्रमाणें शेकडा १० रु. रुसूम व पासोडी व दरशेंकडा १० नूतन जमीन इनाम व दरखेड्यास २ खंडी धान्य व दरपरगण्यास एक गांव ( जहागीर ) इतकें देशमुखीबद्दल व शेंकडा ५ रु. रुसूम व शेंकडा ५ नूतन जमीन इनाम हें पाटीलकीबद्दल याप्रमाणें मुकरर झालें आहे. सदरहू खिदमत इनामें इतबारें बजावावी. रयत लोक व त्या महालांतील सर्व राहणारे यांच्याशी नेकीनें व मेहेरबानीनें वागून राजी ठेवून रजाबंदी व शेतीस उत्तेजन देत जावें. जें मुकरर झालें आहे. त्याशिवाय एक दाम अगर एक दाणा घेऊ नये. दरसाल नवीन सनद मागत जाउं नये. ता. १ जिल्काद स. ३७ जुलूस.

[ पुढें २७ महालांचा व इनाम गांवाचा तपशील ]

भा. इ. सं. मं., त्रै. व. २, अं. १–४, पृ. ५०–५१

१८ नवंबर १६९३ ] (– १९४ –) [ मार्गशीर्ष शुद्ध १, शनवार शके १६१५

मालवण येथील शिलालेख
पातालेस्वरदेवली
श्रीगणेशायनमः

वीनायेकं गुरू भानुं ब्रम्हाविस्णुम्हेंस्वरंः सरस्वती प्रणीमाधव सर्वकार्यार्थसीधदेंः ॥ स्वस्ती श्रीशानृपशालीवाहानसकें १६१५ वेव्हारीक श्रीमुखानाम छवछेंरे मार्गसीरमासे

१. मोहोर पहिली ' काजी अब्दुल फाजलखां ' ची व दुसरी ' मदारूल महाम उम्दतुल्मुल्क आसदखां बहादुर ' ची.

सुध प्रतीपदा सनवारे बैसको श्री मौजे चेदवण तर्फ पाट पाा कुडाळ सुहु सन अर्बा तीसेन अलफ मीलाले. ग्रामपुरूसाचेनी अनुमते केले. कुत गावपण ऐसा जे

भोगले प्रभु वीठे प्रभु गावकर १ | भुजे प्रभु हरदे प्रभु गावकार १
हीरसेणवी रत्नसेणवी कुळकर्णी १ | नीळो तानशु वाली १
मादगाधाई भीयाल ?

हे ग्रामपुरूसे समस्त बैसके ब्रैसोनु केले कृत जे वा येर चुकले त्याचेनी अनुमते ऐसा जे. मौजेमजकुरी पैला जोतीसी होता. जोतीस हरयेक बाबे सागावे ते हाली जोतीसी नाही. मौजे मजकुरी श्रीकुळदेवत हे जागते देवस्तान होते. तेयाचे पैले स्तापना होती. तेव्हा गाव म्हामुरी नादत होता. यैसेयास आज ७-८ वरूशे राजीकरीस कयापासोन श्रीदेवाचे स्तापना जाया जाली होती. स्तापना केले वेघळे गावास बरवे होत नाही, देखौनु श्री देवास स्तापना करावयेयासे व हरयेक बाबे मुहुर्त देणेयाबदल वेदमुहुर्ती राजेश्री मौजे माळवण ताा मसुरे यास ग्रामपुरूसानी नमसपणसाचे बोळ हे नेम करूनु दीले असे ` आमचे जाले, जातेने तुम्हास पाळावे. तुमचे जाले जातेने भागावे. नमसीचें सीमा

पूर्व दीसे चामारकोड | उत्तर दीसे पगे रेचे बोळ
पश्चीम दीजे घाड कुणगा
लीहीत हीरसेणवी रत्नसेणवी मोजे मजकूर | दक्षेण दीसे वींदाणीयाचे बोळ

हे मेरेने मेर हे तुमास नमस करूनु दी... कुर... ळे असे. हे आमी भुजउन देउ. आमचे तेरीख २९ जाळे जातेने दीवाणा राउळा पासोन रबीलाबल तुमास भुजउन द्यावे. तुमचे जाळे जातेने भोगावे. तुमी हरयेक गावकार्याचे मुहूर्त वा लग्नकार्यान्चे मुहुर्त आमास सांगावे. येणेप्रमाणें नमसपटा सही.

श्रीसरस्वती मंदिर, व. ८, अं. २, क्र. ३६, वैशाख शके १८३०, पृ. ४१-४२.

२६ जून १६९४ ] (-१९५-) [ ११ जिल्काद, खमस तिसैन अलफ

श्री

[ शिक्का ][1]

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजेश्री रामचंद्र पंडित आमात्य ताहा देसमूख व देशपांडे ताा भूम सुाा खमस तिसैन अलफ. तर्फ मजकूर यैवजास राजश्री मल्हारजी भाडवलकर याकडे हुजुरून पेशजीच दिधले आहे. येथील खडणीचा यैवज साल मजकूरी मारनुलेस पावणे. संताजी घोरपडे याच्या सनदेने

१. शिक्का-'श्रीरामचं : द्र चरण नील : कंठ सोनदे : व शरण.'

दुसरियाकडे दोनी रुके घ्याल ते गैरमजुरा होऊन तुम्ही आपले केले पावाल. हे नेमस्त समजणे. छ ११ जिलकाद. निदेस समक्ष. [ शिक्का–' लेखन : सीमा समु : लसती ' ]

सुरु सुद बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. ९५.

१६९४–१६९५ इ. स. ] ( – १९६ – ) [ खमस तिसैन अलफ

तकरीर करदे बा। कृष्णाजी सोमनाथ वसिष्ठ अ ... त देशकुलकर्णी ... ... ... चिपोलण सुहुरसन खमस तिसैन अलफ कारणे राजश्री स्वामीचे सेवेसि लिहुन दिले करीनापत्र ऐसे जे. चिपुलणचे मिरास देसकुलकरण कदीम पिढी दरपिढी पुरातन आपली माउसी गोतमाइ व विनानी बलाल देशकुलकर्णी पुरातन चालिले. पुरातन पिढी मूल पुरुष नरसीपंत त्याचे दोघ पुत्र एक विनाजी नरसी एक परशराम नरसी चालवीत होते. विनाजीपंताचा पुत्र बाळो विनायक परशरामपंताचा पुत्र काळो परशराम ऐसे चालवीत होते. पुढे बालोपंत मरोन गेले. त्यावरी काळोपंत चालवीत होते. पुढे कालोपंत दावेदारानी मारिले. त्याचे पुत्र अंतो काळो वृत्ती चालवीत होते. पुढे अंतो काळो मरोन गेला. विनाजी बलाल व नरसो बलाल बालोपंताचे पुत्र विज्यापुरास गेले. त्याकरिता समइ वृत्ती चालवावयासी गोतमाईने तिमाजी भास्कर व गगाजी भास्कर हेळवाककर वृत्ती चालवावयासी ठेविले. पुढे हेळवाककरानी गोतमाईस विस्वास दाखउन तिचे वृत्तीचे फर्मान व माहाजर कागद नेउन आपले नावे कागद केले. फर्मान आणिळा. त्यावरी विनाजी विज्यापुराहुन आला. गोतमाईने विनाजीस घेऊन दाभोलेस कारकीर्दी राजश्री माहादजी अज सुभा जाऊन विदित केले. त्याणी दाहा मनसुबदार बैसउन मनसुबी करून गंगाजी भास्कर तिमाजी भास्कर दूर केले. आणि गोतमाईने आपणासि माहादाजीपंत सुभेदार यासि सांगोन आपण बहिणीचा पुत्र म्हणुन आपणास मुतालकी देउन चिपोलणास मिरास चालवाबया ठेविले. पुढे गोतमाईने आपला कृष्णाजी सोमनाथाचा पुत्र जनार्दन विनाजीस देउन केशवभट लेले व कासीभट व माहादेउभट धर्माधिकरणी व कृष्णभट उपाध्ये व जोसी व मंत्रभट बैसउन होम दत्तपुत्रविधान करविले. पुढे जनार्दन पुत्र घतलियाउपरी विनाजीपंतास तीघे पुत्र जाहाले. एक बाळाजी एक आबाजी एक मोरया. तीधामध्ये दोघ गतःप्राण जाहाले. बालाजी व जनार्दन हाली आहेत. यांचे विवाह केले. येणेप्रमाणे करीना चालत असता राहुजीपंताचा मुतालीक अंताजी आणाजी म्हणून माहाळासि कारकीर्दी राजश्री संभाजी राजे साहेब हा आळां होतां. आपण भगवी वस्त्रे करून उपवास करून राजश्री साहेबांबरोबर हिंडत होता. ते वेलेसि राजश्री कबजीबावा स्वामीने कृपा करून साहेबाचा हातरोखा देऊन माहालासि पाठविले व राजश्री प्रल्हादपंत न्यायाधीश व राजश्री निळोपंत पेशवे व स्वामीचे

पत्र ऐसी पत्रे सादर जाहाली. ते कागद हबसीयाचे स्वारीमध्यें आगीत जळोन गेले. इतुके वर्तमान व कोणी म्हणतात की फगरे देसकुलकर्णी हमजाबाद याचे मुतालीक काले देशकुलकर्णी होते. तरी ते गोष्ट लटकी व राजश्री आबासाहेबाचे वेळेसि राहुजीपंताचा मुतालीक आला म्हणतात तरी तेहि गोष्ट लटकी आहे.

भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. ६६–६७.

२३ जून १६९५ इ. ] (–१९७–) [ अधिक आषाढ वद्य ७ रविवार, शके १६१७

श्रीलक्ष्मीनृसिंहो जयति

स्वस्ति श्रीमन्नृपशालिवाहन शके १६१७ युवनाम संवत्सरे अधिकाषाढ वदि सप्तमी रविवारीं विश्वंभर गोसांवी पुत्र दासोवा गोसावियांस उदयगिरिसमीपवर्ति निडेबनग्रामीं सभ्य सभापति मिलोन जयपत्र करून दिधलें ऐसे जे. दासोवा गोसांवी व सर्वज्ञ गोसांवी उभयता एउन आमचा व्यवहार पद्धत्यनुसारें करून यथान्याय करा मणून अंगीकार जाले. मग न्याय करतां सर्वज्ञ गोसावियांस पराजयस्थानें विरुद्ध निराबाध निरर्थकादिकें प्राप्त जालीं. ते अवघीं स्थलपत्रामध्यें उद्धरलीं आहेत आणि दोघांचीं प्रतिज्ञापत्रें तदनुसार निर्णयप्रकारहि स्थलपत्रावरून सविस्तर कलों येईल. तस्मात् सिद्धांत ऐसा जाला किं दासो गोसावियानें मंत्रांगसहित मंत्रोपदेश करून आपलें संप्रदाय० गुरुपद चालवावें. शिव गोसांवी पुत्र सर्वज्ञ गोसावियानें ज्ञानांगसहित ज्ञानोपदेश करून आपलें सद्गुरुत्व० सांभाळावें. परस्वापहार करणें सर्वथा उचित नव्हे. ऐसे सिद्ध जालेसें जाणोन सभ्य सभापतिस पुशिल्यावांचूनच सर्वज्ञ गोसांवी पलोन गेले. याकरतां पराजित जाले. हें जयपत्र करून दिधलें सत्य. अन्य वादी क्रियाद्वेषी नोपस्थायी निरुत्तरः। आहून प्रपलायीं च हीनः पंचविधः स्मृतः ॥ १ ॥ यास जो वादी अथवा प्रतिवादी अन्यथा करील तो आपल्या श्रीस्वामीचा द्रोही होईल. ते हीं प्रतिज्ञापत्री ऐसें स्वहस्ताक्षरें करून लिहिलें आहे जें पद्धतिविरुद्ध जो करील तो श्रीस्वामीचा द्रोही होईल. [ मोर्तब सुद. ]

साक्षि
नगोजी नारायण देशहस्त
मीर मा जाफुर दीवान सुभे हैदराबाद ॥
आणाजी विश्वनाथ बागलानी
गोविंद कोडदेउ नोकर सा निंबालकर मोहर
बनाम रा मकजी राजे निंबाळकर
फौजदार ठाणे निडेबन [फारसी शिक्का]
सीवाजी गोविंद दीवान रा
मलजी राजे निंबालकर [फारसी शिक्का]

रामाजी कानेर नौकर निंबाळकर [ फारसी शिक्का ] ...

भा. इ. सं. मं. अहवाल, शके १८३४, स्वी. ग्रं. क्र. ४, भाग १, पृ. ११-१२.

३ आगष्ट १६९५ (-१९८-) [ २ मोहरम, जुलुस ३९

[ फारशी अर्जाचा सारांश ]

श्री

मौजे अलमगीरपूर कसबे नांदनज परगणे कडोली सरकार अमदनगर येथील रयत छ २ मोहरम सन ३९ जलूस रोजी काजीची कचेरी कसबे कडोली परगणे मजकूर येथें हाजर होऊन विदित करती झाली कीं आम्ही महाजन व तेली व सोनार व रंगारे व तांबोळी व शेतकरी वगैरे रैयत मौजे मार जाहीर करतो कीं सयाजी बा परसूजी भोसले फौजदार व जहागीरदार व आमीन मौजे मार यांच्या हुकमतीच्या वेळीं पूर्वी दग्याधोप्यामुळें वैराण व उद्धस्त झालेल्या नांदनज गांवाच्या हद्दींत आम्हीं नवीन गांव वसवून त्याचें नांव अलमगीरपूर ठेविलें. तेथील वतनदारी राजरूप बिन सयाजी यानें आपले मुलास दिली. त्यापैकीं महाजनगिरीची वहिवाट करण्याकरितां अबदुल रजाक बा दावलखां यांस मुकरर केलें आणि दुसरे कामदार नेमिले.

थोड्या दिवसांनीं सयाजी मजकूर मरण पावला व राजरूप शेटिये मौजे मार यांनीं आपल्यातर्फे काम करण्याकरितां नायब मुकरर केला आणि स्वतः बादशाही कामगिरीवर फौजेबरोबर काम देऊं लागला. आणि अबदुल रजाक महाजन सुरूपासून हजर नसून कोठें राहतो याचा पत्ता नाहीं असें पाहून तोतया अबदुलखा बा दावलखां यानें कांहीं संबंध नसतां विनाकारण ज्या किल्ल्यांत सयाजीचीं मुलें बाळें आश्रय धरून राहत होती त्यात पन्नास माणसानिशीं घुसून तेथें तो राहूं लागला. आणि जमीन कबजांत करून घेऊन आम्हांस खराब व वैराण केलें. जोपावेतों अबदुल्लाखां तेथें राहिला तो पावेतों आमचें तेथें राहणें मुश्कीलीचें आहे. कारण खुद सरकारी फौजदार व जहागीरदार हेही त्यांस भितात. तेथें गरीब रैयत काय करू शकणार ! त्याच वर्षी चार पांच हजार रुपये उकळुन त्यानें आपला तळीराम गार केला. त्याच्या जुलमाचा आणखीही खुलासा खाली लिहिल्याप्रमाणे करण्यांत येत आहे.

१. प्रथम अबदुल्लाच्या भावानें दांडगे शिपाई बरोबर आणून दोनशे साडेपन्नास रुपये जबरदस्तीनें वसूल केलें व खुद अबदुल्लानेंही सात रुपये तसेंच फुकट घेतलें त्याचा गुमास्ता बुदेखां यानें चाळीस रुपये नजराणा घेतला.

२. दुसरें वेळीं अबदुल्लाच्या भावानें गोविंदा यांस बरोबर घेऊन येऊन कसबे चोला येथें राहून इतकी धामधूम व लुटालुट माजविली कीं त्याच्या दहशतीनें लोक

आपली बायका पोरें बरोबर घेऊन किल्ल्यांत अबदुल्लाकडे गेले. परंतु तेथे दाद न लागून त्यांवर अनेक प्रकारें जास्त सक्ती झाली. लोकांनीं हात जोडून पाया पडून आपली लाचारी दर्शविली. तथापि त्यांजवळ दोन हजार रुपये मागीतले आणि मोठ्या मिन्नतीनें पंधराशे रुपयावर त्यांस राजी केलें; आणि आणखीही किरकोळ रकमा याप्रमाणें सक्ती होत राहिल्यास फिसादी वाढून आबादी बिघडून जाईल. बंडें होतील. गावें बेचिराख होऊन जातील. हल्लीही एक हजार रैयत पळून जाऊन झाडांचा व जंगलाचा त्यानीं आश्रय घेतला आहे. अबदुल्लाचे रिस्तेदार लुटीवर गब्बर झाले आहेत आणि पैसे उपटून एक हवेली बांधण्यांत आली आहे. याप्रमाणे चारा सालापासून गांव तबाह होत आहे.

३. व्यापारी लोकांनीं गांवातील गल्ला जमा करून सरकारी लष्कराकडे पाठवीण्याचा इरादा केला. परंतु अबुदुल्ला यानें फकीर महंमद वा अबदुल करीम यांस फर्माविले कीं व्यापारी यास कैदी करून त्या पासून सव्वाशें रुपये घेतल्यावर गल्ला लष्कराकडे जाऊ द्यां. अशा लांचरुष्वतींच्या सक्तीनें गांवांत अडीचशें घरें महाजनांचीं होतीं तीं वैराण होऊन गेलीं. अबदुल्लाच्या दहशतीमुळें त्याचा ऐब कोणी जाहीर करण्यांस धजत नाहीं. त्याच्या जुलुमामुळें रैयत परेशान ( त्रस्त ) झाली आहे.

४ राजरूप जहागीरदार बारा वर्षांनीं आपले वतनांस परत आल्यावेळीं गांव वैराण होण्याचें कारण विचारूं लागले. तेव्हां झालेली हकीकत त्यांस कळवून लोक म्हणाले कीं आम्हीं अबदुल्लाच्या विरुद्ध ब्र काढण्याचे जाहीर झाल्यांस तो असा जबरदस्त आहे कीं साऱ्या गांवांत हरताळ पाडील, म्हणजे गांवांत दिवा लावणें व दुकान उघडणें ही बंद करून टाकील.

५ आम्हांस कैद करून आमचे पासून जबरदस्तीनें दोनशे साडेसत्तावन रुपये वसूल केले. तात्पर्य हे कीं खानेसुमारीच्या वेळीं सत्यायशीं (८७) घरें गिणतींत आलीं. त्या सर्वांपासून रुपये वसूल करून कोणांस हिशेब दिला नाहीं.

६ मोगऱ्याचें तेल मशिदीत चिराख लावण्याकरितां म्हणून पांचशें दरसाल तेल्यापासून जबरदस्तीनें करीत आहे.

७. याच्या तहकीकातीकरितां फकीरखां साहेब आले होते. त्याच्या नांवानेंही दीडशे रुपये वसूल करून खाऊन टाकिले. कोणी त्यांस विचारिलें देखील नाहीं. यास्तव आम्ही रैयत लोक उमेदवार आहोंत कीं या गोष्टींची तहकीकांत ( चौकशी ) होऊन बंदोबस्त व्हावा. म्हणजे अबदुल्ला जबरदस्तीनें रयतेस वैराण करणार नाहीं व आम्हां रयतेस तकलीफ देणार नाहीं असें झालें पाहिजे. हा तोच मनुष्य आहे कीं ज्यानें सयाजी भोसले शेटिये यांच्या चार वर्षांच्या अर्भकास घरातून चोरून नेऊन लपून ठेविलें. चार वर्षें गेल्यावर जेव्हां अबुदुल्लाचे डोळ्यांस जखम लागली तेव्हां तो मुलगा बाहेर पडूं लागला व लोकांस त्या मुलाची ओळख पटली.

इतके दिवस तूं कोठें होतास म्हणून त्या मुलांस विचारलें असतां त्यानें जाहीर केलें कीं अबदुल्लाखानानें मला किल्ल्यांत लपवून ठेविलें होतें. मोहर

कासमबेग वाकेनवीस.

~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ७३-७५.

६ आगष्ट १६९५ ] ( -१९९- ) [ श्रावण शुद्ध ७ मंगळवार, युवा संवत्सर

श्रीं

श्री वेदमूर्ती राजमान्य राजश्री क्षेत्रवासी ब्राह्मण स्वामींचे शेवेसी

सेवक विद्यार्थी समस्त कायस्त कुल प्रभु

कृष्णाजी हरी पालकर
बाळाजी संभाजी देशकुलकर्णी ताा तुरूग-वाडी
तान्हाजी आत्माजी नीमे कुलकर्णी ताा पणवेली
बाळाजी रूद्र कुलकर्णी वनखल
सखाजी वैज प्रभु बदलापुरकर
नरसो मोरेस्वर पणवेलकर
अंताजी तुक प्रभु कलमुडकर
माहादाजी गोपजी कुलकर्णी कसबे पणवेल
रघुजी विठल पणवेलकर
विनाजी आउजी केलसीकर
नीलाजी माहादेउ कुलकर्णी मामलेपाल ताा हवेली व तपे आतवणे
रामाजी गोमाजी शाहाबाजकर
विनाजी निलकंठ निमक कुलकर्णी का पणवेलकर
आउजी बापूजी गुमस्ते अधिकारी ताा लिंगार
विठल म्हाउ प्रभु बदरापूरकर
सजणाजी खंडो भडळीकर
शंकराजी तावजी माहाडकर
पिलाजी कृस्ण कुलकर्णी पणवेल
वेंकाजी दामोदर प्रभु आतोणकर
नरहरी गोज प्रभु खारकर
रायाजी मल्हार पणवेलकर
मुकुंद कृस्ण अधीकारी ताा वरेडी
अंताजी त्र्यंबक देसकुलकर्णी ताा मुसेखोरें
दामाजी कृस्ण चेउलकर
बाजी सूर्याजी देसकुलकर्णी ताा पौडखोरें
यादव सोन प्रभु पणवेलकर
पुतळाजी श्रीरंग कुलकर्णी पणवेलकर
प्रयाग अनंत पणवेलकर
यादव काकाजी पेणकर
कासीराम कल्याणकर
सजणाजी रंगनाथ अंबरनाथकर कुळकर्णी
रघुजी केशव राजपूरकर
रायाजी रंगनाथ कुलकर्णी अमरनाथ
हरी महिपाजी देसकुलकर्णी प्राा करनाळे
गोपाल नमाजी पेणकर
सुदर काकाजी टिपनीस खोपवलीकर
चिमणाजी तान प्रभु कल्याणकर
रामाजी माहादेव देसकुलकर्णी प्राा नसरापूर
बाबाजी गोविंद अधिकारी ताा निजामपूर
दामाजी त्रिंबक देस कुलकर्णी मामले तळे
~~~~~~~~~~~~~~

सास्टांग दंडवत विनंती उपरी ऐसी जी. बाजी देश कुलकर्णी ताा हिरडस मावल याचा पुत्र पिलाजी यासि शामळानी राजपुरीस धरून सा वर्षे नेळा. त्याचे समंधी कोणी सोडवावया येतील म्हणौनु मार्ग पाहिला. परंतु कोणी आला नाहीं. ऐसे देखोन यासी बलत्कार करून अविंध केळा आणि मागती त्यासी अडीसिरी देऊनु तीन बरसें ठेविलें. त्यासी जे समई अनुकूल पडिलें ते वेलेसी निघोन आला. या प्रांतासी आलेवर यासी अनुताप बहुतच आला कीं आपळया स्वयातीस शरण जाऊनु कुलामध्यें यावे. ऐसी यासी तुम्ही हा शास्त्रार्थ मनासी आणून जो शास्त्रयुक्त विध जैसा असेल तैसा निर्वाह मनासी आणून यासी प्रायस्छीत दिल्हे पाहिजे. ये गोस्टीस आम्ही समस्त मान्य असो. प्रायेस्छीत विध संपादून येक आपले अज्ञापत्र पाठविले पाहिजे. त्या पत्रावरून वर्तणूक करून खुत जाले पाहिजे. हे पत्र स्त्रावण शुध सप्तमी भोमवासरें युवानाम संवत्सरे ( शके १६१७ ) हे विनंती.

भा. इ. सं. मं. तृतीय संमेलन वृत, स्वी. ग्रं. क्र. १२, पृ. ९५–९६.

६ आगष्ट १६९५ ] (–२००–) [ श्रावण शुद्ध ७ मंगळवार, युवा संवत्सरे

श्री

श्री वेदमूर्ती श्रियाविराजित राजश्री समस्त क्षेत्रवासी स्वामीचे सेवेसी सेवेसी विद्यार्थी समस्त कायस्त कुलप्रभु

| | |
|---|---|
| कृष्णाजी हरी पालकर | बालाजी संभाजी प्रभु कुलकर्णी दुर्गवाडीकर |
| अंताजी तुकाजी प्रभु कलमुडीकर | माहादाजी गोपजी कुलकर्णी कसबे पणवेल |
| पुतलाजी श्रीरंग कुलकर्णी पनवेलकर | रघुजी विठल पनवेलकर |
| प्रयाग अनंत पनवेलकर | विनाजी आउजी केलसीकर |
| यादव काकाजी पेणकर | विठल नरसी देसकुलकर्णी कानढवीकर |
| विनाजी निलकंठ निमक कुलकर्णी पणवेल | कासीराम कल्याणकर |
| बाबाजी बाजी व कृस्णाजी फुलाजी देसकुलकर्णी ताा हिरडस मावल | रामाजी गोमाजी |
| रघुजी केशव राजपूरकर | सजणाजी रंगनाथ कुलकर्णी अमरनाथ |
| नरसो विठल | रायार्जी मल्हार |
| नरसो मोरेश्वर | तानाजी अत्माजी निमक कुलकर्णी ताा पनवेल |
| यादव सोन प्रभु पनवेलकर | मुकुंद कृस्ण अधिकारी ताा वरेडी |
| बाजी सूर्याजी देस–कुलकर्णी ताा पौडखोरे | अंताजी त्रिंबक देसकुलकर्णी ताा मोशेखोरे |
| रायाजी रंगनाथ कुलकर्णी ताा अमरनाथ | |
| सखाजी वैज प्रभु बदलापुरकर | |

दामाजी कृष्ण कुळकर्णी मौजे पोईनाड ताा सिरगांव मामले चेउल
आउजी बापुजी प्रभु अधिकारी ताा लिंगारतण
गोपाल बाजी पेणकर
विठल म्हाउ प्रभु बदरापूरकर
चिमणाजी तान प्रभु कल्याणकर
शंकराजी तावजी माहाडकर
पिलाजी कृस्ण कुळकर्णी पणवेल
नरहरी गोज प्रभु खारकर
बालाजी रूद्र देसकुलकर्णी ताा वनखल
हरी महिपाजी प्रभु देसकुलकर्णी प्राा करनाले.
सुंदर काकाजी टिपनीस बोरघाट
दादाजी नरसिंह कुलकर्णी रोहिडकर
सजणाजी खंडो भडळीकर
रामाजी माहादेव देसकुलकर्णी प्राा नसरापूरकर
बाबाजी गोविंद अधिकारी ताा निजामपूर

साष्टांग दंडवत विनंती उपरी. रायाजी नरसी देसकुलकर्णी मामलेपाल ताा हवेली व ताा आतवणे याचा पुत्र शामजी हा सुखवस्तीनें मौजे आंबवली ताा तुडल येथें होता. ऐसीयास सुाा सन खमस समानिना मधे (१६८४–८५ इ.) शामळाची स्वारी राजपुरीहून मौजे मजकुरावरी आली. ते समई धरून नेलें. जंजिरे राजपुरीमधें नेऊन येक वरीसपरयंत अदबखाना ठउन चुना वाटविला. याचे सुटकेचा येत्न भावबंदी करावा तरी त्यास अनकूल पडलें नाहीं. याकरितां मुख्य शामले बलःकारें भीन यातीच्या विचार करून यातीभ्रस्ट केले. आणि आपणासंनिध सेवेसी ठेविला होता. त्यादारम्य मनाच्या तिरस्कारें गंतव्याच्या सूचनेमध्यें असोन तेथून निघायाची संधी पाहून गंतव्य केलें आणि आपले समुदायामधे आला. मनामधें पश्चात्ताप होऊन स्वयातीस शरण निघाला कीं आपणास येकवेल मुक्तता केली पाहिजे. जरी आपणास स्वयात मिलोन मुग्त करीत नाहीं तरी आपण प्राणत्याग करीन. पूर्ण पश्चात्ताप जाला. ऐसे कळोन समस्तांनीं मनावर घेऊन त्यास स्वयातीमधें ध्यावा हा निश्चय जाला. परंतु शास्त्रनिर्णय न केला. म्हणून स्वामीस विनंतिपत्र लिहिले असे. तरी स्वामीनीं शास्त्रनिर्णयें यासी प्रायेश्चीत द्यावें. ऐसे जाले तरी क्षेत्र प्रायश्चीत देऊन प्रायश्चिताचा निर्णय करून आम्हास आज्ञापत्र पाठविले पाहिजे. स्वामीचे आज्ञेवरून वर्तणूक करूं. हें पत्र श्रावण सुध सप्तमी भोमवासरे युवानाम संवत्सरे (शके १६१७) हे विनंती.

भा. इ. सं. मं. तृतीय संमेलन वृत्त, स्वी ग्रं. क्र. १२, पृ. ९४–९५

१६ नवंबर १६९५ ] (–२०१–) [ कार्तिक वद्य ५ शनवार, रा. श. २२

श्री

[शिक्का][1] स्वस्ति श्री. राज्याभिषेक शके २२ युवानाम संवत्छर कार्तिक बहुल

१. शिक्का—‘श्रीधर्मप्र :...दाशरथेरिव : राजारामस्य मुद्रे : यं विश्वबंद्या : विराजते.’

पंचमी मंदवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी नारो कृष्ण व महादाजी [ शिक्का ][2] [ शिक्का ][3] कृष्ण व गोविंद कृष्ण उपनाम जोतिषी यांसि दिल्हे इनामपत्र ऐसे जे. तुम्ही स्वामीचे पुरातन सेवक सेवा एकनिष्ठपणे करीत आहा. तुमचे चालवणे स्वामीस अगत्य. यास्तव स्वामी तुम्हा त्रिवर्गा बंधूवरी स्वामी कृपाळू होऊन तुम्हास नूतन इनाम मौजे खांविली तर्फ पाली प्रांत चेउल देह १ एक रास कुलबाब कुलकानू देखील हलीपटी व पेस्तरपटी जल तरू तृण काष्ठ पाषाण पडिले पानसहित खेरीज हकदार व इनामदार करून ग्राम चतुःसीमा भूमी पूर्वमर्यादेप्रमाणे इनाम दिल्हा असे. तुम्ही आपले स्वाधीन करून घेऊन तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरने अनभऊन सुखरूप असणे. यासि हिंदू कथला करील त्यास वाराणसीमध्यें गोहत्येचे पातक लागेल. मुसलमान कोण्ही इस्कील करील त्यास मकेमध्यें सोर मारल्याचें पाप लागेल. ऐसी पातके जाणोन तुम्हास इनाम सुरक्षित चालवितील. निदेश समक्ष-

[ शिक्का—' मर्या : देयं विरा : जते ' ]

तेरीख १८ माहे रबिलाखर रबिलाखर सुा सीत तिसैन अल्फ

रूजू छ २७ रबिलाखर ( २५ नवंबर १६९५ )

बार सुद सुरू सूद

भा. इ. सं. मं. पंचम संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २०, पृ. ३–४.

७ डिसेंबर १६९५ ] (–२०२–) [ मार्गशीर्ष शुद्ध १२ शनवार, रा. श. २२

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक २२ युवा नाम संवत्सर मार्गशीर्ष सुध द्वादसी मंदवासर क्षत्रीयाकुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी प्रांा खटाव यासी आज्ञा केली ऐसी जे. श्री जयराम गोसावी याचा मठ वृंदावन [ शिक्का ] [ शिक्का ] मौजे वडगाव काा निमसोड प्रांा मजकूर येथ आहे. याचे विशई राजश्री नरसावा गोसावी याणी राजश्री हिंदुराऊ घोरपडे ममलमतमदार समशेरबहादूर याचे विद्यमाने चंदीचे मुकामी विदित केले की श्री जयराम गोसावी स्वामी हे आपले गुरु याचे वृंदावन मठ मौजे वडगाव काा निमसोड येथ अन्नछत्र काही चालत च आहे. त्याजहून अन्नदान विशेषात्कारे चालावियासी नूतन रथोछाव करावयासी येक गाव इनाम देविलियाने ये स्थली अन्नदान व रथोछाव पूजापुनस्कार विशेषाकारे चालऊन

२. शिक्का—' श्री राजाराम : नरपति हर्षनिदान : मोरेश्वरसुत नीळकं : ठ मुख्य प्रधान '.

३. शिक्का—' श्री लक्ष्मी नृह... : मुद्रा नीराजि : जन्मनः ॥ राजा : राम प्रतिनिधी : प्रल्हादस्य विराजते.'

श्रीस्वामी सन्निध्य स्वामींच्या राज्यास व स्वामींस कल्या(णा)भिवृद्धि चिंतून म्हणोन श्रुत केले. त्याजवरून मनास आणीता गोसावी थोर संत पुरुष होते. याचे वृंदावनी अन्नदानास व रथोछावास नूतन इनाम मौजे वडगाव का निमसोड प्रां मजकूर देहे १ येक रास कुलबाब कुलकानू देखील हालीपटी व पेस्तरपटी जल तरु पाशाण निधिनिक्षप पडिल पानें सहित खेरीज हाकदार व इनामदार करून ग्राम चतुःसिमा भूमी पूर्व मर्यादेप्रमाणे सर्वमान्य दिल्हा आसे. गोसावी याचे वृंदावनीचे सिशांचे श्वाध्येन करून अन्नदान व रथोछाहा सांग चाले ऐसे करणे आणि सर्व मान्य गाव आचद्रार्क सिषपरंपरा चालवणे. प्रतिवर्षी नवीन पत्राची आपेक्षा न करणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र यासीं परतोन देणे. या इनामास हिंदु आगर मुसलमान कथला करील त्यास आपल्या महाजबाची आण असे. ऐसी शेफत जाणोन यासी इनाम सरक्षीत चालवणे. निदेश समक्ष. मोर्तब

तेरीख १० जमादिलावल सुा सीत तिसैन आलफ बार सुद

रुजू रा छ २४ जावल माहे जमादिलावल ( २१ दिसेंबर १६९५)

सुरु सुद चार

~~~~~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं., वार्षिक इतिवृत, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. १७९–१८०.

१६९६ इ. स. पूर्व ] (–२०३–) [

श्री

सेवेसी वतंदार कसबे चिपळूण ता मजकूर तालुके अंजणवेल क्षेत्र श्रीपरशुराम कृतानेक विज्ञापना ऐसी जे. श्रीमंत कैलासवासी बाळाजीपंत नाना देशमुख मामले दंडाराजपुरी हे कसबे मजकुरी आले. ते समई आम्ही जागा नेमून दिल्ही. तेथे घर बाधोन राहिले. शामळाचे दंग्यामुळे वरघाटी आले. ती जागा सालगुदस्ता माहाराजानीं पाहून वाडा बांधावयाचा विचार केला. परंतु जागा लहान याजकरितां त्या जाग्यांलगत बखल जागा आहे ती सुद्धा मिरास करून दिल्ही. यास वाडा बाधोन उपभोग करांवयासी एईल म्हणोन आज्ञा जाहाली. त्याजवरून राजश्री ज्यनार्दनपंत देशपांडये शिवापूरकर याणी वतंदारांस बोलाऊन चौकसी करून पत्राचे मसूद्याची याद समस्त वतंदाराचे नावे ठरोन कुलकर्णीयाचे हातची लेहून घेतली. त्याप्रमाणें जाग्याचें पत्र व्हावें ती याद एकीकडे ठेऊन चौधा वतनदारांचा लोप करून एकटा बंदरचा सेट्या आपले नावचें पत्र आपल्या हातून लिहून गैरमाहितीच्या व दहशतीने व भिडेने साक्षी घालून पत्र करून देतो. त्यास कसबे मजकूरची व्यवस्था तरी खोती सर्व अधिकार श्रीकालवहिरवदेव याचे खुमाखुमाचे कारभारी सरकारची उगवणी करितात. अंगारकाचे कारकीर्दीत जमाती खुमाचा कारभारी सणग्या याणे सरखेल यास नजर देऊन खोतीचे वतनपत्र करून घेऊन वहीवाट करू लागला.
~~~~~~~~~~~~~~~~~~

स्वराज्य होतांच सरकारांत आम्ही सर्वांनी विनंति करून सणग्यापासून खोतीचे पत्र माघारे घेतले व हाली सेट्यापा यांणें सरसुभा गैरवाका समजाऊन कारभाराचे पत्र करून घेतले. हे आम्हांस समजल्यावर उलट-पत्र घेतले. असे असोन शेट्यापा सर्वा वतंदारांचा उपमर्द करून आपल्ये नावाचें आपल्ये हातून पत्र लेहून देतो. याचा अंगीकार वेदमूर्ति राजश्री धोंडभट तात्या भागवत सेट्याचे साधनविषई एकपक्षी मजकूर महाराजांस समजावितात. आमचा मजकूर साहेबाची गाठ पडोन निवेदन होत नाही. त्यास महाराज कृपाळू होऊन सर्वा वतनदारांचे नावे पत्र घेऊन पुरातन जागांचा जीर्णोद्धार करावा ऐसा सर्वांचा मनोछाह आहे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. २०८-२०९.

२५ एप्रिल १६९६ ] (-२०४-) [ वैशाख शुद्ध ४ शनवार, रा. श. २२

श्री माहादेउ

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके २२ धातृनाम संवत्सरे वैशाख शुध चतुर्थी मंदवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजाराम छत्रपती याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित अमात्य हुकुमत पन्हा यांसि आज्ञा केली यैसी जे. मल्हारजी बिन कुलथोजी भांडवलकर याणी स्वामीचे सेवेसी विदित केले. श्री (महादेऊ) येथील पुजारेपण आपले पुर्वापर चालत आहे. यैसे असता श्री (महादेऊ) चे बडवे कथला करिताती तरी स्वामीने गोतमुखे बर हक निवाडा करउन जसा गोतमुखे निवाडा होईल तैसे पुजारेपण चालविले पाहिजे म्हणोन विनती केली. त्यावरून तुम्हांस हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी तुम्हीं गोत जमा करउन त्यांवरी मल्हारजी भांडवलकर याची व बडवे याची मनसुफी टाकून श्रीची आण घालून बर हक निवाडा करवणे. गोतमुखें मल्हारजी भाडवलकर याचे पुजारेपण खरे जाले तरी याचे स्वाधीन करउन पूर्वापर चालल्याप्रमाणे चालवणे. बडवे यांस कथला करू न देणे. जाणिजे. बहुत लिहिणे तरी तुम्ही सुज्ञ असा. [शिक्का-' मर्या: देयं विरा: जते ']

बार

~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. म. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. ९५-९६.

२६ जानेवारी १६९७ ] (-२०५-) [ माघ शुद्ध १५ मंगळवार, धाता संवत्सर

श्री

श्री मत्षट्कर्मनिरतांतः करणराजमान्यराजश्रीकऱ्हाटक-तथा-वाल्मीकक्षेत्रवासिसमस्तविद्वद्वैदिकवृंदेषु तथेतरमान्यब्राम्हणेषु च पोष्य श्रीकराचार्य पंडितराय नमस्कार

धातृनामसंवत्सरे माघ पौर्णिमा भौमवासरे लिखितमिदं पत्रं गत संवत्सरे नारोशिवदेवेन रेठरेकरकर्णिकेन समागत्य निवेदितं स्वस्य कन्या नरशिंपुरस्थ कर्णिकेन कृष्णाजी अनंतेन बलात्कारेण मछींद्रगिरिदुर्गस्थिततास्रदूतान् प्रेषयित्वा नीता कस्यचिद्ब्राम्हणस्य हस्ताद्विवाहश्च कृत्वा गृहीतः स्वस्यचाशौचं स्थितं अतः पुनर्विवाहार्थं अनुज्ञा दयेति। तदनंतरं बहुभिर्ब्राम्हणैः सह विचारं विधाय आशौचमध्ये विवाहविधेरनुचितत्वा ज्जातो विवाहो न वैधः केवलं वृथाचेष्टैवेति निश्चित्य पुनर्विवाहकरणाय अनुज्ञापत्र मर्पितं। ततोतिक्रांते कियदनेहसि नारोशिवदेवैः स्वजामात्रा सह संविदं विधाय तस्मादेव निजकन्यामनुमोदितवान्। विदित्वा चेदमितंस्तस्मैं बहिष्कारपत्रं प्रेषितं। तथा तज्जामात्रेपि बलात् कन्यामपहृत्य विवाहं कृतवते बहिष्कारः कृतः। ततो बहिष्कारभयात् नारोशिवदेवनागत्य निवेदितं स्वस्य बलात्कारेण कन्या नीता विवाहिता चेति रोषवशात् मयालीकमुद्भवितं न वास्तवं। तच्च तत्कालस्थितब्राम्हणसक्षिकतया यथार्थमिति निश्चितं। ततः श्वसुरजामात्रोः वाग्दोषकन्यापहारवतोः कतिचित्कालं हव्यकव्यादिब्राम्हणकर्मविलोपवतो स्वदुचितं राजदंडं ब्रम्हदंडं च गृहीत्वा यथोचितप्रायश्चिताचरणाय आज्ञां कृत्वा शुद्धौ कृतौ स्तः। अतः सर्वैर्ब्राम्हणैः एतैः सह यथापूर्वमन्नोदकव्यवहारो योनिसंबंधश्च निर्विचिकित्सं विधेयः केनापि शंका न विधेयेति शुद्धिपत्रमिदमिति विदितमस्तु हे विज्ञप्तिः।

[ भाषांतर ]

श्री

श्रीमत्षट्कर्मनिरतांतः करण राजमान्य राजश्री कऱ्हाड व वाल्मिक क्षेत्रवासी समस्त विद्वान् वैदिक ब्राम्हण व इतर राजमान्य ब्राम्हण यांसी. पोष्य श्रीकराचार्य पंडितराय यांचा नमस्कार. धातृनाम संवत्सर माघ पौर्णिमा मंगळवार रोजीं पत्र लिहितों कीं, गेल्या सालीं रेठरेकर कुळकर्णी नारो शिवदेव यानें आमचेकडे येऊन कळविलें कीं, त्याची मुलगी नरशिंपूरकर कुळकर्णी कृष्णाजी अनंत याने मच्छिंद्रगड किल्ल्यावरील मुसलमान शिपायांना पाठवून बळजबरीनें पळवून नेली आणि एका ब्राम्हणाकडून तिचें लग्न करून घेतलें. मला सुतक आहे एवढ्याकरितां तिचा फिरून लग्नविधि करण्याची आज्ञा द्यावी अशी त्यानें इच्छा दर्शविली. त्यानंतर आम्हीं बऱ्याच ब्राम्हणांसह विचार करितां सुतकांत विवाहविधि करणें अनुचित, झालेला विवाह यथाविधि झालेला नाहीं व तो कांहीं तरी आहे हें निश्चित केलें, व विवाहविधि पुन्हा करण्याची त्यास आम्हीं परवानगी दिली. कांहीं दिवस लोटल्यावर नारो शिवदेवाने त्याच्या जांवयाशीं सल्ला करून त्याला स्वतःची मुलगी देऊं केली, हें आम्हांस समजून आम्हीं त्याच्याकडे बहिष्कारपत्र पाठविलें. त्याचप्रमाणें बलात्कार करून मुलगी पळवून विवाह करणाऱ्या जावयासही बहिष्कृत केलें. नारो शिवदेवानें बहिष्कार भयानें आम्हांस येऊन सांगितलें कीं, माझी मुलगी बलात्कारानें नेऊन तिच्याशीं लग्न केलें ही गोष्ट वास्तविक नसून आकसानें खोटी वदंता उठविली आहे. ही गोष्ट त्या वेळच्या हजर असलेल्या ब्राम्हणांच्या साक्षीवरून खरी आहे अस

आम्ही निश्चय केला. वाग्दोष, कन्यापहारदोष व हव्यकव्यादि ब्राम्हणकर्मांच्या लोपाच्या दोष ज्या सासऱ्याजांवयांकडे लागूं झाला आहे त्यांजकडून उचित असा राजदंड व ब्रम्हदंड घेऊन त्यांस योग्य प्रायश्चित घेण्याची आज्ञा करून शुद्ध केलें आहे. यापुढें सर्व ब्राम्हणांनीं त्यांच्याशीं पूर्ववत् अन्नोदकव्यवहार व शरीरसंबंध कोणत्याहि प्रकारच्या संशय न घेतां करावा. कोणींही शंका उपस्थित करूं नये म्हणून हें शुद्धिपत्र दिलें आहे. कळावें हे विज्ञापना.

चित्रमयगजत, व. १८, अं ५, मे १९२७, पृ. २०१-२०२. [फोटो छापला आहे]

८ फेब्रुवारी १६९७ ] (-२०६-) [२५ रजब, सबा तिसैन अलफ

श्री महाराज कैलासवासी

श्रीमंत पंतसचीव स्वा ... ... नागोजी नाईक व समस्त देसमुख कोंडे ता खेडेबारे सा दडवत बिनंती ता छ २५ माहे रजब सुा सन सबा तिसैन अलफ पावेतो प्रो मारचे वर्तमान यथास्तीत असे. ... ... बिा साहेबाचे आज्ञापत्र सादर झाले तेथें आज्ञा की राजश्री रूद्राजी सखाजी देसकुलकर्णी हे आपल्या वतनावरी आले आहेत. तरी पूर्वी पासून ज्याचे असेल त्याच्या हातें कारभार घेत जाणें. राजश्री बाळाजी बापूजी यांचे बिसी कथला करीतील तरी त्यास समजाऊन सांगणें म्हणोन आज्ञा. ऐश्यास राजश्री नारो भिकाजी यांचे देसकुळकर्ण व कसबा व सिवापूर व पांचही गाव कुळकर्ण याचे वडील पिढी दरपिढी चालवीत आले. वडील घराणे याचे चिमणाजी बापूजी याचे घराणे धाकटे. त्यास नारो भिकाजी याच्या वडिलापासून येकास येकच पुत्र होत आला. प्राा कारभार फार पडो लागला. मग नारो भिकाजीचे वडील म्हणो लागले कीं दुसरा मुतालीक कैसियास टेवावा. आपले भाउ चिमणाजीचे घराणे त्याचाही चुकुरकाल आहे त्यास मुतालकी द्यावी. ऐसी आप्तता मनामधें धरून याच्या घराणियास मुतालिकी दिल्ही. ईश्वरइच्छेने बाळाजी बापूजीचे घराणे लक्ष्मीनें हाती धरील व गावकलाती (?) थोरथोर जाल्या. नारो भिकाजी याच्या घरास वग कोण्हाची नाहीं याकर्ता हे मुतालिकच बल्कावले. त्यावरी राजश्री सखो भिकाजी याणी राजश्री महाराज कैलासवासी साहेब याचे वेलेस वाद सांगितला. त्यास चिमणाजी बापूजी याच्या वगी थोर थोर लाच कुसपतीच्या बळे यास लेखिले नाही. सखो भिकाजी याचे महजर खरेपणाचे जाले होते ते वगीयाच्या बले फाडिले. त्यास राजश्री (महाराज कैलासवासी) साहेब बोलीलें कीं सखो भिकाजी तुझे वतन खरें पुढे साहेब तुझे तुजला देतील. परंतु च्यार दिवस राज्यकारभाराकरिता सरकारकुनाची मने मोडिता येत नाहीत. याजकरिता याचा निवडा प्रस्तुत करिता येत नाही. ते समयी तैसेच राहिले. ऐसे आपल्या वडिलांचे वेळेस व आपणादेखता झाले. त्यास हाली

रूद्राजी सखाजी तर्फ मजकुरी आले. त्याणी बाळाजी बापूजी यासी गाठी घातली कीं तुज देसकुळकर्णी व कसबा शिवापूरचे व पाचागावचिे कुळकर्ण आपली आहेत. तुज देसकुळकर्णी करावयास गरज नाही म्हणून सिवापूरच्या पारावरी बाजारचे दिवशी दोही दिली की जर तुम्हास वाद सांगणे असेल तर गोतामध्ये अगर दिवाणात चालणे. त्यास बाळाजी बापूजी म्हणो लागला की आपणास वाद सांगवत नाही. ऐसे वर्तमान जाले. हक हिसाबी तों नारो भिकाजी याचे वडील घराणे चिमणाजी बापूजी याचे धाकटे घराणे हे आमच्या वडिलाचे वडिली सांगत आले आहेत व आम्हासही ठावके आहे. उभयताची पाठी राखोन लिहिले असेल तरी श्री ची आण असे. सदरहु करीणा येणे प्रमाणे असे. यास साहेब आज्ञा करितील त्या प्रमाणे वर्तणूक करू. सेवेसी श्रुत होय हे अर्जदास.

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १-४, पृ. १५७-८.

१६ मार्च १६९७ ] (-२०७-) [ चैत्र शुद्ध ३ मंगळवार, शके १६१९

बाजीप्रभुच्या पुत्रांमधील शके १६१९ चैत्र शु. ३ मंगळवार रोजीं किल्ले रांगणा उर्फ प्रसिधगड येथें झालेलें वाटणी पत्र–त्याखालील हजर सभासदांचीं नांवे--

कृष्णाजी बिन यशवंतराव मोरे प्रतापराव.
चांदजी कदम मोकादम मौजे निगडें तालुके कोले
माधदाजी बापुजी पिटके खुद्द लिहिला देश कुलकर्णी प्रांत वाई प्रांत कऱ्हाड तालुके कलम
ओऊनी निळकंठ घोलकर
कृष्णाजी काशी कुळकर्णी
त्र्यंबक बाबजी प्रभु तल्कर
गोविंद विश्वनाथ प्रभुनाडकर बंदर वीस व जाबनवीस बंदर तालुके संबरापट्टण.
शामजी माहादेव मुतालीक देसाई प्रत सासे ऊर्फ तालुके पेण.
आत्माजी दत्तो देशकुलकर्णी प्रांत कोंढवी तालुके तुडील उर्फ विन्हेर दस्तूर गोविंद आत्माजी देश कुलकर्णी प्रगणे मजकूर.
दादाजी दरेकर मोकादम मौजे आधिले तपे करेपटार प्रत पुणें.
मोरो उधव जवलकर.
एसाजी कृष्ण ठाणेकर.
विठ्ठल त्र्यंबक खासनिर्वेसि.
कृष्णाजी हरि दिनकरराव सरनाईक मामले दाभोल.
गोविंद कान्हो.
बावजी निलकंठ चेऊलकर.
संगोजी शंकर प्रभु तुंगारी वास्तव्य राजापूर हल्ली मुा प्रसिद्धगड स्वस्ताक्षर.
मुकुंद माहादेव किल्ले कल्याण कुलकर्णी.
त्रंबक गोविंद काल्हेकर.
गणेश रखमागंद.
रघुजी सिवजी देशकुलकर्णी प्रा तलोजे.
त्रंबक कालो कुलकर्णी मौजे उंबर्ड ता पेण प्रा सांकसे.

कोल्हो बापुजी निमख कुलकर्णी मिठबाव-
घर पणवेल.
रामचंद्र त्र्यंबक देशकुलकर्णी प्रगणे वेसवी.
महनाजी नागनाथ दुरूडकर चौघले.
उधो भास्कर प्रभु पेणेकर
गोविंद दामोधर प्रभु चेऊळकर.
विठल त्रिमल माहाडकर.
रामजी आबाजी प्रभु देशकुलकर्णी व गांव
कुलकर्णी व टिपनिसी माहाल प्रांत
बिरवाडी मामले राईर स्वस्ताक्षर.
माबदाजी कृष्ण पालवणकर.
दादाजी रघुनाथ व विसाजी रघुनाथ
प्रभु देशकुलकर्णी व गांव कुलकर्णी
प्रांत माहाड.
माहादजी शंकर देशकुलकर्णी तालुके
रोहिडखोरे.
नरसो बाबाजी व जगन्नाथ विठल प्रभु
देशकुलकर्णी व गांवकुलकर्णी
तालुके मोसेखोरे.
मल्हार विश्वनाथ वेस्वीकर.
सुभाजी महादेव व कृष्णाजी माहादेव कुल-
कर्णी मौजे कसर नवलंगे प्रा नलबुंगे.
मोरोबलाळ दाभोळकर.
त्रंबक मलार तळकर.
रामचंद्र गोविंद दुर्गवडीकर कुलकर्णी.
माबदांजी भिकाजी प्रभु शाबबडीकर
नाईकजी घोलप प्रा मौजे सांगवी ता
रोहिड खोरे.
सूर्याजी साबणे मोकादम मौजे पन्हर
खुर्द ता हिरडस मावळ.
तिमाजी पाटील मौजे फेतु प्रा पुणे.

महाराष्ट्र–साहित्य, व. १, अं. ४, आक्टोबर १९१९, पृ. १४१–२.

२३ मार्च १६९७ ] (–२०८–) [ ९ रमजान, सबा तीसैन अलफ

श्री

अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्यराजश्री रामाजी अनंत सरसुबेदार व कारकून प्रांत राजापूर गो

सेवक रामचंद्र नीलकंठ नमस्कार सुा सबा तीसैन अलफ नार माजन देसाई का मीठगव्हाणे याणे हुजूर एऊन वीदीत केलें कीं गोवीद माजनी देसाई का मजकूर याचा आपला देशमूखीचा वाटा पूर्वी जाला. त्या ऊपरी आपला बाप गोवीद माजनी यास अदलेशाही कारकीर्दीस ईनामत ठीकणे करून दील्ही बीतपसील

| | | | |
|---|---|---|---|
| मला साखरवट | १ | खर बोकील | १ |
| अगर नजीक कारवीने | १ | खरी नजीक बाडी चव्हाण | १ |

एणेप्रमाणें च्यारी ठीकणे आहेत. त्यास गोवीद माजनी सदरहू ठीकाणाचा वीभागावीशी कटकट करीतों. याचे पारपत्य केलें पाहीजे म्हणुन तपसीले वीदत केलें. त्यावरून हे पत्र तुम्हास लिहिलें असे. तरी तुम्हीं हरएक मनसूफी माहालीचे वतनदार वृध बहूतकाली असतील त्यास व हमशाही गावीचे खोत मीरासदार असतील त्यास

आणुन चौकसीने सत्य स्मरोन याचा त्याचा वीभाग त्या उपरी नार माजन याच्या वडीली सदरहू वृती साधन केली तरी गोविंद माजनी यास ताकीद कर ...... बोभाट एऊ न देणे. जाणीजे. छ ९ रमजान. नीदेश समक्ष. [ शिक्का– ' लेखनः सीमा समु ः लसति ] '

भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. ७८–७९.

१ एप्रिल १६९७ ] (– २०९ –) [ १८ रमजान, सबा तिसैन अलफ

जयरामस्वामी श्रीशंकर

राजश्री सरदार पागा व सिलेदार गोसांवी यांसि

॥ छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य...... श्रीा संताजी घोरपडे सेनापति जफ्तनमुलक जोहार सुा सबा तिसैन अलफ. मौजे वडगांउ ताा निंबसोडी हा गांव राजश्री यांचा आहे. तरी तुम्ही या गावाच्या वाटे नंव जाणे. गेलिया तुमचा मुलाहिजा होणार नाही. यैसे खरें समजोन या गावाचे वाटे नंव जाणे. जाणिजे. छ १८ रमजान.

[ शिक्का ]

[ शिक्का– ' श्री राजा ः रामभक्तस्य ज ः फतन्मुलकस्य च ः संताजी... ः ... '. ]

भा. इ. स. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७ स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३१४.

१६ मे १६९७ ] (– २१० –) [ ५ जिलकाद, सबा तिसैन अलफ

माहाजर व तारीख छ ५ माहे जिलकाद अज मोकाम चिपुलण मामले महजाबाद अमाल बंदर मैमुन मुस्तफाबाद सुहुर सन सबा तिसैन अलफ बिहुजूर हाजीर मजालसी

वेदमूर्ति कसबे मजकूर
अवधूतभट धर्माधिकरणी
सिवराम भट धर्माधिकरणी
अनंत भट मंत्रभट
हर जोसी गोविंद जोसी
विश्वनाथभट पटवर्धन
राजश्री बालाजी विश्वनाथ देशमुख मामले दंडाराजपुरी व अधिकारी स्त्रीवर्धन
राजश्री उधाजी भागवत सताजी भागवत

राजश्री गणेश माहादेव हवालदार ताा मजकूर
रामाजी पंताजी मजमदार ताा मजकूर
देसक मामले मजकूर
रंगोवा नाइक सरदेसाई
खंडो अबाजी जानीब खंडो बलाल देसमुख
नारो रघुनाथ मोकादम दिाा सांवरकर

देवजी भागवत
जोत्याजी चवाण
जैतोजी रणनवरे
राणोजी वागचवरे पाटील मौजे आल्गाव ता तरवडे
मलजी गावडे गौड वस्ती राजोली ता फलटण
बवाजी होनमणे वस्ति तराडगा ता फलटण
सखोजी गाजरे पाटील मौजे मणुर बुा ता वाई
कासोजी गाजरे पाटील मौजे पारनेर पा हुजर
सुभानजी रणनवरे पाटील मौजे रांक पा सासवड
संताजी सिंदे शामजी कायदेव बावरे पाटील कसबे कुडाल
विष्णु अबाजी मोकासाई
अंताजीराव पेडाबकर
संभाजीराव पेडाबकर
तानाजीराव वाडकर
येसाजीराव वाडकर
गंगाजीराव तिवरेकर
धारोजी राव तिवरेकर
रायाजी राव व रामाजीराव अडिरेकर
सूर्याजीराव नादिवसेकर
मानोजीराव ठेरूकर
सूर्याजीराव वोवेलीकर
तानाजीराव रूद्राजीराव कादवाडकर
कृष्णाजी व रामजी इगवला वस्ती मौजे दलवठणे

देसक कर्याति चिपळूण
महमदजी देसाई
श्रावणसेट सेटिया
तुकसेट माहाजन
हरी कृष्ण आा कदीम देशकुलकर्णी काले
राघो विस्वनाथ जानीब त्र्यंबक राहुजी
गोविंद रघुनाथ निघावन कसबे मजकूर
अंतो परशराम व निळो नरसीह पतकी जकात मजकूर
गंगाधर हरि
उदमी कसबे मजकर
तिमाजी नाइक देउसकर
त्रिंबक नाइक चिखले पोतदार मीठबंदर मजकूर
नारोबा नाइक वालदेव
नारोबा खोडगडां महाजन
गणो अदाजी
परशराम मोहिता
बकाल कसबे मजकूर
लखसेट चौधरी
गोदसेट वाडकर
लालसेट पोतदार जैतसेट माहाकाल
ता जमाती
हसजी वणगा अलगी देसाई
हसाजीराब व बाबाजीराउ पाळांडे
ता कासार भीकसेट
ता सोनार कृष्णसेट सेटिया
ताफे गौली
संभु म्हेतर हर गौली उसाल
ताफे साली
संभु ताबिया विठोजी काबली
तुकसेट बलकारी
कसबा ताफे साठिये
आबाजी म्हेतर इसुफजी म्हेतर
ठाणगे ता मजकूर

मुडकोजी पडवेल माहादजी कडू

डांगिये जकात चौधरे मजकूर

कानोजी डांगी येलोजी डांगी

भिका तेली कसबे मजकूर

कानसेट म्हेतर सिंपी

निला व धारा परीट

हजाम म्हेतर

तेज माहाला व राम माहाला

जोग सालवी व बाजे कुंभार

पिला वावरी

पिलभा गुरव भैरवकर

लखमोजी गुरव केदारकर

सबा माहार कसबे मजकूर

जाहालां माहाजर ऐसा जे. बाकोजी घाटोरा व मानाजी घाटोरा वस्ती मौजे दलवठणे ता। मजकूर हाली वस्ती मौजे सिदी ता। मलवडी अग्रवादी बादजी बिन तुकोजी सावलकर व बाजी सावलकर वस्ती अधली ता। मलवडी पस्चमवादी या उभयतामध्ये पेठ धणगराची ता। मजकूर यत्ये त्याचे वडीलपणाचें गाउडिकीचा वेव्हार लागला म्हणून भांडत ता। मजकुरास आले. गोतांमध्ये मनसुब्रीस उभे न राहातां बांकोजी घाटोरा व मानाजी घाटोरा हे दोघेजण राजश्री गणेश माहादेव हवालदार ता। मजकूर याजवल येउन उभें राहिले. त्याही गोत मलउन हरदुजणाच्या तकरीरा लिहोन घेतल्या. छ २० माहे रजब ( ३ फेब्रुवारी १६९७ )

बाकोजी घाटोरा व मानाजी घाटोरा अग्रवादी याणी तकरीर केली की ता। मजकूरचे पेठेचे गावडेपण पुरातन आपले चालत आले. ऐसियासी माहाराज राजश्री कैलासवासी छत्रपती स्वामींची नवी काबिजात जाहाली. ते समई केशवसेट सेटे ता। मजकुर गाव टाकून कऱ्हाड प्रांते गेले. तें समई आपला बाप पदाजी घाटोरा सेटिये बाहीर पडिले म्हणून घाटावरी गेला. तेथे पदाजी घाटोरा मरोन गेला. आपण लाहान होतों. कोकणांत यावया फावले नाहीं. वरकड धणगर पेठेस येत च होते.

बादजी सावलकर व बाजी सावलकर पस्चमवादी याणी तकरीर केली की पेठ मजकूरचे वडीलपण आपलें पिढी दर पिढी चालत आले आहे. पिढया

१ राघोजी

१ गोसाजी

१ सिरसोजी

१ बादजी

१ तुकोजी

१ बली बादजी

६

येणेप्रमाणे आपले वडीलपण पिढी दर पिढी चालत आलें आहे. मध्ये बाकोजी

त्यामध्ये तुकोजी सावलकर वडीलपणाचे पान घेउ लागला. हे वर्तमान आपणास कळले. त्यास आपण हि पोख्ता जाहालो. मग आपणहि दलवठणे यासी आलो. तुकोजी सावलकर याची पेठ आली. फरोख्त जाहालियावरी घाटावरी जातां दलवठणें येथे भेटला. तेथे हटकिले की आपले वडीलपणाचे पांन कां घेतोस ऐसे बोलिलो. त्यास वाद सांगो लागला. मग माणकोजी जमादार याजवल उभा राहोन तुकोजीस आणविले. त्याणे हा दु जणाचा कथला आइकोन त्यांणे सांगितले की तुकोजीस पान घ्यावया निसबत नाही. आम्ही घाटोरियानी वडीलकीचे पान घ्यावे ऐसे केले. याउपरी बादजी सावलकर याणे आपल्या पिढिया सांगितल्या त्या लटिक्या. याचा आजा बादजी सावलकर वरकड धनगर येतात ते जातीने येउ लागले. त्यामागे सावलकरांचे कोणी येत नहुते. सांप्रति वडीलपणाचे पान घेतो. तकरीर सही.

घाटोरियानें आपला बाप तुकोजी यासवे दलवठणियात कथला करून माणकोजी जामदार मौजे मजकुरी होता त्याजवल आपल्या बापास नेऊन बोलिला की घाटोरे दलवठणियांत राहातात आणि तुम्ही येऊन यासी न भेटता जाता येता वडीलकीचे पान घेता म्हणून हटकिले. त्यावरी हरदु जणाचा वाद जाहाला. पेठ कोण तागायत चालते आणि दलवठणियात वस्ती कधी हे जातीची बोलणे जाहाले. त्यावरून त्याणे घाटोरीयास लटिके केले. आपल्या बापास सांगितले की तुम्ही जैसी पेठ घेऊन येता तैसे येत जात जाणे. त्यावरी आपणास कोणी अटक केले नाही. अगर दुसरा कोणी पेठेस आला नाही. पहिल्यापासून चालत आले आहे तैसे चालवीत आहो. सांप्रति हालि बाकोजी व मानाजी घाटोरा कथलियास उभा राहिला. घाटावरी दोन तीन स्थली मनसुबी मांडिली. परंतु जाहाली नाहा. उभे राहिलो. परंतु घाटोरा समजेना. हाली येथे आला आहे. हे तकरीर सही.

येणेप्रमाणें तकरीरा लिहोन दिल्या. त्याउपरी गोताने हरदु जणासी पुसिले की घाटावरून दोन तीन स्थलीहून मनसुबीस उभे राहोन फिरत आलेत. या उपरी हे स्थलीची मनसुबी मनात असेल तरी मान्यपत्रे लिहोन देणे. त्या उपरी हरदूजण स्थलास मान्य होऊन राजीनामे लिहोन दिले की चिपुलणचे स्थली मनसुबी निवडील त्याप्रमाणे राजी. जो नाइके कथला करील तो गोताचा वादी व दिवाणचा अन्यायी. म्हणून हरदूजणानी राजीनामे लिहोन दिले. दुसरे दिवसी मनसूबीस गोत मिळाले. मनसूबीस हरदूजण उभे राहिले. मनसूबीमुळें वृद्ध साक्ष मनासी आणिले.

तुकसेट कऱ्हाडकर बैलकारी कसबे मजकुर उमर वरसे ७०।७५ बोलिला की बाकोजी धाटोरा व मानाजी याचा बाप पदाजी यास सेटीनें वडीलकीचे पान दिले. परंतु

जोसी उपाध्ये ब्राह्मण वतनदार यासी पुसिले. त्यास ते बोलिलेकी हा दिवाणगीचा विचार आपणास न कळे. परंतु बाला घाटी धणगर येतात त्याही आपल्या

[ शिक्का ][1] जोर खोरे यांसि आज्ञा केली ऐसी जे. संताजी माहाला याणी हुजूर येऊन विदित केले की मौजे जोर व गोळेगांव व गुळुब तर्फ मजकुर...[पुढील भाग गहाळ]

भा. इ. सं. मं. पंचम संमेलन वृत्त, शके १८३९ स्वी. ग्रं. क्र. २०, पृ. १७.

२२ दिसेंबर १७०२ ] (-२३७-) [ पौष शुद्ध १४ मंगळवार, शके १६२४; १२ साबान, सन १११२ फ.

शके १६२४ चित्रभान संवत्सरे पूस शुध १४ मंगलवार ते दिवसी अवरंगशाह पातशहा मोजे कोरेगाऊ ताा पावल येथें तलेगावीहून आला. तेथून अहादी (?) कनेरसरावरून आले आणि श्रीदेवाचा मंडप व पडशाल पाडिली व कलसही थोडासा वरून पाडिला व देवाचे लेप फोडिले व बैल येक मारिला. परतु स्वयंभ लिंगे वाचली आहेती. त्यास ढका लावला नाहीं थानक मोजे निमगाव नागणा ताा खेड सुाा सन[2] १११२ ह्रु १२ साबान

भा. इ. सं. मंडळ, इ. वार्षिक इतिवृत, शके १८३५, स्वी, ग्रं. क्र. ७, पृ. ४६०-६१.

७ मार्च १७०३ ] (-२३८-) [ चैत्र शुद्ध १ रविवार, शके १६२५; २२ जिल्काद, फ. १११२

[ फारसी मजकूर ]

स्वस्ती श्री नृपशालिवान शेकें १६२५ बरुशे सुभानुनाम संवछरे चैत्र शुध प्रतीपदा रवीवार सुहुर[2] सन १११२ अलफ ( फसली–सुाा नाही ) कारणे रालेश्री वेदमूर्ती रायेभट बीन बाळंभट जोइसी साकीन कसबा मुर्तजाबाद यासी सिदो बाबाजी वा रामाजी महादेव साकीन कसबे मजकुर यांनीं लिहून दिल्हे दानपत्र यैसे जे. अमचे घरामधे ठाव ( टावा ? ) पछेमसी अंकण तीनी ३ सरहद राजेश्री बहिरो जखरस पारसनीस. दक्षण धरून उत्तरेस शारेमुदी भट असे. मधे देवळ नरसीव्ह अमचा कुळस्वामी. तेथून तीनी अंकण टावा अमचे तकसीम वरतील टावा अमचे बापभावाचे असे त्यास समंध नाही. त्याचे गज मजरुबा बा दिाा ...

---

१. शिक्का– 'श्री : आई आदि पुरुषः श्रीराजा शिवछत्रप : ति स्वामिकृपानिधीः तस्यं परशुराम त्र्यंब : क प्रतिनिधि :

२. सन सुहूर ११०३ येतो–येथें सनाचा आकडा सुहूर नसून फसली आहे.

कुळ गज सुमार चोवीस अर्जेगज सुमार पंधरा
२४ १५

यैसे सदरहु होते ते घरटाव अम्ही तुम्हास पाये धुऊन कृतार्थबुधीनें काया-वाच्याकमानसीक सौभाग्यवंती कृष्णवेणी गंगेचे उदक देवब्राह्मण साक्ष करून कृष्णार्पण धार घालून घर दान दिल्हे असे. तुम्ही घरामधे देव पुजावा वेदमंत्रपठण वा आग्नहोत्र करून वैश्वदेव उपासन दिवा लावणे. अमचे कुळस्वामीचे पुजा करून सामा राज लेकरूचे लेकरा ईमारती बाधोन पिडी दरपिडी सुखरूप असीजे. पेस्तर अम्हास त्या घरास अर्थाअर्थ समंध नाही. या घरा विशई अमचे कोणी डाईज गोत्रीज यास समंध नाही वा हरकत वा फितवा केलिया त्यास देवब्राह्मण वा गाईचे आण असे. हे दानपत्र लिहून दिल्हे सही...

घराचे हक हमसाई
दक्षणकडे देवजी अंबाजी अर्जुनवाडकर
मालिचे पाणी पस्छेम भागेस पनाल यार-सनीसाचे अंगणात पडत असे.
ईशानकडे अमचे आड असे सकलिक लोक प्राशन करीत असे.
तिमाजी माहादेऊ

उत्तरेस आनंदरासी गुरव अंबेचा पुजारी मामले मजकुर
अंगणातील पाणी मोहरींचे तोंड पुर्वेकडे पाणी जात असे.
पूर्वभागेस कामणा जडग

वेकाजी रुद्र पत्र प्रमाण साक्ष

स्वहस्त रामाजी माहादेव मो॥ को॥ मुर्तजाबाद

तेरीख २९ माहे जिलकाद
पत्रप्रमाणे साक्षि नृहरि व्यास
पत्रप्रमाणे आणि भट्ट जेरे साक्षि
भागोजी नाईक साक्ष
सीडलम पाटल मामले मुर्तजाबाद

पत्रप्रमाणे साक्षी गोपाळ गोसावी
श्रीनिवास रुद्राजी नाडिगौडा सरकार मजकूर
कृस्णराऊ व्यंकटराउ श्री निवास देसपाडे सरकार मजकुर
वेकाजी दादो देसमुख

भा. इ. सं. मं. त्रै., व. ४, अं. १-४, पृ. ८५-८६,

**१२ मार्च १७०३ ] (-२३९-) [ चैत्र शुद्ध ६ शुक्रवार, रा. श. २९**

श्री

स्वस्ति श्री राज्याभिशेक शके २९ सुभानु सवत्सरे चैत्र शुद्ध षष्टी भृगुवासर क्षत्रीय कुलावतंस राजा शिवछत्रपति याणी वर्धई व खंडई व गणई बेरड नामजाद किले सिहगड यासी आज्ञा केली ऐसी जे. तुंम्ही किले मजकुरा कष्ट मेहनत करिता म्हणून हे वर्तमान राजश्री त्र्यंबक शिवदेव व सिदोजी जाधव मुद्राधारी किले मा।र याणी हुजुरू लिहिले. त्यावरून तुमचे सेवेचा...जाला तरी तुम्ही तैसेच येकनिष्ट सेवक

आहा. पुढेंहि येच रीतीने स्वामी सेवा करीत जाणे म्हणजे तुमची सर्फराजी करितील जाणिजे... ... समक्ष. [ 'मर्या : देया वि : राजिते–शिक्का ' ]

भा. इ. सं. मं. त्रै, ७, अं. १–४, पु. ७४–७५.

१६ एप्रिल १७०३ ] (–२४०–) [ वैशाख शुद्ध ११ शुक्रवार रा. श. २९

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २९ सुभानु नाम (सं)वत्सरे वैत्सख शुध येकादशी भृगुवासरे क्षत्रीय कुलवतंस श्री राजा सिवछत्रपति याणी वर्धाई बेरड व खंडई बेरड यासि आज्ञा केली ऐसी जे. सिहगडास औरंगजेब बिलगला होता. त्यास नतिजा पावावया निमित्य स्वामीने तुम्हास किल्ला मारी ठेविले होते. उतावली करून हिमत सोडून तहरह करून किल्ल्यावरून उतरून राजगडास आलेस. म्हणोन हे वर्तमान धोंडजी चव्हाण दिा लबे याने हुजूर विदीत केले. त्यास स्वामीने तुमचे मदतीस लोक पाठविले. ऐवज दारू पाठविण्यास कांहीं न्यून केले नसतां उताविली करून हिमत सोडून ही गोस्ट केली हे कांहीं बरे केले नाही. पर्जन्य पडेपर्यंत भांडवावयाचा होता ती गोष्ट न केली. याउपरी राजगडी राहून औरंगजेब ( यास न )तिजा पावावयाची आज्ञा केली आहे. तर तुम्ही राजगडी राजश्री शंकराजी पंडित सचीव आहेत त्याची भेटी घेणे आणि त्याचे...पा जमावानसी पर्जन्यकालपर्यंत राहून शत्रूस नतिजा पावणे आणि ( पुढील तीन ओळी फाटल्या आहेत ).

भा. इ. सं. मं. त्रै,. व. ७, अं. १–४, पृ. ७५.

१३ मे १७०३ ] (–२४१–) [ ७ मोहरम, सलास मया अलफ

[ शिक्का ][1]

अज स्वारी राजश्री बालाजी विश्वनाथ दिा राजश्री सेनापती ताा मोकादमानी कसबा सासवड प्राा पुणें सुाा सलास मया आलफ. कसब मजकूर पैकीं घासदाणा स्वार दिा स्वारी मजकूर देणे—

रुाा ४० दाणा .॥. बकरे १

एकूण रु चालीस दाणा दाहा मण रास आदा करणे

छ ७ मोहरम. [ शिक्का–' मोर्तब : सुद ' ]

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, शके १८४१, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. १२६.

---

१. शिक्का– 'श्री उमाकांत : पदोभोज भजनात : समुन्नतेः ॥ बाळाजी : वीश्वनाथस्य मुद्रा : विजयते तरां.'

२७ आगस्ट १७०३ ] (-२४२-) [ श्रावण वद्य ११ शुक्रवार, रा. श. ३०

श्री कृष्ण

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३० सुभानू संवत्सरे श्रावण बहूल येकादसी [ शिक्का ] [ शिक्का ] भृगुवासर क्षत्रीये कुलावंतस श्री राजा सिव छत्रपति याणी वधई बेरड व बाजे यासी आज्ञा केली ऐसी जे. आसीनखानाचा भाऊ न्यामतखान व वाईचा व शिरवलचा फौजदार जमावानसी चालोन आला. त्यासी तुम्ही व बेरडानी गाठ घालून मारून चालविला. तेणेकरून न्यामतखान दस्त केला. घोडा नगरा निशाण पाडाव केला. म्हणोन संताजी खराडे याणी हुजूर लिहिले. त्यावरून तुमचे सेवेचा मुजरा जाला. शाबास तुमची बरी शर्त केली. हाली न्यामतखान फौजदार पाडाऊ जाला आहे तो हुजूर आणविला आसे. संताजी खराडे हुजूर घेऊन येतील. तुम्हाकडे निशाण नगरा पाडाव जाला आसल ते घेऊन तुम्ही हुजूर येणे. स्वामी तुमची सर्फराजे करतील. निदेश समक्ष. मोर्तब.

रूजू सुरू सुद बार

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ७५-७६.

१९ सप्टेबर १७०३ ] (-२४३-) [ १८ जमादिलावल, आर्बा मया अलफ

श्री

राजश्री रामचंद्र लिंगोजी सबनीस जजिरे येसवंत दुरुग गोसावी यांसीं

अखंडित लक्षुमी अलंकृत राजमान्य स्नेहांकित कानोजी आंग्रे सरखेल राम राम. सुा आर्बा मया अलफ तुम्हीं पत्र पाठविलें. लिहिले कीं झांप व वांसे नारल भरुन गांव खाडींतून गलबते आली. त्यास झांप, वांसे कोठे उतरावे म्हणोन तरी येथें तुम्हांस रास झांप वांसे पाहिजेत. तरी जेवडे पाहिजेत तेवढे ठेवणें, बरकड गलबते येथें रवाना करणें. शाकाराचें प्रयोजन नसेल तरी अगदीं भरलीच गलबते देखील नारल रवाना करणें. जाणिजे. रा छ १८ जमादिलावल. [ शिक्का– ' मोर्तब : सुद ' ] [ शिक्का– ' श्री. : राजाराम चरनी : सादर तुकोजीसुत कानोजी : आंगरे नीरंतर ' ]

विविधज्ञानविस्तार. व, ५६, अं. ११, नोव्हेंबर १९२५. पृ. ४९२.

१९ डिसेंबर १७०३ ] (-२४४-) [ २१ साबान, ४७ जुलुस

हजरत जिल्सुभानी महमद अशरफ आलमगीर

मुत्साद्दियानि मोहिमातें हाल व इस्तकबाल व देशमुखान व देसपांडेयानि व मुकदमान व रआयामजारेआन मौजा आवडी पा हवेली मुर्तजाबाद सरकार मजकूर सुभे दारुलजफर विजापूर मनाजी पांच दहां बिघे जमीन बजर बुफ्तादा खारज जमा लायक जिराआत अज सवाद मौजा मजकूर दरवझे मदद माष बयाबाई तसदीक फरके मुबारक मदगान मुकरर व मुतअर्रीज नमुदा शुद बायद के अराजी मजकूररा नमुदा चकबस्ता बतसरूफे ऊवा गुजारन्द के सर्फ मायेषत् खुद नमूदा बादवो बरीकाई दवा मेदौलत आब्रदे मुदत एषते घाल नुमायदं व अराजी मजकूर मरकूअ इनाम दानिस्ता हसबूल... व अमल आरद दरीबाब कदधन तमाम दानद तहरीर फि तारीख २१ शहेर साबान सन ४७ (जुलसबाला) मोर्तब.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अंक १-४, पृ. १००.

१७०३-४ इ. स. ] (-२४५-) [ सन १११३ फसली

[ फारशी शिक्का व मजकूर ]

सिवाय तुमार वासिलाती बर जिमे वजारत व अवाली पनाहा सेख सीराजुदीन महमद दीवान महाल पाये वाकी पा खेड-धामणी सां वासीम सुबे वराड पायाघाट सुा सन १११३ (फसली) अज तहसील तहवेल सेक नूरमहंमद नायेब वजारतपन्हा मजकूर मोकरार टके १९७६९॥४॥ मा येकुन ईस हजार सातसे येकुनहातर टके साडेअठावीस रुके रास जागीर सैद जाहाबाजखान टके १४९१९॥४॥ जागीर सुभानजी दमे टके ४८५०८ दे्ा देसमुखान दे्ा विटोजी आ देसपाडिये सहस्त देसमुखान

अवधूतजी व धर्माजी अवधूतजी प्रताप

दताजी कोनेर

नारायेनजी

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ५२.

१७०३-१७०४ इ. स. ] (-२४६-) [ सन १११३ फसला

श्रीशंकर

फारखती बगो राजश्री कचेश्वरभट ब्रम्हे का चाकण यांसि एसाजी देशमुख प्रा मार सुा सन १११३ (फसली ?) कारणें फारखती लेहोन दिधली ऐसा जे.

तुम्हास परवाना इनामतीचा मौजे गोनोडी व मौज आंबिलें या दोन्हीं गावांचा इनामतीचा परवाना करून आणावयाबदल पातशाही लस्करास चौघांनीं रूा ७०० सातसे देऊन पाठविले. त्यास सतराअठरा वरसें पैकियास जालीं. परंत परवाना तलास करितां न जाला. मग आपआपले तकसीमेचे रूा १७५ पावणेदोनसे त्यापैकीं आपण तुम्हाला सोडिले रूपये १२॥ साडेबारा. ते आपण आपले भरून पावलों. तुमची मेहनती बुडाली. आपले व्याज बुडालें. तुम्हासी आपणासी अर्थाअर्थी समंध नाहीं. आपले भाऊबंद मूललेकरूं कोण्ही मुजाहीम होणार नाहीं. यास अन्यथा करूं तरी श्रीजीची आण असे. पूर्वजाची आण असे. हें लिहिलें सही.

रामजोसी का मा।र
मल्हारजी पा।। ढोकला मौजे करंदी का मा।र.

गोही कृष्णभट पुराणीक का मा।।र
सदू नाणेकर का मा।र.
रामजी तोडकरी का मा।र.

श्रीसरस्वतीमंदिर, व. ८, अं. ११-१२, क्र. ४५-६ माघ-फाल्गुन १८३० शके, पृ. १४-५.

**(-२४७-)** **[वैशाख शुद्ध ३ मंगळवार, रा. श. ३०; १ मोहरम, आर्बा मया अलफ**
**२५ एप्रिल १७०४]**

श्री

विठलदेव

श्री सकल गुणमंडित अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री अंताजी त्रिमल देशाधिकारी व देशलेखक वर्तमान भावी प्रांत पुणे, गोसावी यांसी प्रती श्रीकराचार्य पंडितराय आशिर्वाद. राज्याभिषेक शके ३० तारणनामसंवत्सरे वैशाख शुद्ध तृतिया भौमवासेर राजश्री तुकोबा गोसावी सत्पुरुष यांचे पुत्र नारोबा गोसावी यांनी किल्ले प्रसिद्धगडीचे मुक्कामीं राजश्री स्वामीसन्निध आपले शिष्य सखोबा गोसावी याबरोबर पत्र पाठविले. तेथें विज्ञप्ति लिहिली कीं राजश्री तुकोबा गोसावी थोर सत्पुरुष मौजे देहू पा। पुणे येथें भगवत्कथा करितां अदृश्य झाले. हे गोष्टी विख्यात आहे. त्यांच्या हस्तें पूजा श्री(विटल)या देवाचे मूर्तीची होत होती. ते पूजा आपण चालवीत आहो. पूजेचे अनुकूलतेकारणें राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांनी मौजे मजकूर (अर्धा इनाम) श्री देवास दिल्हें होतें. ऐतियास महाराज धर्मपरायण आहेत. देवाची पूजा उत्तरोत्तर चाललीयानें तें श्रेय महाराजांस आहे. यास्तव मौजे मजकूर श्रीस इनाम दिले पाहिजे म्हणोन विज्ञप्ति लिहिली. त्यावरुन राजश्री स्वामींनीं मनास आणितां राजश्री तुकोबा गोसावी बहुत थोर सत्पुरुष भगवत् साक्षात्कारी पुरुष होते. यांचे पुत्र राजश्री नारोबा गोसावीही भगवत्परायण आहेत. तुकोबा गोसावी स्वहस्तें श्रीची पूजा करीत होते. ते पूजा नारोबा गोसावीही चालवीत आहेत. देहू बहुत जाग्रत स्थान आहे. तेथें पूजापुरस्कार उत्तरोत्तर उत्तमप्रकारें नियत चाललियानें राज्यास कल्याण आहे. यास्तव राजश्री स्वामींनीं मौजे देहू पा। पुणें संपूर्ण देह १

एक श्रीचे पूजेकारणें कुलबाब कुलकानू हल्लीपट्टी व पैस्तरपट्टी देखील खेरीज हक्कदार इनाम सर्व इनाम दिल्हा. तेथील वेठीबेगारी सर्व उपसर्ग मुक्त केले आणि मौजे मजकूर तुकोबा गोसावी यांचे पुत्र नारोबा गोसावी आदिकरून जें वंशपरंपरा त्यांचे स्वाधीन केले आहे. तुम्ही मौजे मजकूर रा० नारोबा गोसावी यांचे स्वाधीन ग्राम चतुःसीमासहित करणे. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे. प्रति लिहून घेऊन मुख्य पत्र परतून देणे. छ. १ मोहरम सुा अर्बा मया व अलफ. हे आशीर्वाद.

विविधज्ञानविस्तार, व. ३३, अं. ११-१२, दिसेंबर १९०२, पृ. ३७५-६,

१९ एप्रिल १७०५ ] (-२४८-) [ वैशाख शुद्ध ७ गुरुवार, जुलुस ४९

०॥ श्रीशंकर

राजश्री श्री देव स्वामीचे सेवेसी

०॥ छ श्रीमत् परमपूज्य तपोनिधी मुक्तिदायक सकलगुणालंकरण देवमान्य वरदमूर्तीपरायण राजमान्य राजश्री

आज्ञाधारक सेवेसी मातुश्री येसूबाई साहेब दोनी करकमल जोडून चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंति उपरी. येथील क्षेम तागाईत वैशाख सुध सप्तमी गुरुवार जाणऊन मुकाम अहमदानगरी दुर्गात स्वामींच्या आशीर्वादे करून यथास्थित असे. स्वकीय कुशललेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष बहुत दिवस जाले. स्वामीनी आशीर्वादपत्र पाठवून बालकाचा परामृश केला नाहीं. या करितां चितास स्वस्थता होत नाही. ते देव जाणे. तरी स्वामीनी येणारा मनुष्य बराबरी प्रतिक्षणीं आशीर्वादपत्र पाठवित गेले पाहिजे. विशेष आमचें वर्तमान तरी स्वामीपासी सत्यच लेखन केले पाहिजे. चिरंजीव दाजी तों पृथ्वीपतीसमागमें गेले. आम्हास सार्वभौमाची आज्ञा जाली की अहमदानगरास जावे. आज्ञेप्रमाणे आम्हास अहमदानगरास घेऊन आले. येथें आलियावरीं आजी पांच मास जाले. परंतु खर्चाची बहुत तंगचाई जाली. काय निमित्य तरी सार्वभौम दूर गेले. अमचा तनखा जो दिल्हा तेथे ताम्रानी व हरिभक्तानी व काही काळाने करून प्रतीकूल जाली. त्यामुळें द्रव्य येणे राहिले. येथे अहमदानगरी साहुकाराचे पांच सात सहस्र ब्रह्मस्व जाले. आता कोण्ही देत नाही. मागिल्याच पैकियास तागादे लाविले आहेत. त्याच्यामुळे बहुत कष्टी होतो. तो दुःखसागर स्वामीस काय म्हणऊन ल्याहावा न जाणो. स्वामीच्या सेवेसी रायाजी जाधव पाठविला असे. तरी माहाराज कैलासवासी स्वामी गेल्या तागाईत आपणावरि हा कसाला प्राप्त जाला. इंगळास बोळंबे लागले. बरें होणार भविष्य त्यास यत्न काय आहे. आतां एक स्वामी वितरिक्त

आणीक कोणाचा भरवसा या समयांत नाहीं. एक स्वामी च क्लेश परिहार करितील. इतराच्याने काही होणे नाही. सारांश गोष्टी की ब्रह्मस्तापासून मुक्त केलियाने बहुत कीर्ति स्वामीची आहे आणि पाऊस पाणी जालियावरी स्वामी ज्यापासून देवितील त्यास प्रविष्ट करून. परंतु हा समय आम्हावरी कठीण पडला आहे. आपले कोणी येथें प्रतिपक्षी नाही. ऐसा प्रसंग प्राप्त जाला आहे. याचे निवारण करणार स्वामी आहेत. माझी उपेक्षा केली न पाहिजे. वरकड चिरंजिवाकडील सामराज व आमचे वर्तमान रायाजी मुखांतरी चरणापाशी विनंती करितां श्रुत होईल. तें सत्यच मानणे. विशेष त्याहाचे तरी आपण अज्ञान मूढ. असें लिहिता येत नाही अथवा ज्ञान हि नाही. त्याहिवरि आपणाजवळी कोण्ही शाहणा कारकून नाही. आवाक्षराची क्षमा केली पाहिजे. कृपा आशीर्वाद निरंतर करीत गेले पाहिजे. कृपा असो दीजे. जाणिजे. मो [ शिक्का– ' श्री: मोर्तब: सुद ']

सेवेसी सेवक बसवंताने चरणावरी मस्तक ठेऊन सां दंडवत विनंति उपरि. लिा परिसीजे. मी सेवक असे. आशीर्वाद पत्र पाठवीत जाणे. जाणीजे. हे विनंति. रा छ ११ माह मोहरम सन ४९ (२४ एप्रिल १७०५). हे विज्ञापना.

भा. इं. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. २९८–२९९.

२८ एप्रील १७०५ ] (– २४९ –) [ १५ मोहरम, खमस मया अलफ

श्री

[ शिक्का ][1]

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री शंकराजी पंडीत सचीव ता मोकदम मौजे सिरवली ता पौडखोरे सुा खमस मया अलफ किले सिहगड.

गड गनिमापासून हस्तगत करावयास धारकरी नेमिले. त्यामधे रामजी फाटक पदाती यां बराबरी स्वारी राजश्री पंताजी सिवदेउ यास नेमिले होते. त्याप्रा धारकरीयांत चढोन शर्त करून किला हस्तगत केला. याबदल मौजे मजकूरपैकी मारनिलेस ईनाम राजश्री मोरोपंत प्रधान याच्या धारियाप्रा जमीन खराब राजभाग खडी ४ च्यार खंडीची जमीन ईनाम करून दिल्ही असे. तरी सदरहू जमीन नेमून मारनिलेस कीर्दी करावयास देणे. हे...वितील. छ १५ मोहरम पा हुजूर. [ शिक्का– ' पत्रावधिरयं भाति ' ]

बार सुरु सुद बार

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. २–४, पृ. ८७.

१. शिक्का–' श्रीशंकराजी : नारायण. '

१२ एप्रिल १७०५ ] (–२५०–) [ वैशाख वद्य २ रविवासरे,
रा. श. ३१

श्री

स्वति श्री राज्याभिषेक शके ( ३१ ) पार्थिव नाम सवत्छरे वैशाख ( बहुल ) द्वितीया रविवासेरे क्षत्रिये कुलावतंस श्री राजाशिवछत्रपती याणी रामजी [ सिका ] [ सिका ] फाटक यासी आज्ञा केली औसी जे. तुम्ही रो संक्राजी पंडीत सचीव याचे आज्ञाप्रा राजश्री त्र्यंवक सिवदेव पंताजी ( सि )वदेव याबराबरी जाऊन कस्त करून किले सेंहगड हास्तगत केला, देवीसिंग किलेदार हे पाडाव करून फते केला. म्हणोन पंत माारनिल्हनी हुजूर लिहिले. त्यावरून तुमचे सेवेचा मुजरा जाहाला. तरी तुम्ही येकनिष्ट मर्दानी सेवक आहा. तुम्हापासून स्वामीकार्यासी आंतर पडो पाहाते कीं काय. याउपरीहि सचीव पंताचे आज्ञाप्रो स्वामीकार्य करीत जाणे. म्हणजे कुला( स ) उर्जीत होईल. जाणीजे. लेखनालंकार. मोर्तब.

रूजु मुरू सुद

भा. इ. सं. मं. त्रै., व ६, अं. १–४, पृ. ८७–८८.

२ जून १७०६ ] (–२५१–) [ १ रबिलावल, सबा
मया अलफ

श्री.

.॥. माा अनाम हणमतराऊ फाटक यास संकराजी नारायण सचीव सुहूर सन सबा मया अलफ. किले राजगडावरी जी श ... आपले लोक चढोन [ शिक्का ] किला फते केला. म्हणून राजश्री पंताजी पंती लिहिले. त्यावरून तुमचा मजुरा जाला. पुढेंहि पंत मशारनिल्हेचे आज्ञेप्रमाणे स्वामीकार्य करून आपले सेवेचा मजुरा करून घेणे. छ १ रबिलावल पाा. हुजूर मोर्तब.

सुरु सुद

भा. इं. सं. मं. त्रै., व. ६, अं. १–४, पृ. ८८.

३ मे १७०७ ] (–२५२–) [ ११ सफर, सबा
मया अलफ

[ शिक्का ]

आज्ञापत्र राजेश्री पंतप्रधान ताहा मोकदम मौजे कळंबें तालुके परळी प्रांत वाई सुाा सबा मया व अल्लफ. मौजे मजकूर येथील खालसाचा अम्मल राजेश्री

बाबूराव कृष्ण यांजकडे किल्ले सातारा येथिल सरंजामास आहे. तो व सरदेशमुखी खेरीज श्री येवतेश्वराची नेमणूक सालाबादची करून व खासबागेचा कमावीस राजेश्री नावजी शंकर हैबतराव यांजकडे आहे. ते त्याजकडील दूर करुन साल मजकुरापासून राजेश्री जोती अनंत सुभेदार माजी किल्ले सातारा यांस बदल मुशाहिरा सातारीं-याची रोकड नेमणूक आहे. त्यापैकीं करार करून देऊन हे सनद सादर केली असे. तरी यासीं रुजू होऊन मौजे मजकूर येथील सदरहू अम्मलापैकीं श्री येवतेश्वराची नेमणूक सालाबादची तीस रुपये खेरिज करून बाकी तिन्हीं अम्मलाचा वसूल दरसाल सुरळीत यांजकडे बदल मुशाहिरा देत जाणें. जाणिजे. ११ सफर. आज्ञा प्रमाण. मोर्तब.

चां. का. प्रभूच्या इति. साधनें, व. १, अं. ६, जानेवारी १८८२, पृ. १४

२१ जून १७०७ ] (– २५३ –) [ आषाढ शुद्ध ३ शनिवार, रा. श. ३४

श्री देव

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित संवत्सरे आषाढ शुध त्रितीया मंदवासरे क्षत्रियकुलवतंस श्री राजा शिवछत्रपती याणी राजमान्य राजश्री बालाजी विश्वनाथ सरसुभेदार प्रां दौलताबाद यांसि आज्ञा केली ऐसी जे. फुलाजी भास्कर दिा श्री (देव) वास्तव्य चिंचवड याजवरी रायाजी मिसाळ याणे नस्ते कुमांड काहाडून ५०० पांचसे रुपयांचा तगादा लावून पैसे श्री पासून घेतले म्हणून हुजूर विदित जाले. त्यावरून तुम्हास हे अज्ञापत्र सादर केलें आहे. तरी तुम्ही हे जाणून रायाजी मिसाळ याचा मुलाहिजा न करिता त्या लबाडास वरजोर ताकीद करून सदरहू ऐवज त्याणे घेतला आहे तो त्याजपासून घेऊन श्रीकड पैका पाठवून देणे. एविशी त्याचा मुला-हिजा न करणे व तुम्हीहि ए गोष्टीस आजिचे उद्यावरी न घालिता देखत आज्ञापत्र त्यास ताकीद करून पैके देववणे. जाणिजे. बहूत काय लिहिणे. [ शिक्का–' मर्या : देयं विरा : जते ']

सुरु सुद बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३०२–३०३.

१७ सप्टेंबर १७०७ ] (– २५४ –) [ आश्विन शुद्ध ३ बुधवार, रा. श. ३४

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित्संवत्सरे आश्विन शुद्ध त्रितीया सौम्यवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिवछत्रपति यांणी सोमनाईक देसाई व देश कुलकर्णी ताा सेतवडें यासि आज्ञा केली ऐसी जे.

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2] राजश्री शाहूराजे ताम्राचे निर्बंधांतून निघाले आहेत म्हणून हुजूर वर्तमान आलें. यैशास हें राज्य थोरल्या कैलासवासी स्वामींनी बहुता श्रमें मेलऊन सर्वार्थे संपूर्ण केले होतें, तें राजश्री संभाजी राजे काका यांणीं विध्वंसून टाकिलें. आपणही अपाई पडले. त्या उपरी कैलासवासी स्वामी राज्याधिकारी झाले. त्यांणी स्वपराक्रमें नूतनच राज्य संपादिलें. स्वामीनीं त्याचें संरक्षण करून ताम्राचा पराभव केला. राज्याची अभिवृद्धि होत चालली. दुसरी गोष्टी हें राज्य थोरल्या कैलासवासी स्वामीनीं तीर्थस्वरूप कैलासवासी स्वामींस द्यावेसें केलें होतें. ऐसें असतां त्यांस या राज्यासि संमंध कांहीं नाहीं. त्या डोहणियांत जे मिळाले आहेत व मिळतील त्यांस नतीजा पावावयाची आज्ञा करून राजश्री जयसिंग जाधवराऊ सेनापति व हंबीरराव मोहिते सरलष्कर व वरकड सरदारांस फौजेनिसी पाठविले आहेत. राजश्री परशराम पंडित प्रतिनिधि यासहि रवाना केलें आहे. ज्यांचें अनुसंधान त्याकडे लागले असेल त्याचा हे मुलाहिजा होणार नाहीं. शासन करितील. तुम्ही वतनदार येकनिष्ठ आहां. तुम्हांपासून अनसारिखी वर्तणूक होणार नाहीं. परंतु शाहूराजे यांजकडील कागदपत्र तुम्हास आले असतां कांहीं वर्तमान हुजूर लिहिलें नाहीं म्हणिजे काये ? त्याकडून माणूस आले तेच कैद करून पाठवावयाचे होते, ते गोष्टी न केली यामध्यें बरें काये विचारिलें आहे. या उपरी यैसें करीत न जाणें. त्याकडील कागदपत्र घेऊन माणूस येईल ते कैद करून हुजूर पाठवीत जाणें. कदाचित् कोण्ही त्याकडे अनुसंधान लावील, राबिता राखेल तरी त्याचा उबार राहाणार नाहीं. तुम्हीं अनसारिखा प्रसंग मनांत आणाल. कागदपत्र येईल तो घन्हाम कराल. तरीं तुमचें बरें होणार नाहीं. वतनापासून दूर व्हाल, हें जाणोन स्वामीच्या पायांसीं निष्ठा धरून राहोन लिहिलेंप्रमाणें वर्तणूक करणें. जाणीजे. लेखनालंकार

[ शिक्का–' मर्यादेयं विराजते ' ] [ शिक्का–' लेखनसीमा समुल्लसति ' ]

मुरू सूद

विविधज्ञानविस्तार, व. ५५, अं. २, फेब्रुवारी १९२४, पृ. १०६–७; दिवाळी अंक, व. १, अं. २, नवंबर १९४७, पृ. ३६.

**१२ आक्टोबर १७०७ ] (–२५५–) [ आश्विन वद्य १३ रविवार, रा. श. ३४; २६ रजब, समान मया अलफ.**

श्री

स्वस्ति श्री राज्याभिशेक शके ३४ सर्वजीत नाम संवछरे आस्वीन बहुल त्रयोदसी रविवासरे क्षेत्रीयेकुळावंतस श्रीराजा शाहू छत्रपती स्वामि यानि वेदमूर्ती

१. शिक्का–' श्री शिव : नरपति हर्षनिधान : मोरेश्वरसुत नीळ : कंठ प्रधान. '

२. शिक्का–' श्री आई अदिपुरुष : श्री राजा शिवछत्रपति स्वामी : कृपानिधि ॥ तस्य परशुराम : त्र्यंबक प्रतिनिधि. '

राजश्री वीरेश्वरभट बीन त्रींबकभट चित्राव पुणेकर यांसि आज्ञा केली येसी जे. तुम्ही स्वामीच्या दर्शनास गोदातीरास आलेस. दर्शन जाले. परमयोग्य अनुष्टाते वेदशास्त्रसंपन वैदीक त्रीकाल सत्कर्मे आचरोन स्वामीस व महाराष्ट्र राज्यास कल्याण चिंतीत आहा. तुमचा योगक्षेम चालिला पाहिजे म्हणून तुम्हास वर्षासन प्रतिवर्षी होनु पा २५ पंचवीस रास केले असेती. सदरहू प्रमाणे वर्ष प्रतिवर्षी पावत जाईल अंतराये होणार नाही. तुम्ही सुखरूप राहोनु स्वामीचे कल्याण ईछीत जाणे जाणीजे. रा छ २६ रजबु मुा समान मया व अलफ. शिक्का— 'मर्या: देयं विरा: जते' ]

बार

भा. इ. सं. मं. त्रै. व. १, अं. २–३, पृ. ३९.

२२ नवंबर १७०७ ] (–२५६–) [ मार्गशीर्ष शुद्ध ९ शनवार, रा. श. ३४

श्री केशवचैतन्य

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ३४ सर्वजित संवत्सरे मार्गशीर्षे शुध नवमी मंदवासर क्षत्रीयेकुलावतंस श्रीराजा शिव छत्रपती यांणी राजमान्य राजश्री बालाजी विश्वनाथ सरसुभेदार प्रांत दौलताबाद यांसी आज्ञा केली ऐसी जे. वेदमूर्ति केशव भटाचे पौत्र कासीभटांचे पुत्र कृष्णभट राजरुषी यांणी हुजूर येऊन विदीत केले की आपले गुरु श्री. ( केशव चैतन्य) माहानुभाव वास्तव कसबे उतूर प्रांत जुनर येथें मठ आहे. त्यास पूर्वापर वृती चालीली आहे:

| | | |
|---|---|---|
| सेत मुजेरी थल इटकर पैकी जमीन चावर येक १ | आंबराई व चिंचाची झाडे पुरातन आहेत १ | जकात पथक मजकूर पा मालसेज उंबरे पैकी दर रोजीना रुके ४ |

येकून सेत जमीन चावर येक व बाग झाडे व रोजीना रुके च्यार येणें प्रमाणें चालत होतें. अलीकडे धामधुमेच्या प्रसंगा करिता चालत नाही. तरी स्वामीनें हे वृती आपणांस बिलाकुसूर चाले यैसी आज्ञा केली पाहिजे म्हणून विनंती केली. त्यावरून यांचे पूर्वील कागदपत्र मनास आणून सदरहू वृती चालवावयाची आज्ञा करून देशाधिकारी यांस आज्ञापत्र सादर केलें आहे, तरी तुम्हीं कसबेकरांस ताकीद करून सदरहू वृत्ती याचे दुमालां करून वंषपरंपरेने चाले यैसें करणें. बहुत काये लिहिणे. [ शिक्का—'मर्यादेयं विराजते' ]

सुरु सुद बार

भा. इ. सं. मं. त्रै., ४, अंक १–४, पृ. ८९.

२९ दिसेंबर १७०७ ] (–२५७–) [ पौष वद्य १४ शनवार, रा. श. ३४

श्री

[ शिक्का ][1]

स्वस्ति श्री राज्याभिशक शके ३४ सर्वजितनाम संवछरे पौष्य बहुल चतुर्दशी मंदवासरें क्षेत्रीये कुलावतस श्रीराजा शाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी लेखक वर्तमान व भावी प्रांत वाई यांसी आज्ञा केली ऐसी जे. वेदमूर्ती विनायकभट बिन नारायेणभट आफळे व समस्त ब्राह्मण वास्तव्य स्थल मौजे माहुली सा निंब कृष्ण संगम याचेविशी वेदमूर्ती हरभट बिन जनार्दनभट व विनायकभट बिन येकनाथ आफळे या उभयतानी कसबे निंब पो मजकूर येथील मुकामी स्वामी सनिध येऊन विदीत केले की विनायकभट आफळे व समस्त ब्राह्मणास येदिलशहाचे वेळेपासून मौजे माहुली पा मार हा गाव इनाम चालत होता. त्यावरी हा प्रांत राजश्री कैलासवासी स्वामीस हस्तगत जाला. तेव्हा ब्राह्मणाचा गाव अमानत करून कुटुंबे व योग्यता पाहोन त्या योग्य धान्य देविले होते ते कित्येक दिवस चालिले. तेणेकरून कालक्षप व चाले. म्हणून आपण राजश्री राजाराम याचे कारकीर्दीस चंदीचे मुकामी जाऊन कितेक प्रकारे विदित केले की धान्यानेच केवल अग्निहोत्रे व कुटुंब संरक्षण होत नाहींत. माहाराजे पूर्व–इनाम चालिले आहे त्याप्रमाणें चालावयास आज्ञा केली पाहिजे. त्यावरून त्याणी मौजे मजकूर ब्राह्मणास इनाम करून देऊन देशाधिकारी यासी पत्र करून दिले आहे. सांप्रत माहाराजाचे येणे जाले आहे. तरी ज्याप्रा पहिले इनाम चालत आहे त्याप्रमाणे करार करून देविले पाहिजे. म्हणजे स्नान संध्यादि सत्कर्मे आचरोन सदैव माहाराजास व महाराष्ट्र राज्यास कल्याण चिंतून सुखरूप राहूं म्हणून विदित केले. त्यावरून मनास आणून पहिले पत्र वेदमूर्ती जवळी आहे तेहि अवलोकन केले व ब्राह्मण समुदाय भले वैदिक अग्नहोत्री याचे आसीर्वादेकरून राज्याचे व स्वामीचे कल्याण आहे. याकरिता पेशजीप्रमाणे यासी मौजे माहुली सा निंब पा मार हा गाव कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी जल तरू पाशाण निधि निक्षेप झाडझाडोरा पडिले पानसहित खेरीज इनामती व हकदार करून देह सुमार १६ येक रास इनाम करार केलेला असे. तरी सदरहू वृत्ता येदिलशहाचे वेळेस सर्वमान्य ब्राह्मणास होता ते समई ज्या ज्या ब्राह्मणी अनभविले असेल ते मनास आणून तेणे प्रा त्याच ब्राह्मणास पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. प्रतिवर्षी नवीन पत्राचा उजूर न करणे. या पत्राची प्रती लेहोनु घेऊन असल पत्र विनायकभट आफळे याजपासी भोगवटीयास परतोन देणे. जाणिजे.

[ शिक्का– मर्यादेयं विराजते ]

भा. इ सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्र. क्र. ७, पृ. २३४–५.

१. श्री : ' शिव नरपति ह : र्षनिधान मोरेश्वर : सुत भैरव मुख्य : प्रधान.'

१७०७ इ. ] (–२५८–)

औरंगजेबाचें पुत्रास पत्र

आतां माझा वृद्धापकाळ येऊन ठेपला, जरेनें गांठलें, व शरिराचीं गात्रें विगलीत झालीं. ! या जगांत मी एक प्रवासी होतों, आणि जाणार तेथेंही मी उपऱ्या प्रमाणें जातों ! माझी मला माहिती नाहीं, आणि माझ्या प्रारब्धीं काय आहे हेंही मला कळत नाहीं ? सामर्थ्य असतांना मीं जीं कर्में केलीं, तीं आतां दुःखास मात्र कारण झालीं आहेत. मी राज्य चालविणारा किंवा रक्षण कर्ताही नव्हतों ! माझें मौल्यवान आयुष्य व्यर्थ गेलें ! माझें संरक्षणकर्ती जी मनोदेवता ती मजजवळच होती, परंतु तिच्या सामर्थ्याच प्रभाव माझ्या अज्ञान अंध दृष्टीस गोचर झाला नाहीं ! मीं ह्या जगांत मानवी स्वभावाच्या दुर्गुणांशिवाय कांहीं आणिलें नसून तेंच बरोबर घेऊन जातों. माझी पुढें काय गति होईल ? व मला कोणत्या यातना भोगाव्या लागतील ? याचा विचार मी करूं लागलों असतां मला फार भीति वाटते ! ईश्वराचें दातृत्व व कृपालुता यांवर माझा पूर्ण भरंवसा आहे, तरीमाझ्या कृत्याकडे पाहिलें असता मला त्याचें भय वाटल्यावांचून राहत नाहीं. ह्या जगांत माझ्या मागें सर्व शून्याकार होईल असें दिसतें. आणि हल्लीं तर अशक्तपणामुळें माझी पाठ वांकली आणि हातापायांत हालण्या चालण्याचें सामर्थ्य नाहीं ! वादळ सुटलें होतें तें नाहींसें झालें; व मागें आशा सुद्धां राहिली नाहीं. मी सहस्रापराधी आहें, व मला कोणते शासन होईल हें कळत नाहीं. माझें राज्य माझ्या मागें तुमच्या स्वाधीन व्हावें ही ईश्वरेच्छा होती. म्हणून मी आतां तें राज्य तुमच्या ताब्यांत देऊन तुम्हास ईश्वराच्या स्वाधीन करून जातों, मला मरणव्यथेनें ग्रासिलें आहे. तुमची आई माझ्या दुःखाची वांटकरीण असून मरणसमयीं ती मजबरोबर येण्यास इच्छिते, परंतु नेमानेम कधींही चुकत नाहीं. मी आतां जातों ! मी मार्गास लागलों आहे ! जें कांहीं मीं चांगले वाईट केलें ते तुमच्या करितां केलें ! प्राणोत्क्रमण कोणासही कळत नसतें, परंतु तें मला कळूं लागलें आहे.

गुलजार–गुलहौशी, पु. १, अं. २, १८८३ इ. स., पृ. ४१–४२.

१७ जानेवारी १७०८ ] (–२५९–) [ माघ शुद्ध ६ शनवार, रा. श. ३४.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित नाम सवछर माघ शुध शष्टी मंदवासरे क्षेत्रियेकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी देशमुख व देशपाडीयानी व मोकदमानी व रयानी कसबे सासवड कर्यात मजकूर यांस आज्ञा केली येसी जे....तपस्वी सिधानंद हे हुजूर येउनु विदित केले की का मजकुरी श्री सोपानदेव

[ शिक्का ][1] याची समाधी आहे. त्यास पूर्वी राजश्री थोरले कैलासवासी यानी इनाम दिधले आहे ते चालत आले आहे. परंतु नैव्यद्यास पुरत नाही आणि अधिक...पाच मण व पुरातन जे चालत आहे त्याची नूतन सनद करून दिल्ही पाहिजे म्हणउनु विदित केले. त्यावरून पूर्वील पत्र मनास आणून ... ... पूर्वील व नूतन भूमि इनाम करून दिल्हे आसे

| | |
|---|---|
| नि॥मुजेरी जमीन देवाभोवताली थळ भाडले पैकी कुलकानु कुलबाब गोसावी यास दुमाला करणे कास | निसबती जकाती बाजारपैकी दररोजीना पके मोईन सालाबाद...चालत आले... |
| ८४॥ कदीम पूर्वील सनदेप्रमाणे मण कास जाजती हल्ली करून दिल्ही भागीर्थी पैकी... | तेलबदल दिवाबती जोरी केली ८८॥· वजन आछेर नैवेद्याबदल केली मापे ८८॥· आघोली ८८॥. |

।४॥.

सदरहुप्रमाणे थळ कास व तेल आदसेरे व जोरी आघोली चालत आहे. तेणप्रमाणे व नूतन येसे चालवणे. साल दरसाल नूतन पत्राचा आक्षेप न करणे. याची प्रती घेउनु आसल पत्र भोगवटियास सिधानद गोसावी याजवळी परतुनु देणे. पूर्वीपासून चालत असेल तेणेप्रमाणे चालवणे. आणि जे नूतन इनाम दिला आहे तो अविछिन चालवणे. पा हुजूर. [ शिक्का ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्र. क्र. १७, पृ. १६०-१६१.

२३ जानेवारी १७०८ ] (-२६०-) [ १० जिल्काद, समान अलफ मया

सोपानदेव

श्री

॥ छ मा॥ अनाम देशमुख व मोकदम व देशपांडे को॥ सासवड यास नारो शंकर सचीव सुहुरसन समान मया अलफ. राजश्री—स्वामीचे शेवेसी तुम्ही अर्दास पाठविली की श्री ( सोपानदेव ) याची समाधी के॥ मजकुरी आहे. त्यास नैवेद्य नंदादीपाची मोईन व इनाम सेत कास मण ८४॥. साडेचार मण आहे. त्या खेरीज जाजती इनाम कास मण पाच द्यावयाची आज्ञा केली पाहिजे. म्हणून आर्दास पाठविली. त्याजवरून राजश्री...स्वामीनी सनद सादर केली असे. बीता

| | |
|---|---|
| मुजेरी पैकी जमीन देवाभोवताली थळ भाडळे पैकी कुलकानु कुलबाब गोसावी | जकाती व बाजार पैकी दररोज मोईन सालाबादप्रमाणे |

१. शिक्का–' श्री : शिवनरपति ह : र्षनिधान मोरेश्वर : सुत भैरव मुख्य : प्रधान.'

याचे दुमाला करणे कास ८४॥ तेल दिवाबतीस जोरी केली नैवेद्यास
कदीम पूर्वी सनदप्रमाणे ।· जाजती वजन टाक ८८॥-
इनाम हल्लीकरून दिल्हे भागीरथी पावेतो ८८॥-
कास ·।४॥

येणे प्रमाणे थळ कास साडे नव मण व दररोज तेल नंदादीपा आदसेर व जोरी केली नैवेद्यास आचोली रास करार करून सनद आलाहिदा दिल्ही आहे. त्या प्रमाणे का मकरूपैकी चालवीत जाणे. छ १० जिलकाद. पा हुजुर. [शिक्का–'पत्रा : वधिरयं : भाति'] सुरु सुद

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृं १५९–१६०.

२७ मे १७०८ ] (–२६१–)

[ बादशाहाचे शाहूस पत्र-- तर्जमा ]

राजे शाहू यांस सलाम कीं तुम्हीं कृष्णाजी दादाजी प्रभु देशपंडिया समागमें अर्जदास्त पाठविली. त्यांतील मजमून आमची चुलती व सर्व नोकरलोक मिळोन फिसात करून आम्हांवर फौजा रवाना केल्या. आम्हांस बुडवावें आपण राज्य करावें, अशी चित्तीं द्वेषबुद्धि धरून असें केलें. त्यास बादशाही हुकमानें देशी राज्यावर आलों तों हा प्रसंग पडला. त्यास श्रीवेरें व शूरत्वेंकरून लढाई केली. बादशाही कृपें-करून फत्ते पावलों व नोकर लोकांस धरून नखेती (शिक्षा) केल्या. बंदोबस्ती कर-ण्याचा क्रम चालला आहे. हुकूम कीं मनुष्य जरबेंत राखावे व रयतलोक यांचें संरक्षण करावें व इनसाफ बराई खुद जातीनें पाहावी. बंडें बुडवावीं म्हणजे धका नाहीं. त्या-प्रमाणें हुकूम चित्तीं दृढतर धरून हिंदुशास्त्राप्रमाणें राज्यपद्धतीनें चालत आहों. ही खबर कळावी सबब कृष्णाजीस मुद्दाम अर्जी देऊन वकिलाकडे पाठविलें. त्यास वकील मजकूर यांणीं हुजूर अर्जदारच रसीद करून तुम्हांकडील नोकरांचें मुखें साकल्य मज-कूर श्रुत केला. त्यास पेशजी फर्मान तुम्हांस जमेदारीबद्दल मिळाला आहे. त्याप्रमाणें मुलकाचा वगैरे बंदोबस्त ठेवून कायम जालां. हा तुम्हांस बादशाही कृपेनें बहुत फायदा झाला हा संतोष मानीत आहों.

विविधज्ञानविस्तार, व. ५५, अं. २, फेब्रुवारी १९२४, पृ. १०९; रा. खं. १५ ले २८९, पृ. २९८–२९९ (रा. ख. त सबंध पत्र असून त्यावर ता छ १७ रबिलावल सन ३ मुताबीक सन ११२० आहे.

२० आगष्ट १७०८ ] (-२६२-) [ १४ जमादिलाखर, तिसा मया अलफ

श्रीराम जयराम गोसावी

राजश्री अंताजी माहादेव सुबेदार कारकून दिा सरदेसमुखी सुभा प्रा खटाव वर्तमान व भावी गोसांवी यांसि

छ अखंडित लक्षुमी आलंकृत राजमान्य-सेवक नारो प्रलाद आज्ञाहात सरदेशमुख नमस्कार सुा तिसा मंया अल्फ. सुबेमजकुरी राजश्री यासि आनंदछेत्रास इनाम गांव आहेत. बिता

मौजे रायेगांव ताा आउद हे पुरातन मौजे वडगाव ताा निबसोड हे नूतन
१ राजश्री माहाराज स्वामीने पत्र दिल्हे १

यकूण दोन गाव इनाम चालत आहेत. त्यास हुजूर राजश्री विठोबा गोसांवी येऊन विदित केले की मौजे रायेगांव हे पूरातन आहे. त्यास पूर्वापर सरदेसमुखी ही कोण्ही घेतली नाही व हाली मौजे वडगांव तो राजश्री माहाराज स्वामीने नूतन गाव दिल्हे आहे. तरी या दो गांवासि सरदेसमुखीचा उपसर्ग न लागे ते गोष्टी केली पाहिजे म्हणून विदित केले. यैसियांसि पूर्वी राजश्री हिंदुराऊ घोरपडे याचे कारकीर्दीस रायेगावीं सरदेशमुखी घेतली नसेल हे मनास आणून तुम्ही सरदेसमुखींचा उपसर्ग न लावणे व नूतन वडगावासि हि सरदेसमुखीचा उसूल न घेणे. राजश्री (जयराम गोसावी) -गोसावी याचे चालवणे हे राजश्री-माहाराज स्वामीस आगत्य आहे. तरी हरदो गावांसि येकंदर उपसर्ग सरदेशमुखीचा न लावणे. असल पत्र गोसावी याजवल भोगवटियासिं फिरोन देणे. या पत्राची तालिक लेहोन तुम्ही घेणे. जाणिजे. छ १४ जमादिलाखर. हे विनंति [ शिक्का-' मोर्तब : सुद ' ] [ शिक्का ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३१४-३१५.

११ दिसेंबर १७०८ ] (-२६३-) [ ४ सवाल, तिसा मया अलफ

श्री जयराम

राजश्री हवालदार व कारकून व मुकासी प्राानिहाय पंचमाहाल सुभा खटाउ गोसावी यासि

॥ छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्नो ॥ श्रीनिवास माधवराऊ आसीरवाद आनुकर्मे नमस्कार सुहुर सन तिसा मंया आलफ. राजश्री स्वामी यास मौजे वडगाउ कर्यात निबसोड-माइणी हा गाउ इनाम आहे. तर तुम्ही मौजेमजकुरास येकदर उपसर्ग देत नव जाणे. बिलाकुसुर स्वामीकडे चालो देत जाणे. हरयेकविषीचा [ शिक्का ] यक रुकियाचा तोसीस न देणे. जाणिजे. रा छ ९ सौवाल. हे विनंति.
[ शिक्का ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३१५.

५ जानेवारी १७०९ ] (-२६४-) [माघ शुद्ध ५ बुधवार, रा. श. ३; जिल्काद, तिसा मया

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारी संवतत्सरे माघ सुध पंचमी सौम्यवासरे क्षत्रीय कुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी यानी राजश्री देशाधिकारी [शिक्का][1] [शिक्का][2] व लेखक वर्तमान व भावी प्रात पुणें यास आज्ञा केली येसीजे. गनोजी जाधव स्वामीकार्यावरी पडले. याकरिता त्याच्या मुलाचे चालवणे अगत्य म्हणून स्वामी कृपाळु होऊन माारनिलेचा पुत्र येशवंतराव जाधव व जनाजी जाधव व आनंदराव जाधव यास मोजे परिंचे ताा निरथडी प्रा मजकूर हा गाब कुलबाब कुलकानु नुतन इनाम करून दिला असे. मोजे मजकूर त्रिवर्गांचे पुत्रपोत्रादि वंशपरंपरेनें चालवणें. या पत्राची तालिक लिहुन घेऊन असल भोगवटीयास परतून देणे. लेखनालंकर. [शिक्का–'मर्या : देय : राजते']

रा छ ६ जिलकाद (८ जानेवारी १७०९) तेरिख ३ जिल्काद माहे जिल्काद सुहुर सन तिसा मया.

रुजु बार सुर सुद बार

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ७९–८०

५ जानेवारी १७०९ ] (-२६५-) [माघ शुद्ध ५ मंगळवार, रा. श. ३५

स्वास्ति श्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारी संवत्सरे माघ सुध पंचमी सौम्यवासरे क्षत्रियकुलवतंश श्री राजा शाहु छत्रपती स्वामी यानी मोकदमानी [शिक्का][1] [शिक्का][2] मौजे परिंचे ताा निरथडी यासी आज्ञा केली येसीजे. रा येसवंतराव व जनाजीराव व आनंदराव जाधव याचे स्वामीस चालविणे आवश्यक. या करिता त्या वरी स्वामी कृपाळु होऊन मौजे मजकुर नुतन इनाम कुलबाब कुल्कानु माप करून खेरीज हकदार व इनामदार दिल्हा असे. तुम्ही मारनिलेचे रजाती परतोन मोजी मजकुरचा अकार प्रमाणें वसूल मारनिलकडे बिलाकुसुर देत जाणें. जाणिजे. लेखनालंकार. [शिक्का–'मर्या : देयं : राजते']

रा छ ६ जिलकाद (८ जानेवारी १७०९)

रुजु बार सुरु सुद बार

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २५. पृ. ८०–८१.

१. शिक्का–'श्री : शाहुनर : पति हर्षनि : धान मोरेश्व : रसुत भैरव प्रधान.'
२. शिक्का–'श्री शंकर श्री : शाहु छत्रपती : कृपानिधी प्रल्हा : द सुत गदाधर : प्रतिनिधी.'
३. शिक्का–'श्री : शाहु नर : पति हर्षनि : धान मोरेश्व : र सुत भैरव : प्रधान.'
४. शिक्का–'श्रीशंकर श्री : शाहु छत्रपती : कृपानिधि प्रल्हा : द सुत गदाधर : प्रतिनिधि.

५ जानेवारी १७०९ ] (-२६६-) [ माघ शुद्ध ५ बुधवार, रा. श. ३५

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारी संवत्सरे माघ शुध पंचमी सौमवासरे क्षत्रीयकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी यानी समस्तराजकार्य धुरंधरविश्वास-निधी राजमान्य राजश्री नारोपंडित सचीव यांसी आज्ञा केली येसीजे. रा गणोजी जाधव स्वामी कार्यावरी कस्त झाले. या करितां याच्या पुत्राचे चालवणे स्वामीस अवश्यक म्हणून येशवंतराव व जनाजी व आनंदराव जाधव यांस नुतन इनाम मौजे परिंचे ता निरथडी हा गाव मारनिलेस इनाम देहे १ तुम्हांस आज्ञापत्र सादर केले असे. तरी मोजे मजकुर कुलबाब कुलकानु मारनिलेस इनाम चालवणे. प्रतिवर्षी नुतन पत्राचा आक्षेप न करणे. जाणिजे. बहुत लिहिणे... [ शिक्का- 'मर्या: देयं; : राजते ]

रा छ जिलकाद

बार बार

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ८१.

२६ मे १७०९ ] (-२६७-) [ वैशाख वद्य १३, रा. श. ३५

( वरील कागद फाटला आहे )

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३५ विरोधी सवत्सरे वैशाक बहुल त्रयो ( दसी )... क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यानी समस्त...धर विश्वासनिधि राजमान्ये राजश्री गदाधर प्रल्हाद प्रतिनिधि...(आ)ज्ञा केली यैसीजे. तुम्ही विनंति पत्र पाठविले ते ( प्र )विस्ट जाले. ...विदित होता. स्वामी बहुत संतोसी जाले जे गोस्टीचा सर्व ... .. दूर केला म्हणोन लिहीले. तरी ज्या कार्यावर जाल तेथै कोणे... वशये राहले ऐसा अर्थ नाही. येविसी स्वामीचीं खातरजमा...लिहिले की पातशाहा सेनासमोदायानसी उतर पथास चालिला ...जादे अगर मातबर उमराव ठेऊन जावे ऐसा आर्थ होता. परंतु ... कितेक प्रकारे येकनिष्टता व हा प्रात म्हणजे अनकूल जाला ऐसा...दाखऊन येकदर मोहरा मुरडिला. परंतु खानदेशांत आपली सैन्ये...मार्गेयासी जाणे ऐसे न होये की कांहीं उपसर्ग लागे आणि बोली.. ... दिसान येई तरी ये गोष्टीचा विचार हाच आहे की.. पाठऊन हजूर घेऊन गेले पाहिजे म्हणौन लिहिले. ऐसीयासी तुम...आगोधर हा अर्थ स्वामीने चितात आणून तमाम सैन्यास पत्रे व... पाठऊन वर वाटेनें हजूर बोलाविले होते. तुम्ही ही लिहिले. आनी ते सेनास...नसी हजूर येत आहेत. सनीध आले आहेत. दरम्यान एक प्रसंग जाला, तो तुम्हाला कलावा म्हणौन लिहिला असे. लोधीखान चाकणकर पठाण बाद...पासून विरोधे

वर्तणूक करीत होता. पुणे वगैरे प्रात पुणेधर पावेतो सवाऱ्या करून उदवस केला. सैन्ये डोंगर वाटेने येतात हे आईकोन भील वगैरे जमाव करून ब्राम्हणवाडे येथील घाट बंद केला. सरदारानी सागोन पाठविले की हे कर्म तुम्ही बरे करीत नाही. लोक अनिवार आहेत. येखादा... ... जगामुळें नुकसान दोही तर्फेचे आहे. तरी तुम्ही घाट सोडून जाणे. ... हे गोष्टी न आईकता लंडाईस उभा राहिला. परस्परे लढाई जाली. ... लोधीखान मारला गेला. इकडील ही लोक बहूत जाया जाले. मारले गेले. तैसेच करीम बेग जुनरकर बहीर बुनगे काही हाती लागले. ... जमावानसी निघोन सैन्यासमीप आला. तोही हस्तगत जाला. परंतु करीमबेग स्वामीसी येकनिस्ट होता. त्यास सोडावे हे स्वामीस आगत्य आहे. सोड विला जाईल व पातशाहासी आपल्यासी सौरश कोण्हे विसी ... न दिसावे हे स्वामीच्या चित्तीं. परंतु ठाणेदार बदमस्त आपखुशीने आ(पले) वाईट करून घेतात यासी इलाज नाही. सोमाजी जगथाप स्वामी पुरधरी ...जेजुरीस म्हणौन आला. कडेपटार व कितेक प्रात नागविला. स्वामीचीं आज्ञा गेली. परंतु मुलकास उपसर्ग देता न राहिला. त्यास तंबी करणे. थोडे कार्य होते. विपरीत भासेल या करिता गैई केली. हाली इलापुरी बैसोन बेसगी वर्तणूक ... आलस करीत नाही. तैसेच यासीन खान पूर्व स्नेहे विसरोन ठाणेदारीच्या प्रसंगात चित देऊन मुलकात धामधूम करितात. तरी या लोकाची हकीगत जाहीर करून हे हालखुद राहेत ते करणे. नाही तरी यासी हालखुद ठेवणे. आगत्ये हो(त)सेच. शामलाने या दिवसात कोकणप्राते शोखी फार माडिली आहे. त्याजविसी इलाज करणे व तुम्ही लिहीले की कोकण प्रातीचे किले ध्यावे. यैसा प्रसग केला आहे. दरम्याने त्याचा ऐवज वरघाटाचे किले ध्यावे ऐसा मजकूर होता. तोही करून कोकण प्रातीचे किले ध्यावे ऐसे नेमस्त केले आहे. तरी कोकणप्रात आधिराज्य ते जाम किले. ते केवळ राज्याचा जीव. हे गोस्टी अधी करून घेणे व तुम्ही लिहीले की सेनासमोदाये हाताखाले घालून पनाला प्राते जाऊन सावत आनकूल करून येक वेले रागणासी कजा होये ऐसा पदार्थ केला पाहिजे. तरी सेना-सगोदाये आलीयावर साप्रत हाच विचार आहे. सावंत मुख्ये तो वारला. पुत्र आहे. त्याचे समाधान पत्रे पाठवून करावयाचे ते केले आहे. तोही आपलें तर्फेनें स्वामीसी येकं(निष्ट) आहे व तुम्ही लिहिले की आपणास पातशहाचे दरशन जाले. मनसफ व सिरपाऊ (दि)ला. औरगाबादेस पोहचल्यावर निरोप होणार आहे. मार्गी येत । जमेत (भारी) बराबर पहिजे तरी तुम्हास निरोप होईल आणि आगोधर लेहून पाठवणे. जी फौज सनीध असेल तीस पत्रे पाठऊन ते तुम्हास घेऊन येतील. खर्चाचेविसी लिहिले. तरी राजश्री बालाजी विस्वनाथ हजूर येत आहेत. ते आलिया-वर पाठऊन देऊन मुलाचेविसी लिहिले. तरी मुलाचे चालवणे ते स्वामी चालवीत आहेत. ती लेकरे स्वामीची. तुम्ही ल्याहावे मग चालवावे ऐसा आर्थ नाहीं व तुम्ही लिहिले . तमी जोड येतात. त्यासमागमे आपणास पत्र येत नाहीं. लतीफखानास पत्रे येतात. तरी लतीफखानास कांहीं पत्र कधीं लिहिले नाहीं. बातमीस जोड जाती.

त्यास तो येकदर स्वामीची आज्ञा आहे की तुम्हाजवळ जावे. पत्रे तातडी (क)रिता देता गाठी पडली नसेल व बातमीजोड्यापासी पत्रे नसावी...ही आहे. याउपरी जासुदास ताकीद केली कीं जे जातील ते तुम्हांजवळ जातील व लिहिले की सिंदा नबाबापासी स्वामीच्या उपहासाच्या गोष्टी सांगत होता तरी त्यानें उपहासाच्या गोष्टी सांगाव्या उचित. त्याहीवर ते लोक आपला रोजगार गरम करितात. त्याचे दंतभग्न जे करणे ते तुम्हीच केले. ते आईकोन स्वामीस बहूत समाधान वाटले व तुम्ही लिहिले की छिटे पाठविली आहेत. त्यापैकीं येक यादोपंतास देविले पाहिजे. तरी यादोपंती तुम्हामागे सेवा बरी केली. स्वामीस बहुत रजाबंद केले. छीटेही द्यावयाची आज्ञा केली व तुम्ही लिहीले कीं कागदपत्र सिध करून ...(स्वामी)चे सो पाठऊन आपण श्रीच्या महायात्रेस जाऊ. तरी हरघडी उदास लि...त नाहीं. स्वामीस ये गोष्टीने समाधान होत नाहीं. तरी हरगीज यैसा ... लिहित नव जाणे. तुम्हाहून आदीक आणखी यैसा अर्थ स्वामीस नाही. हरयेकविसी समाधान आसो देणे व नबाबास पत्र लिहिले आहे त्याचा तरजुमा हेंदवीत करून पाठविला आहे तो मनास आणून प्रविष्ट...जाणिजे बहुत काये लिहिणें तरी तुम्ही सुज्ञ असा. [ शिक्का–' मर्या : देयं रा : जत ' ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १–४, पृ. ८५ ते ८७

१९ जुलै १७०९ ] (–२६८–) [ २२ जमादिलावल, जुलस ३

श्री

[ शिक्का ] श्रीमतु सौजन मोकदमानी को। सागली यासी शशगिरिराऊ व गोपाळराऊ सरदेशमुख व सावत आदिनाईक देसमुख व क्रीस्टाणराऊ व वेकटराऊ श्रीनिवास देशपांडे व श्रीनिवास रुद्राजी नाडगौडा सरकार मुर्तुजाबाद सुा सन १११९ कसबे मजकुरी मराहमतपनाहा किलेदार फौजदार साहेब परवाना करून बयाबाईस इनाम ·। पाऊ चावर जमीन दिल्हे आसे. हद्द माहादूद काढवून जमीन दीजे. जाणीजे. रा छ २२ माहे जमादिलावल सन ३ जलुसवाळा. [ मोर्तब सूद–शिक्का ]
विनीति दा देसपांडे सरकार मजकूर

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १–४, पृ. १००.

२१ जुलै १७०९ ] (–२६९–) [२४ जमादिलावल, ३ जुलस; सन १११९; अशर मया अलफ

श्री राघवस्वामी

महाराज राजाधीराजे श्री बयाबाई स्वामीचे सेवेशी

अमिलानि व सेखदारानी स्नेहपूर्वक मोकदमानी वा रयानि सागली मामल

मुर्तजाबाद सन ११११९ आसरिन (अशर?)[1] मया अलफ कारणे तुम्हासि इनाम का मारी जमीन ।· पाउ चाबर साहेबी दिल्हे. दुबालें परवाना वा सरदेसमुख वा देसपाडे वा नाडगोडा सरकार मजकूर यानी इनाम दिल्हे. जमीन चावर ।· पाउ दिल्हे का मारी धुरंग.

पैकी दिल्हे आसे. तेथील जो माहासूल पिकऊन घेणे धर्माचे आभीवृधी करून गावासी आश्रीवाद देणे. सदरहु इनामासी वा दिवाणा व बाजे काही तऱ्ही तगाद। लागणार नाही. सरकारातून इनाम दिल्हे. आलाहि(दा) आपले तरफेने हि ईनामाचे हक दिल्हे आसे. कोणे गोस्टीचे वसवसा न करणे. पेस्तर सालासि ताजे सनदाचे उजूर करणार नाही. हे लिहून दिल्हे कागद. सही. छ. २४ माहे जमादिलावल सन ३ जुलूसवाला.

बिा रायाजी चौडा कुलकरणी का मार रुजु भीमराउ सेखदार

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १–४, पृ. ९९.

## जुलै १७०९ ] (– २७० –) [ आषाढ, रा. श. ३६

स्वस्ति श्री राज्याभिषक षके ३६ विरोधी सवछरे आशाढ क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामि... धुरधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री गदाधर प्रल्हाद... केली ऐसीजे. तुम्ही विनंतिपत्र पाठविले ते प्रविष्ट जाले. ...प्रसंगाचे लिहिले ते विदीत जाले. औरंगाबादेहून कार्यं प्र... देवितो म्हणौन नबाब साहेबी करार केला आहे. ये... दाखल जालो. कार्यं मनोगतानुरूप सिधी पाऊन स्वार होऊन येतो म्हणौन लिहिले. तरी तुम्ही सदैव येशश्री आहा. कार्यं मनायोगे करून याल हा भरोस स्वामीस पूर्ण ...स्टी कार्यभाग जो करणे तो साधी करून घेऊन याव... व दुसेरे लिहिले की पदाजी घाटगे याणे कितेक ... मारूफतीनें बदगोईचा प्रसंग केला होता. तो नबाबास सांगोन फजीत करावयाचे ते केले. कार... तरी स्वामीनी ते प्राती त्याची ठाणी व आणखी ...ती तंबी केली पाहिजेत म्हणौन लिहिले. तरी सेनास... सरदार लोकाचे दिलासे करणे आहे व दोनी मास प्र(स)मोदयाचा बंदोबस्त या दिवसांत करून भाद्रपद ... खुद स्वारी करून ज्या ज्यास नतीजा पावणे तो स्वा...सी आपले समाधान आसो देणे व तुम्ही लिहीले कीं आप...आलीयावर सवेच कोकण प्रांत स्वारीस जावयाचा नि... करून बंदोबस्त त्या प्रांतीचा करून तरी काही माव...नी तजबीज करून हाताखाले घातला पाहिजे, म्हणौन लि. लोकाचा तलाश करणे तो होत आहे. जे समई जो जमामल होईल व तुम्ही करीम बेगाचे विसी लिहीले की

१ अशर फ. १११९ शी जुळतो. आशरीन घेतला तर फ. ११२९ असावयास पाहिजे. याची इंग्रजी तारिख २३ मार्च १७२० येते.

नबाबाने...... प्रकारे सांगितलें आहे कीं त्यास सत्वर मुग्त(क्त) करून पाठविण्याचे न आईकतां त्याची मुग्तता करून रवाना केले (पाहिजे). तरी करीम-बेग हुजूर आणिला आहे. त्याचे सुटके...मीने केला आहे. थोडकीयाच दिवसात मुग्त करून ...कडे रा होईल व कसबे पुणे येथें ठाणे करीम......पंत नायेबी करीत होता. ऐसीयासी जुनरचा प्रसंग ...स्वामी समीप आला. मग पुणे जागा पुरातन आहे. ......च ठाणे असावे हा हेत स्वामीच्या चित्ती बहूत...ते जागा खालीं जाली. याकरितां आपले तर्फेनें गंगाराम...ह्याची आज्ञा केली. तरी तुम्ही नबाबास सागोन ...ळूक् करून घेणे व तुम्हास जातेसमई मातुश्रीचे ...(सां)तले होते. ऐसियासी मातुश्रीची अवस्था ...चे राहाणे ऐसा कितेक प्रसंग लिहीता गाठी पड...बाबास सागोन या प्रसंगात त्याची सुटका हो(ये) ये गोष्टीचा सहसा विसर पडो न देणे व तुम्हास आण...रूबरू जातेसमई सागितली. त्याप्र...... पावणे. आणखी जो प्रसंग स्वामीच्या हिताचा ... प्रसंग उचित हातीचा जाऊ द्याल ऐसा आर्थ नाही. कार्याचा भार तुमचे सिरी आहे. कार्यकर्तेहि ... कार्यभाग उत्तम पदार्थ सिधी पाऊल मग स्वामी ...वयाचे करणे यावयाचे ज समई समीप होईल. ते पुढे लेहून पाठवणे. मार्गी भारदारीने यावयासी र... येखादी पाठवितील. मग स्वार होऊन येणे ...याचे सहसा न करणे. हरयेकविसी आपलेस...स्वामीस तुम्हाहून आणखी कोण्ही अगर ...दार्थ आधिक आहे ऐसा अर्थ कदापि नाही. स...ची दया कृपा तुमचे ठाई आहे. तुम्ही आप... समाधान आसो देणे व तुम्ही ते प्रसंगी आहा. नबाबास ...पुरजी बावाचे कार्यें प्रयोजनविसी साहेता ... व वतनी गाऊ त्याचे जागिरीत होते ते विशगलीत जा ... ती बदस्तूर साबीक बाहाल होये ते करणे. येविसी पत्र लिहिले आहे व नबाबासही त्याचे विसी सिपा...तरी तुम्ही हरएक विसी साहेताकरून त्याचे कार्य ... रायभानजी काका याचे जागिरीत गोपाजी सिदा ... करीत आहे बारसीस राजे उठोन खसखस लाविली. ...स ताकीद होये की बारदीगर याच्या जागिरी... वाटेस न जाये व याच्या बाहालीच्या सनदा पत्रा द... आहेत त्याही ताकीद करऊन त्वरेने होत त्या लो... सविस्तर वर्तमान राजश्री यादो गोपाल यानी लिही .. कळेल जाणिजे. बहूत काये लिहिणे तरी तुम्ही सूज्ञ.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७., अं. १-४, पृ. ८८-८९.

१२ आगष्ट १७०९ ] (-२७१-) [

[ फार्सीचा मराठींत तर्जुमा ]

[ शिक्का ]

ह्या समई फर्मान वालाशान सादर जाला की दोन चाहूर जमीन पडित पो कडेवळित सरकार आहमदनगर सुभे खुजस्तेबुनीयाद पौ निर्वाहानाा आबूदूल रसूल

मुतवली वाा जैनु आबेदींन याच्या किहाभाचा वतमलियात करणार दर्गा गुफरान पन्हा सैद शरीफ यांचा व दर्गामजकूर पो हवेली मजकूर येथील आहे व सिवाय दोन मौजे दर्गाचे खर्चाकरितां मुकरर आहे. तर बाफर्जेदान पाठीवर लिहिल्या बर-हुकुम मुकरर व्हावा की उमद्य तेथील निर्वाहास खर्च करून असिर्वाद हमेषा दौल-तीस देण्याची काळजी करीत जातील. यास्तव पाहिजे की हाकीम व आमलदार व जाहगीरदार व करोडी हालचे व पुढे होतील ते याणी जमीन वर लिहिलेली मोजून व चक बांधून वहिवाटीस यांस देणे व कोणत्याहि तऱ्हेने तगीर व बादल न करणे व सायर बाबती व खर्चापोा कनलगा व नजराणा व जरीबना व जाबताना व मोहो-राना व दारोगांना व बेगार व सिकार व मोकदमी व कानुनगोई बाा व जप्त करणे. हरसाल चकनामा पाहिल्यानंतर व तक्रार जिराइयी बदल व सर्व प्रकारे हरकती बादशाई व दिवाणी कामाबदल मुजाहींम न होणे. या बाबतीत दरसाल नवीन सनदेची तलब न करणे. जर दुसरे माहाली काही इनाम असल्यास त्याचा इतबार न करणे. ताा ९ माहे जोवल सन ३ जुलुसबाला (१ जानेवारी १६६१) यांत लिहिला असे.

शेरा जालेले यादीचा ताा ३ रोज शुक्रवार माहे रमजान सन ५१ जुलुसवाला मुताबीक सन १११८ हिजरी (२८ दिसेंबर १७०६) मांफीक १८ अजूर माहे इलाही चीरी साल यात सियाखत व नज्याबत पन्हा सुज्याआत व शाहामत सजावार इनायत पातशाइ काबीळील मरहमत जिले इलाही सदर रफीउल कदर महंमद आमीन बाहा-दूर याची व नौबत वाक्या निंगार बंदे दर्गा ख्वाज्या आबदुला याचे कल्मी होतात की बादशाहा याचा हुकुम सादर जाला की दोन चावर जमीन पो कडेवळित सरकार आहमंदनगर सुभे खुजस्तेबुनियाद पौ निर्वाहाकरिता आबदूल रसूल मुनवली वाा जैनुल आबेदींन किहाभाचा व तमलियत करणार दर्गा गुफरान पन्हा सैद शरीफ याचा की दर्गा मजकूर पौ हवेली मजकूर येथील आहे व सिवाय दोन मौजे दर्गाचे खर्चाकरिता मुकरर आहेत तर माारनिल्हे यांचे नावे बाफर्जेदान, मरहामत केला असे. जर दुसरे माहाली काही इनाम असल्यास त्याचा इतबार न करणे ताा २ माहे जोवल सन ५ कल्मी जाला शेरा दस्तखतान सियादत पन्हा खानाजाद लायकुल मरहामत व पेहसाल मतलबखान यांचा व हेनायब सियादत व नकाबत पन्हा शराफत व नज्याबत दस्तगाहा मोते मनुत दौलतुल आलि या मोतमेदुस सलतनत इलाही या उमद्ये फिदवीयान सुज्या आत निशान ज्युबदैन व इनाम रफीउशान ताजींम मनाजींम मुल्कुमालवाहेज मनाहेज दौलत व येकबाल आ आर्जीम उजतजमदेउलमुलुक मदारुल मोहाम आमिरुल उमराव यांचा जैसा जे दाखल वाक्यातकतम शेरा दस्तखताने सियादत व नज्याबत पन्हा सुज्याआत शाहामत दस्तगाहा सजावार इनायत पातशाही काबीले मराहमत जिले इलाही सदर रफीउल कदर महमद आमीनखा बाहादूर यांचा ऐसा जे दाखल वाक्यात कराम शेरा दस्तखताने वाकेनवीस यांचा ऐसा जे वाकेप्रो आहे. शेरा

दस्तखताने उलीहे आ आजींम उजराजमदेतुलमुलक मदारुलमोहांम आमिरुल उमराव यांचा ऐसा जे दुबार अर्जास पोचविला. शेरा दस्तखताने फजीलत पन्हा काबुलील येहेसान फाजलखान यांचा ऐसा जे. ता १५ माहे जिल्काद सन ५१ जुलसवाला ( ९ फेब्रुवारी १७०७ ) यांत अर्ज पावला शेरा दस्तखताने आकारत व आयालत पन्हा रिसाल्यात व शाहामत दस्तगाहा उमद्ये फिदवीयान मुखलीसखान बायेतकादमे जुर नजर पातशाही मौरदे आलखाफनामत नाही. माबते आताफ बेकिरान खाना मादसुज्याआत निशान सामसा मुददौला नाफीयुलमुलक बक्षी युलकुमालिक आमिरुल उमराव बाहादूर नुसरतजंग सिपा सरदार नायेब यकतिजाद खिलाफत व फर्मा रवाये येतिमात सलतनत व किशवर कुशाये मुमाहिदे कवाइदे मदिलत मोआजम उमौरे खिलाफतउकद कुशायेमो आकीददी दौल्त सिपे आरये माआरी केफत हो नसरत गुजुर इझरार पातशाही दानाय जमीर जिले इलाही आजींम पैराये मय फिलखलीफये मयमनतहु सदे दानष वसलाई साहेब इलाही आलंम आराये दस्तुर उजरामालिके मदार बुन्हान व कुलाले जलिल येलातीदार साहेब शौकत व आजमत व लयेलातीदार हतेशाम व आजबुलईजे व शरीफ व लयेहेतीरांम किदवे खबानीन बुलदे मकान उमदये उजराय अजीमुशान रुकुनुस सलतनतुल आलिया निजाम मुलमुलुक असफदौला यांचा ऐसा जे. फर्मान आलिशान कलमी जाला. बस्त आहेत. (खाली लिहिलेला फर्मान बरहुकुम दर्गामजकुरचे खर्चाकरिता दोन मौजे मुकरर दरोवस्त आहेत.)

खाली आलिशान लिहिलेला ता १८ माहे शहरयुर सन ९ बरहुकुम येक मौजा कोनसी आमले शेवगाव सरकार आहमंदनगर व मौजे येकलाहारे आमले पा हवेली सरकार संगमनेर सुभे मजकूर मुकरर दरीविला मरहामत जाला.

अर्जाची याद हुजुरास गुजराविली की फर्मान पूर्वील जुलसचा बरहुकुम दोन मौजे सर्व उत्पन्न रुपये ७३५ दर्गामजकूरचे खर्चाकरितां पूर्वीपासून मुकरर आहेत की असीर्वाद करणार फार उमेदवार आहे कीं दोन मौजे सिवाय येक मौजे मराहामत व्हावा. दस्तखताने खास मुजयंन होऊन माारनिल्हे याचे बावे बाफर्जदान दोन चाहूर दोन चावर जमीन पडित जमा खरीज लायक जिराइत.

रिसाल्यात सियादत व नज्याबत पन्हा सुज्या आत व शाहामत दस्तगाहासजावा इनायत पादशाही काबिलें मरहामत जिले इलाही सदर रफीउलकदर महमद आमीनखान बाहादूर व नाबत वाक्यानवीस ख्वाज्या आब्रदुला याचा.

ता १८ माहे रजब सन ३ जुलुस माफीक सन ११२१ हिजरी मुताबीक १७ तिरमाहे इलाही ( १३ सप्टेंबर १७०९ ) नक्कल साह्यात तवजुचे दप्तरात शाहा महमद यांचे मार्फतीनें पोचली.

२४ जिल्काद सन ५१ ( १८ फेब्रुवारी १७०९ ).

ता ११ माहे रावल सन ३ जुलसवाला (१२ मे १७०८) नकल

दप्तरात इस्तिफा व आबुवाल्मानचे शाहमहंमद याचे मार्फतीने पोचली. ता ३ माहे जिल्काद सन ३ नकल वकीलाचे दप्तरात पोचली

ता १६ माहे रमजान सन ३ जुलुस (९ नवंबर १७०९) नकल तवजूचे दप्तरात शाहा महंमद याचे मार्फतीने पोचली.

ता १६ माहे रमजान सन ३ जुलुसवाला माफीक सन ११२१ हिजरी (९ नवंबर १७०९) नकल ऐमाचे दप्तरात शाहा महंमद यांचे मार्फतीने पोचली. वाक्यानिशी मोकबीक केला आहे

दाखल रोजनाम्यास जाला ता ३ माहे रमजान सन ५१.

ता २९ जाखर सन ३ शाहा महमद याचे मार्फतीने इंतिखावाद दाखल जाला.

शिक्का– ' असफददौला : बंदा शाहे आलम : बादशाह गाजी.'

शिक्का– ' मोअजमखान : खानाजफरजंग बहादूर : बफादार फिदवी शाहे : आलंबवादशाहे गाजी : सन ११२०.'

शिक्का– ' सैद आफजदखान : सर ज्याहानफीतवी : शाहे आलंम बादशाहे : गाजी.'

ता माहे जिल्काद सन ३ यात मोहोर केली

ता १६ माहे रमजान सन ३ यांत (९ नवंबर १७०९) मोहोर केली असे

शिक्का– आमरसिंग बीन : राज्या रघुनाथ बंदा : शाहे आलंम बाद : शाहे

ता १८ माहे रजब सन ३ (१३ सप्टेंबर १७०९) लिहिला असे

ता ९ माहे साबान सन ३ (३ आक्टोबर १७०९) यात मोहोर केली असे.

शिक्का– ... ... फिदवी महंमदशाहा बादशाहे गाजी.

ता ११ माहे रमजान सन ३ (४ नवंबर १७०९) यात इतला जाला

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, खी. ग्रं. क्र. १७, पृ. १८८–१९२.

१७ आगस्ट १७०९ ] (– २७२ –) [ श्रावण वद्य ८, रा. श. ३६

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३६ विरोधी संवत्छरे श्रावण वद्य ८ सौम्यवासर क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिवछत्रपती याणीं पारपत्यगार व कारकून वर्तमान व भावी ता पांवस प्रांत राजापूर यांसी आज्ञा केली ऐसि जे. वेदमूर्ती गोपाल जोतिसी बिन श्रीधर जोतिसी सा कसबे पांवस याणी स्वामीसंनिध येऊन विनंती केली. आपले पिते श्रीधर जोतिसी बहूत थोर विद्यावंत. याचा योगक्षेम चालावा याकरितां देवाणातून धर्मदाव तांदूल कोठीमापें खंडी १८० दिल्हा. त्याप्रमाणे चालत होते.

त्यास तेवढ्यानें संवसारकृत्य न चाले. याकरितां राजश्री कैलासवासी स्वामी चंजी प्रांतें असतां विनंती केली. त्यावरून राजश्रीनी धर्मादाव दूर करून तीन शत लारीची वृत्ती करून दिली. राजश्री रामचंद्र पंडित आमात्य हुकमतपन्हा यावरी राज्यभार होता. यासि पत्र करून दिल्हे. तें पत्र पंतम-शारानिलेस दिधलीयावरी पंती दीड शत लारीची वृत चतुर्थांश लागवड व तीन तकसिमा पडी याप्रमाणें पत्र माहालकरियासी करून दिल्हें. परंतु भुमी आपल्या दुमाला होऊनु चालिले नाहीं. त्याउपरी आपले पिते निधन पावले. आपला योगक्षेम चालिला पाहिजे याकरितां आपल्यास धर्मादाय कोठीमापें तांदूल मोकरर करून दिल्हे ते कितेक दिवस चालिले. त्याउपरि धामधुम जाली. धर्मादाव ही न पावे. या करितां सिधुदुर्गिच्या मुकामी स्वामीसंनीध येऊन विनंती केली. त्यावरून स्वामीनें सन सबा-मध्यें छ १२ रमजानीं ( ८ दिसेंबर १७०६ ) का मजकुरी सेजारकरीची वृती करून दिधली. तें पत्र महालास नेलें. त्यास आपलें ठिकाण आगर व सेत आहे ते नेदता पडी आणखी ठिकाण महालकरी देऊ लागले. ऐशास आपल्यास पडीचें ठिकाण घेऊन कीर्दी करावयास अनकूल पडत नाहीं. तरी स्वामीने आपलें ठिकाण आगर व सेत आहे तें इनाम करून दिल्हे पाहिजे. म्हणजे स्नानसंध्या करून स्वामीस कल्याण: चिंतून सुखरूप राहीन. म्हणून विदित केलें व सन सबामध्यें सनद दिधली होती ते आणून दिधली व पूर्वील चंजीचे मुकामी तीर्थस्वरूप कैला-सवासी स्वामीनें तीन शत लारीची वृती करून दिधली तें पत्र गेले म्हणून विदित केले. ऐशास गोपाळ जोशी भले शास्त्रज्ञ याचे पिते श्रीधर जोतिसी बहुत थोर होते. हे ही तैसे च आहेती. यांचा योगक्षेम सांग चालावा हें स्वामीस अगत्य. याकरितां सन सबामध्यें सनद दिधली ते रद करून हाली यास नवीन इनाम कुलबानु व कुलकानु खो। हकदार करून याचा आगर व सेत कसबे मजकूरी आहे त्यापैकी अनाजी दतो याचे धारेयानें इनाम लारी दाभोली १०० येकसें रास इनाम करून दिल्हा आहे. तरी तुम्ही कसबे मजकुरी याचे आगर सेत असेल त्यापैकी सेजारकरीची भुमी लाग-वडीयास नेमून देउनु चुतु:सीमा करून याचे दुमाला करणें आणि इनाम यास व याचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने चालवणे. सालदरसाल ताजा सनदेचा उजूर न करणे. पेशजी धर्मादाय चालत असेल तो व कैलासवासीचें पत्र असेल तें रद असे. या सनदेची तालिक लेहोन घेऊन असल सनद भोगवटीयास त्याजपाशी परतोन देणे.

लेखनालंकार. [ शिक्का– ‘ मर्या : देयं विरा : जते ’ ]

तेरीख २१ जमादिलाकर सुास‍न अशर मया व अलफ

रुजू सुरु निवीस  बार सुरुसुद सुरुसुद बार

[ शिक्का– ‘ श्री शिं : व नरपति : हर्ष निधान मो : रेश्वर सुत नील : कंठ प्रधान’. ]

भा. इ सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. ७४–७५.

२० आगष्ट १७०९ ] (–२७३–) [२३ जमादिलाखर, अशर मया अलफ

श्री

[ शिक्का ][1]

आज्ञापत्र समस्तसेनाधुरंधर विस्वासनिधि राजमाण राजश्री जयसिंग जाधवराउ सेनापती ताा मोकदमानी मौजे करंजे सोमयाचें ताा निरथडी प्राा पुणे सुहुर सन आसर ( मया ) आलफ. मौजे मजकूर दताजी भाडवलकर दिाा राजश्री बालाजी विश्वनाथ याजकडे मुकासा दिल्हा आहे. तरी यासी रुजुवातीने खंडणी प्रमाणे वसूल देणे. जाणिजे. छ २३ जमादिलाखर. मोर्तब सुद. [ शिक्का–' विलसती : लेखनाव : धि मुद्रा ' ]

बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शक १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. ९७.

८ सप्टेंबर १७०९ ] (–२७४–) [ भाद्रपद वद्य १ गुरुवार, रा. श. ३६

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३६ विरोधी संवछरे भाद्रपद बहुल प्रतिपदा गुरुवासरे क्षत्रिय कुलावतंश श्री राजा शाहुछत्रपती स्वामि याणि देशमुख व देशपांडे ताा सिरवल प्राा मावळ यासी आज्ञा केली ऐसी जे. जगनाथ पंताजी बोकील यानी स्वामीसनिध वंदनचे मुकामी विनंती केली की आपले बाप पंताजी गोपीनाथ याणी [ शिक्का ][2] [ शिक्का ][3] राजश्री थोरले कैलासवासी स्वामिची सेवा एकनिस्टेने केली. त्यावरून कृपाळु होऊन इनाम जमीन चावर २ व सेटेपण बिाा ताा

मौजे भोळी ताा माार जमीन चावर १ मौजे मांडकी येथील सेटेपण व जमीन चावर १

एकूण दोनी चावर जमीन प्राा मजकूर पैकीं दिली. तेणेप्रमाणे चालत आला. मधे ताब्राची धामधूम जाहलियावरी पंताजीपंत व आपण कर्नाटक प्रांतें गेलो. त्या तागायत इनामाचा भोगवटा चालिला नाही. सांप्रत स्वामी कृपाळु होऊन पूर्वी राजश्री कैलासवासी स्वामीनी देऊन चालविले प्रमाणे स्वामीनी आज्ञा करून चालविले पाहिजे म्हणून विनंती केली. त्यावरून पंताजी गोपीनाथ याणी राजश्री थोरले कैलासवासी स्वामीची सेवा बहुत केली. त्याचे चालविणे

१. शिक्का—श्री : राजाराम : चरणी दृढभा : व सेनापति ध : नाजी जाध : वराव.'
२. शिक्का– 'श्री : शिवनरपति ह : र्षनिधान मोरेश्वर : सुत भैरव मुख्य : प्रधान '
३. शिक्का– ' श्रीशंकर श्री : शाहु छत्रपती : कृपानिधी प्रल्हा : द सुत गदाधर : प्रतिनिधी '

स्वामीस आगत्य. याकरितां पूर्वी दिल्हेप्रमाणें स्वामींनी पेस्तर चालवावयाविसी आज्ञा केली असे. तरी सदरहू दोनी चावर जमीन कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी पूर्वी जमीन चतुसीमा नेमून देउन पेसजीच चालविले. या प्रमाणे पंताजी गोपीनाथ याचे पुत्र त्रिवर्ग त्यांत रामचंद्र पंताजी मृत्यु पावले त्याचे पुत्र बाबूराऊ रामचंद्र जगन्नाथ पंताजी श्रीनिवास पंताजी यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवणें. प्रतिवर्षी नूतन पत्राचा उजूर न करणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुखें पत्र भोगवट्यासी परतून देणे. जाणिजे. इनामाचा भोगवटा पहीलेपासून चालत असे त्याप्रमाणे पेस्तरहि चालवणे. लेखनालंकार [ शिक्का- 'मर्या : दंयं रा : जते ' ]

रा॥ छ ६ साबा

रुजु बार सुरु सुद बार

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, शके १८४१, स्वी. ग्रं. क्र. २५ पृ. ६०-६१

६ सप्तेंबर १७०९ ] (–२७५–) [ भाद्रपद शुद्ध १४ मंगळवार. रा. श. ३६

स्वस्ती श्री राज्याभिषेक शके ३६ विरोधी संवत्सरे भाद्रपद शुद्ध चर्तुदसं भोमवासरे क्षत्रीये कुलवंतस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणे देशमुख व देशपांडे पा॥ परेली यासी दीलेहे अभेयपत्र ऐसे जे. तुम्ही विनंतीपत्र पाठविले. ते प्रवीष्ट होऊन लीहीले वर्तमान वीदीत जाले. पा॥ मा॥स डोंगरी फौजा राहून उपद्रव देतात. त्यामुळे पा॥ मा॥र वैरान जाला. याकरिता स्वामीनी कृपाळू होऊन लस्करास ताकीदपत्र व पा॥ मा॥स अभेयपत्र सादर करावयास आज्ञा केली पाहिजे म्हणून लीहीले. त्यावरून लस्करास ताकीदमत्र व हे तुम्हास अभेयपत्र सादर केले असे. तरी कोणेवीसीं शक–अंदेशा न धरिता पा॥ मरारीं राहून कीर्दि आबादानी करून सुखरूपे राहणें. कोणाचा उपसर्ग लावणार नाही. अभये असे. लेखनालंकार. ['मर्यादेयं राजते-' शिक्का ]

युगवाणी, व. २, अं. ३. मार्च १९४७, पृ. ८७.

८ आक्टोबर १७०९ ] (–२७६–) [ आश्विन वद्य १ शनवार. रा. श. ३६

श्री देव

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३६ विरोधी संवत्सरे आश्वीन बहुल प्रतिपदा मंदवासरे क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी राजश्री हरी

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2] यादव मुख्य देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी प्रांत पुणे यांसि आज्ञा केली येसी जे. श्री(देव) मुा चिंचवड यांस मौजे मोरगाव ताा कऱ्हेपठार प्राा मार येथे इनाम १ सेत चावर भूमी १ येक पूर्वीपासून आहे. तेणे प्रौ करार करून हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी तुम्हीं सदरहू इनाम पुर्वीपासून चालिल्या प्रमाणे भोगवटा ताा (?) साल गुदस्ता मनास आणून चालवणे. प्रतिवर्षी नवीन पत्राचा अक्षेप न करणें. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र भोगवटियास परतोन देणें. निदेश समक्ष [ शिक्का– ' मर्या : देयं रा : जत ' ]

रूजु सुरू मुद बार

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १–४, पृ. ६८.

१ नवंबर १७०९ ] (– २७७ –) [ कार्तिक शुद्ध १०
मंगळवार, रा. श. ३६

श्री

[ शिक्का ][3] [ शिक्का ][4]

स्वस्ति श्री राज्यभिषेक शके ३६ विरोधी नाम संवत्सरे कार्तिक शुद्ध दसमी भौमवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं राजश्री विठल गोपाल देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी प्रांत जावली यांस आज्ञा केली ऐसीजे. वेदमूर्ती शामभट बिन रामभट श्रीमाभळेस्वरकर सूर्यउपासनी याणीं हुजूर येऊन विदित केलें कीं थोरले कैलासवासी स्वामी यांणीं गोपालभट आपले आजे यांजपासून मंत्र उपदेश संपादिला. ते समयीं वर्षासन सुभे मजकूर पैकीं करून दिले आहे. बिा

| | |
|---|---|
| होन पादशाही १००. | गला नवशेरी बारूळ मापें |
| वजनी टाा मण | खंडी |
| ·।४ तूप | ४ तांदूळ |
| ·।४ तेल | ४ नागली |
| ·।।।३ | ८ |

येणेंप्रमाणे होन एकशें व गला खंडी आठ वजन टकेबंदी अठरा मण थोरले कैलासवासी यांचे कारकीर्दीपासून श्री शिवाजीराजे यांजपासून

१. शिक्का– ' श्री : शिवनरपति ह : र्ष निधान मोरेश्वर : सुत भैरव मुख्य : प्रधान.',
२. शिक्का– ' श्री शंकर श्री : शाहु छत्रपती : कृपानिधी प्रल्हा : द सुत गदाधर : प्रतिनिधी.'
३. शिक्का—श्री : शिवनरपति हर्ष निधान मोरेश्वरसुत भैरव मुख्य प्रधान.
४. शिक्का—श्रीशंकर श्रीशाहुछत्रपति कृपानिधी प्रल्हादसुत गदाधर प्रतिनिधी.

सदरहू प्रो भोगवटा चालत आला आहे. परंतु आपणाजवळ पुर्वील पत्रें होतीं तीं घरामध्यें जळालीं. याकरितां स्वामींनीं सदरहू वर्षासन भोगवटियाप्रो नूतन पत्र देऊन जालवावयाची आज्ञा केली पाहिजे. त्यावरून हे थोर मळे अनुष्ठाते ब्राह्मण यांस स्वामींनीं आज्ञा केली कीं तुम्ही सुभां जाऊन आपले वर्षासनाचे मोइनीची सुभेदारीची बखेर घेउन येणें. त्यावरून शामभट बिन रामभट सदरहू संभर होन पाा व गला नाा बारूळे खंडी ८ आठ वजन टकबंदी अठरा मण प्रो भोगवटा पूर्वावार चालत आहे म्हणोन सुभांची बखेर आणिली. त्यावरून स्वामींनीं मनास आणून पहिले चालत आल्याप्रो चालवावयाची आज्ञा करून हें तुम्हांस आज्ञापत्र सादर केलें असे. तरि सदरहू मोईनप्रो पूर्वीपासून चालत आलें असेल तें मनास आणून पुढेंही शामभट यांस व त्यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें बिलाकुसुर चालवणें. या पत्राची प्रती घेऊन असल पत्र भट गोसावी यांजवळ भोगवटियास परतुन देणें. जाणिजे. लेखनालंकार. [ शिक्का—मर्यादेयं राजते ]

विविधज्ञान विस्तार. पु. ४१, अं. ८, आगष्ट १९१०, पृ. २७७; भा. इ सं. मं. वार्षिक अहवाल, शके १८३२, पृ. ७९–८०

१७०९ इ. स. सुमार ] ( – २७८ – )

श्री

राजश्री गदाधर भट प्रतिनिधि स्वामी गोसावी यास

छ श्री ॱत सकलगुणालकरण आखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नेहांकित जयेसिग जाधवराऊ सेनापती कृतानेक दंडवत विनति. उपर येथील कुषल जाणून स्वकीये लेखन केले पाहिजे. विशेष साप्रत आपण पत्र पाठविले ते पावले. विषद करून पत्रार्थ व वार्तिक मुखता वृत कलोन समाधान वाटले. स्वामी येशस्वी. हे प्रयोजन काही सामान्य संपादिले नाहीं. फौजाचें विषी लिहीले. त्यास आम्ही राजश्री स्वामीची आज्ञा घेऊन आलो ते मजल दरमजल खानदेस प्रांते गेलो. राजश्री रायाजि प्रभू यास थोरात दाभाडे याजकडे पाठविले. कितेक साधक बाधक विचार सागोन पाठविले. त्यावरून त्याणी आपणाकडील राजश्री जिवाजी गोविद व शामजी वामन उभयेता व राजश्री रायाजि प्रभू ऐसे पाठविले. त्याची भेटी जाली. त्याउपर कसबे पिपलनेर प्रा बागलाण या मोकामास गेलो. थोरात दाभाडेही त्या मुकामास आले. आक्षत्रि( ती )येस ( १ मे १७०९ ? ) भेटी जाली. साराष आपले सर्व आन्याये क्षमा करावे, दाभाडियाचा सरजाम पूर्ववत करार करून द्यावा. राजश्री स्वामीपासून बहुमान गौरवास आतर न करावे. ऐसे मुदे घातले. ते सर्वहि मान्य करून त्याची सारी फौज समागमे घेऊन घाट चढोन गगातरि प्रा

आलो. त्यास लस्करावर स्वारी करावी सिधात केला. तो गोसावी याचे पत्र (आले), त्यावरून दरमजल राजश्री स्वामीसंनीध जात आसो, प्रस्तुत आम्हासमागमे सरदार ता

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| बापाजी नाईक | १ | जानोजी नाईक | १ | रभाजी ( नाईक. ? ) | १ |
| बालाजी विस्वनाथ | १ | राजजी थोरात | १ | खडेराऊ दाभाडे | १ |
| दमाजी थोरात | १ | चादो बिरदेऊ | १ | केरोजी पवार सेखोजी | १ |
| | | | | थोरात | १ |
| रायाजी ... | १ | तिमाजी साबळे | १ | | |

येणे प्रमाणे आहेत. गोसावी यास वर्तमान कलावे म्हणून लिहीले आसै. गोसावी यानी जो मनसबा केला आहे त्याचा निर्वाह करून घेऊन आम्हास पुढे बुधीवाद लिहिणे. तो लिहिला पाहिजे. बहुत काय लिहीणे हे विंनंति. [शिक्का- " विलसतु : लेखनाव : धि मुद्रा "]

[शिक्का- "श्री : राजाराम : चरणी दृढभा : व सेनापति ध : नाजी जाध : वराव "]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ८४-८५.

२१ जून १७१० ] (-२७९-) [आषाढ शुद्ध ६ बुधवार, रा. श. ३७.

श्री केशव चैतन्य

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३७ विकृति नाम संवत्सरे आशाढ शुद्ध शस्टी सौम्यवासर क्षत्रीयेकुळावतंस श्री राजाशाहूछत्रपती स्वामी यांणी मोकदमानी व सेटे माहाजनानी कसबे वोतूर प्रा। हरिश्चद यासी आज्ञा केली ऐसी जे. श्री संन्याशी याचा मठ कसबे मजकुरी आहे. त्यास नदीचा कडका लागोन जाया जाला आहे. त्यास [शिक्का][1] [शिक्का][2] नदी बाधोन काढणे हें स्वामीस अगत्य. या करितां बाबतींचे ऐवजी दुसाला रुपये १००० येक हजार देविले आहेत व नदी बाधावयाचे खटपटेस येक ब्राह्मण व येक अहुराप ठेवावयाविसी राजश्री पंतप्रधान यासी आज्ञा केली आहे. ते वेतन नेमून देतील. त्याप्रमाणें का। मजकुर पैकी देणे व का मजकूर पैकीं गाडे व वेटे देऊन नदी बाधोन काढणे. मठास आजार न लागे ते करणे. सदरहु हजार रुपये देऊन नंदी बाधवणे म्हणजे तुमचा मजुरा होईल. गै केलिया स्वामी तुमचा मुलाहिजा धरणार नाहीत. लेखनालंकार [शिक्का- मर्यादेयं : विरा : जते]

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १-४, पृ. १५५-१५६.

१. शिक्का- 'श्री : शाहुनर : पति हर्षनि : धान मोरेश्वर : र सुत भैरव : प्रधान.
२. शिक्का-- 'श्री शंकर श्री : शाहुनरपति कृ : पानिधि प्रल्हाद मु : त गदाधर प्रति : निधि.'

७ नोव्हेंबर १७१० ] (-२८०-) [ २५ रमजान, इहिदे
अशर मया अलफ

श्री

राजश्री रामाजी मल्हार हवालदार व कारकून ता मोसेखोरे गोसावी यासी

छ स्नो शामजी हरी नामजाद सुभा व कार प्रात मावले आसीर्वाद व नमस्कार सुा इहिदे आसर मया आलफ. बाा सनद राजश्री पंत सचीव छ २० रमजान (२ नवंबर १७१०) पो छ मार तेथें आज्ञा की माा साबजी येशवतराऊ पासलकर देशमूख ताा मोसेखोरे याणी विनती केली की अपल्याकडे इनामसेते व इनामगाऊ ताा मारपैकी आहेत. बिा ताा

सेते इनाम रकम कास होन
११॥ कसबे मोसे बुा पुरातन इनाम आहे होन
१०॥ गारजे
१ गावठण
११॥
६. मौजे जाबली पैकी सेत पलस-माची राजश्री पंतसचीव वैकुठवासी याणी दिल्हे.
१७॥

मौजे डाविजे ताा मजकूर हा गाऊ कुलबाब कुलकानु खेरीज इनामदार व हकदार राजश्रीपंत वैकुठवासी यांणी पूर्वी इनाम करून दिल्हा आहे. रकम होन ३४ येकून इनाम देह १

येकून सेते दोन येकून रकम साडेसतरा होन व इनामदेह १ येक रकम होन चवतीस आपणांकडे चालत आहे. परतु इनामाच्या सनदा आपणाजवल होत्या. त्यास सन तिसामध्ये (१७०८-९ इ.) अवलसाली हबसीयाची स्वारी आपणांवरी आली. आपणास कबिलियासह वर्तमान राजपुरीस धरून नेले होते· ते प्रसगी कुल वतनाचे कागद गेले. भोगवटीयास सनदा आपल्या जवल नाहीत, तरी सदरहू इनामसेताची व इनाम गावीची पत्रे द्यावयाची आज्ञा केली पाहिजे. म्हणउन विनती केली. त्यावरून हे पत्र तुम्हास सादर केले असें. तरी तीर्थरूप राजश्रीपंत वैकुंठवासी याचे-वेलेस यांकडे इनामसेते व इनाम गाऊ सदरहूप्रमाणें चालत आले आहे. त्याचा भोगवटा मनास आणून यांकडे सदरहू प्रमाणे इनामसेते व इनामगाऊ पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवीत जाणे. तालीक देहून घेऊन आसल पत्र भोगवटियास परतोन देणे. म्हणऊन आज्ञा. आज्ञेप्रमाणे हे सनद तुम्हास सादर केली असे. तरी इनाम सेते व रकम होन साडेसतरा व मौजें डाविजे देह यक रकम होन चवतीस त्याचा भोगवटा मनास आणून सनदप्रमाणे इनामसेते व इनाम गाऊ पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणे. तालीक लेहून घेऊन आसल पत्र भोगवटियास परतोन देणे. छ २५ रमजान.

[ शिक्का—लेख : णावदी : रघ ]
[ शिक्का—श्रीम... : रावचरणी : तत्पर शामजी : नी : रंतर. ]
पौ छ २९ रमजान ( ११ नवंबर १७१० ).

भा. इ सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ११३-११४.

१७१० इ. स. ? ] (-२८१-)

श्री

विनती उपर दोन हजार रुपयाचे घोडीयास जमान रा हिरोजी यादव दिल्ही आहेत. यास घोडी घेता देता पुरवत नाही हे मनास येईल तैसी येणार हजार रुपयाचे वित दोनसे म्हटले तर येथे इलाज नाहीं. यास तुम्ही घोडियाचे...न पडणे. नख्त चे हर इलाज करून आस्ता बरे आहे. हिरोजी यादव यास तगादा केला असे. तर गळा आधी उगवणे. बहुत काय लिहिणे हे विा.

भा इ. सं. मं सप्तम संमेलन वृत्त, शके १८४१, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ९७.

१७१० इ. स ? ] (-२८२-)

श्री

राजश्री आबाजीपंत स्वामी गो

सेवक बालाजी विश्वनाथ नमस्कार विनति. उपर रा हिरोजी यादव दोन हजार रुपयास तुम्हास जमान आमचे वचन करून जाले. घोडी द्यावी यैसा निर्वाह केला. यास येथील दडक तुम्ही जाणतच आहा. घोडी मिल्त नाही. पके घेऊन म्हणोन ...तगादा लाविला आहे. हे भले माणुस कचाटी गुतले आहेत. यास तुम्ही घोडा तूर्त याचे हवाली करणे. दुसरे पधरा दिवसा लिगाड अवघे वारणे. हे स्वमी होत यैसे सर्वश्वी न करणे. वरकड आमचे वर्तमान तर तूर्तवत हली बहुत कामी छत्रपती स्वामीस विनतीपत्रे पाठविली आहेत. श्रीदेव मध्स्यत द्यावे यैसे केले आहे. चिरंजीव बाजीराउ येथे ठेवावे. श्री दरम्यान द्यावे. यास श्रीकडील विचार तुम्ही बलकट करून ठेवणे. पत्राची उतरे आलियाउपर आधी तो प्रसंग सिद्ध असला पाहिजे. तर आनकुल करून ठेवणे. लोभ असो दीजे हे विा.

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, शके १८४१, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ९६-९७.

१७१० इ. स ? ] (–२८३–)

श्री

राजश्री अंबाजीपंत स्वामी गेाा

सेवक बालाजी विश्वनाथ नमस्कार विनंती. उपर तुम्ही पत्र पाठविले की राा हिरोजी यादव यास तुम्हास समध नाही. हे गोस्ट उचित नाही. येथील प्रसग तुमचा कैसा आला होता. तेव्हां हिरोजी यादव यास बहुता प्रकारे सागोन तुमचा निकाल करविला. आम्ही खावद तुमचे कर्तेंच जालो. यैसे असता येसी गोस्ट तुम्ही लिहिली उचित नव्हे. याउपर पत्र पावताच दोन हजार रुपयाचा निर्वाह करून पाठवणे. गणेशपंत मामा सकाली पाठविला असे. यामुले आमचे प्रसगास अतर पडले यैसे जाले आहे. या उपर आब्राजीपंत आनमान कराल तर तुम्हास आमचा सफत असे. अखेर पैके सुटत नाहीं. बरे समजणे आणि गणेशाबराबर निर्वाह करून पाठवणे. बहुत काय लिहिणे हे विाा.

भा. इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त, शके १८४१, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ९६.

२१ जून १७११ ] (–२८४–) [ १४ जमादिलावल, इसने अशर मया अलफ

श्रीशंकर रामदास

आज्ञापत्र राजश्री पिराजी घोरपडे सेनापती व नारो माहादेव ताा मोकदमानी कसबे सागली सुाा इसने अशर मया अलफ. बयाबाई परमपरा राजश्री स्वामी (रामदास) हे बहुत थोर याचा श्रीचा मोहछाव चालावा लागत आहे. याकरिता कसबे मजकुरी जमीन -।- पाव चावर यास दिली आसे. तरी उत्तम जमीन गावाजवली यास देऊन आद महदुद घालून चालवणे. प्रतिवृसी नूतन पत्राचा आक्षेप न करणे. नकल लिहून घेऊन असेल पत्र भोगवटियास देणे. जाणीजे. ताा छ १४ जमादिलावल.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १–४, पृ. १००.

२१ जून १७११ ] (–२८५–) [ १४ जमादिलावल, इसने अशर मया अलफ

श्रीशंकर

- रामदास

धर्मपत्र मातुश्री बयाबाई परमपरा श्री (रामदास) स्वामी यास पिराजी घोरपडे सेनापति व नारो माहादेव दडवत आनुक्रमे नमस्कार सुाा इसने अशर मया आलफ.

तुम्ही बहुत थोर. ये महिने स्वामीचे मोहछाव करिता. हे ठायी काही कुसीदल दिल्हीया राज्याची आभीवृध आहे यैसे पाहून तुम्हास वृती करून दिली आसे.

जमीन ·॥· अर्ध चावर

बिा

·।· कसबे सागली

·।· मौजे वडकी व सागली

---

·॥·

एकूण अर्ध चावर जमीन श्रीच्या वौशपरपरेने इनाम करून दिली असे. गावकरास आलाहिदा पत्रे आहेत....जो ऐवज उत्पन्न होईल तो करून राज्याची आभीवृध श्रीपासी इछीत जाणे. जाणीजे. रा छ १४ जमादिलावल.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. १०१.

१३ जुलै १७११ ] (-२८६-) [ १३ जुलै १७११

[ जाहीरनामा ]

महाराणीच्या कौन्सील ऑफ स्टेट मधील, डॉम रॉड्रीगो डा-कॉस्टा--हिंदुस्थानांतील व्हाइसरॉय व मुख्य सेनापती, ( याजकडून ) हा जाहीरनामा ज्यांच्या नजरेस येईल त्या सर्वांना कळविण्यांत येतें कीं चेऊलच्या किल्ल्याच्या मैदानांतील व त्याच्या आजूबाजूच्या टप्यांतील भंडारी लोकांवर सदर टापूंतील जमीनीच्या व नारळाच्या वाड्यांच्या मालकांकडून फार मनस्वी जुलूम करण्यांत येऊन त्यांना अयोग्य रितीनें वागविण्यांत येतें, म्हणजे त्यांच्या जमिनी व वाड्यांची मशागत करण्याची सक्ती त्यांच्यावर त्यांच्या इच्छे विरुद्ध करण्यांत येते असें कळल्यावरून व यास प्रतिकार व्हावा म्हणून, या द्वारें आम्ही हुकूम फर्मावितो कीं कोणत्याही दर्जाच्या अगर स्थितीच्या मनुष्यानें आपली मिळकत अगर नारळाच्या वाड्यांची मशागत करण्यास चेऊलच्या किल्ल्यांतील व आजूबाजूच्या टापूंतील भंडारी लोकांना त्यांच्या इच्छेविरूद्ध भाग पाडूं नये अगर त्यांवर सक्ती करूं नये. या हुकूमाच्या विरूद्ध जो वागेल त्याचा या रितीनें मिळविलेला सर्व फायदा सरकार जमा करण्यांत येईल. चेऊलच्या किल्ल्याच्या मुख्य व या ठिकाणच्या राज्यकर्त्या सभेच्या सभासदांना योग्य अधिकाऱ्यांमार्फत भंडारी लोकांनीं अर्ज केल्यावरून वरील हुकूमाची बजावणी करण्याचा जरूर तो हुकूम करण्यांत आला आहे. महाराणीच्या राज्याच्या फायद्यासाठीं व भंडारी लोकांना शांतता मिळावी म्हणून हा उपाय करण्यांत आला. या लेखाद्वारें चेऊलच्या उपरिनिर्दिष्ट सेनापती, राजकर्ती सभा, अधिकारी व दुसरे मंत्री व अधिकारी लोकांनीं हा हुकूम योग्य रीतीनें मान्य करावा व तो वर दर्शविल्या-

प्रमाणें फेरफार न करितां तंतोतंत पाळावा. नवीन फी न घेतां अथवा च्यान्सरीं कोर्टाची फी न घेतां महाराणीच्या सेवेसाठीं हा हुकूम केला असे.

[ चऊल येथील किल्ल्याच्या वखारींत व राजसभेंत नोंदला असे. ]

ता. १३ जुलै सन १७११ रोजीं गोवे येथे ग्रेगोरीओ मानरा सारा याणें लिहिला.

टाम रॉड्रीगो ड कॉस्टा.

भंडारी विजय, व. २, अं. १, आगष्ट १९२०, पृ. ६. [ हुर्न साहेबांनीं केलेला स्टॅस्टिकल रिपोर्ट ऑफ धी कुलाबा एजन्सी, इ. स. १८५४ च्या ग्रंथांतील, पृ. ६६--६७ वरून. ]

१७ आक्टोबर १७११ ] (–२८७–) [ आश्विन वद्य २ बुधवार, रा. श. ३८

श्री

[ शिक्का ][1]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ खर संवत्सरे आस्विन बहूल द्वितीया सौम्य वासर क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री पताजी सिवदेउ [ शिक्का ][2] यांसीं दिल्हे इनामपत्र यैसे जे. तुम्ही स्वामींचे पुरातन सेवक राज्यमध्ये श्रमसाहाय बहुत केलें. पुढें स्वामीच्या पायांसी येकानिष्ट जाणून तुमचे चालवणे अवश्यक. यास्तव तुम्हावरी स्वामी कृपाळू होऊनु मौजे बाडगुरें ता। निरथडी खेरीज हकदार तुम्हास व तुमचे वंशपरंपरेस इनाम देखील तिजाई व हाली पटी पेस्तरपटी दिल्ही असे. तरी तुम्ही तुमचे वंशपरंपरेने मौजे मजकूर कुलबाब कुलबानु देखील तिजाई खेरीज इनामदार व हकदार वजा करून इनाम अनभऊनु सुखे राहाणें. स्वामी चालवितील. जाणीजे.

लेखनालंकार. [ शिक्का-- 'मर्या : देयं रा : जते' ]

तेरीख १५ रमजान सुा। इसने (अशर) मया अलफ.

बार सुरु सुद बार

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १–४, पृ. ८८--८९.

१. शिक्का– 'श्री वर्धिष्णुर्विक्रमोर्विष्णो : सामूर्तिरिव वामनी । शंभुसूनोरसौमुद्रा शिवराजस्य राजते.'

२. शिक्का– 'श्री शाहु नरपति हर्षनिधान मोरेश्वर सुत भैरव प्रधान.'

१८ नवंबर १७११ ] (-२८८-) [ कार्तिक वद्य ५ रविवार,
रा. श. ३८

श्री सिधविनायेक

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ खर नाम संवत्सरे कार्तीक बहुल पंचमी रवि वासरे क्षत्रियेकुलावतंस श्रीराजा शाहु छत्रपती स्वामी यांणी राजमान्य राजश्री रंभाजी निंबाळकर यासि आज्ञा केली यैसी जे. मौजे सिदटेभ ताा पेडगाव प्रांत कडेवलित हा गांव श्री ( सिद्धिविनायक ) वास्तव्य मौा मजकुर यासि इनाम दिल्हा आहे. सनद निराळी सादर आहे. त्या प्रमाणें त्या तरफेने चालवुन तेथील यैवज बिकुसूर श्री ( सिद्धिविनायक ) स नेवेद्यास पावे ते गोष्टी करणें. जाणिजे. बहुत काये लिहिणे.

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १-३, पृ. ६९.

१० मार्च १७१२ ] (-२८९-) [ फाल्गुन शुद्ध १४
सोमवार, रा. श. ३८

स्वास्ति श्री राज्याभिषक शके ३८ खर सवत्सरे फाल्गुण शुद्ध चतुर्दशी इंदुवार [ शिक्का ][1] [ शिक्का ][2] क्षत्रीय कुलावतंस श्री राजाशाहू छत्रपति स्वामी याणी वर्धेई बेरड चाकर किले पुरंदर यासी आज्ञा केली ऐसीजे. थोराताकडील येस माली किलाखाले चालोन आला. तेथें गडकरी व बेरडाचा जमाव खाले उतरोन हरामखोरास दिल्हा. बेरडानी शर्त केली.... .. पडला म्हणून विदीत... तरी स्वामी... याचे मुबदला त्याचा गेला असेल तरी त्याचे स्वामी उर्जीत करितील. तुजेहे स्वामी चालवतील. पुढेंही निष्टेनें सेवा करणें. सराफराजी होईल. लेखनालंकार. [ शिक्का- मर्या : देय रा : जते ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ७६.

१० मार्च १७१२ ] (-२९०-) [ फाल्गुन शुद्ध १४
सोमवार, रा. श. ३८

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ३८ खर नाम सवत्सर फाल्गुण सुध चतुर्दसी भौमवासरे क्षेत्रियकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी यांणी मोकदमानी मौजे

१. शिक्का- श्री : शाहु नर : पति हर्षनि : धान मोरश्वर : सुत भैरव प्रधान.

२. शिक्का- ' श्री मत्र्यंबक : भक्तस्य शाहु प्रति : निधेर्मुद्रा : नारायणस्य मुद्रेयं प्रल्हाद : तनुजन्मन :

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2] वालण ता। पौन मावल यासि आज्ञा केली यैसी जे. मौजे मजकूर रा। पंताजी सिवदेव यांस वेतनाचे यैवजी मुकासा आहे. त्याप्रमाणे करार असे. तरी देखील बाबती मारनिलेकडे उसुल देणे. दुसरेकडे यक रुका न देणे. लेखनालंकार.

[ शिक्का— मर्यादेयं राजते ] रुजु सुरुसुदबार

~~~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १–४, पृ. ८९

२६ जून १७१२ ] (–२९१–) [ आषाढ शुद्ध ३, शके १६३४

[ शिक्का—' श्री : विद्याशंकर : भारती ]

श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्यपदवाक्यप्रमाणपारावारपारीणयमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासप्राध्यष्टांगयोगानुष्ठानिष्ठतपश्चक्रवर्त्यनद्यवछिन्नगुरूपरंपराप्राप्तव्याख्यानसिंहासनाधीश्वरसकलवेदार्थप्रकाशकसांख्यत्रयप्रातिपालनसकलनिगमागमसारहृदयवैदिकमार्गप्रवर्तकसर्वतंत्रस्वतंत्रआदिराजधानीविद्यानगरीराजधानीकर्णाटकसिंहासनाधीश्वरगुरूभूमंगलाचार्यऋष्यशृंगपुरवराधीश्वरतुंगभद्रातीरनिवासचतुर्वेदपारायणण्मतस्थापनाचार्यशृंगेरीमठवरपट्टपद्रसिंहासनश्रीशंकराचार्यपादपप्राराधकशृंगेर्यादि मठचतुष्टयमुख्यपीठाधिपतिश्रीशंकराचार्यकरकमलं ... मध्वमतकोलाहलविद्याशंकरभारतीयतीश्वैरः कृतनाराणस्मरणानि

नानादुष्टनिवासभूमितलभामज्जीतपाथोनिधा, उद्धर्तु जगदीश्वरोपरवपुः संधारयन्नामतः ॥ विद्याशंकरभारतीतिवसुधापृष्ठेभ्रमन्सर्वदा, ग्राम्याणांमुखमर्दनो विजयतेऽज्ञानांधकारापहः ॥ १ ॥ स्वस्ति श्रीमदंतूर्जदेशस्थसमस्तविद्वद्वैदिकान्प्रति तथा सर्वगृहस्थानप्रति विशेषस्तु श्रीशके १६३४ नंदनसंवत्सर आषाढशुद्धतृतीयायां अस्माभिर्गंगायात्रोद्देशेन कोंकणे फोंडाख्यदेशे कपिलेश्वरस्यालये आगतं तत्र पद्यब्राम्हणानां भिक्षां गृहीत्वा बंधवाटिकाग्रामे श्रीमन्महालक्ष्म्यालये समागतं ततः अस्मत् श्रीस्वामिपरमप्रियशिष्यैः शस्थज्योतिर्विद्ब्राम्हणानां गृहे अनादितः यावदद्य दिनं अस्मदादि श्रीस्वामिपरंपरया अस्मैत्स्वामिभिर्यथाभिक्षागृह्यतेतथास्माभिरपि यदा अस्मिन्देशे संचारार्थमागतं तदा एभिरेवमेवदीयतं अस्माभिरपि गृह्यते तथैवेदीनामेप्येतषां ज्योतिर्विदां गृहे भिक्षां गृहीत्वा श्रीमन्नाटेकरगृहे भद्रंभट्टादिब्राम्हणा प्रेषितास्तदातेषां गृहे देवूसकरोपनामकरामचंद्र भट्टस्थितः तेनास्मत्प्रेषितब्राम्हणान्प्रति ज्योतिर्विदां गृहे भवद्भिर्भिक्षा न ग्राह्येति अस्मन्नियममतिक्रम्य भिक्षागृहीतेतिकरणात् यूयंभ्रष्टास्थ युष्मत्पंक्तो अस्माभिर्नभुज्यते

१. शिक्का– ' श्री : शाहुनर : पतिहर्षनि : धान मोरेश्व : रसुत भैरव : प्रधान.'

२. शिक्का– ' श्रीमत्र्यंबक : भक्तस्य शाहु प्रति : निधेर्मुद्रा- नारायण : स्य मुद्रेयं प्रल्हाद : तनुजन्मनः '.
~~~~~~~~~~~~~~~~

इत्याधनेकधा असद्वलगना कृता तदास्मद्ब्राम्हणाः कोपात् गुरुनिंदकरामचंद्रभट्टस्य यज्ञोपवीतत्रोटनार्थ गताः तदा नाटेकरगणेशभट्टैः ब्राम्हणानां बहुविध समाधानं कृतं तदा तैर्ब्राम्हणरागत्यऽस्मिन्निकटे तदखिलं वृतं निवेदितं तदानाटेकरगृहे अस्माभिर्गत्वा भिक्षा गृहीता तदुत्तरं ब्रम्हद्रोहीत्वात देवुसकरोपनामक रामचंद्रभट्टो बहिष्कृतः अतः सद्भिः सवैरनेनसह न व्यवहर्तव्यमित्याज्ञापत्रमिदं.

ब्राम्हण, व. १, अं. ५, मे १९४६, पृ. १४–१५.

१९ जुलै १७१२ ] (–२९२–) [ आषाढ वद्य १२ शनवार. रा. श. ३९

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदननाम संवत्सरे आशाढ बहुल द्वादसी मंदवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति याणी राजमान्य राजश्री खंडो बावाजी जमिनीवीस दिा सेनापति यांसी आज्ञा केली ऐसिजे. तुम्ही स्वामीच्या पायासी निस्टा धरून स्वामीसेवा शुधातःकर्ण करून करीत आहा. दुसरा अर्थ किमपि जाणत नाहीं. हे वृत्त राजश्री जयेसिंग जाधवराउ सेनापति याणी हुजुर लिहिलें. यावरून स्वामी तुम्हावरी बहुत संतोषी जाहले. तरी तुम्ही स्वामीचे पुरातन कदीम सेवक आहा. तुम्हापासून येक निष्टतेस अंतराये होऊं पाहतो की काय पुढें ही स्वामीच्या पायासी निष्टा धरून स्वामी कार्य करीत जाणे. म्हणजे स्वामी तुमचें उर्जित करून चालवितील. येवीशी आपले समाधान असों देणें. बहुत काये लिहिणे.
[ शिक्का–'मर्या : देयं विरा : जते' ]

महाराष्ट्र साहित्य. व. १, अं. ३, सप्टेंबर १९१९, पृ. १०२.

२४ आक्टोबर १७१२ ] (–२९३–) [ ३ सवाल, सलास अशर मया अलफ

श्री

[ शिक्का ][1]

आज्ञापत्र समस्तराज्यकार्यधुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री पंत आमात्य ताा मोकदमानी मौजे करजे ताा निरथडी सुा सलास अशर मया व अलफ. मौजे मजकूर पेशजी दताजी भाडवलकर याकडे मोकासा होता. हाली त्याकडून दूर करून हाली खंडोजी भाडव(ल)कर दिमती राजश्री दामाजी माणकेस्वर

१. शिक्का—'मल्लनिषूदन : सक्तेः शाहुराज्ञः स : देवनिष्ठस्य। श्री वा : सुदेवसुनो-राव्रु : रावस्य मुद्रेयं.'

याकडे जमावाच्या बेगमी बदल मोकासा करार करून दिल्हा असे. तरी तुम्ही मानु-लेसी रुजु होऊन मौजे मजकूरचा मोकासबाबेचा वसूल यासि देणें. जाणिजे. छ ३ सौवाल. पा हुजूर [ शिक्का—' लेखनाव : धि जयति ' ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत, शके १८३८ स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. ९८.

१७१२ इ. स. सुमार ] (–२९४–) [ ?

॥ श्री ॥

॥ श्रीविद्याशंकर ॥

[ शिक्का ][1]

श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्यपदवाक्यप्रमाणपारावारपारीणयमनियमासनप्राणायाम्अप्रत्याहारध्यानधारणसमाध्यष्टांगयोयानुष्ठाननिष्ठतपश्चक्रवर्त्यनाद्यवांछिन्नगुरूपरंपराप्राप्तषड्दर्शनस्थापनाचार्यव्याख्यानसिंहासनाधीश्वर सकलनिगमागमसारहृदयसांख्यत्रयप्रतिपादकवैदिकमार्गप्रवर्तकसर्वतंत्रस्वतंत्र आदिराजधानी विद्यानगरमहाराजधानीकर्नाटकसिंव्हासनप्रतिष्ठापनाचार्य श्रीमद्राजाधिराजगुरूभूमंडलाचार्यतुंगभद्रानिवासश्रीविद्याशंकरपादपद्माराधकश्रीनृसिंव्हभारतीगुरूकरकमलसंज त श्रृंगेगिरिश्रीसच्चिदानंदभारतीस्वामिभिः

श्रीमत्परमहंसपरिव्राजकानां अखंडब्रम्हैक्यानुसंधानशीलानां श्रीविद्याशंकरभारतीनां कृतान्यनंतनारायणस्मरणानि तद्रुपरि विशेषस्त तत्रत्य सर्वव्यवहारं लिखित्वा पूर्व पत्रं प्रेषितं भवद्भिः तद्विचार्य तदभिश्रेयानुसारतः अस्माभिः धर्माधिकारी विठ्ठलक्रमविदां पुनःपत्रं प्रषितंत ... द्दत्य तत्रत्य सर्वकाराहाटकैः पद्यैश्च भिक्षादिकं न दत्तमिति पुनःप्रेषितात्रमवलोक्य तत्रत्यचित्तपूर्णकराहाटकंज्योतिर्वित्पद्यादिसमस्तानां मध्ये आचारव्यवहारप्रायश्चितादिकं अवश्यं कर्तव्यं भवद्भिः एतेषां मध्ये ज्योतिर्विद्देशस्थब्राम्हणाः न पंक्तियोग्या इति ये वदन्ति तेषां उत्तरं देयं भवद्भिः किं शास्त्रमवलोक्य तदुरीकृतं तच्छास्त्रं गृहीत्वा युष्माभिः शृंगगिरियामेव वक्तव्यं नोचेत् तत्रैव तूर्णां शास्त्रार्थमविदित्वा ये वदंति तेषां यज्ञोपवीतत्रूटित्वा ब्राम्हणानां मध्ये. यूयं दूरीकृता इति सम्यक शिक्षा कर्तव्या अस्मन्मठस्थितपंडितान्सर्वशास्त्रपारंगतान्सर्वान्सम्यग्विचार्य सकलस्मृतिपुराणादिकं चावलोक्य माधवमंत्र्यादिदत्तशासनादिकं च द्दष्ट्वा सर्वेषां मन ... संशयं कृत्वा एतद्यवहारोस्थापितः तस्मादिदं पत्रं गृहीत्वा फोंड्याग्रामं प्रविश्य सर्वेषां राजकीयानां इदं पत्रं दर्शयित्वा चित्तपूर्णादि सर्वेषां मध्ये आचारव्यवहारादिप्रचारणं यथानिर्गलं तथा द्दढीकुर्विति अस्माभिः कृष्णदीक्षितः प्रेषिताः तद्वाक्यं

[1] शिक्का—' श्री : विद्याशंकर : भारती '

मनसा धृत्वा पत्रिकार्थं विचार्य गुरूद्रोहिणः शिक्षयित्वा अस्मच्छासनातद्रष्टेसुखेन संचारः आचार्यपादपप्राराधकानां लेखनीयं किमस्ति श्रीः श्रीः श्रीः

ब्राम्हण, व. १, अं. ५, मे १९४६, पृ. १३–१४.

१७१२ इ. स. सुमार ] (–२९५–) [ ?

॥ श्रीविद्याशंकर ॥

[ शिक्का ] [१]

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य...चार्यान्वयसंजातवर्याधर्मानुशिक्षकैः शंकराचार्यवर्यैश्चक्रुतनारायणस्मृतिः

स्वस्ति श्रीमत्सकलनिगमागमाध्यनाध्यापनीर्जितयशश्चंद्रिकाधवलीकृताशाप्रांतेषु चातुर्यदार्यगांभीर्यधैर्याद्यनेकगुणप्रवीणेषु राजमानविराजमनराजश्रीअंनतूर्जादि महाराष्ट्र देशस्थक्रमवंतादि ज्योतिर्विदब्राम्हणेषु विशेषस्तु प्रागस्मत्स्वामिनः दिग्विजयार्थं यदा अंतूर्जदेशे गतास्थिताः तदा कैश्चित्कराहाटकैः भवद्गृहे भिक्षा न ग्राह्येति नानाविध कुचोद्यमा... तदा श्रीस्वामिभिः पूर्वोत्तरं सम्यग्विचार्य भवंतः समीचीना आर्यावर्त देशादागतः महाराष्ट्रदेशीयब्राम्हणा इति भवद्गृहे भिक्षां गृहीत्वा भवद्देशे सर्वेषा ब्राम्हणादीनां च आचारव्यवहारप्रायश्चित्तदिविषये भवतां धर्माधिकारं दत्वा कालविशेषे श्रीपु यतिथ्यादुयुत्सवेषु अस्मन्मठे आगत्य समाराधनादिपूजां विधाय सुखेन स्मतव्यैंमित्युक्तपितां श्रीमदाज्ञामनादृत्य श्रीकुंडलीविरूपाक्षादि मठस्थतैलंग संन्यासीनाभिक्षादिकं दीयते पादपूजानादिकं च क्रीयतेति शतं तर्हि भवंतो महाराष्ट्राः... देशस्थब्राम्हणाः अतो भवतामि...चितं यतः...संस्थानाधीश्वरत्वं नास्ति तैर्षमात्रधारिणो भवंति अन्यच्च अटंति बहवो धूर्तादंडिनो मुडिनः सदा ॥ वेषमात्रधराः सर्वे ग्राम्यादित्यैकहेतवः तैलिंगाःकृत्रिमसंन्यासवेषधारिण अतः स्ते तैलंगसंन्यासिनां भिक्षादिकं किंचिदधिनदेयाषां पूजा न कार्या अन्नादिकं च न देयं इतः परं भवद्देशे पूर्वपरंपरागतं धर्माधिकारणादिकं सर्व भवग्दिरेव सम्यक् संपाद्य सर्वान् संबोध्य...... विरूपक्षादिमठस्थाः स्तैलंगाकृत्रिमवेषधारिणः तत्रागतास्चित् अस्माकं पत्रप्रेषणीयं वयं तत्रागत्यसशिष्यान्तंन्दंडेइष्याम ... हुवारं पत्रादिकं प्रेषितमपिश्रीमद्भिमनसि न धृतं तथा न कार्यं अस्मिन्समयधर्महिस्यं परोपकारकरणाश्रीमतांयुक्तमेव भवत्प्राते आहारव्यवहारप्रायश्चित्तादिकं यत्र यत्र जायते तत्रतत्रपूर्वैरपरप्राप्तं मठामानुशासनं भवादृशे : शिष्यधुरंधरैः परिपालनीयं तैलिंगयतिनां ब्राम्हणानां च किंचिदपि बहुमानादिकं न कर्तव्यं शिष्यवर्येषु किंबहुनेत्यलं.

ब्राम्हण, व. १, अं. ५, मे १९४६, पृ. १५–१६.

---

१. शिक्का—' श्री : विद्याशंकर : भारती'.

२ एप्रिल १७१३ ] (–२९६–) [ चैत्र वद्य ४ गुरुवार, रा. श. ३९.

श्री

[ शिक्का ][1]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदन सवंत्सरे चैत्र बहुल चतुर्थी गुरुवासरे [ शिक्का ][2] [ शिक्का ][3] क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणीं देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी ताा जिजापुर प्रांत राजपुरी देहे-

१ मौजे साजे
१ मौजे दुरठोलीं
१ मौजे कुडलीं
१ मौजे विघाट
१ मौजे जामगाव

५

यासी आज्ञा केली ऐसी जे. राजश्री कान्होजी राजे सिर्के हे पांडवगडचे स्वारीस राजश्री बालाजी विश्वनाथ सेनाकर्ते यासमागमे युद्धप्रसंग बहुत केला. हे जाणोन कुटुबसंव्रक्षणार्थ देहेमजकुरचा निमे आकार मोकासा मारनिल्हेकडे करार करून दिल्हे असे. तरी सदरहूप्रमाणे मारनिल्हेकडे चालवीत जाणे. लेखनालंकार.

[ शिक्का– मर्या : देयं रा : जते ]

रुजु सुरु सुद बार

~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. ४६६–४६७.

१३ आक्टोबर १७१३ ] (–२९७–) [ कार्तिक शुद्ध ५ मंगळ- वार, रा. श. ४०

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ४० विजयनाम संवत्सर कार्तीक शुध पंचमी भोमवासर क्षत्रियकुलावतस श्री राजा शाहुछत्रपती स्वामि याणि देशमुख ताा रोहिड- खोरे प्राा मावल यासि आज्ञा केली ऐसी जे. तुम्हाकडे ईनाम गाव आहेत त्याची तिजाई व हकाची चौथाईचा मुकासा राजश्री पंताजी सिवदेव यांकडे वतनाचे

---

१. शिक्का– वर्धिष्णुर्विक्रमे : विष्णोः सा मूर्तिरिव : वामनी । शंभुसूनोः रसी मुद्रा शिवरा : जस्य राजते'.

२. शिक्का– श्री : शिवनरपति ह : र्षनिधान मोरेश्वर : सुत भैरव मुख्य : प्रधान.

३. शिक्का– ' श्री आई : आदिपुरुष श्री राजा शाहु छत्रपति : स्वामी कृपानिधी त : स्य परशुराम त्र्यंब : क प्रतिनिधि. '
~~~~~~~~~~~~~~

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2] अैवजी दिल्हा असे. तरी तुम्ही यासी रुजु होऊन इनाम गावचा तिजाई व हकाची चौथाईचा अैवज़ मारनिलेयाकडे वसूल देणें. लेखनालंकार. [ 'मर्या : देयं रा : जते '-शिक्का ]
तेरीख ३ सौवल सन आर्बा अशर
बार सुरु सुद बार सुरु सुद बार

भा. इ. सं. मं. त्र., व. ६, अं. १-४, पृ. ८९-९०.

## ११ जानेवारी १७१४ ] (-२९८-) [ ११ जानेवारी १७१४

व्हाइसराय ते पोर्तुगाळचा राजा : ११ ज्यानुआरी सन १७१४.

सर्व हिंदुस्थानांत बलाढय होत चाललेलें मोंगल राज्य एवढें वाढलेलें आहे कीं, इस्तादाच्या ( पोर्तुगीज लोकांच्या हिंदुस्थानातील राज्यास इस्ताद ( संस्थान ) याच नांवानें उल्लेखीत असत. ) आणि त्याच्या सीमा ( सरहद्द ) एकत्र भिडलेल्या आहेत; यासाठीं आमचें सारें लक्ष्य त्याच्या हालचालींकडे लागून राहिलें पाहिजे. शिवाय विशेषतः शहा अलम बादशाहाकडे असलेली दोस्ती दृढ केली पाहिजे आणि पत्रव्यवहार चालला पाहिजे, म्हणून त्याकडे वकील पाठविण्याचा बेत केला. कारण, औरंगजेब मरण पावून तो ( शहा आलम ) नुकताच तक्तारूढ झाला होता. तेव्हां त्या निमित्तानें वकिलामार्फत दरबारी सहानुभूति प्रदर्शित करणें योग्य होतें. त्याला जें तक्त मिळालें तें, बादशाहाच्या औरसपुत्राच्या हक्कानें नव्हे. हे रानटी लोक ( Barbars ) त्या हक्काला मुळींच लेखीत नाहींत. तर एका मोठ्या लढाईत मिळविलेल्या विजयाच्या हक्कानें तें त्याला मिळालें आहे. या लढाईत त्यानें भयंकर रक्तपात करून हसनतारा यांस मारिलें. हा औरंगजेबाचा दुसरा मुलगा आपण राजसत्ता हातीं घेण्यास पहात होता. त्याचप्रमाणें त्यानें अस्सल राजवंशांतील १४ राजपुत्र मारून टाकले व या लढाईत दोहों बांजूचे कमींत कमी दीडलाख लोक प्राणास मुकले असें सांगतात. वर सांगितलेल्या आनंदप्रदर्शनासाठीं पाद्री जोसेफ हे शिल्हा याची आम्ही योजना करून नोव्हेंबर माहेंत जहाजांतून येथून उत्तरेस जाण्यास निघाला व मोंगलाचे मुख्य बंदर ज सुरत शहर तेथें तो पोंचण्यापूर्वीच मला अशी बातमी मिळाली कीं शहाअलम विषप्रयोगानें मरण पावला. त्याच तिघे पुत्र आपापसांत तक्ताधिकारासांठीं भांडूं लागले, पण शेवटीं लढाईत जय झाला तो औरस पुत्राचा व या कामीं त्यानें येशू ख्रिस्ताच्या आईची नवरात्रपूर्वक

१. शिक्का- 'श्री : शाहु नर : पति हर्षनि : धान मोरेश्व : रसुत : भैरव : प्रधान.

२. शिक्का- 'श्री : आई आदिपुरूष : श्री राजा शाहु छत्रपति : स्वामि कृपानिधि तस्य : परशुराम त्र्यंबक : प्रतिनिधी.'

(C.m hoina) आराधना चालविली होती. कारण हा राजपुत्र ख्रिस्तीधर्माकडे आणि पोर्तुगीज लोकांकडे वळलेला होता. त्यामुळें आमच्या दैवानें हा चमत्कार ( Milagre ) घडवून आणिला. त्याचे दोघे भाऊ ख्रिस्त भक्त नव्हते.

या नव्या उपस्थित झालेल्या भानगडीमुळें पाद्री वकिलाचें प्रयाण बंद ठेवावें लागलें. कारण ह्या राजपुत्राचा एक पुतण्या यांवर उलटला आणि एका लढाईत त्याचा मोड करून त्यानें कित्येक उमरावांस ठार मारिलें व त्यांच्या बायकांसहि कैद करून त्यांना ठार मारिलें. पराजय पावलेला राजपुत्र आग्र्यास पळून गेला. पण तेथें त्यास वेढा घालून त्या पुतण्यानें त्याचा शिरच्छेद केला. एका वर्षाच्या अवधींत घडून आलेल्या या अनेक राजकीय घोटाळ्यामुळें येवढ्या विस्तीर्ण राज्यांत अस्वस्थता माजून राहावी हें स्वाभाविक आहे. त्यामुळें प्रवास करणें सुरक्षित नाहीं म्हणून आमच्या वकिलास सुरतेसच राहण्यास सांगून दोना जुलीयान बाईस राजकारणांत स्वस्थता होतांच मोगलाकडून परवाना ( Passport ) पाठविण्यास कळविलें आहे. आरबी चांचे लोकांनीं मकावाहून येणाऱ्या आमच्या एका गलबतास पकडल्यामुळें त्याचें सुरतेच्या बंदरांत पारिपत्य करण्यासाठीं येथून आम्ही 'आरमार' रवाना केलें होतें व त्याकडे वकिलांसहि निरोप पाठविला होता. पण सध्याच्या गडबडीमुळें तें पारिपत्य करण्याचें ठेविलें आहे. कारण सुरतेच्या बंदरांत झालेलें गडबडीचें निमित्य मोंगल अधिकाऱ्यास वाईट वाटण्यास साधन होईल.

दोना जुलीयाना दे कोस्त या बाईचें महत्व पुन्हां मोंगल दरबारांत वाढलें. ही बाई 'कोद दे आल्होर' या व्हाईसरायाच्या कारकीर्दीत मोंगल दरबारांत पाठविलेल्या एका सर्जनशीं विवाह करून त्याचे सोबत गेली होती. ही त्या दरबारांत एवढी प्रिय झाली कीं, औरंगजेब व शाहाआलम याच्याशीं तिचा वशिला फार चांगला उपयोगी पडे. तिचें वर्चस्व राजकारणांत चांगलें होतें. आमच्या इस्तादार्चे कांहीं काम असलेलें तिला सांगितलें म्हणजे ती तें स्वतःच्या हिताच्या कामापेक्षांहि फार अगत्यानें करिते. किंबहुना तिला या इस्तादाच्या कारणाच्या साह्यावाचून दुसरें कोणतेंच ध्येय नाहीं असें म्हटल्यास चालेल. या बाईचें या इस्तादाची पुष्कळ कामें वरील दोन्ही बादशहांकडून साध्य केलीं आहेत. शहाअलमच्या कारकीर्दीत एकदोन महिने ती दुखण्यामुळें आंथरुणास खिळली होती व तेवढ्यापुरतें तिचें वेतनहि त्यानें बंद केलें होतें. परंतु आतां तिला मिळालें. येवढेंच नव्हे तर पूर्वीपेक्षां बादशहाची मर्जी तिच्यावर फिदा झाली असून तिचा त्याच्यावर पगडा बसलेला आहे. ती या इस्तादाचीं कामें पहिल्याप्रमाणें फार अगत्यवादानें चालवितें. येवढी तिनें आमचीं कामें काजें केलीं असतांहि तिची, उत्तरेस एक गांव विकत घेण्यास परवानगी मागण्यापेक्षां दुसरी अपेक्षा नाहीं. म्हणून तिला परवानगी ( Alvora ) देण्यास आज्ञा केली आहे. [ लिव्हु, दे मोसोइंस नं ७९. पृ. २१२ ते २३३ ]

~~~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १–४, पृ. ६२ ते ६४.
~~~~~~~~~~~~~~~~

२३ जानेवारी १७१५ ] (-२९९-) [ १७ मोहरम,

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपती स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक आज्ञाधारक माणकोजी बंडगर वजारतमाद सेवसी कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान छ १७ मोहरम पावेतो स्वामीचे कृपादृष्टी करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. विशेष पूर्वी सेवेसीं हे प्रातीचे वर्तमान लिहिलें होतें. त्यावरून श्रुत जाहालेच असेल. त्या अलिकडीऊ षर्तमान तरी निजामनमुलुक-याची छावणी येतगिरीस होती. दिलीहून पत्रें आलियावरी तेथून कुच होऊन कलबुर्गे अलंद अकलकोट परगणे यावरून मजल दरमजल कुच होऊन गेले. परगणे नलदुर्ग रा रभाजी निंबालकर याजकडे जाहागीर आहे. ते पहिलेंच निजाम-न्मुलुक याची आज्ञा घेऊन तुळजापुरी राहिले. अलंदेचे मुकामीहून रा चंद्रसेन जाधव यानी आज्ञा घेऊन गुजोटीस राहिले. दसरा जाहालियावरी चद्रसेन जाधव गुंजोटी-हून कुच करून तुलजापुरास आले. रभाजी निंबालकर याची व त्याची भेटी जाहाली. उभयेतानी मनसुभा करून पनालियाकडे पक्ष धमवा यैसा इत्यर्थ करून इमानप्रमाण श्रीच्या थलास जाहालें. रभाजी निंबालकर तुळजापुरी राहिले. चद्रसेन जाधव भालकीकडे जावयासी गेले. हजरून राजश्री फतेसिग बावा भोसले या समागमे तोलदार फौज आली. तरी उभयेतानी दोनोच्यार जागे बळाऊन कहीकब्राड मारावे. नाना छद करावे. तालदार फौज न ये. थोडी बहुत आली म्हणजे कुल आपली फौज सनध करून गुजोटीमाजी मुकाबला करावा. यैसा विचार केला आहे. य प्रांतीचे वर्तमान संकल्प स्वामीचे सेवेसी श्रुत व्हावे याजकरितां विनंती लिहिली आहे. सेवकास ज्याप्रमाणे आज्ञा होईल त्याप्रमाणे वर्तणूक सेवेसी श्रुत होये. हे विज्ञापना.

[ शिक्का ]— ... ... ... तत्पर तावाजी : सुत पदाजी : बडगर ?

[ मोर्तबसुदचा शिक्का जोडावर ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. ३, पृ. १५७-१५८.

२७ मार्च १७१५ ] (-३००-) [ चैत्र शुद्ध ४ रविवार, रा. श. ४१.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४१ मन्मथ नाम संवत्सरे चैत्र सुध चतुर्थी रवि-वासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामि यांणी राजश्री देशाधिकारी व

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2] लेखक वर्तमान व भावी प्रांत कऱ्हाड यांसि आज्ञा केली यैसी जे. वेदमूर्ति मोरेश्वरभट गिजरे यांणी पनालांचें मुक्कामी स्वामि संनिध येऊन विदित केलें कीं राजश्री थोरले कैलासवासी स्वामीसी कऱ्हाड क्षेत्र संनिध कृष्णा कोयना येथील आपले तीर्थपुरोहितपण आपले पिते विश्वनाथ भट यांस वृत्ति करून देऊन पत्र दिल्हे. तदनुरूप कैलासवासी स्वामीनींहि तीर्थ पुरोहितपणाचे पत्र दिल्हे व उभयता नदींचा नित्याभिषेक सांगोन त्यास मौजे शिवापुर पा। मजकूर या गांवापैकीं इनाम भूमि बिघे ।। तींस देऊन पत्र दिल्हे आहे. तेणेंप्रमाणें स्वामींनींहि आपणांस उत्तरोत्तर चालवायाविशई भोगवटीयास पत्र दिल्हे पाहिजे. म्हणून विदित केलें. तीर्थरूप कैलासवासी स्वामींचें पत्र आणून दाखविलें. त्यावरूनहि कलों आलें. यैशास हे भले ब्राम्हण सत्क्षेत्रीं स्वामींचे पुरोहितपण थोरले कैलासवासीपासून व कैलासवासी स्वामीपासून करीत आले आहेत, त्याप्रमाणें तीर्थ पुरोहितपण व कैलासवासी स्वामीनी उभयतां नदींचा नित्याभिषेक सांगोन मौजे मजकूर पैकी तीस बिघे इनाम दिल्याप्रमाणें चालवणें हे स्वामीस अवश्यक व तेणेंकडून स्वामीस व स्वामींच्या राज्यास कल्याण आहे. या करितां तुम्हांस हें आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी तुम्हीं कैलासवासी स्वामीच्या पत्राप्रमाणें तीर्थपुरोहितपण व उभयेता नदींचा नित्याभिषेक व यास मौजे शिवापुरपैकीं इनाम जमीन बिघे तीस यैसे मोरेश्वरभट गिजरे यांस पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालविणें. नवीन पत्राची अपेक्षा न करणे. या पत्राची प्रत लेहून घेऊन मुख पत्र भोगवटीनिमित्य वेदमूर्तिजवल परतोन देणें. लेखनालंकार.

[ शिक्का– मर्यादेयं विराजते ] रुजु सुरू सुद बार

विविधज्ञानविस्तार, व. ५५, अं. ६, जून १९२४, पृ. २९२.

२३ जुलै १७१५ ] (– ३०१ –) [श्रावण शुद्ध ४ शनवार
रा. श. ४२

श्री

[ शिक्का ][3]

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४२ मन्मयनाम संवत्सरे श्रावणशुद्ध चतुर्थी मंदवासरे क्षत्रियकुलावतंस राजा शंभू छत्रपति स्वामी यांणीं वेदशास्त्रसंपन्न वेदमूर्ति राजश्री सदाशिवभट बिन लक्ष्मणभट अरवीकर शाकल्य गोत्र ऋक् शाखाध्यायी पुरोहित यास दिल्हे दानपत्र ऐसेंजे. तुम्ही स्वामीचे पुरोहित बहुत थोर वेदशास्त्रसंपन्न,

---

१. शिक्का– ' श्री शि : व नरपति : हर्षनिदान मो : रेश्वरसुत नील : कंठ प्रधान'.

२ शिक्का– ' श्री आई आदिपु : रुष श्रीराजाशिवछ : त्रपसि स्वामि कृपानिधि : तस्य कृष्णाजि परशु : राम प्रतिनिधि.'

३. शिक्का– श्री : प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णु : विंश्ववंदिता शुंभु : छत्रपते 'मुद्रा रामसूनो विराजते.'

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2] स्वामीच्या राज्याची अभिवृद्धि व्हावी हेंच निरंतर इच्छून त्रिकाल स्नानसंध्यादि षटकर्म आचरोन स्वामीस आशीर्वाद देत आहा. तुमचे सर्व प्रकारें चालवणें स्वामीस परम अवश्यक. सांप्रत स्वामीने अर्धोदय पर्वकालीं तुह्मास नूतन दान सहिरण्योदक धारादत्त मौजे माहारूल ता असंडोली प्रा तारळें गांव कुलबाब कूलकानू हालीपटी पेस्तरपटी जल तरु पाषाण निधिक्षेपसहित खेरीज हकदार व इनामदार करून इनाम सर्वमान्य करून दिल्हा असे. तरी तुह्मी मौजे मजकूर पूर्वमर्यादेप्रमाणें चतुःसिमा करून आपले स्वाधीन करून घेणें आणि इनाम तुह्मी व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून सुखरूप राहणें. या इनामास हिंदु अगर मुसुलमान इस्कील करील त्यास धर्मशास्त्राचीं वचनें—दानपालनयोर्मध्ये दाना-च्छ्रेयोनुपालनं ॥ दानात्स्वर्गमवाप्नोति पालनादच्युतं पदं ॥ १ ॥ स्वदत्तां परदत्तां वा यो हरेच्च वसुंधरां । स विष्ठायां कृमिर्भूत्वा पितृभिः सह मज्जति ॥ २ ॥ येणेंप्रमाणें सदरहू हीं वचनें जाणोन इनाम सुरक्षित चालेल जाणिजे. निदेश समक्ष. [ शिक्का— ' मर्यादेयं : विराजते ' ]

तेरीख ३ साबान् सुा सन शीत असर मया अलफ

बार सुरु सूद बार रुजू

~~~~~~~~~~~~

धर्म : वाई १४ सप्टेंबर १९०५ गुरुवार, पृ. ७१५–७१६.

१७१५-१७१६ इ. स. ] (–३०२–) [ सीत अशर मया अलफ

श्रीवरदमूर्ति

करीना वतन देशकुलकर्ण हरी कृष्ण... ... कर्यात ताा चिपोळण सुबा मामले दाभोल इस्तकबील वतन साधले. त्यापासून तागायत सुा सीत अशर मया व अलफ मन्मथ नाम संवत्छर येकूण सरासरी भोगवटा वरसें ... पूर्वील करीनां काळोपंत ताा मजकुरीचे देशकुलकर्ण पिढी दर पिढी करीत होते. त्याची जबरदस्त... ... एकंदर वतनदारास... ... होऊन... ... त्यास जिवेंच मारिलें. याचे पोटी एकच पुत्र होता. त्याचे नांव अंताजी कालो. उमरवरसें १० वर. त्याख शाहाणा लिहिणार सरंदाज होता. तो कारभारामुळे विजापुरास जाऊन तेथून येऊन आपले घरी आप-मरणे मृत्य पावला. कालोपंताची स्त्री गौतमबाई. दुसर कोण्ही मुतालीक ठेवायास यत्न करितां कोठें चित्तानरूप यौजेना. कालोपंताच्या घराण्याचे दायाज विनाजी बलाल हे साजंण बंधु होते. परंतु विद्या नाही. ऐसे असोन साही जण उठोन देशांत-रास गेले. वतन चालिलें पाहिजे म्हणोन... जी दातार याची मुली अंतोबास पहिले

१ शिक्का– ' श्री : शिवनरपति : हर्षनिदान मोरेश्वर : सुत नीळकंठ : प्रधान.'

२ शिक्का– ' श्री : आई आदिपुरुष श्री राजा : शिवछत्रपति स्वामी कृपा : निधि तस्य कृष्णाजी पर : शराम प्रतिनिधि.'
~~~~~~~~~~~~

दिल्ही होती. त्याही आप्त विषई देखोन पंचाइताच्या अनुमते त्यास देशकुलकर्णाची मुतालकी सांगितली. त्याणें चालविले वरसें ३०-४०. त्याउपरी कितेकां दिवसी गोतमाईमध्यें व हरबाजी दातारामध्ये बेबनाव होउन कलहो निर्माण व्हावयास निमित्य गोतमाबाई दातारास म्हणे कीं तुझी मुली आपल्या लेकास दिल्ही होती. ते त... व... ती याकरितां आपला पुत्र मेला म्हणौन नाना प्रकारची त्यावरी कुफराने घेऊन नित्य कटकट होऊ आरंभ ... यास दूर करावा ऐसा इत्यर्थ जाला. परंतु दुसरा मुतालीक यत्न करितां चित्तानरूप मिलेनां. दाहा जणांस ऐसे कलो आले की गौतमाबाईस दुसरा मुतालीक योजून...ऊन दांतारास काढावा. तरीच परस्परे कलहो वारतो. नाहीतरी एखादा अनर्थ होणार. हे गोष्ट जगप्रसिध जाली. अकळपीत तिमाजी भास्कर व गंगाजी भास्कर हे दोघे...वाक तर्फेंचे कुलकर्ण करीत होते. तेथून थानभ्रष्ट होऊन चिपोलणी गोदोबा व गणोबा व नारोबा ती...देव चाटेपण करीत होते....चा सुहृदसमंध होता. याकरितां चिपोलणास सहकुटुंब आले. राहायास जागा न मिले. तेव्हा काही येक दिवस विठल जोसी याचे वोटिवरी राहिले. तेथे तग निघेनां देखोन तिमाजी नाईक देउसकर याचे घरीं राहिले. लिहिणार उमेदवार देखोन सर्वांसि आर्जव संपादून गोतमाबाईस सांगोन तिमाजीपंतास देशकुलकर्णाची मुतालकी सांगितली. कितेका दिवसी गंगाजी भास्कर हेलवाकास कुलकर्ण चालवायास गेले. तिमाजीपंत व गंगाजीपंताचा पुत्र हरी त्रिमल यास तिमाजीपंताचे पोटी संतान नंव्हते म्हणौन त्यास दिल्हा होता. त्यास तिमाजीपंती आपणासंनिध ठेवून कितेक दिवस गोतमबाईसि रूजुवात राखोन पंचाइतास राजी राखोन कुलकर्णाचा कारभार करू लागले. साऱ्या मामलियामध्यें दर...रो... आपणास अनकूल करून घेतले. त्याउपरि विषकुंभ पयोदुग्ध हे विद्या मनीं धरून दिवसें दिवस गोतमाईस अलक्ष करून अंनावस्त्राकरितां हैरान व अपमान करूं लागले व मुतालकी आहे तें स्वता खावंदगिरी करूंन घ्यावी ऐसी तरतुद तलाष प्रसंग पाहोन आरंभला. यत्न करितां करितां विजापुराहून अफजलखानास राजश्री सिवाजी राजे यावरी नामजाद केले. अफजलखान हुमत वजीर. त्याहीबराबरी पादशाहाचा फर्मांनाची डौलें करूंन घेतली होती. हे वर्तमान तिमाजीपंतास शृत जालियावरी याहीं कासी दियानतराउ यास वष करून याखेरीज तीनसें नावा विज्यापुरास पोंहचवाव्या ऐसा करार दाद करून फर्मांनाची डौले होती त्यापैकी आपल्या नावे फर्मान करून घेतला. त्यामध्यें गौतमाबाईची अफलाद लेहोन रूजु पडे ऐसे करून फर्मान घेऊन जाहिरानां न करिता चिपलोणास आले ऐसियास माहार पाहिजे म्हणौन जेथे श्नेह वाद ट सावला त्यास शृत करून फर्मानाप्रमाणें माहाजर करून घेतले. अनकुल होते तेवडियाच्या साक्षी घेतल्या. केशवसेट व गागसेट सेटिये हे नामधारीक याची साक्ष अलबता असावी म्हणौन प्रसंगोचित त्यास सांगितले. त्याही उगेच मान्य केलेसे केले. आणि त्या अपरोक्ष गौतमाईस आणुन पुसिले की तिमाजीपंती आपल्या नावे पादशाही फर्मान करून

घेतला. आता माहाजर करितातो. कितेकानी साक्षी केल्या. आम्हासहि साक्ष करू म्हणौन आमचे भेटीस आले. हे वर्तमान तुम्हास काही कळलें की नाही. त्यावरी ते कष्टी होऊन बोलिली की हे वर्तमान आपणास आजीवरी कळले नाही. तेव्हा सेटीने पुसिले की तुम्हापासी काही कागदपत्र वतनांचे आहेत की काय. त्याउपरी ते बोलिली की आहेत. त्याउपरी तन्ही सावध होऊन कोण्हास रुप न व्होता जतनेने वागवणें. त्यावरी बाइकोची जात. कागद दुसरे जागा ठेवावयास योजेनां. तेव्हा चिरकुटे घालून उसां ध्यावयास उसी करून त्यामध्ये कागदपत्र होते तेवढे अशेष घालून उसि ठेविली. रोज उठोन उसी दडपुन पाहाता कागद दरम्यान आहेत ऐसे कळत गेले. तो तिमाजीपंतास अगत्य जाले की आपण फर्मान व माहाजर आपले नावे करून घेतला. परंतु गोतमाईपासी कागदपत्र असतील. त्याचा अंतस्ते शोध करून हस्तगत करावे. म्हणौन कार्याकारण तीपासी येऊन आपले कितेक सुखदुख तिचे मन द्रवे ऐसे करू लागले. उसा उसी होती. तेथे हात चालऊन उसीमधे कागद आहेत ऐसा तर्क दिसौन आला. तेघ्हा प्रसंग पाहोन खर्डेयाचे गुंडाले करून उसीमध्ये घालून पहिले कागद ठेविले होते ते काढुन घेउन त्याची... त्यानी खर्डे ठेविले. गौतमाई सदा पाहात असे तैसे पाहो लागली तो पहिल्याच प्रमाणे कागद आहेत. ऐसे प्रत्ययास येत गेले. त्यावरी कितेका दिवसी संदेह निर्माण जाला. म्हणौन उसी उघडून कागद पाहो लागली तो ते बाइको तीस कळेनां. तेव्हा भलत्यापासी वाचायास दाखउ लागली. कोण्ही वाचीना तेव्हा कृष्णाजी देउसकर यापासी दाखविले. त्याणे पाहाता बुके फुरसी खर्डे म्हणो लागला. हे कळताच तिमाजीपंताच्या घरास जाऊन पांच...बोंबा मारून त्याचा आपला आट घोकणा केला. फर्मानामध्यें माझे लेकीचा औष म्हणून लिहितोस तरी तू माझ्या बटकीचा लेक की काय. ये जातीने .. यो विन्य जाले. ते समई तिमाजीपंत तिमाजीनाईक देउसकर याचेच घरीं होते. हे कथले होऊ लागले तैसे त्यास आपल्या घरातून बाहेर घातले. तेव्हां वाळदेवाच्या विद... सांडोनु बा... चे घर होते तेथे जाऊन राहिले. नित्य उठोन इचा त्याचा सीमेपरता कलहो होउ लागला. दुसरा मुतालीक ठेवावा तरीच कलहो वारतो. नाही तरी या कथलियानिमित्य आपला प्राण जाईल म्हणौन गोतमाई भगीरथ प्रयत्न करू लागली. परंतु बाइको कोण्हाचा पक्षपात नाही. हरीपंताचे पिते कृष्णाजी सोमनाथ ते समई पंचनदीची मजमु करीत होते. त्याची प्रत्यक्ष गोतमाई माउसी. हे तिचे पुतणे. म्हणौन एका दो वर्षी भेटीस येत. कांहीं अनकूल पडिलिया-सारिखा परामर्ष करीत. त्यापासी गोतमाई म्हणे की तू माझा पूत असता माझी दुर्दशा होते. मुतालीक होता तो कृतघ्न होऊन विस्वास घात करितो. माझे नाव बुडउन आपले प्रतिपादतो. ऐसे असोन वतन का बुडविता ऐसे नाना प्रकारें सांगत गेली. परंतु कृष्णाजीपंती मांन्य केले नाहीं. तेव्हां कोनेर रघुनाथ तुरूंबकर यांची आजी ते गोतमाईची बहीण. याकरितां त्याच्या घरास गेली. यास कितेक सांगायाच्या नीतीने सांगितले. परंतु याही मान्य केले नाहीं. तेव्हां रोज उठोन झगडे भांडणे होत

चालिली. घरामध्यें राहो नेदीत. दुसऱ्याच्या घरास गेली. तरी ज्याचे घरी असे त्यासी हितशत्रुपण दर्षवीत. गोतमाईचे समाधान करून आपल्या घरास पाठवा. ते चीकडे फिरते. तीपासी द्रव्याची पोतडी आहे. ते जतन करा. म्हणौन सांगत. त्यावरून नसते अरिष्ट म्हणौन तीस आपल्या घराहून बाहेर घालीत. ऐसे घरोघर होत चालिले. कोठे राहावयास जागा नाहीसा कर्मभोग पाठीस लागला. देशत्याग करावा की विषप्रलय करावा ऐसे जाले. तेव्हां श्री परशरामास जाऊन देवापासी धरणे घेऊन उपोषीत बसली. काय निमित्य म्हणौन नारंभट पुजारे याही पुसिले. त्यापासी सांगितले की आपणास राहावयास जागा नाही. जेथे जावे तेथे ब्रह्मग्रह पाठीस लागला. याकरिता देवापासी देहांत करावयास येथें आलों. तेव्हां त्याचे मन द्रवोन आपला घरी राहाविले. हे वर्तमान ते समई अंताजी बावाजी बांणी सावडकर चिपोलणची मजमु करीत होते. त्यास हे वर्तमान कलले. त्यावरून त्याहीं गोतमाईस बोलाऊन आणुन वर्तमान पुसिले. त्यावरून तिणे आद्यंत निवेदन केले. तेव्हां तिमाजीपंतास सांगोन फजीत करून तिच्या घरठणीयावरी स्वतंतर घर बांधोन देऊन अनावस्त्राची बेगमी करविली. अंताजीपंत मजमु करीत होते. तो काही एक दिवस चालिले. ते हुजूर गेलियावरी पहिल्यापेक्षा विशेष कलहो निरंतर होउ लागले. काही एक दिवस इची हलाखी होऊन तिमाजीपंतास छी थु फजीती करिता करिता भोग हलु हलु भोगोन खडो लागला. तो अकळपीत अंताजी बावाजी रायगडाहून राजापूरचा सुभा करून चिपोलणास आले. तेथे स्मरण करून गोतमाईचा परामर्ष करू लागले. तेव्हा साक्षात कुलस्वामी मूर्तिमंत येऊन भेटला ऐसे तीस समाधान होऊन भेटीस येऊन आपले वर्तमान त्यास निवेदन केले. त्यावरून ते बोलिले की ऐसे च होता होता उद्या मरोन जासील. वतन बुडोन त्याच्या हातास जाईल. याकरितां तुझा कोण्ही आपतविषई असेल तरी त्यास आणून वतनावरी ठेव. दिरंग करू नको. तेव्हा गोतमाई बोलिली की आपणास स्वामीच्या पाया वितरिक्त दुसरे नाही. मायबाप भाऊबंद सकळ गणगोत आपण आहेती. मी निराश्रीत आहे. द्रौपदीच्या आकांतास साक्षात श्रीकृष्ण पावला तद्वत स्वामी आले. याउपरी माझा काही उबार राहिला नाहीं. स्वामीने जीर्णोद्धार करावा. म्हणौन बहुता प्रकारे सांगितले. तेव्हा ते बोलिले की प्रस्तुत माहादाजी अनंत दाभोलचा सुभा करितातीं. ते आपले पुत्र. त्यास आम्हीं स्वता आपले दस्तुरे तुझेविसी पत्र लेहोन देतो. तें घेऊन त्याचे भेटीस जाणे. ते तुझे परिपत्य करितील. म्हणौन त्याही पत्र लेहोन दिल्हे. ते घेऊन गोतमाई दाभोलेस माहादाजीपंताचे भेटीस गेली. पत्र त्यास देऊन सविस्तर आपल्या श्रमाचे व तिमाजीपंताच्या करतुत्वाचे आद्यंत वर्तमान निवेदन केले. त्यावरून त्याही गोतमाईचे समाधान करून तुझे कोण्ही आप्तविषई आहेत की नाही हे पुसिले. ते बोलिली की प्रस्तुत कृष्णाजी सोमनाथ माझे पुतण्ये. पंचनदीची मजमु स्वामीच्या पायांपासी करितातीं. त्यावरून त्यास हा कार्यभाग सांगावा. म्हणौन अंतःकर्णी समाधान मानून त्यास बोलून नाना प्रकारे बोध केला. परंतु आइकिला

नाही. माहादाजीपंतास कृष्णाजीपंताचा राग आला. तो मान्य केला. परंतु हे गोष्टीचा अंगिकार न करिता उठोन गेले. तो दैवीगतीने तेच फडी विनाजी बलाल देशत्यागे गेला होता ते अकळपीत तेथे पैदा जाला. गोतमाईने हर्ष मानून माहादाजीपंतास भेटविला. त्यावरून माहादाजीपंतहि बहुत समाधान पावले. परंतु मनास आणितां विनाजीस विद्या नाही. केवल पाषाणरूप. याकरिता मागती कृष्णाजीपंतास अतिशय करून बोलाऊन आणिले. विनाजीची त्याची भेटी करविली. हे कोण ते कोण परस्पर पुसिले. खुणमुद्रा कलली. याउपरी कृष्णाजीपंतें तुम्ही देशकुलकर्ण करा. स्वता तुमचीच खावंदगिरी ऐसे करून देतो म्हणौन तिमाजी नाईक देउसकर चिपोलणांहून तेथे गेले होते त्यास मध्यस्तीस घालुन नाना प्रकारे बोध करून मान्य केले. कृष्णाजीपंती आपले नाव लेहो दिल्हे नाहीं. आपले पुत्र हरीपंत याही व विनाजीने चालवावे. पुढे विनाजीच्या पुत्रानी हरीपंती वौषपरंपरेने वतनाचा उपभोग करून सुखी असावे ऐसे कागदपत्र करून देउनु गोतमाईसहवर्तमान विनाजीस कृष्णाजीपंताचे हाती देऊन तिमाजीपंत अगोधर मेले. गंगाजीपंत होते त्यास दूर करून यास चिपोलणास पाठविले. रूगानुबंध प्रमाण कृष्णाजीपंती मानून आले. कारकुनाची व वरकड अनुक्रमे भेटी घेऊन कार्यभाग यथान्याये चालऊन मागील जुने कागदपत्र व माहालीचे रुमाल गंगाजीपंतापासी मागो लागले. तेंव्हा गंगाजीपंत रडो लागले. आपणांपासी कागदपत्र होते तेवढे गोवलामध्ये ठेविले होतें. ते अकस्मात आग लागोन गेले. कागदाचा कपटा राहिला नाहीं म्हणौन नफरा करू लागले. माझा भाउ तिमाजीपंत मेला. हरी त्रिमल पुतण्या तो हि मेला. मी हि मरेन. म्हणौन काकुलतीस येऊन आपणास निरोप द्या म्हणौन पाया पडो लागले. दरम्यान निरोप देता नये म्हणौन सेटीच्या मते जाले. तेव्हा गंगाजीपंतास घेऊन कृष्णाजीपंत दाभोलेस माहादाजीपंतापासी गेले. त्याही कागदाचे त्वष्ट लाविले. येथे हि तेच तकरीर केली. तेव्हा गंगाजीपंती आपले पत्र कृष्णाजीपंतास स्वदस्तुरें लेहोन दिल्हे की कागदपत्र आपणास ठाउकें होते ते आपणादेखत जलोन गेले. आपणास न कलत कोणे कदाचीत ठेविले असतील. त्यावरून तुम्हासी जो कोण्ही प्रसंग करील त्याचे आई वर गडिली आहे व कार्यभागमुले खर्चवेच दरबारी अगर आवंतर जाला असेल तो तुबासि निसबत नाही व कार्यभागमुले जे मिलकत जाली असेल ते तुम्हास मागावयास निसबत नाहीं. मिलकत व खर्च आमची आम्ही जाणो ऐसे पत्र लेहोन दिल्हे. त्याउपरी माहादाजीपंती गंगाजीपंतापासी पाच हजार लारी मागो लागले. तेव्हा भल्या लोकी अर्ज केला. परंतु माहादाजीपंत नाइकत. कोण्हाचा यत्न चालेनां. तेव्हां कृष्णाजीपंती बजीद होऊन माफ करऊन गंगाजीपंतास आणुन कसब्याचे मुतालिकीचे कुलकर्ण दिल्हे. गोतमाइ केवल मातेपेक्षा विशेष देवरूप मानून सांभाल करीत गेले. आजन्माचे क्लेष होते तेवढे दूर जाले. सुखरूप मायलेकरासमान कालक्रमणां होत चालिली. तेव्हा गोतमाई कृष्णाजीपंतास म्हणो लागली की तुझे तीधे

पुत्र आहेत. त्यास मार्कंडाचे आयुष्य हो. त्यामधील एक पुत्र आपणास दत्त पुत्र द्यावा म्हणौन भिडेस घातले. तिची भीड उलंघवेनां. तेंव्हां मान्य केले. शाखाधार पंडिताच्या मते मनास आणिता गोतमाईचे जमदाग्नीचें गोत्र कृष्णाजीपंताचे वसिष्ट गोत्र. घटितार्थास न ये. पुरूष असिला तरी कार्यास येईल. बाइकोस बोलिले नाही. ऐसे धर्मशास्त्री निघाले. तेंव्हा विनाजी बलालास तऱ्ही द्यावा ऐसा सिधांत जाला. कृष्णाजीपंताचें पुत्र

वडील हरीपंत १ मधील जनार्दन १ कनिष्ट भिकाजी १

या तीघापैकीं जनार्दनास विनाजीस देऊन दत्तविधान केले. तो थोडकीयाच दिवसांत विनाजीस हि पुत्र जाला. त्याचे नाव बापु ठेविले. वडील जनार्दन. धाकटा बापु ऐसे मानून उभयताची लग्नें यथाविधी कृष्णाजीपंती केली.

वडील जनार्दन विनायक यास विठल जोतिसी प्रभोलीकर याची कन्या केली तिचे नाव वेणाई १.

धाकटा बापुजी विनायक त्यास विसोबा नाईक संबेकर खोत मौजे...... मणवणे याची कन्या केली तिचे नाव सावित्री १

याप्रकारे उभयतांची लग्नें करून विद्याभ्यासास लाविले. केवल गंगाजळ होऊन कार्यभाग सुरळीत होऊ लागला. विनाजीनेंहि आपले पत्र कृष्णाजीपंतास लेहोन दिल्हे कीं आपले दोघे पुत्रानी व हरीपंती एकदिल राहोन वौषपरंपरेनें वतनाचा उपभोग करावा. ऐसें साक्षीनिसी पत्र लेहोन दिल्हे. त्या प्रसंगामध्यें जे कोण्ही स्वकीय परकीय राजकीय नामधारीक लोक होते त्यादेखत सदरहु प्रसंग जाला. तो त्यास दखल आहे. बितपसील

सुबा दाबोल

| | | |
|---|---|---|
| महादजी अनंत सुभेदार १ | लक्ष्मण कृष्ण मजमदार १ | पांडुरंग विश्वनाथ |
| तिमाजी नरसिंगराउ दफतरदार १ | नरसो गोविंद चिटनिवीस १ | दफतरदार १ |
| सिदोजी अनंत मावजनीस १ | संभाजी बापुजी हवलदार | नरसो नागदेव |
| | सौदागरी १ | पतकी ..पोतनीस |

ता चिपोलण कसबा

| | | |
|---|---|---|
| माहालीचे कारकून | परस्थळी येऊन बसका राहिले | |
| १ माहादाजी राम हवालदार | वेदशास्त्रसंपन | राजश्री कासी |
| १ मल्हार हरी मजमदार | कर्मकांडपरायण | विस्वासराउ १ |
| १ रूपजी हरी दफतरदार | रा केशवभट | रा विठल जो- |
| १ अंतो हरी दफतरदार | पंडित लेले १ | तिसी प्रभोलकर |
| ४ | हरी गणेश १ | |

१ विसाजी सोमनाथ निगावने कसबा

जोतिसी

१ गोविंद जोसी
१ वीरेश्वर जोसी
१ विठल जोसी
१ बाल जोसी
१ रूद्र जोसी
१ कास जोसी
१ बाल जोसी खीर
१ नर जोसी
१ बहिर जोसी बलाल जोसी

९

मंत्रभट
१ मधुभट
१ शंकरभट

२

उपाध्येपैकी

१ कासीभट पुराणीक
१ अवधुतभट चितले
१ माहादे भट
१ धोंडभट
१ नरसीभट ढेगे

५

वैद्य
१ नारभट
१ परशरामभट

२

पोटे

खोवा नाइक १ परसोबा ना। १
हरबा ना। १ अंतोबा ना। १
नारभट पुजारे परशराम १
अंतोबा ना। सफरे १
गोविंद ना। नरेकर १
गस्ती नरहरी नाईक १
गोविंद रूद्राजी पोतदार १

बालदेव लिहिले०
बाल जोसी बागेमधील

पतकी वतनदार
नरसो गोविंद नरसो गोविंद
१ १
मु... सि द र स मुतालिक कुलकर्णी जमाती १
देसाई मोकदम चिपुलण १

देउसकर

तिमाजी नाइक हरबा नाइक
केसोबा ना। १ रूद्राजी ना। १

बाळदेव
गोदाबा ना। गणोबा ना।
नारोबा ना।

सराफ
हरबाजी ना। मरढे गोलक गोदोबा ना।
अंबाजी ना। हरबाजी चिचोरे १

गोलक १
कुबेर ना। मोहिते तिमाजी ना। ठाकूर
१ १
कृष्णाजी दातीर १ विसोबा नरेकर १
मल्हार विठल मुतालीक कुलकर्णी कसबा १
विसोबा मुतालीक लावणीस १

सेटीये
केशवसेट १ गांग सेट १

तुकसेट माहाजन १

वाणीपैकीं मोख्तसर

गांग सेट कुडा-लकर १ विस सेट वणजवडीकर १

खल सेट वाडकर १ कानसेट पोंतदार १

नजर सेट पाथरे १ विठसेट लेडिये १

दास सेट डाखवे १ गोपाल सेट चौधरी १

सोनार

दामसेट १ तुकसेट १

दरजी जानसेट १

गौळी गोंद म्हेतर १

धाबी गोविंद १

हजाम रोड माहाला १

पारकर रामणी १

साळी

तान म्हेतर १ बापु विथापा १

सिदोजी कांबळी १ भिकाजी १

व्यापारी सिलार १

गुरव तान्हा १

ठाणगे बावाजी निरूत वाडी माल-खाजाणी २

कृष्णसेट १

जमातीपैकी मोख्तसर

दांवजी नाखवा १ जैत्रोजी नाखवा १

अंबाजीनाखवा पेजकर १

इसमाइल मुल्ना १

कासार गणसेट १

तेली

ताबडोजी १ याकुबजी १

बैल्करी बापु १

खुमारी जनकोजी १

तोडकरी गोपालसेट १

कागदी खोजगी १

माळी

गोंद म्हेतर १ मांयाजी १

साटे

वेटजी म्हेतर १ अबादुलजी १

१

करूड चांगा १

नाइकवाडी कदीम

मालजी नाइक १ कृष्णाजी ना १

डांगे लखमोजी व विटोजी १

बाबा व माहादा महार

कर्यातपैकीं

बांदरे मुकासी मोहताही

पेढाबकर १ वाडकर १

नादिवसेकर १ वोवलीकर १

तिंवरेकर १ अडरेकर १

मोखणेकर १ ठेरूकर १

सिणाकर १

......न्हे

जोग प्रभु १ कृष्ण प्रभु १

पिपली खुर्द गंगाजी हरी १

बावजी नाइक सेबेकर खोत मोजे खर्डी १

रोघोबा नाइक सेबेकर खोत मोजे धामणवणे १

काप साले झोरोजी टेभ्या १

चिचधरी कासार १

दलवठणे सटवोजी व कृष्णाजी लिगवना १

कानें गोविंद मल्हार १

कुभारली महादसेट सेटिया १

परसोजी करजन
पोफली पवार १
वाबल कान्होबा नाईक काटधरे १
कासी रामजी नाईक १
कवाडदस्ते गोदावा १
तुरबु कोनेरी रघुनाथ १
... ... होसी हरजीराउ चव्हाण देसाई १
गोवल इस्माइलजी चौगला १
विरले गंगाजी भास्कर

येणेप्रमाणें सर्वांच्या मतें तिमाजी भास्करास दूर करून कृष्णाजी सोमनाथ स्थापनां केली. आणि कोणे गोष्टीचे किलबिश तिलतुल्य च राहता नि : प्रांजल घरोब्रियामध्ये व राजगृही बिलाकुसूर चालो लागले. तो तोमध्ये कितेक व्याक्षेप पडिले. ते कृष्णाजीपंती शर्तीनसी वाद सांगोन पराभवाते पावविले. बितपसील

राजश्री संभाजीराजे याच्या कारकीर्दीस राजश्री आनाजीपंती प्रसंग केला की संगमेश्वराच्या देशकुलकर्णास कोण्ही खावंद नाहीं. तेवढे वतन साहेबी मेहरवान होऊन आपणास मन्हामत करावे. त्यावरून मनास आणून संगमेश्वरचे वतन देश कुलकर्णाचे अनाजीपंतास दिल्हे. तेच प्रसंगी राहुजी सोमनाथ आनाजीपंतास बोलिले की तुमचे सिवेशेजारी आपणांसहि एक वतन द्यावे. मनास आणिता वेकाजी गंगाधर हेलवाककर कुलकर्णी तिमाजी भास्कराचा पुतण्या रायगडास मोहसबा द्यावयास गेला होता. त्याणे सांगितलें कीं चिपोलणच्याहि देशकुलकर्णास खावंद नाही. त्यावरून हुजूर मोझ्यास त्यास उभा करून राहुजीपंतास चिपोलणचें देशकुलकर्ण वतन करून दिल्हें. त्या फडास कृष्णाजीपंती जाऊन सा महिने वाद सांगितला. परंतु सरकारकुनापुढें याचे मांडेना. राहुजीपंताचा मुतालीक माहालास आला. हे वाद सांगत जर्जर जाले. तऱ्ही दरबारीचा पिछा सोडिला नाही. इतकियांत राजश्री कबजीबावा संगमेश्वरीहून रायगडास जाता बराबरी राहुजीपंत चिपोलणास आले. माहाजर करून घ्यावा म्हणौन लोकास तश्रीफा द्यावयास चिपोलणचे दफतरदार याही कुष्मांड करून विनाजी बलालास फिसाऊन वस्त्रपात्र जेवणखाण गाडी दाखऊन कृष्णाजीपंतास काढुन आपण देशकुलकर्ण करावे ऐसे करून विनाजीस घेऊन सरकारकुनासी वाद भगीरथ च प्रयत्न करून सांगितला. ते फडी राजश्री रघुनाथ नारायण होते. त्याही कृष्णाजीपंताच्या मुखांतरें करीनां मनास आणिता हे थोटाई करिताती. कृष्णाजीपंत वतनाचे खावंद खरे. ऐसे त्याच्या चितास आले. रघुनाथपंत थेंड सामान्य नव्हे. त्याचे पिते नारोपंत माहाराज शाहाजीराजे याची मजमु करीत होते. तैसेच रघुनाथ हाली शिवाजीराजेयाची मजमु करिताती. त्यास राजे ताजीम देताती त्याही मनसुफी केली. ते कुदरत कोणाची अन्यथा करावयास. तेव्हा रायाजी हरी व लिंगोजी हरीस बाहेर घातले. विनाजीस फजीत करून आपले कागदपत्र देऊन कृष्णाजीपंतास वतनावरी पाठविले. हे कलम २

त्याउपरी हरबाजी दांतीर पहिले मुतालकी चालवीत होता. त्याणे आपली लेकी गोतमाइच्या पुत्रास दिल्ही होती. त्याचा लेक पांडुरंग केलसीहून येऊन कृष्णाजीपंतासि वाद सांगितला की आपले बहिणीचे

दोन दीडे कापड खा करून अगोधर आपण चिपोलणास आले. राजश्री कबजीबावा परशरामी येऊन भोजनास राहिले. तें प्रसंगी कृष्णाजीपंती विनाजी बराबरी दोघे त्याचे पुत्र देऊन कबजीबावा बाहेर येताच तीघानी येऊन कबजीबावाच्या पायावरी घालून घ्यावे ऐसे सिकउन पाठविले. तेणेच प्रमाणे य तीघानी येऊन कबजीबावाच्या पायावरी सपवल घालुन जुलुम होतो दाद द्यावी म्हणौन अर्ज केला. त्यावरून कबजीबावा अनुतापी होऊन कोनेरीपंत कारभारी यास रागेजोन सांगितले की यो बडा जंज्याल हमारे नजीक किस सबब दयाल हुवा. इसका करी देखकर निशा करो. फेर हमारे पास गरगशा आने न द्यौ. म्हणोन सांगितले त्यावरून कोनेरी पंती त्यास उठउन उदैक तुमचा निवाडा करितो म्हणौन आपणाकडे आणिले. कुल हकीकत कृष्णाजी पंताच्या मुखांतरें रायगडी आइकिलीच होती. त्यावरी कबजीबावा भोजनास बसले. ते समई पंडितानी येऊन न्यायनीतीच्या शास्त्राच्या चर्चा केल्या. त्यामध्ये सहज एकाची वृत्ती छेद करून दुसऱ्यास दिल्हीयाने त्या पापास जोडाच नाही म्हणौन वाक्यें चालिली. तेंच समई कोनेरपंत येऊन कबजीबाबावास सांगितले की त्या ब्राह्मणांची मनसुफी बरहक मनास आणितां त्यांचे वतन खरें. येथे संदेह नाहीं. राजद्वारी बलात्कार होऊन त्या गरीबाचा उछेद होतो म्हणौन सांगितले. त्याच्या सांगण्यांस आणि शास्त्राच्या वाक्यास एक जाले. त्यावरून त्याचे मन द्रवोन राहुजीपंतास सांगोन त्याचे वतन दूर करून वतन त्याचा स्वतसिध खावंद आपण हयात असतां दरम्याने तुम्ही वतन खावयास कोण म्हणौन कटकट बहुत केली. तेव्हा त्यास चौघानी सांगितले की तु खावंद म्हणोन घेतोस तरी जेव्हा कृष्णाजीपंताच्या गळा वतन घातले तेव्हाच का उभा राहोन आपले वतन घातलेस नाहीं. याउपरी तुज फिटत नाहीं. व्यर्थ श्रमी होउ नको. म्हणौन कितेक सांगितले. त्याणे पारपत्य होईल म्हणौन गावा मध्ये तीन रोज बरोबर कोरान भिक्षा मागितली. ज्याच्या घरास भिक्षेस जावे तोच झिडकरी. तेव्हा उटोन गेला. हे कलम ३

त्याउपरी मागती अनाजीपंतावरी व राहुजीपंतावरी कुष्मांड होऊन यास दस्त राजश्री संभाजी राजे यानी केले. तेव्हा सारा कारभार खंडेदाउ पानसंबल यास जाला. त्याही खाच्या वतनांवरी हुजुरून दो माहालास दोघे मुतालीक पाठविले. त्यावरून कृष्णाजीपंत हुजुर जाऊन झाला करीनां सांगितला. च्यार महिने वाद सांगत श्रमी जाले. तेव्हां मनास पेसजीची कुल कैफत मनास आणुन कृष्णाजीपंतास करार करून पाठविले. हे कलम ४

त्याउपरी राहुजीपंत मृत्य पावले. दोघे पुत्र कासी राहुजी व त्र्यंबक राहुजी यास घेऊन राहुजीपंताची स्त्री घेऊन राजश्री रामचंद्रपंत यासी विशालगडास गेली. तेथें या कुलकर्णाचा प्रसंग केला. तेथ चालवावे हे अगत्य देखोन त्यास दोन तकसिमां कृष्णाजीपंतास एक तकसीम देऊन समजाऊन पाठवावे ऐसा तह केता. परंतु कृष्णाजीपंत नाइकेत. कुडी-

याचे यासच द्यावे ऐसा आपले मनी निश्चय केला. तो चिपोळणी राहुजीपंती त्वरा करून माहाजर करून लोकास तश्रीफा द्यावयासि तमाम लोकास ताकीद करून चाटे पडवीस जमा केले. तों कृष्णाजीपंती विनाजीस सांगितले की तु दोघे मुल घेऊन संभाषण वठली असेल तेथे उभे राहोन ठसासा जुलुम होतो म्हणौन बोंबा मारा. म्हणौन त्यास सांगोन पाठविले. त्याचप्रमाणें याही केले. त्यावरून मुलारंभी अपशकुन मानून तमाम लोक भरारा एकाकेंच उठोन आपल्याला घरास गेले. राहुजीपंती हिंवसलेसें तोंड करून खटे होऊन परशरामास गेले. कबजी बावाजीची भेटी होताच कबजी बोलिले की राहुजी पंडित तुम बडे होकर राज्याजीका निशाकर कर गरीब बमणका बतन लेकर तुम लेते हो ये मनसुफी हम जानता नई. राज्या देखकर लेवा. म्हणौन निःश्रौसून सांगितले. कबजी बावा स्वार जाले. राहुजीपंतहि डोलीमध्यें बसोन त्याबराबरी गेले. तो वाटेस कृष्णाजीपंती जाऊन डोली उभी करून राहुजीपंतास बोलिले की राहुजी नानां तु म्हातारा जाला आहेस. उद्या मरोन जासील. तुजपासी पटकुल अंपरांपर असतां तुझ्या पुत्रास काय उणे आहे. हे टाकून माझ्या आंगावरील घोंगडी जुनी बलात्कारें हिरोन घेतोस. हे तुझे कोण भूषण. ऐसे तप्त होऊन बोलताच राहुजीपंती दोन्ही हात जोडून याउपरी तुझ्या वतनाच्या वाटे अजीपासून जाईल तो तुझ्याच बटकीचा लेक असेल म्हणौन सांगोन कृष्णाजीपंतास निरोप देऊन राहुजी नाना स्वार होऊन गेले. हे कलम वारले तऱ्ही कृष्णाजी मध्यें आत्मा आहे तो सोडून जात नाही. देहं वा पातयेत् अर्थं वा साधयेत् हे गोष्ट चितात धरून मरणास धरणे घेत बसले. रोज उठोन राहुजीपंताची स्त्री बार्जी आणि कृष्णाजीपंत देहावर संकळ्प करून फड सोडिला नाही. तेव्हा एके दिवसी रामचंद्रपंतास राग येऊन बलात्कारें कृष्णाजीपंतास गडाखाले घातले. उघडे बोडके दरवाजापासी येऊन योगासन घालून बसिले. तो राजश्री नारो नीलकंठ रामचंद्रपंताचे वडील भाऊ जंजिरे-विजयदुर्गाहून रामचंद्रपंताचे भेटीस विशालगडास आले. त्यास आणावयास पुढे सामोरे रामचंद्रपंत गेले. तों दरवाजियापासी कृष्णाजीपंत उघडे बोडके आसन घालून बसिले होते. ते देखिले. तेव्हा पंताचे मन द्रवोन बराबरी दिवटिया देऊन गडावरी पाठविले. दुसरे दिवसी प्रसंग पडला. तो राहुजीपंताच्या पुत्राची भीड मोडेना. कृष्णाजीपंत आइकेतना. तेव्हां एखादा अनर्थ होणार. कृष्णाजीपँत तामसी जिवाचवर उदार होणार. तेव्हां सभासद भले लोकी कृष्णाजीपंतास बहुता प्रकारे सांगितले की तुमचे कुलकर्ण उद्या तुमच्या हातास येईल. प्रस्तुत ये प्रसंगी पंती तह केला आहे की दोन तक(सि)मा त्यास एक तकसीम तुम्हास देताती ते तुम्ही मान्य करा. म्हणौन नाना प्रकारे बोध केला. त्यावरून शांत होऊन कार्याकारण प्रसंगानरूप मान्य करून आले. तो मोगलाचा धुंदकार (धुंदमार?) जाला जागाजागा फौजा येऊन सातान्यास सर्फखान बिलगला. सेख निजाम विशालगडास येउन वेढा घातला. तमाम कोकण मोगलास कबूल

भगवी कपडे करून उपोशणे आरंभुन रोज राजे बाहेर येता च मजुरा करू लागले. याउपरी राजे गंगोलीस आले. तेथेहि पिछा सोडिला नाही. एकें दिवसी राजे बाहेर डोहो बांधला होता. तेथे होडीया घालुन खुशालीस जागा केला. तेथे राजे येताच कृष्णाजीपंत उभे राहोन नेटयाने (?) हाका मारिल्या. साहेब सर्वज्ञ शास्त्रार्थाचा अर्थ स्वता पंडितांचा निशा होय ऐसा करिताती. ऐसे असोन माझें पारपत्य होत नाही म्हणौन अर्ज केला. त्यावरून राज्यानी प्रल्हादपंतास पुसिले. त्याही सांगितले कीं थोरलें माहाराज होते ते थोराची भीड पडली तऱ्ही एकाचे वतन काढून दुसऱ्यास सहसा दिल्हे नाहीं आणि साहेब माहाराज पुत्र भिडेमारेने या ब्राह्मणाचे वतन खरेखुरें असता बलात्कारें काढून दिल्हे. त्यावरून राज्यानीं राहुजीपंताचे कुलकर्ण दूर करून कृष्णाजीपंतास करार करून राजश्री प्रल्हादपंती राजपत्र व आपले पत्र वेकाजी निबंदेव दाभोलेस सुबेदार होतें त्यास आणून आपले वतन चालउ लागले. त्याउपरि दुसऱ्यास खलेल करावयास गरज नाही. ऐसे राजपत्र खरेखुरे होऊन बिलाकुसूर चालउ लागले.

एक वरीस राहुजी पंताचा मुतालीक होता. त्याउपरी रायाजी हरी व लिंगोजी हरी.

जाले. अगदीं वतनदारी विष्कळीत जाली. राहुजीपंताचे मूल परभारेंच मोरगिरीस गेले. त्याउपरी कितेका दिवसी निवल होऊन लोक आपापले जागा येउ लागले. तो राजाराम चंदी मोगलानी घेतलियावरी त्या प्रांताहून सातारियास येऊन राहिले. तेथे सारे सरकारकून आले. तेथें हरीपंत कृष्णाजीपंताचे पुत्र सातारियास गेले. राजे माडीवरी बसले होते त्यास जाऊन भेटले. वर्तमान निवेदन केले. तेव्हा राजानी हरीपंताबराबरी चोपदार देऊन कोनेरीपंत न्यायाधीश याकडे पाठविले. त्यास जाऊन भेटले. त्यास पहिली हकीकत कललीच होती व यांही आपले स्वमुखे सांगितले. तेव्हा कागद करून द्यावें म्हणौन कोनेरपंत राजास पुसावयास आले. तेव्हा परशरामपंती रेशा मारिलीं की विनाजीच्याच पुत्रानी उपयोग करावा ऐसे पत्र करून देणे. हरीपंताच नाव नाही म्हणौन खलेल पडिले. कोनेरपंत हरीपंतास म्हणो लागले की तुमचे नाव लेहावयास तुम्हापासीं काही कागदपत्राचा आधार असेल तरी दाखवा. त्यावरून तुमचे नाव लेहोन पत्रे करून देतो. तेव्हा हरीपंतापासी विनाजीनें पत्र लेहोन दिल्हे होते की आपल्या पुत्रानी व हरीपंती मिलोन वतनांचा उपगोग वौषपरंपरेनें करावा म्हणौन पत्र होते. ते कोनेरपंतास दाखविले. त्यावरून राज्यास व परशरामपंतास सांगोन ते पत्र दाखउन याचे नाव लेहोन द्यावे ऐसी परवानगी घेऊन पत्रामध्यें याचे हि नाव लेहोन राजपत्र करून सिध केले. तो राज्यास काही पैकियाची गरज लागली म्हणौन

कोनेरपंताकडे ऐवज न्यायाधिशीची... ले ते प्रसंगी होती. तेवढी वरी ऐवज नावनिसीवार लिहिला. त्यामध्ये हरी पंताच्या नावे दोनी सें रूपये घेणे म्हणौन लिहिले. त्यावरून दोशा रूपयाचे त्वष्ट यास लाविले. रूका न मिले. कागदपत्र तयार जाले. तेव्हा कर्जवाम मिळाले तैसे घेऊन दोनीशें रूपये देऊन कागदास सिके होऊन हरीपंतास निरोप देविला. ते दरवाजियास आले. तो राहुजी पंताच्या दोघा पुत्रानी मोरगिरीहून येऊन दरवाजियापासी हरीपंतास अरगटून माघारे राजसनिध गेले. राज्यापासी सांगितले की आपणास चिपोळणचे कुलकर्णाचे वतन संभाजी राजे यानी दिल्हे आहे तेणेंप्रमाणें साहेबी द्यावे. त्यावरून राजाराम बोलिले की दाजीने एकाचे वतन काढून एकास काय समजोन दिल्हे. आम्ही मनास आणून ज्याचे त्यासच सरे तुम्हास निसबत नाहीं. याउपर कुलकर्णाची चर्चा करायास गरज नाही म्हणौन पष्ट सांगोन हरीपंतास पाने देऊन वतनाच्या वतनावरी पाठविले. हे कलम ५

येणेप्रमाणें सत्याचे सत्य नानाप्रकारीचे व्याक्षेप निर्माण जाले होते ते दूर होऊन सेवट खरे तेंच परिणामी उरले. तेव्हां कृष्णाजीपंती श्रमाचा स्वास टाकून एकश्चित्त जाले. वर्तमान होते तोवरी चालविले. त्यावरी त्याही कैलासवास केलीयानंतर हरीपंत त्याचे पुत्र ते चालवितातीं. या कार्यभागमुळे दरबारी हुजरातीस व रौबतीस प्रसंग पडिले

| महाराज | | सरकारकून | |
|---|---|---|---|
| संभाजी राजे १ | राजाराम १ | रघुनाथ नारायण पंडीत | प्रल्हाद पंडीत |
| सुभेदार दाभोल | | | शंकराजी पंडीत |
| माहादाजी अनंत | राघो वासुदेव | | |
| पंताजी रंगनाथ | बहिरो त्रिमल | रामचंद्र पंडीत | |
| माहादाजी नारायण | वेंकाजी निबदेव | परशराम पंडीत | कबजी बावा |

| | | |
|---|---|---|
| अंताजी लक्ष्मण | दैवाजी विठल | कोनेरपंत |
| बापुजी आपाजी | गंगाजी दादाजी | |
| माहादाजी बलाल | कासी रंगनाथ | |
| विठल गोपाल | सिवाजी कृष्ण | |

इतकियासी प्रसंग पडोन त्याच्याहि मुखांतरे कृष्णाजीपंत खरे जाले. याउपरी भालेराई मोगलाई जाली. तेथे हि रूजुवात जाली आहे. हे वर्तमान गौतमाईने आपल्या स्वमुखाने कुल हकीकत सांगितली व ज्याणे हे पत्र आपल्या स्वदस्तेरे लेहोन दिल्ही त्यास हि इतकिया गोष्टीची दखलगिरी आहे. श्रीस व सत्य स्मरोन लिहिले आहे. यामध्ये जाले वर्तमान टाकून स्वता बुधीने लिहिले असेल त्याचा दोषी तोच होईल. ऐसे जाणोन लिहिले आहे. हे पत्र जे कोण्ही थोर लोक वाचून पाहातील आणि आपल्याच हृदई शद्बमथन करिता सारांष ध्यानास येईल तेच अंतरसाक्ष श्रीची आहे. सत्ये करून हा भूगोल राहिला आहे. असत्य असते ते हजार मुलामगिरी जडावाची केली तऱ्ही जे कोण्ही श्रीच्या पायाचे परीक्षक आहेती त्याही नजरेनेच पाहाता खरेच तेच खरे परीक्षा न पाहाता दिसोन येते. तैसेच... मगिरी असते त्यास हजार श्रिंघार केलियाने भल्याचे अंतरी साक्ष येत नाही. यामध्ये या पत्रार्थावरून आमचे वतन आहे त्याणे आपल्या स्वमखु प्रसंग पडेल तेथे सांगावे लागत नाहीं. सारा निशापत्रावरून सर्वज्ञ असतील त्यास कलेल म्हणौन लिहिणाराच्या हृदइ संचार होऊन लिहिविले. तेणेच प्रमाणें स्फुर्ती चालिली. स्वता बुद्धीने इतकी जे ट न द रा जी राहात नाही. यामध्ये सर्वज्ञ आहेत त्यासच हा अर्थ कलला असेल. वरकडास कागद मात्र वाचून आइकतील. काही ध्यानास येणार नाही हे खरे. तेथे याउपरि लेहावे ऐसा अर्थ नाही. कलले असावे. संपुर्णमस्तु शुभं भवतु ॥ एक गोष्ट राहिली गोतमाई वर्तमान असतां ते व विनाजी बलालाचे कुटुंब देखील हरीपंताचे कुटुंब याचा त्याचा रूणानुबंध मिलाप जाला त्यापासून आजिवरी सकल कुटुंब एकत्रच हरीपंतापासी आहे. कलले असावे.

~~~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. ५२–६६.

१९ जून १७१६ ] **(–३०३–)** [आषाढ शुद्ध ११
मंगळवार, रा. श. ४३

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्छरे अशाढ शुद्ध येकादसी भोमवासरे क्षत्रीयकुलावतंस श्रीराजा शाहूछत्रपती स्वामी याणि देशमुख व देशपाडे कर्यात सासवड यासि आज्ञा केली यैसी जे. मौजे कोढीत बुा काा मजकूर येथील कुलकर्ण व जोतीस बाळाजी हरी मेडजोगी याणी रामाजी त्रिमल देशपाडे काा माार यांस बीस होन देऊन विकत घेतले होतें. परंतु बालाजी
~~~~~~~~~~~~~~~~

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2] हरी व त्रिंबक रघुनाथ व मोरो नरहर मेडजोगी यांचा भोगवटा नव्हता. मल्हार अनंत अत्रे कुलकर्णी व जोसी पुरातन प्रमाणे चालवीत होते. यैशास स्वामि स्वराज्यात आल्यावरी मोरो नरहर मेडजोगी व त्रिंबक रघुनाथ मेडजोगी याणी कथला केला. अणी कुलकर्ण अमानत केलें. होतें. कथला निवडे तोंवरी कुलकर्ण मल्हार अनंत अत्रे याचे दुमाले केलें होतें. सांप्रत रा। त्रिंबक रघुनाथ मेडजोगी याणी आपले मुदल वीस ओन घेऊन मल्हार अनंत अत्रे कुलकर्णी व जोतिसी मौजे मजकूर याची वृती याचें स्वाधीन करून आपले बेदाव्याचे पत्र लेहोन दिल्हे आहे. त्याप्रमाणें स्वामिणी मल्हार अनंत अत्रे पुरातन वतनदार जाणोन सदरहू वृत्ती दुमाले केली आहे. तरी तुम्ही मशारनिलेचे हाते सालाबाद चालत आले आहे त्याप्रमाणें वतनाची सेवा घेणे. नव जिकीर न करणे. या पत्राची प्रती लेहोन ठेऊन मुख्य पत्र भोगवटियास मल्हार अनंत अत्रे यापासी देणें. जाणिजे. लेखनालंकार. [ शिक्का—' मर्या : देयं रा : जते ' ]

[ जोडावरील शिक्के—' लेखन सीमा ' ]

बार सुद सुरुसुद बार

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १–२, पृ. १०४.

१६ दिसेंबर १७१६ ] (– ३०४ –) [ पोष शुद्ध १४ रविवार, रा. श. ४३; १३ मोहरम, सबा

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुख सवत्सरे पौश शुध चतुर्दसी भानुवासरे क्षेत्रिये कुलावतस श्रीराजाशाहुछत्रपती स्वामी याणी मोकदमानी मौजे कादली ता। आळे यांसी आज्ञा केली ऐसीजे. मौजे मजकूर पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून हली राजश्री बाकोजी ढमढेरे यांसि कुलबाब कुलकानु खेरीज हकदार व इनामदार

१. शिक्का—' श्री : राजा शाहू छत्र : पति हर्षनिधान : बाळाजी विश्व : नाथ प्रधान.'

२. शिक्का—' श्रीआई : आदिपुरुष श्री : राजा शाहू छत्रपति : स्वामि कृपानिधि : तस्य परशराम : त्र्यंबक प्रतिनिधि. '

[शिका][1] [शिका][2] यांसी इनाम दिल्हा असे. तरी तुम्ही यांसी रुजु होऊन मौजेमजकुर वसूल कडे देणें. जाणिजे. लेखनालंकार [शिका–मर्या : देयं रा : जते] तेरीख १२ मोहरम सुा सबा.

बार सुद सुरू सुद बार बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. २२१–२२२.

१२ जानेवारी १७१७ ] (–३०५–) [ ९ सफर, सबा अशर मया अलफ

श्री

[शिका][3]

आज्ञापत्र राजश्री पंत प्रधान ताा मोकदमानी मौजें येठगाऊ ताा हवेली प्रांत जुनर सुहूर सन सबा अशर मया अलफ. मौजेमाार राजश्री वाकोजी ढमढेरे यांसी मुकासा दिल्हा असे. तुम्ही माारनिलेसी रुजु असोन मुकासबाबेचा ऐवज सुरळीत पावविणे. जाणिजे. छ ९ सफर. आज्ञा प्रमाण. [शिका– 'लेखन : सीमा']

सुरु सुद बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. २२१.

१९ एप्रिल १७१७ ] (–३०६–) [ वैशाख वद्य ५, रा. श- ४३; १७ जमादि लावल, सबा असर

**लक्ष्मीनारायण**
**वालावली**

॥ श्री ॥
नारायण

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ४३ हेमलंबी नाम संवत्सरे वैशाख बहुल पंचमी... क्षेत्रीय कुलावंतस श्री राजा शंभु छत्रपति स्वामिया ... श्री राजश्री

१. शिका : 'श्री : राजा शाहू नर : पती हर्ष नीधा : न बाळाजी विश्व : नाथ मुख्य प्र : धान.'

२. शिका : 'श्री आई आदिपुरु : ष श्रीराजाशाहुछत्रप : ति स्वामि कृपानिधि त : स्य श्रीनिवास परशु : राम प्रतिनिधि.'

३ शिका– 'श्री : राजा शाहु न : रपती हर्ष नीधा : न बाळाजी विश्व : नाथ मुख्य प्र : धान.'

देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रा. कुडाळ यासी आज्ञा केली ऐसीजे. श्री... वास्तव्य मौजे वालावली हे बहूत जाग्रत स्थान स्वामीची स्वारी कुडाळप्रांते जाली. ते समयी श्रीच्या दर्शनास जाऊन दर्शन घेतले. स्थल अनादिस्थान पुरातन प्रसिद्ध. श्रीचा पूजाऊछाह चालिल्यानें स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याणवह. ऐसियास मौजे वालावली ता हवेली प्रा मजकूर हा गाव श्रीच्या पूजाऊछाहास निमे अिनाम चालत आहे. हाली स्वामीनी श्रीचे दर्शन घेतले. यास्तव निमे गाव येकून मौजे मजकूर देह १ येकरास इनाम सर्व मान्य करून दिल्हा आसे. तरी तुम्ही मौजे मजकूर पूर्व मर्यादेप्रमाणें च्यतुसीमा कुलबाब कानुखेरीज हकदार व इनामदार करून गाव श्रीकडेस स्वाधीन करणें आणि इनाम गाव श्रीचे पूजाउछाहास उत्तरोत्तर चालविणें; प्रतिवर्षी नुतन पत्राचा आक्षप न करणें. या सनदेची तालिक लिहून घेऊन आसल सनद श्रीचे पूजारी याजवळी भोगवटीयास परतोन देणे. जाणिजे. लेखनालंकार.

तेरीख १७ जमादीलावल सुहूर सन सबा आसर

ब्राम्हण, वर्ष १, अं. १०, आक्टोबर १९४६, गोवा, पृ. ५.

२४ एप्रिल १७१७ नंतर ] (–३०७–) [ २२ जमादिलावल, हि. ११२९.

श्री

महजर पारसी बमोहर काजी अबदुल रसूल वगैरे उमदे मनशु व तालुकदार वगैरे समस्त लहान थोर साकीन शहर अहमदनगर वगैरे मोहरा सुमार ३६ छेतीस वगैरे शाहीया समस्त सेदलोक व सेख वगैरे साकीन शहर मजकूर याचे सेवेसी महामद अशरफ बगैरे पुत्र फत्ते माकादगी बलदे मजकूर याणीं येऊन विनंति केली कीं छ २२ जमादिलावल सन ११२९ हिजरी ( २४ एप्रिल १७१७ ) ते दीवसी खंडो दाभाड्या व मुलतानजी नीबालकर वगैरे सरदार गनीमाईचे चालीस हजार स्वार व प्यादे बेसुमारानसी आमदानगरावर येऊन वेढा घातला. फौजदारी लढाई गेली व बाणाची संध्याकाल पावेतो जाली. सेवट ते फौज बेसुमार शहरांत दाखल जाहली जे वस्तभाव घरची व परवानें पेशजीचे हकमाचे व चकनामे जमीनदाराचे ब्रा एक चावर जमीन इनाम खेरीज जमा सेताचे उपयोगी मौजे बुरुडगांव पोा पांढे पेडगांव सरकार मजकूर बदल योगक्षेम आमच्या मथे फरजंदा करार होते ते लुटून नेले. त्या प्रो सनद जमीन मजकूरचे व परवाने बमोहर इस्माईलखान व परवाने बमाहर दुखलेसखान व परवाने बमोहर मीर्जा साले व परवाने बमोहर फकरूदीखां कीलेदार व जागीरदार याच्या फौजेचे तळावर हुडकीता फाटके टुकडे सांपडले ते उपयोगी नाहींत. त्याचे वर्तमान ज्यास वीदीत असेल त्याणी ईश्वरपरायण आपली

मोहर साक्षीची व साक्षी आपली या पत्रावर करावी म्हणोन विनंति केली. त्याजवरून महाजराबर मोहरा करून दिल्ह्या

तपसील मोहरा

१ मोहर काजी अबदूल रसूल
१ मोहर सैद आली आमजसू
१ महमद आकरान फरोखसेरी
१ सेद सुज्या मोहतसीब
१ गुलाम नीजामुदीन फरोखसेरी
१ अबदुलनबी इमाम व खतीब मसीद दरगा पातशाहा
१ महमद सुलतान एखत्यार खानी
१ मीर सादक हुसेनी
१ महमद फाजलखा सेरखानी
१ हयातखान
१ रहमत तुला
१ महमद अली

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. २२०.

३ आक्टोबर १७१७] (–३०८–) [आश्विन शुद्ध १० गुरुवार, रा. श. ४४.

श्री

स्वति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी संवछरे आश्विन शुध दशमी गुरुवासर क्षेत्रीय कुलावतंस श्रीराजाशाहु छत्रपति स्वामी यांणीं समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री खंडेराव दाभाडे सेनापति यांसी आज्ञा केली ऐसीजे. राजश्री खंडोबावाजी प्रभु यांची पूर्वीपासून सेनापतिची जमेनिसी होती. त्यांस अलिकडे दुसऱ्यांकडे दिली होती. त्या उपर हे हुजुर उमेदवार होते. हे एकनिष्ट सेवक लिहिणार सरंदाज स्वामीकार्याचे मर्दान जाणून स्वामी यांवरी कृपाळु होऊन यांन्ही वतनी जमेनिसी जाणून यांस सांगोन पाठविले आसत. त्यांचे हाते जमेनिसीचे प्रयोजन घेत जाणे. यांस वेतन सालीना देखील चाकर होन पातशाही ५००० पांच हजार रास केले असतई. पैवस्तापासून वजावाटा व दंडक प्रमाणे वजा करून उरले वेतन सिरस्ताप्रमाणें देत जाणे. चाकर मोईन प्रा ठेवून हजिरी लिहवतील त्या दिवसापासून चाकराचा हक देत जाणे. यासी बैसावयास पागेचे घोडे देत जाणें. कागद बाब लिहिणार व शाही सिरे व तैवज खर्च.... तादप्रमाणें देत जाणे. यासी जमान येसवंतराव महादेउ पोतनीस हुजुर घेतले असत. बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा. [ शिक्का– 'मर्या: देयं विरा: जते' ]

महाराष्ट्र साहित्य, व. १, अं. २, सप्तेंबर १९१९, पृ. १०३.

८ नवंबर १७१७ ] (–३०९–) [ १५ जिल्हेज, समान अशर मया अलफ

श्री

राजश्री कान्होजी राजे सिर्के गोसावी यांस स्नो बाळाजी विश्वनाथ प्रधान रामराम विनंती सुा समान अशर मया व अलफ. ताा पौड खोरे येथें तुम्हांस इनाम गांव आहेत. त्यांत तुम्ही सेते करणें. याशिवाय दुसरे गांवी सेते करतां म्हणोन विदित झालें. त्यास दुसरे गांवीं सेते केलियास बाबती मावल सिरस्ताप्रों देणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. बोभाटा आलीयास कार्यास येणार नाहीं. पाा हुजूर राा छ १५ जिल्हेज, बहुत काय लिहिणें मोा.

विविधज्ञानविस्तार, पु. ४०, अं. ६, जून १९०९, पृ. २२२.

८ नवंबर १७१७ ] (–३१०–) [ १५ जिल्हेज, समान अशर मया अलफ

श्री

राजमान्य राजश्री केसो गणेश हवालदार व कारकून ताा पौडखोरे यांसी बाळाजी विश्वनाथ प्रधान नमस्कार. सुा समान अशर मया व अलफ. देशमुख व देशपांडे ताा मार यांची खासगत सेते गावगना आहेत. त्यास पूर्वीपासून बाबती जमा धरीत नाहीं. मध्यें जमा धरल्या आहेत. सालमजकुरापासून बाबती न धरणें. सालाबाद वसूल देत नाहीं म्हणोन विदित केलें. तर सुदामत पूर्वीपासून जमा धरीत नसले तरी जमा न धरणें. जाणिजे. छ. १५ जिल्हेज. पाा हुजूर मो असे.

विविधज्ञानविस्तार, पु. ४०, अं. ६, जून १९०९, पृ. २२२.

५ डिसेंबर १७१७ ] (–३११–) [ मार्गशीर्ष शुद्ध १३ गुरुवार, रा. श. ४४

श्री

[ शिका ][1]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबी सवछरे मार्गशीर्ष शुध त्रयोदसी गुरुवासर क्षेत्रीयकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामि याणी राजश्री पंताजी सिवदेऊ यांसि दिल्हे इनामपत्र ऐसे जे. तुम्ही पुरातन सेवक येकनिष्ठपणें सेवा केली. ये

१. शिका– ‘श्री : वार्धिष्णु विक्रमो : विंष्णोः सामूर्तिरिव : वामनी शंभुसूनो : रसौ मुद्रा शिवरा : जस्य राजते’.

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2] निमित्य तुमचे चालत्वणे स्वामिस अवशक जाणून स्वामि तुम्हावरी कृपाळु होऊन मौजे भाटघर ताा वेलवडखोरे प्रात मावल हा गाव पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून हाली कुलबाव कुलकानू खेरीज हकदार व कदीम इनामदार देखील हालीपटी व पेस्तरपटी जलतरुतृणपाशाणनिधिनिक्षप चतुः सीमापूर्व मर्यादेपूर्वक तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम करून दिल्हा असे. तर मौजे मजकूर चतुःसीमापूर्वक पूर्व मर्यादेप्रमाणें आपले दुमाल करून घेऊन वंशपरंपरेने ईनाम अनभऊन सुखरूप राहाणे. स्वामी अविछिन चालवितील. लेखनालंकार [ शिक्का-'मर्या : देयं रा : जते' ]

तेरीख १२ मोहरम सुाा समान.

रुजू सां मंत्री बार सुद सुरु सुद बार बार

[ जोडावर शिक्का- 'लेखन : सीमा' ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १-४, पृ. ९०-९१.

## २० मे १७१८ ? ] (-३१२-) [ जेष्ठ शुद्ध २ सोमवार.

श्री

श्रीमंत राजमान्ये राजश्री गदाधरभट स्वामींचे सेवेसी सेवक बालाजी विस्वनाथ कृतानेक नमस्कार विनंती.उपरी ताा जेष्ठ शुध प्रतीपदा इदुवार परयेत मुाा मूल येथे स्वस्ति क्षेम आसो. विशेष. स्वामीने पत्रे पाठविली ती पाा आवगत जाले. ऐसीयासी आम्ही समुदायानसी आकू भरडी यावरून घाट चढोन आलो. लोधीखान याने... आरभली ते समई युद्ध प्रसंग जाला. हे वर्तमान सेवेसी नि... परी आम्ही स्वार होऊन समुदायानसी ओतूरावर येऊन मजल दरमज(ल) देशास येत होतो. त्यास अजम करीम बेग लस्करीच्या लोकाची घोडी नेली. वस्तभाव नेली. याज... आनीवार पाठोपाठ लाग करून जुनरास जाऊन... समई शहर लुटिले गेले. मग आम्ही फौजेनसी जाऊन शाहाराबाहेर निघालो. त्या उपरी स्वामीचे पत्र ... [ पुढील ओळी फाटल्या आहेत ] लोभ असो दीजे हे विनंति.

भा. इ. सं. मं. त्रै. व. ७, अं. १-४, पृ. ८३-८४.

---

१. शिक्का- 'श्री : राजा शाहु छ : त्रपति हर्षनिधा : न बालाजी वि : श्वनाथ प्रधा : न.'

२. शिक्का- 'श्री : श्री आई आदिपुरु : ष श्री राजाराम शाहु : छत्रपति स्वामि कृपानिधि त : स्य श्रीनिवास परशुराम : प्रतिनिधि.'

३१ आगष्ट १७१८ ] (–३१३–) [ १५ सवाल, तिसा अशर मया अलफ

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री विसाजीबावा स्वामीगोसावी यांसीं

पो बाळाजी विश्वनाथ प्रधान–कृतानेक नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत असिले पाहिजे. विशेष. पूर्वी अंजनवेलीत असतां आमचे सर्व प्रकारें आपण चालविलें. संकटें आम्हावरी पडलीं. त्या प्रसंगीं आपण आम्हावरी कृतोपकार फार केला. आम्हामुळें सर्वस्वें खराब होऊन आमचें सरंक्षण केलें. हल्लीं ईश्वरें आम्हावरी कृपा केली. यास्तव आपण आम्हापाशीं रहावें. आम्ही सर्व प्रकारें चालवावें. हें आमचें मानस. यास्तव आग्रह बहुत केला. त्यास आपण सांगितलें जे आपला वृद्धापकाळ आपण योगक्षेम चालत आहे ज्याचे सन्नीद्ध आहां तेहि उत्तम प्रकारें चालवितात. मुलें ठेवावी तर ती लहान. यास्तव त्याचें उपयोगी पडे ऐसें पत्र लेहून द्यावें म्हणोन बोलिला. त्यावरून तुम्हांस हें पत्र लेहून दिल्हे असे. जर करितां आमचें व आमच्या वंशाचें ईश्वरें कल्याण केलें तर सर्वप्रकारें आपले वंशाचें उत्तम प्रकारें चालवावें. अंतर करूं नये. अंतर जाहालिया पूर्वी आम्ही आपल्याशी शफत केली आहे त्यास अंतर पडेल. ईश्वरास मानणार नाहीं. प्रस्तुत आम्ही आपणास रुपये ७०० सातशें प्रतिवर्षी करार करून दिल्हे आहेत. साल दर-साल प्रविष्ट करूं. सुा तिसा आशेर मया व अलफ छ १५ सवाल. लोभ असो दीजे हे विनंती.

विसाजी नारायण यांचे वशजांची वंशावळ खालीं दिली आहे



|

हरी रामचंद्र चिटणीस

|

कृष्णाजी हरी चिटणीस — नारायण हरी चिटणीस

भा. इ. सं. मं. द्वि. सं. वृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. ११४–११५.

२७ नवेंबर १७१८ ] (–३१४–) [ मार्गशीर्ष वद्य २ शुक्रवार, रा. श. ४५

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४५ विलंबी सवत्सरे मार्गशीर्ष बहुल द्वितीया भृगुवासरे क्षत्रियेकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान यासि आज्ञा केली ऐसी जे. दरगाह शाहा शरीफ पीर[१] मुा अहमदनगर यास इनाम मौजे कोनोसी पा सेवगाऊ मौजे येकलारे पा सगमनेर हे दोन गाव इनाम दिल्हे आहेत. तरी तुम्ही

---

१. वंशावेल

शहा शरीफ

लाड महंमद वा सय्यद शरीफ

|

—

|

—

|

—

|

—

|

बुऱ्हाणमिया

|

बाबामिया (मृत्यु– फल्सी ११३३ (१७२३–४ इ. स.)

|

वलीमीया

|

इमाममिया (हयात इ. स. १८५३)

बिलाकुसुर पीराकडे चालवणे. कोण्ही उपसर्ग देईल त्यास ताकीद करणें. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा. [ शिक्का– 'मर्या : देयं रा : जते ']

बार बार बार

भा. इ. सं. मं. वा. इ., शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १८०–१८१.

२७ नवंबर १७१८ ] (–३१५–) [ मार्गशीर्ष वद्य २ शुक्रवार, रा. श. ४५

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४५ विल्म्बी सवत्सरे मार्गशीर्ष बहुल द्वितीया भृगुवासरे क्षत्रियेकुलावतंस श्रीराजा शाहु छत्रपती स्वामी याणी देशमुख [ शिक्का ] [ शिक्का ] व देशपांडे प्रा सगमनेर यांसि आज्ञा केली ऐसी जे. मौजे येकलारे हा गाव हजरत शाहा शरीफ पीर याच्या दरगाहास इनाम दिल्हा आहे. तरी तुम्ही मौजे मजकुरचा ऐवज बिलाकुसुर दरगाहाकडे पावता करणे. लेखनालंकार [ शिक्का– 'मर्या : देयं रा : जते ' ][1]

रुजु सुरु निवास सां मंत्री

बार सुद सुरुसुद बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १८१–१८२.

१० मे १७१९ ] (–३१६–) [ जेष्ठ शुद्ध २ रविवार सवंत १७७५

[ English Translation of no. 317 ]

VICTORY TO ALMIGHTY

Maharaja Ajitsing

Shree Hingula,

This assemblage of letters, submits its statement, like a messenger, after bidding Ram Ram. This letter is dispatched by Maharaja Ajeet Singh who is very eager to have a dip in the celestial ocean of your love and affection you, who are deeply attached to the feet at God शेषशायी, whose kind heart is akin to the drops the juice of the celestial

---

१. असे च आज्ञापत्र मोकदमानी मौजे येकलारे ताा बेलापूर पाा संगमनेर यांस आहे. त्यात मौजे मजकुरची सरदेशमुखी दरगाह मजकुरास इनाम दिली आहे. मिति पौष शुद्ध तृतीया मंदवासर शके ४५ ( १३ दिसेंबर १७१८ ).

flowers, sprinkled with the sprays of the sweet ways of the beautiful celestial river you, who have justified your birth in this race, by the practice of four पुरुषार्थ & by your selfless attachment to the feet of God, which are decorated by the lotus flowers, blooming in the light of spotless moonlike fame, you, who have torn to pieces the circle of your enemies by the dance of your arrows which on the occaslon of your invasion, proceeded from the full drawn bow which resembles the tongue of the snake in the disguise of your victorious arms you Maharaja Shahu who are ever attended by the Goddess of wealth and being so ever lustrous and you, who lead the whole race of क्षत्रियाs.

By the grace of Goddess हिंगुला whose lotus like feet are being served by the whole race of immortal beings, everything is going on quite well here. We pray for the same on your side as well. Your letter to hand. We are glad to learn its contents. We stand on equal footing. My heart rejoices to hear the good wishes of your people. You have written that Nawab Kutubulmulk helped you a lot. Friendship renders even a difficult task easy to perform. It is said that the attainment of a friend leads to prosperity, We are transported with joy, as we write thise. You are wise enough to distinguish between substance and shadow. But still the affection between us brothers and between you and me also must be taken care of by you. Again you have sent military leaders like Pandit Balaji under Amirul Ubrai. I met them and spoke and heard everything about you and thereby derived much pleasure. We have been told that after the task is fully accomplished, the information should be sent. The emperor did not open his mind before. After that some rogues dealt fraudulently with us. Formerly also the Emperor continued roguery with us. Then we consulted Kutubulmulk (Abdullahkhan) and you wrote to Amirul Ubrai (Husen Ali khan) to come here soon. He came hastily on the fourteenth day of the dark of the month of फाल्गुन. Then we resolved that he is not fit for the imperial throne, His dealings are very fraudulent He always befriends low and mean people. So he should be replaced by one belonging to the imperial family. Then on the ninth of the bright half of फाल्गुन he was confined in the fort and on the next day he was imprisioned and replaced on the imperial throne by Rafi-ul-darjat the son of Rafi-ul-dar. He was brought out of prison. He is eighteen years of age. By the

grace of God the Jizia-Tax on all Hindus has been abolished and all the places sacred to Hindus are now tax-free. You wile be very much pleased with these two events, what you did desire has happened. Again you wrote to us to make you a partner in this work. That is right. Whichever weighty tasks we have performed are performing present or shall perform in the future, were, are and will be done under your leadership. We shall meet in Gujarat and there we shall get written what is in most in our heart and what will give you much pleasure. We have sent with पं. मल्हार शंकरजी पं. बाळाजी one elephant, eighteen clothes and one scimitar, studded with jewels. What are these things? These things are of no account. They are simply meant to remind you my friendship. You can know other secrets from पंडित मल्हार शंकरजी पं. बालाजी. Our happiness should be safeguarded daily.

You are a high souled man. It is but fitting on your part to keep up our mutual friendly relations by writing from time to time about your well-fare.

Too much expansion is not needed in case of learned people. We three have resolved to leave for our own country to Gujarat having replaced the old deceitful monarch by another of the same family and having taken the following things. Name of the things : clothes, a horse with harness, set with jewels, a garland of pearls and diamonds, a decoration of the head dress which has a diamond on the centre and is very valuable which in Hindi is called 'सिरपेच', another decoration of the turban set with diamonds which in Hindi is called 'किलंगी' both of these being given by the Emperor himself, one sword studded with jewels and a similarly adorned scimitar, a shield, nine lacs of rupees, a male elephant attended with a female, one Mura-tub-tum-mantog ( मुरतबतुम्यान तोग ) of a very high quality which deserved the highest praise in all the royal ensigns. You will be highly delighted to have these things. We shall write to you after reaching our capital. Be pleased to know other things and all the secrets from my messenger like letter from the hands of my servant. What more should be said to learned men.

This letter has been written on the second day of bright fort-night of the ज्येष्ठ, year 1775 Samvata, Sunday.

This letter has been dispatched to श्रीमद्राजाधिराज Shahu, who is the first and formost man among the क्षत्रियाs

This letter is for श्रीमद्राजाधिराज Shahu, who is the fist and formost man among क्षत्रियाs and who is an ornament to his own race.

This message like ambassador has been sent to Chatrapati Kshatriya- Dhurandhar Shri Shahu.

~~~~~~~~~~~~~~~

पुरुषार्थ, वर्ष २७, अंक १, क्र. २५ जानेवारी १९५१, पृ. ३८-४०.

१७ मे १७१९ ] (-३१७-) [ जेष्ट शुद्ध २ रविवार, संवत १७७५

श्री परमेश्वरो विजयते तराम् ॥

श्रीहिंगुला । श्री राम राम स्मरण निवेद(न)पूर्वकोऽयं वर्णनिकस्दूतो निवेदयति-

स्वस्ति श्री मद मेंदुर मन्दाकिनी मधुरतर तरंगधारानिरन्तर सीकर संसिवत मंदरा (मंदार)कुसुमनिष्यन्दितमकरन्द बिन्दु सन्दोह-सोदर-सदयहृदय शेष-शायिचरणस्मरण रसिकेषु ।

श्रीमद्विशद यशोराशिचंद्र-चन्द्रिका विकसत-सरोजिनी राजित-भगवत्पद-द्वंद्व-निर्द्वंद्व धर्मादि-पुरुषार्थ-सार्थकीकृत-निजवंशावतारेषु ।

प्रतिभटकटक-विजययात्रा-ऽवसर-जैत्र-भुजभुजङ जिह्वायमान प्रव्हाकृष्ट कोदण्डवह्यसादित-शरकाण्ड ताण्डवखण्डिता-ऽराति मण्डलेषु ।

सतत-वितन्यमान-पद्मालया देदीप्य-मान-श्रीमद् छत्रपति महाराज शाहू श्री क्षत्रियधुरन्धरेषू ।

श्रीमद्-भवदीय-प्रेमगीर्वाणार्णव-पूर-मज्जनोत्सुकित श्री छत्रपति राज-राजेश्वर श्री महाराज 'अजीतसिंह' प्रेषित पुरस्सरा पत्रिकेयम् ।

श्रीमद् देवाधिदेव सेवित पादाम्बुजायाः ... ...प्रसादाद् भव्यमिह वरीवर्ति, श्रीमदीयं तद् अनुदिनम् अव्याहतम् ईहामहेतराम् श्रीमतां पत्रं समायातम् अभिप्रायोऽवगतः, सानन्दाः, जाता : । श्रीमदावयोरैक्य व्यवहारं श्रीमद्भगवतज्जन-मुखेभ्यो मामिकी-हितैषिणी वार्ता श्रवणात् स्मारं हृदयानन्द-वृन्दं समुत्पन्नम् । श्रीमद्भिर्लिपीकृत-नवाब कुतुबुम्मुलकेन साहाय्यमतीवाऽकारि । कृतं कर्तुमिष्यते चेति, तत्तु मैत्रीवशाद् दुष्करमपि सुकरम्, उक्तं च-"मित्रलाभमनुलाभसंपदः" एतल्लेखनाद् वयं ब्रह्मानन्दनिर्भराः जाताः । यूयं सारासार विचारज्ञाः पुनरपि अस्माकं द्वयोर्भ्रात्रोः प्रत्यहं स्नेह संवर्धिष्णुता श्रीमद्भिरपि स्नेह संवर्धिष्णुता रक्षणीया । श्रीमद्भिः पुनरपि पण्डित बालाजी प्रमुखा सेनाधुरीणः 'अमीरल उमराय'
~~~~~~~~~~~~~~~

साद् विधाय प्रेषिताः, तैः समागत्य श्रीमत्संबंधिनीः सर्वाः वार्ताः कृताः, श्रुताः प्रचुरानन्दता जाता। पुनस्ततः उक्तम् एतत्–कार्यं सम्यक्तया सम्पाद्य अस्माकं प्रयोजन–सिद्धिः प्रेषणीया। तस्माद् अत्रत्यं वृत्तम्–पूर्वम् सार्वभौमेन (बादशाह फरुखसीयर) अस्मान् आहूय पूर्वम् मनोगतं वृत्तं नोक्तम्। पश्चाद् कैश्चिद् वराकैः संभिल्य प्रभूत दंभता कृता, धृता अग्रेऽपि द्वयो–र्भ्रात्रोः सार्वभौमस्य धूर्तता वृद्धिः। तदऽस्माभिः कुतुबुन्मुलकान्मन्त्रः कृतः, अमीरुल उबरायं प्रति लिपिकृतं–भवद्भिः त्वरयैवाऽत्रागन्तव्यम्। फाल्गुन कृष्ण चतुर्दश्यां शीघ्रतया (सः) समायातः, तदाऽस्माभिरिदं निश्चयीकृतम् अयं सार्वभौमा (बादशाह) सनयोग्योनाऽस्ति, अस्याऽदभ्रकापथ्यं नीचैः सह मैत्री, तस्मादेवं उत्थाप्य प्राचीन सार्वभौमवंशोऽन्यः स्थापनीयः। तदा फाल्गुन शुक्ल ६ म्यां दुर्गमध्यें संरुध्य फा० शु० १० बुधे (१८ फेब्रुवारी १७१९) कारागारे स्थापयित्वा रफीयलदरस्य सुतं रफीयलपरजातं कारागारां निष्काश्य सार्वभौमासने स्थापितः अष्टादश वर्ष परिमितोऽस्मि। श्री श्रीजी प्रतापात् समस्त हिन्दूकानां जेजीयामोचनं, समस्त तीर्थानां करमोचनं कृतम्। अनयोकार्यद्वयोर्महानन्दः कार्यः। ईश्वरेच्छया श्रीमदभीष्टं जातम्। पुनरपि श्रीमद्भिर्लिपीकृतम्–अस्मान् अंश भागिनः करिष्यन्त्येवास्मिन् कृत्ये। सत्यमेतत् अस्माभिर्यानि गुरूणि कार्याणि कृतानि, क्रियन्ते कर्त्तुभिष्यते चेति तेषु यूयंधामवन्तः, मद्धितैषिणः पुरस्सराः। वयं गुर्जर ... ... देशे समागभिष्यामः तत्रा गत्य–परमाश्लेष सन्तोषजनकं मनोगतं वृत्तं लेखयिष्यामः। एको गजः वस्त्राणि अष्टादश (पोशाक) कट्टारिका (कटारी) एकारत्न-जटिता, पं० मल्हारशंकरजी पं० बालाजीकरे प्रेषितानि। एतत् किं वस्तु, का गणना? एतेषु वस्तुषु दृष्टिपथं गतेषु अस्माकं मैत्री–स्मरण–वृद्धिताऽवगन्तव्या। अन्यद्रहस्यं पं० मल्हारशंकरजी पं० बालाजी मुखाद् अवगन्तव्यम्। इह प्रत्यहं ब्रह्मानन्दः, रक्षणीयः पुनर्निज-कुशलपत्र प्रेषणेन। पारस्पारिक व्यवहार संरक्षणम् उचितमेव महात्मनाम्।

किं बहु उक्तेन बहूज्ञेषु

श्रीरामजी

सहर्षता—

विशेषस्तु–प्राचीन सार्वभौमं धूर्त (बादशाह फरुखसीयर) राज्यासनादुत्थाप्य प्राचीन सार्वभौम वंशोद्भवं तदासने स्थिरीकृत्य मास शुक्र (ज्येष्ठ) कृष्णै–कादश्याम् एतानि वस्तूनि गृहीत्वा स्वदेशं वा गुर्जरदेशं प्रति प्रस्थानम् इति अस्माकं त्रयाणाम्–एक संमतम्

वस्तूनां नाभानि–अम्बराणि, अश्वश्चैकः रत्नजटितोपस्कर संयुक्तः, मुक्ताफल–मालिका एका सार्वभौमेन स्वहस्ताभ्यां उरसि धृता (परिधापिता) तथा च कर्णयोर्मुक्ताफल चतुष्टयम् सरत्नम्, उष्णीष भूषणं महर्घ्यम् मध्ये रत्न संयुक्तम् लोक भाषायां सिरपेच इति तदपि स्वहस्ताभ्यां धृतम् (परिधापितम्) द्वितीयम् उष्णीष–भूषणं रत्नजडितं तदपि स्वहस्तेन शिरसि निवेशितम् लोकभाषायां किलंगी इति

प्रसिद्धम्, पुनरपि खडश्चैको रत्नजडितः तथा कट्टारिका (कटारी) एका रत्नजडिता, चर्म (ढाल) चैकम्, रजत मुद्रिका नवलक्ष परिमिताः, एको गजः करिणी संयुक्तः, मुरातब तुं भाग तोगः अतिश्रेष्ठः सर्वेषां राजचिन्हानां मध्ये स्तवनयोग्यः, एतानि वस्तूनि स्वीकृतवन्तः श्रीमद्भिर्ब्रह्मानंन्दः कार्यः स्वराजधानीं समागत्य ब्रह्मानन्द जनकं पत्रं त्वरया लिखामः तथा च अन्यद् वृत्तं श्रीमन् मामकीना नुचर-हस्तगत-पत्र दूतात् सर्व रहस्य वृत्तं विदित्वा प्रचुर हर्षता विधेया किं बहु लिखेन उक्तेन बहूशेपु ।

संवत पंचार्ष सप्त भूवर्ष (१७७५) शुक (ज्येष्ठ) मासे शुद्ध (शुक्ल) पक्षे विरिंचि (२) तिथौ भास्कर वासरे (१० मे १७१९) लिखितमिदम् पत्रम् ।

श्रीमद्राजाधिराज शाहु क्षत्रिय धुरन्धरेषु प्रेपतेयं पत्रिका-श्रीमद्राजाधिराज शाहु स्वीय कुलावतं सेम्यः......पत्रिका

छत्रपति महाराज श्री शाहु क्षत्रिय धुरन्धरेषु प्रेषितोऽयं वर्णद्रतः ।"

पुरुषार्थ, व. २७, अं. १, क्र. २५, जानेवारी १९५१, पृ. ३६-३८.

८ जून १७१९ ] (-३१८-) [ ३० रजब, अशरीन मया अलफ

श्री

वेदमूर्ती राजश्री ब्राम्हणानि कसबे कऱ्हाड स्वामी गोसावी यांसि

सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधी नमस्कार सुहुरसन अशरीन मया अलफ. यंदा मृगाचे नक्षत्र संपूर्ण पडिले नाही. आरद्रा हि पडता दिसत नाही. पर्जन्याकरिता मुलकात हकाक जाहाला आहे. या करिता हे पत्र लिहिले आहे. तरी अवघे ब्राम्हण क्षेत्रींचे मिलोन अनुष्टान करून पर्जन्याची वृष्टी होए ते गोष्टी करणें. ए गोस्टीस अतराय कराल तरी तुम्हांस बोल्र लागेल. हे चितात आणून एवढ्या दिवसात पर्जन्य पडे ऐसे करणे. छ ३० रजब. [ शिक्का- 'राजते : लेखना : वधी' ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ९, पृ. ४१; स्वाध्याय, वाई, व. २, अं. ८, मार्गशीर्ष शके १८४४, पृ. ३१.

---

१. हें पत्र नकलेवरून छापलें आहे. त्यामुळें मूळांतील संस्कृत मजकूर पुष्कळच अशुद्ध असा आला आहे. या पत्राचें इंग्रजी भाषांतर वरील क्रमांकांत आले आहे तें पहावें.

२८ जून १७१९ ] (–३१९–) [ २० साबान, (अशरीन मया अलफ)

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजश्री ब्राम्हण क्षेत्र कराड स्वामी गोसावी यांसि

सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधी नमस्कार विनंति. उपरी एथील कुशल जाणुन स्वकीय लिहिले पाहिजे. विशेष मुल्खात पर्जन्य पडत नाही. या करिता राजश्री स्वामीनी आज्ञा केली आहे. तरी तुम्ही समस्त मिलोन अनुष्टान करून पर्जन्य वृष्टी होए ते करणें. नाही तरी तुमचे इनाम दूर होतील. छ २० शाबान. बहुत काय लिहिणे. [ शिक्का—'राजते : लेखना : वधी' ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ९, पृ. ४१–४२; स्वाध्याय, वांई, व. २, अं. ८, इ. स. १९२२, पृ. ३१.

जून १७१९ ] (–३२०–)

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री समस्त ब्राम्हण क्षेत्र कऱ्हाड गोसावी यांसि

स्नो रघुनाथभट पंडितराव नमस्कार. उपरी. येथील कुशल जाणुन स्वकीय लिहिणे विशेष. प्रजन्याने ओढ दिली आहे. याजनिमित्य राजश्री स्वामीनी सर्वत्र क्षेत्रास प्रजन्यसूक्ताचे अनुष्टान करणे आणि प्रजन्य सीघ्र वृष्ट करी ते केले पाहिजे. बहुत काय लिहिणे. [ शिक्का– लेखन : सीमा ]

भा. इ. सं. मं., वार्षिक इतिवृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ९, पृ. ४२.

१६ आगष्ट १७१९ ] (–३२१–) [ १० सवाल, अशरीन मया व अलफ

श्री

शिक्का ][1]

आज्ञापत्र पंतप्रतिनिधी

तां मोकदम मौजे पाटखळ ताा वंदन सुाा सन अशरीन मया अलफ. तीर्थस्वरूप राजश्री पंताचे वृंदावन कृष्णवेणी संगमासनिध मोजे खेड ताा वंदन येथील

१. शिक्का—'श्री : श्री आई आदि पुरूष श्रीराजा शाहु छत्रप : ति स्वामि कृपानिधि त : स्य श्रीनिवास परशु : राम प्रतिनिधि.'

जमिनीमध्यें वृटवृक्षासंनिध आहे. तेथे श्री ची पूजा अभिषेक वेदमूर्ती अनंतभट बिन अमणभट गलंडे यास सांगितला आहे. त्यासंमधी उपजीविकेकरिता मोजीब आम्हास कुलबाब कुलकानु इनाम राजग्रही दुा दिल्हा आहे. या करितां मौजे मजकूरपैकी पड जमीन अवल दुम सिम तीन प्रतीचीं बिसा पांडाच्या बिघ्याने बिघे ८१५ पंधरा इनाम कुलबाब कुलकानू खेरीज हकदार करून दिल्ही आहे. ती जमीन याचे स्वाधीन करून चतुःसीमा करून देऊन वंशपरंपरेने इनामत उत्पन्न होईल ते भक्षून पूजा अभिषेक चालवतील. या पत्राची प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र वेदमूर्ती यास देणे. छ १० शौवल निदेश समक्ष. [ शिक्का—' राजते : लेखना : वधी ' ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत, शके १८१६, स्वी. ग्रं. क्र., पृ. १८८-९.

२५ आगष्ट १७१९ ] (–३२२–) [१९ सवाल, (अशरीन मया अलफ )

श्री

वे. समस्त ब्राह्मण क्षेत्र श्री कराड स्वामी गोसावी सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधि नमस्कार विनंति उपरि. एथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. मुलकामध्यें दोनवर्षे पर्जन्याची वृष्टि होत नाहीं. एदं निमित्य जितुक्या ब्राह्मणास अग्रहारें दिल्हीं आहेत त्यांनीं सांग अनुष्ठानें करून पर्जन्य पडोन पिकें होऊन राज्याची अभिवृद्धि करावी ह्मणऊन राजश्री स्वामींची आज्ञा जाहली आहे. तरी तुम्ही समस्त एकत्र होऊन सांग अनुष्ठान करोन पर्जन्य पडोन पिकें होऊन राज्याची अभिवृद्धि होय तें करणें. छ १९ सवाल. बहुत काय लिहिणें. [ शिक्का- ' राजते : लेखना : वधी ' ]

स्वाध्याय, वांई, व. २, अं. ८, इ. १९२२, पृ. ३२.

१३ सप्तेंबर १७१९ ] (–३२३–) [ ९ जिल्काद, अशरीन मया अलफ

श्री

[ शिक्का ][1]

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान ताा मोकदमानी मौजे पिपलगांव ताा घोडे सुाा आशरैन मया व अलफ. मोा माार राजश्री बाकाजी ढमढेरे यास पेसजीपासून इनाम आहे. तेणे प्रो करार आहे. तरी तुम्ही माारनिलेसी रुजु होऊन गावीचा इनामतीचा

१. शिक्का– ' श्री : राजा शाहू न : रपती हर्षनीधा : न बाळाजी विश्व : नाथ मुख्य प्र : धान '

ऐवज सुरळीत वसूल देत जाणे. ऐविसी उजूर न करणें. जाणिजे. छ ९ जिलकाद. आज्ञाप्रमाण. [ शिका– ' लेखन सीमा ' ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. २२२–२२३.

२४ सप्तेंबर १७१९ ] (– ३२४ –) [ १० जिल्काद, अशरीन मया अलफ

अखंडित लक्ष्मीअलंकृत राजश्री अंताजी प्रयाग नामजाद खाल्सा ताा कुडाळ मेढे परळी गोसावी यांसीं,

स्नहांकित फत्तेसिंग भोसले रामराम सुाासन अशरीन मया व अल्लफ. मौजे कळंबे ताा परळी हा गांव राजश्री प्रयागजी अनंत सुभेदार किल्ले सातारा यांस इनाम आहे. तेथील खाल्साचा आकार रुपये २४० दोनशे चाळीस पैकीं हुजूर वसूल रुपये शंभर करार केले असत. सदरहूप्रमाणें शंभर रुपये हुजूर वसूल घेणें. बाकी रुपये एकशें चाळीस मशारनिल्हे यांचें नांवें खर्च लिहिणें. साल दरसाल सनदेचा उजूर न करणें. सदरहू तहाप्रमाणें हुजूर वसूली ऐवज घेत जाणें. बाकी ऐवज दुमाला खर्च लिहित जाणें. जाणिजे. छ १० माहे जिलकाद. मोर्तब.

चां. का. प्रभूंच्या इति. साधनें, व. १, अं. ६, जानेवारी १८८२, पृ. ११–१२

१० डिसेंबर १७१९ ] (– ३२५ –) [ मार्गशीर्ष शुद्ध १० गुरुवार, शके १६४१

श्रीराम

[ सिका ]

स्वतिश्री नृपशालिवाहन शके १६४१ विकारीनाम संवत्सरे मार्गशीर्ष शु॥ १० गुरुवासरे वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री सिवरामभट यांचे पुत्र नरहरि भट काश्यप गोत्र आश्वलायन सूत्र ऋकशाखाध्यायी उपनाम सांवगावकर वास्तव्य श्रीकरवीर क्षेत्र यासी रामोजी भावकर सरसुभेदार, प्रांत कोल्हापूर सुाा सन आश्रीमया अलफ ( अशरीन मया अलफ) श्रीदेवीचे प्रेरणेवरून राजेश्री हिंदूराव घोरपडे ममलकत मदार याणी देवालयात स्वसिंहासनी श्रीची स्थापना करून तेथील प्रधानत्वपणाचा अधिकार वतनी वंशपरंरेने तुह्मास सांगीतले, त्यास ऐवज करून देणे ह्मणोन राजेश्री राऊ मशारनिल्हे यांचीं आज्ञा. त्यावरून ऊर्जा विशेषात्कारे चालऊन स्वामीचे व स्वामीच्या राज्याचें कल्याण व्हावें या करिता यास ऐवज त्यास कसबा सांगाऊ प्रांत हुकेरी येथील चवथाई देखील पेठ व जकात व मुजरीमोतर्फा व पानसाळ व नदीटोकरा व कुलबाव

कुलकानु पडलें पान अकाराची चवथाई धारादत्त करून दिल्ही असे. सदरील ऐवज घेऊन श्रीची उर्जा विशेषात्कारें चालवीत जाणें. यास महाराज राजश्री स्वामीही चालवितील. वरकड ब्राम्हण अथवा महाराष्ट्र व हिंदू व मुसलमान आदिकरून समस्त जातीचानी चालवावें व चालवितील. विक्षेप करितील त्यास आपल्याला स्वधर्मांचे पातक असे. जाणिजे. रवाना छ ९ माहे सफर. जे विक्षेप करतील त्यास धर्मशास्त्रीचे वचन प्रमाण:

॥ स्वदत्तां परदत्तां वा यो हरेच्च वसुधरां ॥
॥ स विष्ठायां कृमीभूत्वा पितृभिः सह मज्जति ॥ १ ॥
॥ षष्टिवर्षसहस्राणि स्वर्गे वसति भूमिदः ॥
॥ आच्छेत्ता चानुमंता च तावंति नरके व्रजेत् ॥ १ ॥

ऐसे वचन स्मरोन तुमचा प्रधानत्वपणाचा अधिकार श्रीचे पूजेचा ऐवज चालवितील. तुह्मी एकनिष्टपणें राहून श्रीची पूजा विधियुक्त करवणे आणि तुह्मी व आपले पुत्र-वंशपरंपरेने कसबा सांगाऊ देखील पेटज कायत येथील चवथाईचा ऐवज घेऊन अनुभवून राहणें. जाणिजे. चंद्र मजकूर मोर्तब सूद [ शिक्का–मोर्तब ]

धर्म, साप्ताहिक, १४ सप्टेंबर १९०५. वाई, पृ. ७०६–७.

११ डिसेंबर १७१९ ] (– ३२६ –) [ ९ सफर, अशरीन मया अलफ

श्री

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री अंताजी मल्हार गुमास्ते सरदेश-मुख सा। सगमनेर वर्तमान व भावी यास

सेवक चिमणाजी दामोदर राजाज्ञा नमस्कार सु॥ अशरीन मया अलफ. शाहा शरीफ पीर मु॥ आमदानगर याच्या दरगाहास मौजे येकलारे पा। मजकूर हुजरून राजश्री स्वामीनी कुलबाब कुलकानु इनाम दिल्हे. तर मौजे मजकुरचें सरदेशमुखीचा ऐवज होईल तो पीरजादे याकडे पावल. तुम्ही मौजे मजकुरास एकदर तगादा न लावणे. प्रतिवर्षी ताजे सनदेचा उजूर न करणे. छ ९ सफर. आज्ञा प्रमाण. [ शिक्का—'लेख : न सीमा' ]

सुरुसुद

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १८२–१८३.

१७१९–२० इ. स. ] (– ३२७ –)

श्री

श्रीमत् सकल तीर्थस्वरूप राजश्री दाजीसाहेब ( शाहू महाराज ) वडिलांचे सेवेसी अपत्यें संभाजी राजे कृतानेक दंडवत विनंती. उपरी येथील कुशल वडिलांचें

आशीर्वाद जाणोन निरंतर आशीर्वाद पत्र पाठऊन परामर्ष केला पाहिजे विशेष. आशीर्वादपत्र पाठविलें तें व ममतापुरसर वस्त्रें व तरवार ढाल आदिकरून जिनस पाठविला तो अशेष यादीप्रमाणें प्रविष्ठ जाला. त्याचे अवलोकनें व पत्रीं कितेक ममताविशेयें अर्थलेखन केला. तत्श्रवणें वडिलांचे अंतःकरणपूर्वक लोभाचा विस्तार राजश्री बावाजी प्रभु यांणीं विषद लिहिला. तत्छवणें संतोषाच्या कोटी जाल्या. तो विस्तार पत्रीं किती म्हणोन लिहावा. वस्त्रादि जें पाठविलें तें परम प्रसाद यैसे जाणोन घेतलें. श्रीमन्मातुश्री आऊसाहेब आली ते वर्तमान लिहावयासी अवकाशावरी पडलें त्याचें कारण लिहिलें तेंही अवगत जालें. तुम्हापेक्षां अधिकोतर इतर तें काय आहे ? तुमचा परामर्थ न करावा यैसे नाहीं म्हणोन लिहिलें तरी ये गोष्टी येथार्थच आहे. वडिलांचे निर्व्याज वात्सल्य तैसेच आहे. आम्हांसही वडिलांपेक्षा इतर दैवत तें काय आहे ? वडिलीं वरचेवरी याच रीतीं सांभाळ करावा हेंच वडिलांसही विहित. ये गोष्टीस वडिलांपासून अन्यथा काय निमित्य होईल ? बाबाजी प्रभु यांणीं तुमचा चित्ताभिप्राय सविस्तर निबेदन केला. त्यासी राजश्री सुलतानजीराऊ निंबाळकर आलियावरी यांसी जे आज्ञा कर्तव्य ते केली जाईल म्हणोन लिहिलें. तरी वडील आम्हांस पितृस्छानी; आमचा मनोरथ सिधि करून आम्हांस संतोष पाववावा. आमचा सर्व प्रकारें सांभाळ करावा हेंच वडिलांस विहीत आणि कीर्तिस्पद आहे हा अर्थ. वडील सर्वज्ञ ; वडिलांस अनवगतसा काय आहे. तेंच गोष्टीची प्रतीक्षा करीजेत आहे वडिलांस उचित ते वडील करितीलच. बहुत लिहिणें तरी वडील सुज्ञ असेती. [ शिक्का- मर्यादेयं विराजते ]

~~~~~~~~~~~~~~~~~~~~

विविधज्ञानविस्तार, ५२ अं. ११, नोव्हेंबर १९२१, पृ. ३४७–८; हेटकरी, दादर, व. ४, अं. ४, १ एप्रिल १९४३, पृ. ८८.

१७१९–२० इ. स. ?] (–३२८–)

श्री

श्रीमत सकल तीर्थस्वरूप राजश्रिया विराजमान राजश्री शाहू राजे दाजी वडिलाचे सेवेसी

आपल्यें संभाजीराजे दंडवत विनंति उपरी. वडिलीं आशिर्वाद पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाले. मातुश्री येसूबाईसाहेब यांसी व्येथा होऊन कैलासवास जाला म्हणोन लिहिलें. त्यावरून ममताविषयें चित्तास परम खेद प्रात जाला. ह्या अयेत्नीं मार्ग यसाच आहे. वडिल सर्वज्ञ आहेत. विवेकेंकडून चित्ताचें सांतवन होये ते केले पाहिजे. विशेष लिहावे तरी वडिल सुज्ञ आहेत. [ 'शिक्का– मयादेयं : विराजते' ]

~~~~~~~~~~~~~~~~~~~~

नवयुग, व. ४, अं ७, क्र. ४३, मे १९१७, पृ. ५७०. [पत्राचा फोटो छापला आहे.]

२ मे १७२० ] (-३२९-) [ १ रजब, अशरीन मया अलफ.

श्री आई आदिपुरुष

वेदशास्त्र संपंन राजश्री आनंतभट बिन आमणभट गलंडे वास्तव्य क्षेत्र परशराम संगम कृष्णावेणी गोसावी यांस

सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधी नमस्कार विनंति उपरी सुरू सन अशरीन मया व अलफ. तीर्थस्वरूप राजश्री पंत कैलासवासी यांच्या वृंदावनाचे व आलीकडील क्षेत्रीचे उपाध्यपण व आष्टाधिकार क्षेत्र मजकूरचे तुम्हास वृत्ती करून दिली आहे. तरी क्षत्री कार्य प्रयोजन नित्य नैमितिक होईल. त्याचा क्षेत्र उपाध्येपणाचा व वृंदावनाच्या उपाध्येपणाचा मान पान तुम्हास पावेल. तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने आनभऊन सुखरूप राहणे. तुम्हास सालिना इनामाखेरीज वर्षासन रुपये ७५ पावणासे व उलफा आसामी दोन करार करून दिल्हा आसे. सदहूप्रमाणे साल दरसाल पावेल. जाणिजे. चंद्र ५ रज्जब हे विनंति.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त. शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. १८३.

१७ आक्टोबर १७२० ] (-३३०-) [ आश्विन वद्य १२ सोमवार, रा. श. ४७

श्री

स्वस्ति श्री. राज्याभिषेक शके ४७ शार्वरी सवत्सरे आश्विन बहुल द्वादसी इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी मोकदमान मौजे भोळी ता। सिरवल प्रा। मावळ यास आज्ञा केली ऐसी जे. रामचंद्र पंताजी याचे पुत्र [ शिक्का ][1] [ शिक्का ][2] बाबूराऊ रामचंद्र व जगनाथ पंताजी बोकील याचे पुत्र गोपाळ जगन्नाथ व श्रीनिवास पंताजी याणी स्वामीसंनिध विनंती केली कीं थोरले कलासवासी स्वामीनी आपले वडिलास मौजे मजकूर पैकीं जमीन चावर १ एक इनाम दिला आहे. त्याप्रमाणें इनाम जमीन चालवावयाची आज्ञा करून स्वामीनीहि पेसजी पत्रे दिली आहेत. पुढे आविछिन चाले ऐसी आज्ञा केली पाहिजे. म्हणौन त्यावरून एक चावर जमीन इनाम चालायाची आज्ञा करून हे आज्ञापत्र सादर केले आहे. तर पूर्वी यास मौजे मजकूरपैकीं इनाम जमीन दिली आहे ते च जमीन तुम्हीहि यास

१. शिक्का—' श्री : राजा शाहु नर : पति हर्षनिधान : बाजीराव बल्लाळ : ल प्रधान. '

२. शिक्का—' श्री : श्री आई आदिपुरु : ष श्री राजा शाहु : छत्रपति स्वामि कृपा : निधि तस्य श्रीनि : वास परशुराम : प्रतिनिधि. '

नेमून देऊन इनाम सुरलित चालविणे दरहारसाल ताजे सनदेचा ऊजूर न करणे. या पत्राची तालीक लेहोन घेऊन हे पत्र भोगवटियास परतोन देण. जाणिजे. लेखनालंकार
[ शिक्का— ' मर्या : देयं रा : जते ' ]

रुजू सूरु निवीस संा मंत्री
बार सुद सुरु सुद बार बार

भा इ. सं. मं. सप्तम संमेलन वृत्त. शके १८४१, स्वी. ग्रं. क्र. २५, पृ. ६१--६२.

२२ दिसेंबर १७२० ] (–३३१–) [ पौष शुद्ध ५ गुरुवार, रा. श. ४७;. १ रबिलावल, इहिदे अशरीन

श्री

[ शिक्का ][1]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४७ शार्वरी संवछरे पोष शुध पंचमी गुरुवासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यांणी रा कृष्णाजी नाईक बिन केसोवा नाईक उपनाम जोतिषी यांस दिल्हे इनामपत्र ऐसा जे. तुम्ही स्वामीसंनिध किले सातारचे मुकामीं विनंती केली जे आपण स्वामीची शेवा निष्टेनें करीत असों. आपणांस एक गांव इनाम करुन देऊन वंशपरंपरेनें चालविले पाहिजे म्हणून. त्यावरून मनास आणून तुम्ही स्वामीची शेवा एकनिष्ठपणें करीत आहां. तुमचें चालविणें स्वामीस अवशक. जाणोन स्वामी तुम्हांवरि कृपाळू होऊन मौजे पिंपरी ताा हवेली प्राा पुणें हा गांव पेशजीच्या मुकाशियाकडून दूर करुन हालीं कुलबाब कुलकानू देखील हलीपटी व पेस्तरपटी जल तरु तृण पाषाण निधी निक्षेप खेरीज इनामदार व हकदार तुम्हांस व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम करुन दिल्हा असे. तरि तुम्हीं मौजे मजकूर [ शिक्का ][2] [ शिक्का ][3] चतुःसिमापूर्वक मर्यादेप्रमाणें आपले दुमाले करुन घेऊन, तुम्ही व तुमचे वंशपरंपरेनें इनाम अनुभवून सुखरुप राहणें, लेखनालंकार. तारीख १ रबिलावल इहिदें अशरीन [ शिक्का– ' मर्यादे : यंराजने ' ]

भा. इ. सं. मं. अहवाल. शके १८३४ स्वी. ग्रं. क्र. ४ ( भाग १ ), पृ. १९--२०.

---

१. शिक्का– ' वर्धिष्णुर्विक्र : मैर्विष्णोः सामूर्ति : रिव वामनी शंभु : सूनोरसौ मुद्रा : शिवराजस्य रा : जते '.

२. शिक्का– श्री : राजा शाहू नरपति : हर्षनिधान बाजीराव : बल्लाल मुख्य प्रधा : न ' ( न उलटा ).

३. शिक्का– ' श्री : श्रीआई आदि : पुरूष श्री राजा शाहू : छत्रपति स्वामी-कृपानिधि : तस्य श्रीनिवा : स परशुराम : प्रतिनिधी.'

२२ दिसेंबर १७२०.] (–३३२–) [पौष शुद्ध ५ गुरुवार, रा. श. ४७; ३ रबिलावल, इहिदे अशरीन

श्री

[शिका][1]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४७ शार्वरी संवछरे पौष शुध पंचमी गुरुवारे क्षत्रीयकुलावतंस राजश्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी रा कृष्णाजी नाईक बिन [शिका][2] [शिका][3] केसोवा नाईक उपनाम जोतीषी यांसी दिल्हे इनामपत्र ऐसी जे. तुम्ही स्वामीसंनीध किले साताराचे मुकामीं विनंति केली जे आपण स्वामीची शेवा निष्ठेने करीत असो. आपणास एक गांव इनाम करून देऊन वंशपरंपरेनें चालविले पाहिजे म्हणून. त्याजवरून मनास आणून तुम्ही स्वामीची शेवा निष्ठेने करीत आहां. तुमचे चालवणे स्वामीस अवश्यक जाणोन स्वामीं तुम्हावरी कृपालु होऊन मौजे पिंपरी ता॥ हवेली प्रा॥ पुणें हा गांव पेशजीच्या मुकाशियाकडून दूर करून हाली कुलबाब कुलकानू देखील हालीपटी व पेस्तरपटी जल तरु तृण षाषाण निधिनिक्षेप खेरीज इनामदार व हकदार तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम करून दिल्हा असे. तरी तुम्ही मौजे मजकूर चतुःसीमा पूर्वमर्यादेप्रमाणें आपले दुमाले करून घेऊन तुम्ही व तुमचे वंशपरंपरेनें इनाम अनभवून सुखरूप राहाणे. लेखनालंकार.

[शिका—'मर्या : दये विरा : जते']

तेरीख ३ रबिलावल सु॥ इहिदे अशरीन

रुजु सुरुनिवीस सां॥ मंत्री

बार सुद सुरु बार बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८ स्वी. ग्रं. क्र. १७. पृ. १७७–१७८.

१७२१ इ. स.] (–३३३–)

[फारसी पत्राचा अनुवाद]

आतांपर्यन्त आपण बादशहाची एकांतांत गांठ घेऊन त्यांना जुन्या करारमदाराबद्दल सांगितलें असेलच. याला चांगलें फळ प्राप्त होईल अशी आशा आहे. नवाब

---

१. शिका—'वर्धिष्णु : साम्राज्य : वामनी शंभु : रसौ मुद्रा शिव : राजन.'

२. शिका—'श्री : राजा शाहु नरप : ति हर्षनिधान बा : जीराव बल्लाळ : मुख्य प्रधा : न.'

३. शिका—'श्री श्रीआई आदिपुरु : ष राजा शाहु छत्रप : ति स्वामि कृपानिधि त : स्य श्रीनिवास परशु : राम प्रतिनिधी.'

एतिमादुद्दौला मरहूम यांच्या मृत्यूबद्दल कांहीं लिहिणें अशक्यच होय. त्याच्या मृत्यूनें अतिशय दुःख झालें.

एक गोष्ट आपण लक्षांत घ्या. मी माळव्याच्या सुभेदारीवर असतां या बादशहाचीं वरचेवर पत्रें येत होतीं. दुष्ट बंडखोरांचें पारिपत्य होणें आम्हाला अगत्याचें आहे, असा त्यांत मजकूर असे. बादशहांनीं पुन्हां पुन्हां लिहिलें कीं, ही कामगिरी पार पाडली कीं वजिरी तुमची झाली असे समजा. या बाबतींत बादशहांनीं स्वदस्तूरचें पत्र धाडलें. अल्मुलिल्लाह (धन्य परमेश्वराची) बादशहाच्या इच्छेस अनुसरून आम्ही कामगिरी केली. आपले प्राण, संपत्ति, आप्तइष्ट आणि मुलेंबाळें यांची पर्वा केली नाहीं. आम्ही आपलें घरदार सोडलें. आम्ही अतिशय जोखमीची कामगिरी अंगावर घेतली. त्यांतील धोका पाहून आमच्या बरोबर येण्यास कोणीहि कबूल होईना. आम्ही परमेश्वरावर भरंवसा ठेविला आणि हिंमत करून कामाला प्रवृत्त झालों. शत्रूचें सैन्य मोठें होतें. त्यांच्यापाशीं लहान मोठ्या अनेक तोफा होत्या. पण आम्ही त्यांच्याशी निकरानें युद्ध केलें. आमच्या सैन्याने वाखाणण्यासारखें शौर्य दाखविलें. मोठीं निकराचीं युद्धें झालीं. परमेश्वर कृपेनें आणि बादशहाच्या भाग्यानें आम्हांला लागोपाठ विजय मिळत गेले. या मोहिमेंत आम्हांला जे कष्ट पडले ते मनुष्याच्या आवाक्याबाहेर होते. त्यामुळें शत्रूची धास्ती जी मनांत बसली होती आणि त्यांच्या पराक्रमाचा आणि शौर्याचा जो दरारा बसला तो पार नाहींसा झाला. शत्रूचे सैन्य मोडलें. त्यांच्यांत फाटाफूट पडून ते नक्षत्रांप्रमाणें पांगले या सुमारास एतिमदुद्दोला मरहूम याच्या प्रयत्नानें हुसेनअल्ली खान याचा खून घडून आला. कुतुबुल्मुल्क याचे हात मात्र मोडल्याप्रमाणे झाले. पंख नसलेल्या पक्षाप्रमाणें त्याची स्थिति होऊन तो जाळ्यांत अडकला. साम्राज्यांतील वातावरण स्वच्छ झालें. आमच्या प्राणपणास लावणाऱ्या कामगिरीचें फळ मिळालें पाहिजे. आणि दिलेल्या वचनांची पूर्ती झाली पाहिजे. आम्ही हरप्रकारें वजिरीचे हकदार आहोंत. आम्हाला मिळालेल्या वचनांच्या एका दृष्टीनें एतिमादुद्दौला मरहूम यांनी वजिरी कबूल करण्यास नको होती. पण माणसांत दोष हे असावयाचेच. त्यामुळें त्यांनीं बेमुर्वती केली. आणि वचनाच्या विरुद्ध वागून जे करावयाला नको होते ते केलें. अशी वर्तणूक आम्हाला अगदी आवडली नाहीं. पण एतिमादुद्दोला माझे जवळचे आप्त होते. त्या विचारानें आम्ही आपले समाधान करून घेतलें.

आतां एतिमादुद्दौला आपल्यांतून निघून गेले आहेत. वजिरीचा हुद्दा हा सर्वांत मोठा आहे. तो जर दुसऱ्यास देण्यांत आला तर माझ्या मनाला जो विलक्षण ताप होईल त्याचें लिहून वर्णन करणें अशक्य आहे. बादशहाची नोकरी करणेहि आम्हाला आवडणार नाहीं.

सध्यां दक्षिणची राज्यव्यवस्था विस्कळीत झाली आहे. त्याचा बंदोबस्त करण्यांत आम्ही गुंतलो आहोत. विजापूर सुभ्याच्या बंदोबस्ताकरितां आमची फौज अथोनीला पोहोंचली आहे.

परमेश्वर करील तर (इन्शाल्लाहोताला) लवकरच आम्ही या प्रकारणांतून मोकळे होऊन बादशहापाशीं पोहोचूं. आम्ही येईपर्यन्त इनायतुल्ला खान अगर बादशहास पसंत असलेला कोणीहि माझे नायब म्हणून काम करतील.

आलमगीर, दिपावली अंक १९६१ इ. स. पृ. ९४.

१६ जुलै १७२२ ] (– ३३४ –) [ अधिक श्रावण शुद्ध १४, रा. श. ४९; १२ सवाल, सल्लास अशरीन.

श्री

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४९ शुभकृत संवछरे अधिक श्रावण शुा १४ क्षत्रीय कुलावतंस श्रीराजाशाहू छत्रपती याणी वेदशास्त्रसंपन्न समस्त ब्राह्मण वगैरे वास्तव्य श्री परशराम क्षेत्र श्रीवेणी संगम बाट संनिध्य मौजे खेड तर्फ वंदन यासी दिल्हे इनामपत्र ऐसी जे. तुम्ही समस्त ब्राह्मण वगैरे क्षेत्री वास करून स्नानसंध्यादिक शटकर्म व तपश्चर्या अचरून स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याण चिंतून आहां. तुमचे चालवणे आवश्यक जाणून स्वामी तुम्हावरी कृपालु होऊन मौजे पाटखळ ताा वंदन प्राा सातारा येथें खालिसा पड पैकी अवल दुमसिला सिम प्रतीची जमीन कुलबाब कुलकानु देखील स्वराज्य व मोगलाई आमल एकुण पटी व पेस्तर पटी खेरीज हक-दार इनाम जमीन दिल्ही.

किता इनाम जमीन

।. मुदगलभट बिन मल्हारभट गोत्र शाकल रूग्वेदाध्याई

।. भिकभट बिन तुळजंभट अग्नीहोत्रीं कासेगावकर उपनाम गलंडे गोत्र भारद्वाज आपस्तंब

८२५ अनंतभट बिन आमणभट उपनाव गलडे कासेगावकर गोत्र भारद्वाज शाखा आपस्तंब

किता इनाम जमीन

८१५ रामभट बिन सभुभट माहादेवकर गोत्र वसिष्ट आथर्वणी

८१५ तुकभट बिन आनंतभट जोसी खेडकर गोत्र कौशिक आथर्वणी

८२० चिंतामणीभट बिन नारायणभट फडके आत्रीगोत्र

८१५ यादवभट बिन बाळंभट गोत्र कौसिक आथर्वणी यासी

१. शिक्का– ‘श्री : राजा शाहू नर : पति हर्ष निदान : बाजीराव बल्ला : ल प्रधान ’.

२. शिक्का– ‘श्री : श्री आई आदि पुरु : ष श्री राजा शाहु छत्रप : ति स्वामि कृपानिधि : तस्य श्रीनिवास : परशुराम प्रतिनिधि.’

८२० नारायणभट बिन आमणभट उपनाव गलडे कांसेगावकर गोत्र भारद्वाज शाखा आपस्तंब
८१५ सिवभट बिन महादेवभट गोडखिडीकर गोत्र काश्यप्य
८१५ अनंतभट बिन कृष्णभटजी मदे शिराळकर गोत्र हारित
८२० विश्वनाथभट बिन दत्तात्रेयभट उपनाव गलांडे गोत्र भारद्वाज शाखा आपस्तंब
८१५ परशरामभट बिन वेदंभट जोसी खेडकर गोत्र कौसिक शाखा पिपॅलायेनी आथर्वणी
८१२ माणभट ब्रिन त्रिंबकभट जोसी खेडकर गोत्र कौसिक शाखा पिपलायेनी आथर्वणी
८१५ गोपाळभट ब्रिन नारायणभट जोसी खेडकर गोत्र कौसिस
८१५ विरेश्वरभट ब्रिन नारायणभट चिपलोणकर गोत्र आत्री
८१० वासुदेवभट ब्रिन भटंभट गोवलकर
८२० बाळंभट बिन हरभट गोडबोले गोत्र काशेप यासी इनाम
८१५ सखबा गोसावी यासी इनाम
८१५ त्रिंबकभट ब्रिन वामनभट काशप गोत्री
८२० बल्लाळदेव ब्रिन गणेशदेव गोत्र भारद्वाज यासी
८१५ केशवभट ब्रिन आनंतभट थिटे काश्यप गोत्री यासी
।· गंगाधरभट बिन मोरेश्वरभट प्रभुणे गोत्र गार्ग्य सूत्र आश्वलायन

२॥।५

८२० भगवंतभट ब्रिन आनंतभट पराडकर गोत्र काश्येप
८१५ कृष्णंभट बिन आपईभट गोत्र वसिष्ठ यासी इनाम
८१५ भटभट बिन विनायकभट आफळे गोत्र भारद्वाज
८१२ रघुनाथभट बिन नरसिव्हभट उडालकर गोत्र विश्वामित्र
८२० माधवाच्यार्य ब्रिन नरसिव्हभट गोत्र गारग्य यासी
।· कासिनाथ तुळजानंद सिवनामे गोत्र वसिष्ठ यास
८१० आपदभट बिन गेरभट गोत्र भारद्वाज यासी
८१५ जिवभट बिन नरसिंगभट ताटे काश्यप गोत्री यासी
८२० मल्हारभट आनंतभट गोत्र कौशिक यासी
८२० कृष्णभट बिन सिवभट आफले आग्नहोत्री गोत्र भारद्वाज
८२० तुळसभट ब्रिन मादभट पाडकर गोत्र काश्यप यासी इनाम जमीन
८५ बया जगमीण ईस
८५ देवपुरी नंगा गोसावी यासी
८१५ रामभट ब्रिन हारभट गोत्र कौसिक यासी इनाम
८१५ जनार्दन गोसावी आखडानंद गोडे गोत्र गार्ग्य
८१० नारायणभट बिन गोविंदभट राजापूरकर गोत्र भारद्वाज
८१० रामभट ब्रिन गोविंदभट सप्रे गोत्र आत्री यासी इनाम
८१० केशवभट ब्रिन भीडभट त्रिभुते वसिष्ठ गोत्र यासी

२॥।८

एणेप्रा जमीन साडे पांच चाऊर सात बिघे तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वौश परंपरेने इनाम करून देऊन नावनिसीवार इनामपत्रे दिल्ही आहेत. तरी सदरहू प्रा जमिनी चतुसीमापूर्वक आपले करून घेऊन इनाम आनभऊन सुखरूप राहाणे. लेखनालंकार. [ शिक्का— 'मर्या : देयं रा : जते ' ]
ता १२ सवाल सुा सलास आसरीन

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. १, पृ. १८३–१८५.

२० जुलै १७२२ ] (– ३३५ –) [ अधिक श्रावण वद्य ३
शुक्रवार, रा. श. ४९

श्री

[ शिक्का ][1] [ शिक्का ][2]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४९ शुभकृत संवत्छरे अधिक श्रावण बहुल तृतीया भृगुवासरे क्षेत्रीये कुळावतंस श्रीराजाशाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व लेखन वर्तमान भावी प्रा सातारा यासी आज्ञा केली ऐसी जे. परमाम क्षेत्र कृष्णावेणी संगम वट संनिध मौजे खेड ता वंदन येथे ब्राह्मण समुदाये राहिले. स्नान संध्यादिक शटकर्मे आचरोन स्वामीचे राज्यास कल्याण चिंतितात. त्यांचा योगक्षेम चाल्लिला पाहिजे. याकरिता स्वामी कृपाळु होऊन ब्राह्मणाचे वगैरे मौजे पाटखल ता वदंन प्रा मजकूर येथे नूतन इनाम जमीन कुलबाब कुळकानू देखील हली पटी पेस्तर पटी स्वराज्य व मोगलाई आमल एकूण दुतर्फा खेरीज हकदार बिघे

८२५ आनंतभट बिन आमणभट गलंडे गोत्र भारद्वाज शाखा तेतीरिये आग्रारी
८१५ विरेश्वरभट बिन नारायणभट चिपळोणकर गोत्र आत्री सूत्र आश्वलाय.
८१० चिंतामणभट बिा नारायणभट गोत्र आत्री उपनाव फडके
८१२ रघुनाथभट बिन नरसिंहभट गोत्र विश्वामित्र उडालेकर
॥ भिकंभट बिन तुळजमभट गोत्र भारद्वाज उपनाम गलंडे कासेगावकर
८१५ परशरामभट बिन देवभट गोत्र कौसिक आथर्वणवेदी
८२० बाळंभट बिन हरभट गोत्र कौसिक उपनाम गोडबोले

---

१. शिक्का– 'श्री : राजा शाहु नर : पति हर्षनीधान : बाजीराव बल्ला : ल प्रधान '.
२. शिक्का– 'श्री : आई आदिपुरु : प श्री राजा शाहु छत्रप : ति स्वामि कृपानिधि त : स्य श्रीनिवास परश : राम प्रतिनिधि.'

८१५ रामभट बिन हरभट गोत्र कौसिक
।· कासिनाथभट बिन तुळजंभट सिराळे गोत्र वसिष्ट
८१० माणकंभट बिन त्रिंबकभट गोत्र कौसिक आथर्वणवेदी
८१५ यादोभट बिन बाळंभट गोत्र कौसिक
८१५ तुकंभट बिन अनंतभट गोत्र कौसिक वेद आथर्वण
८१५ गोपाळभट बिन नारायणभट गोत्र कौसिक वेद अथर्वण
८१५ रामभट बिन शंभूभट गोत्र श्राविष्ट उपनाम ढवळे माहादेवकर
८२० कृष्णभट बिन सिवभट आफळे गोत्र भारदाज आग्निहोत्री
८१५ कृष्णभट आबादेभट गोत्र वसिष्ट वेद रूगवेद वाळिंबे
८१५ भटंभट बिन विनायकभट उपनाम आफळे गोत्र भारद्वाज
८१५ केशवभट बिन अनंतभट उपनाम थिटे गोत्र काश्यप
८१० आपदेभट बिम मेरूभट गोत्र भारद्वाज आश्वलायन शाखा
८२० नारायणभट बिन आमणभट गोत्र भारद्वाज उपनाम गलंडे कासेगावकर
८२० विश्वनाथभट बिन दत्तंभट गोत्र भारद्वाज उपनाव गलंडे
८१५ अनंतभट कृष्णभट गोत्र हरीत उपनाव सिरालेकर
८२० भगवंतभट बिन अनतभट परडेकर गोत्र काश्यप
८२० कृशंभट महादेवभट परडेकर गोत्र काश्यप
८१५ सिवभट बिन महादेवभट गोत्र कौडण्य गोवखिंडीकर
८१० सिवभट बिन भिकूभट उपनाम विभुते गोत्र वसिष्ठ
८१० वासुदेवभट बिा भटभट गोत्र काश्यप गोलवलकर
८२० मल्हारभट बिन अनंतभट गोत्र काश्यप उपनाव तरटे
८१५ जिवभट बिन नरहरभट गोत्र कौसिक उपनाम तरटे
८१० रामभट बिन गोविंदभट गोत्र अत्री
।· मुदगलभट बिन मल्हारभट गोत्र शाकल्य वेद रूग्वेद
८१० नारायणभट बिन गोविंदभट गोत्र भारद्वाज राजापूरकर
।· गंगाधरभट बिन मोरेश्वरभट उपनाम परभुणे गोत्र गार्ग्य सूत्र आश्वलायन जोती वझरडेकर
८२० बलाळ देव बिन गणेश देव गोत्रं भारद्वाज आश्वलायन
८१५ त्रिंबकभट पाटक बिन वामन पाटक गोत्र शाखा सूत्र कात्यायन अग्निहोत्री
८१५ जनार्दन गोसावी बिन आखंडानंद गोसावी गोत्र गार्ग्य
८२० मध्याचार्य बिन नरसीभट गोत्र गार्ग्य उपनाम कैच
८१५ सखोबा गोसावी बिन आनाथ प्रो गोत्र भारद्वाज
८५ नागो गोसावी
८५ बया जगमीण

येणेंप्रो बिघे साहसें सदसष्ट एकूण साडे पाच चावर सात बिघे इनाम दिल्हा असे. याच्या सनदा नावविसीवार मौजे पाटखळ या गावीचे नावें सादर आहेत. तर तुह्मी सदरहू जमीन आसामीवार ज्याची त्याचे दुमाल करून पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालविणे. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे. या पत्राची प्रती लेहान घेऊन मुख्यपत्र भोगवटियास देणे. जाणिजे. लेखनालंकार [ शिक्का– ' मर्या : देयं रा : जते ' ]

~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ९, पृ. १८५–७.

२१ जुलै १७२२ ] (–३३६–) [ अधिक श्रावण वद्य ५ शनवार, रा. श. ४९; १८ मोहरम, सलास अशरीन मया अलफ

श्री रामदासस्वामी

राजश्री तुको घोडदेव हवालदार व कारकून वर्तमान व भावी प्रा सिरवल गोा

छ अखंडित लक्ष्मी अलकृत राजमान्य सेवक शामजी हरी नामजाद व कारकून सुभा प्रा मावले नमस्कार सुा सलास असरेन मया अलफ बाा सनद राजश्री स्वामी शके ४९ सुभकृत संवछरे अधिक श्रावण बहुळ पंचमी मंदवासरे तेथे आज्ञा जे. रामाजी बिन बाजी गोसावी परंपरा श्री वास्तव्य कसबे सिरवल हे स्वामी सनिध येऊन विदित केले की अपले बाप बाजी गोसावी सत्पुरुष होते. ते पुर्वी शांत जाले. त्याचे वृदावन काा मजकुरी बाधले आहे. ते साप्रत गतवर्शापासून डोलतें. हा चमत्कार बहुता लोकानी पाहिला आहे. तेथें पुजा नैवेद्य व पुण्यतिथीचा उत्छाह चालिला पाहिजे. तरी स्वामीनी कृपालु होऊन नूतन इनाम जमीन दिल्हीयाने स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याण चिंतून राहो म्हणून विनती केली. त्यावरून मनास आणिता बाजी गोसावी बहुत भले सत्पुरुश होते. याचे वृदावन डोलते हे गोष्ट येथार्थच आहे. तेथें पुजा नेवेद्य व नदादीप व पुण्यतिथीचा उत्छाव चाललियाने उत्तम आहे. याकरितां स्वामी कृपालु होऊन रामाजी बिन बाजी गोसावी यासी काा सिरवल प्राा माा पैकीं नूतन इनाम पडी जमीन बिघे ८१० दाहा कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार इनाम करून दिल्हा असे. तरी तुम्ही सदरहु जमीन अवल दुम सिम तीन प्रतीने नेमून देऊन यासी व याचे पुत्रपौत्रादि वौसपरंपरेनें इनाम चालवित जाणे म्हणून अज्ञा. अशेप्रमाणे रामाजी बिन बाजी गोसावी यासी काा सिरवल पैकी इनाम जमीन ८१० दाहा बिघे देविले असे. ती अवल दुम सिम तीन प्रतीने नेमून देऊन दुमाल करणे. तेथील अकार होईल तो इनाम दुमाल करणे.
~~~~~~~~~~~~~~

लिहित जाणे. या पत्राची तालिक लेहून घेऊन अस्सल पत्र भोगवटीयासी परतोन देणे. जाणिजे. रा छ १८ मोहरम.

भा. इ. सं. मं. तृतीय संमेलन वृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. १२, पृ. २.

३ दिसेंबर १७२२ ] (– ३३७ –) [ ५ रबिलावल, सलास अश रीन मया अलफ

श्री

राजश्री उदाजी पवार गोसावी यासी

॥ छ अखंडित लक्षुमी आलंकृत राजमान्य स्नो बाजीराऊ बलाल प्रधान [ शिक्का ][1] आशीर्वाद सुा सलासीन (सलास) अशरीन मया व अलफ. प्रांत गुजराथ व प्रांत माळवा निमे मोकासा हुजूरून आम्हाकडे आहे. त्यापैकी निमे तुम्हास मोकासा सरंजामी करून दिल्हा आहे. आमची इमारत सर्व तुम्हावरच आहे. येविशीं आपलें समाधान असों देणें. ५ रबिलौवल. बहुत काय लिहिणे.

मालव-साहित्य (त्रैमासिक), व. ३, अं. ३-४, १९२२ इ. स., पृ. १७८–९; भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १–२, पृ. ३८.

१२ दिसेंबर १७२२ ] (– ३३८ –) [ मार्गशीर्ष वद्य १ बुधवार, रा. श. ४९, १४ रबिलावल, सलास अशरीन मया

श्री

[ शिक्का ][2]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४९ शुभकृतनाम संवत्सरे मार्गशीर्ष बहुल प्रतिपदा सौम्यवासरे क्षत्रियकुलावंतस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशिवभट बिन लक्ष्मणभट उपनांव अरवीकर गोत्र शाकल्य [ शिक्का ][3] [ शिक्का ][4] ऋक् शाखाध्यायी पुरोहित यास दिल्हे दानपत्र

१. शिक्का– 'श्री : राजा शाहू नरप : तिहर्ष निधान बा : जीराव बल्लाळ : मुख्य प्रधान.'

२. शिक्का– 'श्री : प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णु : विश्ववंदिता शंभु छत्रपते : मुद्रा रामसूनो : र्विराजते'.

३. शिक्का– 'श्री : श्रीशंभु छत्रपति : हर्षनिधान रघुनाथ सुत : तिमाजी पंडित मुख्य : प्रधान'.

४. शिक्का– 'श्री : श्रीआई आदिपुरुष श्री राजा : शिवछत्रपति स्वामी कृपा : निधी तस्य परशराम त्र्यं : बक प्रतिनिधि'.

ऐसे जे. तुह्मी स्वामीचे पुरोहित बहुत थोर विद्यापात्र स्वामीच्या राज्याचा दिवसे-दिवस अभ्युदय व्हावा हा तुमचा सदैव निजध्यास. याविना दुसरे चिंतन नाहीं. त्रिकाल स्नानसंध्यादि षट्कर्म आचरोन स्वामीस आशीर्वाद देत आहां. तुमचे दिवसेदिवस उर्जित करून सर्वप्रकारे चालवणें हे स्वामीस परम अवश्यक. सांप्रत मार्गशीर्ष शुद्ध पूर्णीमा भौमवासरीं (११ दिसेंबर १७२२) राहूपराग चंद्रग्रहण पर्वकाळीं सकुश सहिरण्योदक धारापूर्वक इनाम गांवचा संकल्प करून तुम्हांस धारादत्त इनाम कुलबाब कुलकानू हालीपटी व पेस्तरपटी जल तरू पाषाण निधि निक्षेपसहित खेरीज हकदार व इनामदार करून मौजे येळवडे ता। तारळे सुभा तारळें हा गांव देहे १ एक रास इनाम सर्वमान्य करून दिल्हा असे. तरी तुम्ही मौजे मजकूर पूर्वमर्यादेप्रमाणें आपले स्वाधीन करून घेणें. आणि धारादत्त इनाम तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनुभवून सुखरूप राहणें. सदरहू इनाम गांवास जो हिंदू अगर मुसलमान कथला करील त्यास आपलाले स्वधर्मांची शफत असे. यदर्थी धर्मशास्त्रवचनें :-

दानपालनयोर्मध्ये दानाच्छ्रेयोनुपालनं ॥
दानात्स्वर्गमवाप्नोति पालनादच्युतं पदं ॥ १ ॥
स्वदत्तां परदत्तां वा यो हरेच्च वसुंधरां ॥
स विष्ठायां कृमिर्भूत्वा पितृभि: सह मज्जति ॥ २ ॥

येणेंप्रमाणें हीं पातकें जाणोन सदरहू धारादत्त इनाम तुह्मांस वंशपरंपरेनें सुरक्षित चालेल. निदेश समक्ष. [ शिक्का– ' मर्यादेयं विराजते ' ]

तेरीख १४ रबिलावल सु॥ सलास अश्रैन मया

रुजु बार सुरू सुद बार

~~~~~~~~~~~~~~

धर्म– साप्ताहिक, वाई, १४ सप्टेंबर १९०५,.पृ. ७१३–७१४.

१७२२–२३ इ. स. ] (– ३३९ –) [ सलास अशरीन मया अलफ

पेशमी गंगाजी नाईक व बुवाजी नाईक व जनार्दन नाईक बिन मुरारजी नाईक व शिवाजी नाईक व नारायणजी नाईक बिन निंबाजी नाईक महिमानराव कुळी साळोंखी ज्ञात पाठारे पुरातन वास्तव्य कसबे वानरें तर्फ मरोळ परगणे साष्टी वतनदार मोकादम मौजे अणजूर तर्फ आटगांव परगणे सायवान प्रान्त वसई हे प्रांत मजकुरीहून तीर्थरूप रा. बाजीराव व तीर्थरूप रा. चिमणाजीपंत आपा यांचे दर्शनास सातारीयाचे मुकामीं सन सलास अशरीन मया अलफामध्यें येऊन आपली हकीकत विदित केली कीं आपण पुरातन प्रान्त मजकुराचे वतनदार आहों. त्यास वसई प्रान्त फिरंगी याकडे आहे. त्यानें देवस्थानें व तीर्थें यांचा व महाराष्ट्र धर्म याचा लोप केला.
~~~~~~~~~~~~~~

हिंदु लोक भ्रष्टऊन क्षार केले. आपण पुरातन वतनदार, देशनाड गौडपणाचें वतन होतें. त्यास फिरंगी याकडे तो प्रान्त जाहलीयापासून वतन चालों देत नाहीं. यामुळें आपण कुटुंबासहवर्तमान त्या प्रान्तांतून येऊन कल्याण प्रान्तीं प्रस्तुत राहिलों. वसई प्रान्ताची हकीकत व आपलें वृत्त निवेदन करून त्या प्रान्तीं साहेबीं मसलत करून प्रान्त मजकूर सर करून देवस्थापना करून स्वधर्मस्थापना होय ते गोष्टी करावी व आपलें वतन आपणांस करून घ्यावें. त्या प्रान्तीचे कोट किल्ले व अंजीरे वसई व कोट ठाणें या जागांचे लागे, माग व खाडीयांचे उतार व मार्ग वाटांस आपण माहीत आहों व ठाणें वसई कोटाचे लाग आपले स्वाधीन आहेत म्हणून. त्यावरून आणजोरकर मजकूर यासी तीर्थरूपानीं आज्ञा केली कीं तुमचे हातलागे असतील ते हातीं धरून वसईचा व ठाणें याचा उताराचा लागठोक करणें. त्यावरून अणजूरकर मजकूर याणीं हातलागे त्या प्रान्तीचें हातीं घेऊन कोट ठाणें साष्टी येथील लागवतेच खाडीयाचा उतारा व वसईचे आगरेचे खाडीचे लाग केले. ते वर्तमान हुजूर येऊन साल दरसाल निवेदन केलें. त्याजवरून सन सलास सब्रासीन सब्रैन मया व अलफमध्यें तिर्थरूप रा. आप्पांनीं मसलत करून फौजसमागमें देऊन रा. शंकरजी केशव व रा. चिमणाजी भिवराऊ फौजसमेत गंगाजी नाईक व शिवाजी नाईक अणजूरकर बराबर देऊन वसईस पुढें रवाना केलें. व रा. खंडोजी माणकर व रा. रामचंद्र हरी यास फौजसमागमें देऊन बुबाजी नाईक व मुरारजी नाईक व नारायणजी नाईक अणजूरकर हे तिघे बंधु बराबर देऊन साष्टीची खाडी पार करून फौज नेऊन ठाणें यांचा कोट हस्तगत तुमचे हातीं लागोन जाला. ती. कैलासवासी रा. आपा खास फौजसुद्धां पाठीवर जाऊन प्रान्त मजकुरचे गड कोट किल्ले हस्तगत करून प्रान्त मजकूर सोडवून स्वराज्य केलें. त्यामुळें स्वधर्मस्थापना होऊन देवधर्मादिक चालते झाले व अणजूरकर यांचा बंध यांनीं एकनिष्ठपणे जीवाभ्य श्रमसाहास करून सेवाधर्म संपादिला. मुरारजी नाईक अणजूरकर जंजीरें वसईचे कोटास हल्ला जाहली. तें समयीं युद्ध प्रस्तांत स्वामीकार्यी खर्च झाले. आणजूरकर पांचजण बंधु याजवरी कृपाळु होऊन ती. कैलासवासी यांनी यासी नूतन वतनकरार करून द्यावे ऐसा करार केला. त्याजवरून हल्लीं अणजूरकर मजकूर हुजूर देऊन आपली हकीगत निवेदन केली. त्यावरून तुम्हास नूतन वतन देशनाडगौडी उर्फ सर पाटीवली वतन परगणे साष्टी देखील जकायती व तर्फ आठ गांव देहे २६ सव्वीस परगणे सायवानपैकीं तर्फ मजकूर देखील जकायती जलमार्ग व उभा मार्ग व बंदरे परगणें मजकूर व तर्फ मजकूर वतन सर पाटीलकी करार करून दिले असे.

क्षात्रवृत्त, व. ७, अं. १, जानेवारी १९२७, पृ. ११–१२.

४ नवंबर १७२३ ] (-३४०-) [ १६ (सफर?), आर्बा अशरीन

मोअजम देसाई तो संगमेश्वर यांसी कृष्णाजी पर्शराम प्रतिनिधि सु। सन आरबा अशरीन (मया) गंगशेट शेट्ये... कसबा संगमेश्वर यांनीं हुजुर विशाळगडचे मुक्कामीं येऊन विनंति केली कीं आपण कुटुंबवत्सल आहों आणि सेवाहि एकनिष्ठ केली आहे... तरी स्वामीनीं कृपाळु होऊन कांहीं नुतन जमीन इनाम दिली पाहिजे म्हणून. त्यावरून मनास आणितां हा कुटुंबवत्सल आहे. याचा योगक्षेम चालावा. या करितां यास कसबे मजकुर पैकीं पडजमीन मेली बिघे ८२ देविली आहे. तरी सदरहु जमिनीचीं ठिकाणें कसबे मजकुरीचीं मोजून चतुःसीमा करून शेट्यांचे कुमाला करणें. आणि सदरहु जमीन यास व याचे पुत्रपौत्रादि परंपरेनें चालवीत जावें. या पत्राची तालिक लिहून घेऊन अस्सल पत्र शेट्यांजवळ भोगवटियास परतोन देणें. छ १६ हुजुर (सफर?) मोर्तब.

वैश्य, मुंबई, व. ६, अं. १०-१२, जानेवारी- मार्च १९१६, पृ. २०८.

१७२३-१७२४ इ. स. ] (-३४१-)

[ राजा गिरधर बहादर यास लिहिलेल्या पत्राचा सारांश ]

दौलत इकबाल जावेदानी पैवस्ता हमइनां इमारत व आयालत मरतबत हशमत व शौकत मजिलत रफीउल्कदर बुलंद मकान राजासाहेब मेहर्बाब दोस्तान् बाद.

अज इबराक दर्याफ्त मुलाकात हरहत आयात के चूं बेहरे आमवाज मुतवातिर अस मकशूफ बरजमीर खुल्लत तसवीर गरदानीदाभी आयद दरी वलाह चहारूम हिस्सा व बाबद सरदेशमुखी सूबे मालवा बीच जमाने शहामत दस्तगाह उदाजीराव पवार कै मुकरर हुआ. उमेद राह दोस्ती और यमागनी के यह है कि सरकारके एहलकारों और कारपरदाजों और जुमीदारों सूबे मजकूर को हुक्म दिया जाकर ताकीद सख्त की जावें की बीच जारी करनें अमलके तवज्जोह बहोत रखी जावे. और इतिफाक शहामतपनाह के साथ रिआयत रखकर बीच जारी करने कामो उस तरफके मुतवज्जेह रहें ऐसी इनायत मद्देनजर रहे के मशारूत इलैह हमेशाह इमदाद और मदद देनेपर दिलसें और मोहब्बत बगैर अन्देशेके और रियायत तमाम कामोंमें उन मेहरबान के वास्ते लिखा जावें. तहकीक वाकै होना इस बातका खुसी दोस्तदार की और आबादी मुल्ककी और आराम खुल्कका और जादती मोहब्बत और असानी दुसरे कामोकी है, जियादा आपसे मिलनेका शौक है. आपकी उम्र और दौलतका आफताफ जाहो जलालसे निकलकर चमकनेवाला हूजिओ.

मालव-साहित्य, इंदूर, व. ३, अं. ३-४, १९३२ इ. स., पृ. १८०.

५ एप्रिल १७२४ ] (– ३४२ –) [ चैत्र वद्य ८ रविवार, शके १६४६; २१ रजब आर्बा अशरीन मया अलफ

महजरनामा शके १६४६ क्रोधीनाम सवछरे चैत्र वद्य ८ आष्टमी वार आदितवार व तारीख छ २१ माहे रजब बहुजूर हाजर मजलिस हाकीम शेरा व तोरा व देशमुख व देशपांडिये व गोत मोकदमानी देहाये प्रगणे चाकण व बाजे प्रगणात सरकार जुनर वगैरे सुभे खुजस्तेबुनियाद उरूफ दक्षण सुहूर सन आर्बा आशेन्हीन मया व आलफ सन हजार ११३३ सबब आकि तायाजी बिन खंडोजी व कृष्णाजी बिन गोदजी व सुलतानजी बिन नागोजी व भानजी बिन मालजी कड्ड चव्हाण मोकदम कसबे चाकण व देशमुख प्रगणे मजकूर यांसी महजर करून दिधला ऐसा जे. तुम्हामधून तायाजी बिन खंडोजी व कृष्णाजी बिन गोदजी कड्ड मोकदम कसबे मजकूर व देशमुख प्रगणे मजकूर यानी कसबे खेड सरकार जुनर येथील मुकामी व मज्यालसीम येऊन आपली हाकीकती जाहीर केली की कसबे चाकण येथील मोकदमी व प्रगणे मजकुरची देशमुखी हे दोन्ही वतने पुरातन आपली. वडील वडीली आनुभवीत असता पूर्वी चाकणेच्या कोटात हाकीम होता. त्यांत व आपल्या वडिलांत बरकशी पडोन बेबनाव होऊन बाहेर पडिले. मागे येसाजी वलद संताजी व सिवजी वलद विठोजी कड्ड यांचे वडिल गुमास्ते होते. ते वतनाचा कारभारी करीत असता बहुत दिवसा आपले वडील वतनावरी आले. तो येसाजी व सिवजी कड्ड कदम याचे वडिल रूजू न होता जोरावरीने वतनाचा उपभोग करू लागले. तधीपासून आपले वडील कलह करीत असता हाजरत बादशाहा यांचा मुकाम कसबे खेड सरकार जुनर या जागा होता. तेथे हाजरतीने गोतमुखे निवाडा करावयाबदल खान आजम अमानुलाखान किलेदार किले मोमिनाबाद उर्फ चाकण व फौजदार प्रगणे मजकूर यांसी हुकूम फर्मीविला. त्यावरून खान आजम अमानुलाखान याही कसबे मजकुरी गोतमुखे वरहाक इनसाफ करिता आपले वडील खरे जाले. येसाजी वलद संताजी व सिवजी वलद विठोजी कड्ड कदम मुदई खोटे जाले. ते रद करून आपल्या वडिलास महजर करून देऊन आमल दुमाले गेला. त्यावरी आपले वडील खंडोजी कड्ड व भानजी कड्ड फरमानाबदल बादशाही लस्करास जाऊन आदालतीस उभे राहिले. हाजरत बादशाहाजीने हाकीकत खातरेस आणून फरमानाचा हुकूम केला. तो बादशाहा यांची मोहीम बागनगिरीयावरी जाली. आपले वडील लस्करात होते. दिवाण आसदखान यांसी आपली हकीकत जाहीर करून दिवाणी परवानियाचा हुकूम घेतला. फरमान व परवाना तयार होऊन हातास यावे त्यांसी दरबार खर्चास पैके पाहिजेत. याकरिता खंडोजी कड्ड व भानजी कड्ड बादशाही लस्करामधून येऊन कान्होजी बिन तुकोजी आंगरे यांजकडे जाऊन त्यांसी दोन्ही वतनाची तिसरी तकसीम रुपये १७५०० साडे सतरा हजार रुपयासी विकत देऊन पैके घेऊन बादशाही लस्करास गेले. दिवाण आसतखान यांचा परवाना हातास

आला. फरमान तयार जाला. मोहोर हातास यावा तो हजरत बादशहा हक जाले. त्यावरी खंडोजी कड्डू वतनावरी येउन कितेका दिवसा मरोन गेले. मागे त्यांचे वडील पुत्र मज तायाजीचा वडील भाऊ गोमाजी बीन खंडोजी कड्डू व त्यांचे पुतने मज कृष्णाजीचा बाप गोदजी कड्डू वतन अनुभवीत असतां आजम आली खान अवरंगाबादेत होते· त्यांचा परवाना आणिला. मुदई यांसी हाती धरून गोतामध्ये उभे राहा म्हणत असता गोतामध्ये उभे न राहिले. मध्ये कितेक दिवस गेले. नातवानीच्या प्रसंगाकरिता आपले वडील गोमाजी व गोंदजी कड्डू यानी खर्चवेंचाबद्दल याजजवळुनी नियेताहुनी ज्याजती रुपये ४२५०० मोकरा साडे बेतालीस हजार रुपये घेऊन खर्च केला. वतनी आमल चालवीत असता आजम आलीखान व नवाब किलिचखान निजाममनमुलुक बहादूर यांचा जंग होउन आवरंगाबादेस निजाममनमुलुक यांचा आंमल जाला. त्यापासून शहामंत अवाली पुन्हा अबदूल रसूलखान यांसी किलेदारी व फौजदारी मोकरार होऊन प्रगणे मकुरास आले. सैद माखनखान किलेदार व फौजदार होते. तगीर जाले. यांची तगिरी व त्यांची बाहाली मध्ये मुदियानी वजिया केला. याकरिता सुबे औरंगाबादेस जाऊन हकीकत जाहीर करून दिवाणी परवाना आणावयाबदल आपले वडील गोमाजी व गोंदजी कड्डू टका पैका व वतनी कागद घेऊन स्वार होऊन कसबे खेड सरकार जुनर या गावी देऊ पाटील यांच्या वाडियात राहिले. पुढे जावे तो मुदई रामाजी कड्डू व शिवजी कड्डू बादा बिरादरी व खुद जामितेतिनसी छ ५ माहे जमादिलावल सुाँ इहिदे आशेरीण मया व आलफ (२१ फेब्रुवारी १७२१) या तारिखेस रात्री येऊन डांक घालून दोघा जणास जिवे मारिले. कितेक टका पैका व अमानुलाखान यांचे कारकीर्दीस गोतमुखे निवाडा होऊन महजर जाला होता तो व दिवाण असद-खान यांचा परवाना व आणखी कितेक वतनी कागदपत्र होते ते मुदई यांचे हाती लागले. यांचे व मुदई यानी मारे केले. त्याचे सुरतनामे आहेत व खान अजम अब-दूल रसूल खान किलेदार किले चाकण यांही दोन्ही खुन मुदयांवरी शाबूद करून त्यांचे शिरी गुण्हेगारी ठेऊन त्यांची कबुलियेत लेहान घेतली. तोही कागद आहे. ऐवजने आपली खराबी जाली. हे हकीकत आपले वतनभाऊ कान्होजीं आंगरे यांसी सांगोन पुढे दिवाणात हयाल व्हावयाचा विन्चार करावा व या बदल आपले वडील शहाजी कड्डू व सुलतानजी कड्डू व भामजी कड्डू कुलाबियास जाऊन कान्होजी आंगरे यासी वर्तमान सांगितले. ते समई त्यानी मजकूर केला की तुमच्या दोन्ही वतनाची तिजाई तक्षीम तुमच्या वडिलानी आपणास रुपये १७५०० साडेसत्रा हजारास देऊन पैके नेले. त्या आलीकडेही गोमाजी कड्डू व गोंदजी कड्डू यानी रुपये ४२५०० साडे बेतालीस हजार नेले. या उपरी पुढे ही खर्चवेच लागेल. मबलग टका होतो याची वाट काय. तेव्हा आपले वडील शहाजी कड्डू व सुलतानजी कड्डू व भानजी कड्डू यानी आत्मसंतोषे कान्होजी आंगरे यांसी पत्र लेहोन दिधले की या मागे तुमचा टका साडे

सत्रा हजार रूपये या खेरीज नेऊन खर्च केला व पुढे कार्य होईल तो खर्च करून वतनाचे कागदपत्र करून घ्यावे. दोन्ही वतने तुह्मास दिधली. तुह्मी होऊन येकापासून पांच-दाहा गाव जें द्याल तितकियाचा उपभोग करून म्हणवून पत्र लेहोन दिधले. त्यावरी आपले वडील शाहाजी कड्ड मृत्यु पावले. सुलतानजी कड्ड व भानजी कड्ड यानी कान्होजी आंगरे यांची निशा केली. आनी हे व ते बराबरी किले सातारियाचे मुकामी माहाराज राजश्री स्वामी यासंनीध जाऊन हायाल जाले. यावरी खासा महाराज मज्यालसीस बसोन सरकारकून व पंडित व सरदार व भले लोक वतनदार यांसमक्ष हाकीकती मनास आणून धर्मता इनसाफ केला की मुदईयानी मारे केले ते खोटे. गुण्हेगार आहेत. सुलतानजी बिन नागोजी व भानजी बिन भालजी कड्ड हे वतनदार खरे. यांसी वतनाचे कागदपत्र करून द्यावे. परंतु यांही आपली दोन्ही वतने कान्होजी आंगरे यांसी लेहून दिधली आहेत. याचा विचार त्यांचे समाधानें करावा लागतो. तेव्हा येविषयींची पृछया कान्होजी आंगरे यांसी केली. तिहीं आर्जे केला की आपला टकापैका या वतनप्रसंगास मबलग खर्च जाला. पुढेहि खर्च होईल. दोन्ही वतनें आपणास लेहून दिधली आहेत. तथापि आपण माहाराजाचा हुकूम बारदार जो हुकूम होईल त्याप्रमाणें वर्तणूक करून म्हणवून. त्यावरून माहाराज राजश्री स्वामी धर्मपरायेण कृपाळु होऊन समस्त मज्यालसीचे विचारे करून कसबे मजकूरची मोकदमी व प्रगणे मजकूरची देशमुखी या दोन्ही वतनाचे दोन विभाग बराबरी करून येक विभाग आपणास व येक विभाग कान्होजी आंगरे यासी देऊन पत्रे करून दिधली. ते पत्रे आपण व कान्होजी आंगरे यांनीं खुशरजावंदीनें घेऊन त्याप्रमाणे हरदोजण निमे निम वतनाचा उपभोग करीत आहो. ऐसीयासी तुम्ही हाकीम व गोतगंगा धर्मपरायेण आंहा. आपली जाली हाकीकती जाहीर कराबयाकरिता आपण व कान्होजी आंगरे मोकदम कसबे मजकूर व देशमुख प्रगणे मजकूर यांचे पुत्र सेखोजी आंगरे व संभाजी आंगरे आलो आहो. आपणाजवळी कागदपत्र आहेत. ते मनास आणून भोगवटीयांसी हाजर करून दिधला पाहिजे म्हणवून वर्तमान सांगितले. आणि तुम्ही व सेखोजी आंगरे व संभाजी आंगरे मोकदम कसबे चाकण व देशमुख प्रा मजकूर यांनीं कागद पत्र आणवून पुढें ठेविले. बिाल

तुम्हाजवळील कागदपत्र

बेदरीच्या पातशाहाचा परवाना येक १
आलम आलीखान याचा परवाना येक १
मुदई यानी मारे केले त्याचे सुरतनामे ३
 १ का खेडचा
 १ जुनरचा
 १ का चाकणचा
 —
 ३
माहाराज राजश्री स्वामीचे आज्ञापत्र १

कसबे चाकण व प्रगणे मजकूरच्या वतनदारांचे समापत्र १
मुदई यानी खुनाची गुण्हेगारी रुपये १२००० बारा हजार कबूल करून आजम आबदूल रसूलखान किलेदार व फौजदार कसबे चाकण यांसी खत लेहून दिधले आहे ते पत्र १
लंग
 ०

सेखोजी आंगरे व संभाजी आंगरे यांजवळील पत्रे

कसबे चाकण प्राा मजकूरच्या वतनदाराचे शाहिदीपत्र १

देशपांडिये व सेटें वगैरे वतनदार कसबे चाकण प्रगणे मजकूर ईही पत्र लेहून दिधले आहे ते पत्र १

माहाराज राजश्री स्वामींचे आज्ञापत्र

दोन्ही वतनाचे तिसरे तक्षिमेचे विकरीतपत्र १

शाहाजी कडू वलद खंडोजी कडू व सुलतानजी कडू व भानजी कडू यानी दोन्ही वतनें लेहून दिधली आहेत ते पत्र १

लेग ०

येणेप्रमाणें पत्रे मनास आणिता बेदरीच्या पातशाहाचा फरमान कसबे चाकणची मोकदमी व प्रगणे मजकरची देशमुखी या दोन्ही वतनाचा तुम्हाजवळी आहे. त्यावरून तुम्ही चव्हाण कडू वतनदार पुरातन खरे आहा. कदम कडू मुदईगिरी करितात ते खोटें आहेत. समापत्र कसबे मजकुरची रयती व प्रगणे मजकूरचे मोकदम यांचे आहेत. ते पाहाता तुम्ही कसबे चाकणचें मोकदम व प्रगणे मजकूरचे देशमुख पुरातन आहां. तुम्ही दिवाणात इनसाफ करून घ्यावयासी उभे राहाणे. आपण तुमची शाही देऊ म्हणवून शफतपूर्वक लेहून दिधले आहे. त्यावरून तुम्ही खरे. मुदई खोटे. तुमचे मारे मुदईयानी केले. त्याचे सुरतनामे शरियेतपन्हा काजी व हकीम याचे मोहरनसी व देशमुख व देशपांडिये व मोकदम व हामेशाही वतनदाराचे शाहीदिणसी ३ तीन किते आहेत. ते पाहाता सैद माखन किलेदार किले चाकण व फौजदार प्रगणे मजकूर माजूल त्याच्या आमलांत मुदई यानी कजिया केला. याकरिता गोमाजी वलद खंडोजी व गोंदजी वलद नागोजी कडू मोकदम कसबे चाकण व देशमुख प्रगणे मजकूर दिवाणी परवानियाबद्दल आंवरंगाबादेस जावयासाठीं टका पैसा व वतनी कागद घेऊन स्वार होऊन कसबे खेड सरकार जुंनर या गावी येऊन देव पाटील कसबे मजकूर याचे वाडियात राहिले असता छ ५ माहे जमादिलावल सुहूर सन इहिदे आशेरीण मया व आलफ (२० फेब्रुवारी १७२१) या दिवसी रामाजी व सिवजी कडू कदम मुदई यांनी बिरादरी व खुद जमियेतीनसी दोनप्रहर रात्रीच्या आमलात येऊन देव पाटील याच्या वाडियात सिरोन गोमाजी व गोदजी कडू निजेले आसता तरवारेचे वार केले. गोमाजीवरी आकरा जखमा जाल्या. याचे चाकर ३ तिघे जखमी जाले. वतनी कागदपत्र व टकापैका बिशादी होती ती लुटून गोदजीस दस्त करून मौजे चांडोली ताा खेड या गावीच्या सिवारात नेऊन जिवे मारून मुदई मुर्दा टाकून गेले. गोमाजी जखमी होता. त्यासी दुसरे दिवसी खेडच्या लोकानी उचलून चाकणेस खान आजम अबदूल रसूलखान किलेदार किले चाकण व फौजदार प्रगणे मजकूर याजवळ नेले. जेर होता. चौथे दिवसी गोमाजी मयेत जाला. हे हाकीकत बयाजवार सुरतनामियात लिहिली आहे व आम्हास हे वर्तमान बिलकुल दखल आहे. तुमचे सारे मुदई यानी केले. हे खरे. दुसरीयाचा दाखल,

खान आजम अब्दुल रसूलखान किलेदार किले चाकण व फौजदार प्रगणे मजकूर यांही मुदई यांच्या माथा मारीयाचा गुन्हा शाबूत करून गुण्हेगारी रुपये १२००० बारा हजार रुपये ठेऊन कबुलीयेत लेहून घेतले. ते पाहाता रामाजी व लिंबाजी कड्ड मुदई यानी लेहोन दिधले की गोमाजी व गोंदजी कड्ड यांसी आपण मारिले खरे. गुण्हेगारी बारा हजार रुपये कबूल केले. ऐसे लेहून वसुलास मुदती लिहिल्या आहेत ते खरे व आमानुलाखान यानी पेशजी गोतमुखे निवाडा करून महजर दिधला होता. तो व दिवाणी आसदखान यांचा परवाना होता तो व आनीक तीन कागदपत्र व टकापैसा बिशाती गोमाजी व गोदजी कड्ड मारिले गेले ते बख्ती मुदई यानी लुटून नेला म्हणवून तुम्ही जाहीर केले. याची तहकिकात करून मनास आणिता आमानुलाआन याचे कारकीर्दीचे दाखले कागदोपत्री आहेत व ते •मज्यालसीस कसबे चाकण प्रगणे मजकूरचे व बाजेहामेशाही वतंदार होते. त्यापैकी हाली हजीर मज्यालसीस कितेक आहेत. त्यांही यांची शाहीदी दिधली. महजर होता तो गेला हे खरे. दिवान असदखान याच्या परवानीयाचा दाखला तरी त्या परवान्याप्रमाणे कसबे चाकणची मोकदमी व प्रगणे मजकुरची देशमुखी तुमची कदीम वतने आहेत. पुस्त दर पुस्त खात जाणे म्हणऊन आजम आलीखान याचा परवाना तुह्माजवळी आहे. यावरून आसदखान दिवाण याचा परवाना कितेकास दखल होता. त्यानी हजीर मज्यालसीस जाहीर केले. यावरून दिवाण आसदखान याचा परवाना होता तो गेला हे खरे व बिशाती व कागदपत्र मुदई यानी मारे केले ते समयी त्यांही लुटून नेले ह्मणऊन सुरतनामियांत लिहिले आहे. यावरून तुह्मी जबानी हाकीकत जाहीर केली ते खरी जाली व आपले वडील मुदईयांसी गोतात यां ह्मणऊन ह्मणत असता ते गोतात न आले ह्मणऊन तुम्ही जबानी सांगितले आहे याची गोही हजर मज्यालसीस गुजरली. वरकड सेखोजी आंगरे यांजवळी पत्रे कसबे चाकण व प्रगणे मजकूरच्या वतनदारानी शाहिदीपत्रे लेहोन दिधले ते व विकरीत व देशपांडिये व सेटीये वगैरे वतनदार कसबे मजकूर यानी पत्रे लेहून दिधले आहेत व वरकड पत्रे पाहाता तुमच्या वतनाचा निर्णय लिहिला आहे. तुह्मी कड्ड चव्हाण मोकदम कसबे चाकण व देशमुख प्रगणे मजकूर यांत ब चाकणच्या किलियांत हाकीम होता त्यांस करकसा लागली. त्यामुळें भोजजी कड्ड बाहेर पडिला. मागे येसाजी वलद संताजी व सिवजी वलद विठोजी कड्ड कदम मुदई यांचे वडील हाउजी होनजी कड्ड गुमास्ते होते ते व हकीम एकामते राहोन वतनी कारभार करू लागले. कितीका दिवशी तुमचे वडील वतनावरी आले. त्यासी कदम कड्ड रूजू न जाहाले. त्या दिवसापासून तुमचे वडील भांडत आले. आमानुलाखान याचे कारकीर्दीस गोतमुखे निवाडा जाला. तेव्हा मुदई खोटे जाले. तुमचे वडील खरे जाले. त्यासी महजर करून दिधला. हाही दाखला लिहिला आहे. यावरूनही तुह्मी चव्हान कड्ड वतनदार खरे. मुदई लायान गळा पडोन कजिया करिताती ऐसे कळो आले. एवं प्रकारे निश्चये जाला. पुढे तुमचा ब कान्होजी आंगरे यांचा प्रसंग मनास आणिता रूपये साडेसत्राहजार

यांसी तुमच्या वडिलानीं दोन्ही वतनाचीं तिसरी तक्षीम पेशजी विकत दिधली व मध्ये रूपये ४२,५०० साडे बेतालीस हजार त्यांपासून खर्चाबदल आणिले. त्यावरी दोन्ही वतने त्यासी लेहून दिधली. हे खरे. परंतु महाराज राजश्री स्वामीनी तुमचे व कान्होजी आंगरे यांचे उत्तरोतर मुरलीत चालावे करिता दोन्ही वतनाच्या दोन तक्षिमा बराबरी करून तुह्मी व त्यांही निमेनिमप्रमाणे वतने आनुभवांवी ऐसा निर्व्हाहा करून पत्रे दिधली आहेत. ते पाहाता निर्णये लिहिला आहे की तुह्मी कड्डू चव्हाण वतनदार पुरातन जमीन जुमलियाने खरे आहां. यावरी तुमचे मुदई आणून इनसाफ करावा तरी त्यांही तुमचे मारे केले. तेव्हा ते दिवाणचे गुण्हेगार व गोताचे खोटे आहेत. त्यांसी या वतनासी आर्थाआर्थी समंध नाही. याकरिता त्यांसी व यांजवळील कागदपत्र कुल रद केले असेत. दोन्ही वतनापैकी निमे वतन तुह्मी खाणे व निमे वतन कान्होजी आंगरे यासी दिधले आहे. ते खातील. यांसी हिला हरकती कोण्ही करू नये ऐसी पत्रे दिधली आहेत. त्याप्रमाणे तुह्मी व कान्होजी आंगरे निमेनिमप्रमाणे वतने खात आहां. पुढे भोगवटियांसी महजर पाहिजे ह्मणऊन तुम्ही येऊन जाहीर केले. तरी तुम्हासी करून द्यावा हे धर्मता. तथापि तुह्मी हकीमात व गोतात उभे राहिलेत हे ऐकोन तुमचे मुदई येऊन उभे राहातील या आंदेशाबदल काही दिवस त्यांची वाट पाहिली. परंतु न आले. तेव्हा येसाजी वलद संताजी कड्डू मुदई मौजे वाकी प्रो चाकण येथे होता. त्यासी बोलाऊ पाठविले. तो न येता तेथून कबिलेसमवेत पळोन गेला. मनुष्य बोलाऊ गेली होती. ते फिरोन आली. यावरी मोकदम मौजे वांकी यांसी आणऊन तहकिकात करिता तुम्ही या जागा आलेत. हे ऐकोन येसाजी कड्डू निघोन गेला म्हणवून जाहीर केले. ऐसीयासी बेदरीच्या पातशाहाचा फरमान तुम्हाजवळी आहे व आमानुलाखान यांचे कारकिर्दीत निवाडा होऊन तुम्ही खरे मुदई खोटे जाले व हजरत बादशाहा यांचा हुकूम फरमान द्यावयाचा जाला होता व दिवाण आसदखान यांचा परवाना तुम्हाजवळी होता व आलमआलीखान यांचा परवाना तुम्हाजवळी आहे व पेशजी मुदई यांस गोतात बोलाविले आसता गोतात न आले व त्यानी तुमचे मारे केले. त्यावरी तुम्ही सातारियांसी गेलेत माहाराज यानी मुदई यांसी रद करून तुम्हास व कान्होजी आंगरे यांसी वतनी कागद करून दिधले. तेव्हां तेथेही उभे न राहिले व हाली पळोन गेले. यावरून मुदई येसाजी वलद संताजी व सिवजी वलद विठोजी वगैरे मुदई कदम कड्डू खोटे आसत. त्यांसी या वतनासी काही अर्थाआर्थी समंध नाही. तुम्ही चव्हान कड्डू जमीनजुमल्यावरून व गोही साक्ष भोगवटियांवरून पुरातन वतनदार खरे जाणऊन तुम्हास महजर करून दिधला असे तरी तुम्ही मोकादमी कसबे चाकण व देशमुखी प्रगणे मजकूर हे वतने आपली मिरासी मुस्तकीम जाणोन हरदो वतनात निमे कान्होजी आंगरे यांसी विकत दिधली आहेत ते होऊन पुस्त दर पुस्त खात जातील. निमे कसबे मजकूरची मोकदमी व निमे देशमुखी प्रगणे मजकूर तुम्ही उभयेता कारभार खिदमत सरबराह करून किर्द आबादानी व मालगुजारी करणे आणि मोकदमीचा हक लाजिमा

व इनाम पासोडी व सेवसबजी कानू कवयेद जमीन जुमला मिरासी जिराती व बागाईती जल स्थल घरवाडा देखील निमेनिम व देशमुखीचा हाक रूसुम बरोब इनाम गाव मौजे गोनवडी व लवाजिमात कानू कवयेद व दिवाणाचे सिरपाव व पान मान चाजे उत्पन्न निमेनिम माफिक सुदामत बफरजेंदानी लेकरालेकरी काबीज मुतसरफ होऊन खात जाणे. सानीऐन हाल यासी कोन्ही हिलाहरकती करील तो दिवाणाचा गुन्हेगार व गोताचा खोटा. हा महजरनामा लिहिला सही.

~~~~~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ७. पृ. ३४५--३५२.

१७२४ इ. स. ] (-३४३-)

[ निजामुल्मुल्काच्या फारसी पत्राचा तर्जुमा ]

विनंति कीं परमेश्वरावर श्रद्धा, महंमद पैगंबरांच्या आज्ञेचें पालन आणि राजनिष्ठा यामुळें अवघड प्रकरणें सुलभ रितींनें पार पडलीं. सय्यद दिलावर अलीखान आणि आलम अलीखान यांजपाशी मोठे सैन्य होतें. उलट या एकनिष्ठ सेवकापाशीं सैन्य थोडें आणि अत्यल्प अशी साधनसामुग्री अशी परिस्थिति होती. ही गोष्ट सूर्यप्रकाशाहूनहि स्पष्ट आहे.

बादशहाचे एकनिष्ठ सेवक आपल्या निराकरण्यांत गुंतले होते. माझी कामगिरी पाहून त्यांना हिंमत आली. त्यांनी निर्धार करून धाडसाचीं कामें केलीं ( सय्यदबंधूपैकीं हुसेन अलीखान याचा बध आणि सय्यद अब्दुल्ला याचा पाडाव) त्यामुळे हें चिरस्थायी साम्राज्य म्हणजे निष्कंटक असे उपवन बनलें.

यानंतर आपल्या आज्ञेनें हा सेवक अहमदाबादेस गेला. हैदरकुलीखान त्याच्या बुद्धिरूपी नेत्रावर गर्वाचा धूर चढला होता. अनेक तऱ्हेनें त्याने बादशहांची अवज्ञा केली. ( बेहुकमी ). हा सेवक तेथें जाऊन पोहोंचला. प्रतिकाराची आणि युद्ध करण्याची शक्ति आपल्यांत नाहीं हें पाहून खान घाबरला आणि त्यानें पलायनाची वाट धरली. मी केलेल्या मेहनतीचे चीज होण्यास हवे होतें. हेंच न्यायाचे होतें. पण बादशहांच्या कारभाऱ्यांनीं माझ्याशीं कोणत्या तऱ्हेची वागणूक केली हें जाहीर आहे.

शत्रूंचें पारिपत्य आणि बादशहांच्या हुकुमाचें पालन याशिवाय या एकनिष्ट सेवकाचा कोणताच हेतु नव्हता आणि नाहीं. याला परमेश्वर साक्षी आहे.

माझे हितशत्रू वरकरणी सेवक म्हणून मिरवितात. पण अंतस्थ कारस्थानें करतात. स्वतःची पोळी पिकविणें याशिवाय त्यांचा दुसरा कोणताच हेतु नाहीं. कोणतेंहि काम असो, तें राज्याच्या भलाईच्या आणि राज्यकारभार चालविण्याच्या दृष्टीनें मी करतों. त्याचा विकृत अर्थ करून ते आपल्या पुढें मांडतात. त्यामुळें आपल्या मनांतहि खळबळ उडाली.
~~~~~~~~~~~~~~~~~~

शेवटीं परिस्थिति अशी झालीं कीं, आपल्या हुजुरांत राहून माझें जगणें दुष्कर झाले. यामुळें मी मुरादाबादेस निघून गेलों. येवढ्यावर संतुष्ट न राहतां बादशहांनीं दक्षिणच्या सुभेदारीवर मुबारिजखानाची नेमणूक करून त्या मजकुराचीं फर्मानें रवाना केलीं. त्याला फौजफाटा गोळा करून माझ्याबरोबर युद्ध करण्यासाठीं चिथावणी देण्यांत आली. आपल्या आज्ञेप्रमाणें या सेवकानें राजिनामा दिला आणि मुबारिजखानाला औरंगाबादेस येण्यासाठीं लिहिले. पण त्याला शेवटीं असें दिसून आलें. की मुबारिजखानाचें औरंगाबादेस येणें हें दुसऱ्याच उद्देशानें होतें. राज्य-कारभार व्यवस्थित चालविण्याकरितांच हें सर्व केलें आहे असें कारभाऱ्यांनीं बादशहाच्या मनांत भरविलें आहे. त्यांत कांहीं तथ्य नाहीं. मदत मिळाल्यानंतर या सेवकाचा नाश करावा हाच हेतु होता हें निःसंशय होय. अफगाण आणि त्या प्रांतांतील सरदार त्याला (मुबारिजखानाला) येऊन मिळाले. या गोष्टीला प्रमाणाची अगर साक्षीपुराव्यांची जरूर नाही. स्वतःचे प्राण आणि अब्रू यांचे रक्षण करण्यासाठीं म्हणून त्या सेवकानें बादशहापाशीं नम्रतापूर्वक अर्ज्या पाठविल्या. मला आशा वाटली कीं बादशहा या एकनिष्ठ सेवकावर कृपा करतील. पण त्याला उतर देण्याची कृपा झाली नाहीं.

या दुःखावर अधिक दुःख म्हणून कीं काय मला वजिरी, आणि अहमदाबाद आणि माळवा या सुभ्यांच्या सुभेदारीवरून काढून टाकल्याची हकीकत प्रसिद्ध झाली. मुबारिजखान याची वाटच पाहात होता. त्याचें सैन्य वीस हजारापेक्षां अधिक होतें. अशा प्रबळ आणि प्रचंड फौजेशीं लढण्याचा विचारहि करवत नव्हता. पण मुबा-रिजखान युद्धाला प्रवृत्त झाला. मग हा सेवक निरूपाय होऊन शहराबाहेर (औरंगा-बाद) पडला. गुरुवार तेवीस मुहरम जुलूस महंमदशाही सहा रोजीं औरंगाबादेहून पन्नास कोसावर असलेल्या शक्करखेडा या गांवाजवळ मोठें युद्ध झालें. मुबारिजखान आणि त्याचीं मुलें बहादुरखान, गालिबखान, महंमदखान, अमीनखान, आणि मुबा रिजखानाचे इतर सहकारी आपल्या सैतानी स्वभावामुळें आणि बदनियतीमुळें मृत्यु-मुखीं पडले. जवळ जवळ चार हजार अफगाण आणि इतर सैनिक आमच्या प्रखर आणि रक्तपिपासू तलवारींचे भक्ष्य बनले. अनेक लोक पाडाव होऊन कैद झाले. हा विजय म्हणजे साम्राज्याची घडी नीट बसण्यासारखें होय. याबद्दल हा सेवक नम्रपणें आपलें अभिनंदन करतो. आपल्या कृपेची हा सेवक आशा बाळगून आहे. या वेळीं दक्षिणेंतून बंडखोर आणि कलह माजविणारे नाहीसे झाले. हा कचरा निघून जाऊन दक्षिण मोकळी झाली आहे. या सेवेस योग्य जो कोणी ठरेल त्याला ती सांगावी. हा आज्ञाधारक सेवक बादशहाची जी कांहीं आज्ञा होईल तिचें पालन करणें म्हणजे एक मोठी आराधना होय असें समजतो. (अफजल इबादत) साम्राज्याच्या आकाशांतील सूर्य नेहमीं तळपत राहो.

---

आलमगीर, दिपावली अंक, इ. स. १९६१, पृ. ९५–९६.

१७२४ इ. स.] (– ३४४ –)

[ निजामुल्मुल्काचे पत्र– तर्जुमा ]

मुबारिजखान हा कलहप्रिय होता. त्याचें नशीब पण फिरलें होतें. या वयांत हलक्या लोकांच्या चिथावणीवरून त्यानें दक्षिणचें राज्य संपादन करण्याची ईर्षा बाळगली. आम्ही त्याच्यावर उपकार केले होते. आमचे त्याच्यावर हक्क होते. सर्व लहान थोर लोकांना हें पूर्णपणें जाहीर आहे. पण या गोष्टी त्याने झटकल्या. सच्चेपणा, समजूतदारपणा आणि माणुसकी या गोष्टी सोडून देऊन तो खाली आला. त्याची वर्तणूक जनावरें आणि श्वापदें यांच्याहूनहि अधिक वाईट झाली. कुराणांत म्हटलें आहे "ती माणसें म्हणजे जनावरेंच होत. जनावरापेक्षांहि जास्त असे ते निर्बुद्ध होत." त्यानें आपला दुष्ट हेतु सोडून द्यावा म्हणून मी त्याला पत्रद्वारें आणि निरोपाच्या द्वारें वळवण्याचा प्रयत्न केला, त्याच्याशीं मी युक्तिवाद केला. आणि त्याचे विचार खोडून काढले. मी त्याला पुष्कळ समजावून सांगितलें. उपदेशाचे अनेक मुद्दे त्याला उघड करून सांगितले. पण फारसी कवितेंत वर्णिल्याप्रमाणें ज्याचें नशीब काळें ठिक्कर झालें ते जमजम विहिरीच्या पाण्यानें अथवा स्वर्गातील अमृतसरोवरानें धुऊनहि पांढरें होऊं शकणार नाहीं. त्या हीन आणि दुष्ट माणसानें उपयुक्त गोष्टी आणि उपदेशाचीं वचनें हीं लक्षांत घेतलीं नाहींत. त्यानें विरोध पत्करला. आणि त्यावर अडून राहून मागें दुष्टपणें वागण्यास सुरुवात केली. त्याला भारी गर्व चढला होता. त्याला पुष्कळ उद्देशाच्या गोष्टी सांगितल्या. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. मुसलमानांचें रक्त वाहील, त्यांचा वध होईल, पण या गोष्टींचा त्याने विचारहि केला नाहीं. त्यानें असंख्य स्वार आणि पायदळ गोळा केलें. तोफा, जेजले, बाण, गजनाळ, रेहकले ही सामग्रीहि त्याच्यापाशीं बरीच होती. अनुभवी बंदूकची आणि कर्णाटकचे तफेची ( तर्फचे चालविणारे ) हे असंख्य होते. अनुभवी आणि शूर सरदार हे त्यानें चोहकडून बोलावून आपल्याजवळ आणले होते. त्यांना आपल्याबरोबर घेऊन आणि युद्धाची तयारी करून तो मजला मारीत आला. नंतर त्यानें आपल्या सैन्याची रचना केली. बहादुरखान त्याचा मुलगा आणि भाऊ दिलेरखान आणि सगळे अफगाण यांना उजव्या बाजूस ठेवण्यांत आलें. दिलावरखान आणि मुबारिजखानाचीं दोन मुलें हीं डाव्या बाजूस उभीं राहिलीं. गालिबखान, सय्यद अब्दुल्वहाबखान, किजलबाशखान, अरबबेगखान, मिर्जा महंमद बेगखान आणि फायकखान यांना मोठ्या सैन्यानिशीं आघाडीवर ठेवण्यांत आलें. त्याचीं तीन मुलें हीं मोठ्या पथकांनिशीं एलतमश म्हणजे आघाडीला लागून उभीं होतीं. अशा रीतीनें सैन्यरचना करून त्यानें औरंगाबादेहून चाळीस कोसांवर असलेल्या शक्करखेडा या स्थळाजवळ तेवीस मुहरम गुरूवार जुलूस सन ६ ( १ आक्टोबर १६२७ ) रोजीं युद्ध केलें. त्याचे अनुभवी सरदार आपले सैनिक, आणि कर्नाटकी बंदुकची यांना घेऊन वाघ आणि सिंह यांभोवतीं डुकरांनीं गर्दी करावी तसे आमच्या

शूर शिपायांभोंवती गोळा झाले. एक प्रहर आणि दोन घटिकापर्यन्त लढाई झाली. तोफा उडूं लागल्या. रूस्तुमप्रमाणें सैनिक तुटून पडले. त्यांनीं मर्दुमकीची शर्थ केली. प्रयत्नांत त्यांनीं कोणत्याहि प्रकारें कसूर केली नाहीं. युद्धाच्या प्रखरपणानें बघणारांचें डोळे दिपून गेले. परमेश्वर कृपेनें विजयसूचक वाऱ्यामुळें सत्यनिष्ठांचे ध्वज फडफडूं लागले. त्या दुष्ट जमातीचा पुढारी (मुबारिजखान) त्याचीं मुलें बहादुरखान, अमीनखान, गालिबखान, दिलेरखानाचा मुलगा खानजमान खान, अरबबेगखान व सय्यद अब्दुल्वहारबखान हे असंख्य सैन्यानिशीं नाश पावले. कुराणांतील वचनाप्रमाणें असत्याचा नाश हा होणारच. एका ठिकाणीं चार हजार सैनिक लढत होते. त्यापैकीं बहुतेकजण पायउतारा होऊन ढाल तल्वारी चालवूं लागले. ते सर्व मारले गेले. मैदानांत प्रेतांच्या राशी लागल्या. दोन हजार सातशें घोडे आणि दोन हत्ती मारले गेले. बाकीचे हातीं लागले. दोन हजाराच्यावर सैनिक जखमी होऊन मैदानांत पडले. बाकीचे मैदानाच्या चहूं बाजूला जखमी अगर मृत झाले. सारांश, फार कमी माणसें तेथून सुरक्षितपणें निघालीं. पायदळ शिपाई मारले गेले त्याच्याबद्दल काय लिहावें ! त्यांची गणति करतां येत नाहीं.

शहामतपनाह (शौर्यनिधि) बाजीराव, तहव्वुर दस्तगाह (वीरोत्तम) सुल्तानजी आणि जलादत इंतिबाह (शौर्यकर्मांचा मर्मज्ञ) पिलाजी यांनीं शत्रुचा नाश करण्यांत अप्रतिम कामगिरी बजाविली त्यांचे पराक्रम हे वास्तविकपणें आपल्या स्नेहाचे किरणच होत. त्यामुळें आम्हाला अतिशय संतोष झाला. हें उत्तम असें स्नेहाचें कार्य झालें. परमेश्वर घनिष्ट मित्रांच्या स्नेहकार्यांत यश देवो.

~~~~~~~~~~~~~~~

आलमगीर, दिपवाळी अं. इ. स. १९६१, पृ. ९६–१०४.

१७२४–५ इ. स. ] (–३४५–) [ शके १६४६

श्री

स्वस्ति श्रीमधुमारमणचरणरूहांतःकरणषट्कर्मपरायण वेदशास्त्रसंपन्न राजपूज्य विद्वद्‌गृहस्थवृंद शूर्पारकक्षेत्रस्थितेषु

स्नेहाभिषिक्त धर्माधिकारि ज्योतिर्विदुपाध्याय प्रमुखविद्वद्‌वृंद श्रीक्षेत्रस्थित-कृतानेकशांनतयः क्रमश आशीरायायः शमिहेषसित शिखि तिथ्यंत वरिर्वर्ति भावत्रक्रमाशास्महे विशेषस्तु. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन वर्तमान वीदीत जाले. तेथें लिहिले होते की परशुरामक्षेत्रिं माहाराष्ट्र व चित्तपावन व कऱ्हाटक ब्राम्हण आणिखि जवळ शेणवि व किरवंत व देवरूखे इत्यादिक वेदोक्तकर्माधिकारी अनेक जाती आहेत. त्यामध्यें माहाराष्ट्र व चित्तपावन व कऱ्हाटक या तिहीं जातीमध्यें परस्परें अन्नव्यवहार व पंक्तिव्यवहार परंपरागत चालत असे. इतर जातिमध्यें कोणाचे घरिं अन्नव्यवहार व पंक्तिव्यवहार नाहिं. ऐसें असोन सांप्रती देवरूखेयांनि मुद्गलभटां.
~~~~~~~~~~~~~~~

जवळ येउन अर्ज करून सांगितले जे चित्तपावन व कऱ्हाटक हे पूर्वी आमचें घरिं जेवित होते आणि पक्तिस हि घेत होते. त्यास आलिकडे दोनशा वर्षांपूर्वी अनंतभट्ट चितळे चित्तपावन ब्राम्हण हें मउजे वसणिचे तलें उपाशीत होते. तेथे नियत केल अइसा जे. ह्या मार्गे जाइल त्याणें एक पाटी माती खणोन तळ्याबाहेर टाकावी. आशियासि भानपुरू तेरा देवरूखा हा त्या मार्गे जात होता त्यास अनंतभटिं आज्ञा केली जे एक पाटी माती टाकुन जाणें. त्यास त्याणें अवज्ञा केली म्हणउन त्यास शाप दिल्हा. त्या पासुन उभयता आमचे घरिं जेवित नाहिं. तरी स्वामिनि आमचा अंगिकार करून आमचे घरिं जेवित असें केलें पाहिजे म्हणऊन विज्ञप्ति केलि. त्या नं(त)र राजेश्री मुद्गलभट्ट पंडितराय यांशि परशुरामक्षेत्रिंचि व्यवहारविचारणा विदित नसतां त्याचे वचन प्रमाण मानु(न) अजंम शिदियांशि अनेक पत्रें लिहिलिं ऐसे जे. हे देवरूखे उतम ब्राह्मण अंनव्यवहारायोग्य आहेत. आम्ही देशस्थ. तो यांचे घरि जेवितच आहों. तरि तुम्हीहि ते प्रांतिचे सारे ब्राम्हण मीळउन यांचे घरिं जेववणें. त्यास तेणें प्रमाणें दाभोळ व राजापुर यां दो सुभ्यांचें ब्राम्हण सारे मेळउन परस्परें मनास आणिता अनादिसिद्धि जेवित नाहिं असें चित्तात आणून अजम शिदिं ब्राम्हणास बोलिलें ऐसें जे आम्ही तुम्हास जेववावें तरि हाकिमिच्या बळें जेविलें असें दिसोन येतें. पंडितराव तों लिहितात जे ब्राम्हण उत्तम अन्नव्यवहारायोग्य आहेत. अशियांशि हा मुकद्दमा हिंदू महजबावरून फैसल होईल तर तुम्ही सारें ब्राम्हण सातेरेयास माहाराज राजेश्री छत्रपतिपाशि जाउन कजा चुकउन येणें. नाहिं तरी देशातुन जागाजागांचिं समंतपत्रें घेउन येणें. ब्राम्हण जे येथें कजिया चुकेल म्हणऊन बोलिले. त्याजवरून आम्ही चित्तपावन व कऱ्हाटक सारे सातारेयास हुजूर येऊन राजेश्रीस विज्ञप्ति केलि ऐशी जे. वेदमूर्ति मुद्गलभट पंडितराय यांहिं पत्रें पाठऊन आमास श्रमी केले. (धर्मास श्रमी केलें). तनिमित्य तेथें आलों. तरि माहाराजाहिं पडित मीळऊन धर्मशा(स्त्र)न्याय करून आमचा कजिया चुकविला पाहिजे. म्हणुन विनंति केलि. त्याजवरि माहाराज बोलिले जे मुद्गलभटिं पत्रें लिहिलिं ती बाष्कळ रद्द असेत. म्हणउन त्याच्या हातुन मुद्रांकित कागद लिहुन देविले आणि बोलिलें जे आपण ब्राम्हणजातीचा न्याय मनास आणित नाहि. तुम्ही आपल्ये क्षेत्रीं जाऊन पूर्वापर व्यवहार चालत असेल त्या प्रमाणें चालवणें असे बोलोन आम्हास निरोप दिल्हा. या नंतर आम्ही आपल्या क्षेत्रास जाणार तरि संमत्तपत्रें घेऊन गेलें पाहिजे. यास्तव तुम्हास पत्र लिहिले असे. तरि स्वामिनी शास्त्रावलोकन करून धर्मशास्त्रिची वचनें लिहुन संमत्तपंत्र पाठविणें म्हणऊन तुम्ही लिहिलें. तरि पत्रार्थ मनास आणिता भानपुरू तेरा यास अनंतभटिं येक पाटिं मृत्तिके करिता शाप दिला. त्याज वरून साऱ्या देवरूख्यांचे घरि चित्तपावन व कऱ्हाटक जेवीत नाहिं म्हणउन देवरूखे मुद्गलभट्टांजवळि बोलिलें. तर हे गोष्टि असंबद्ध दिसोन येत्ये. निमित्य जे ब्रम्हशापे करून वंशक्षय होतो. तर भानपुरूचा वंशक्षय तों जालाच. त्याचि संतति तों नाहिं, म्हणउन परस्परें लोक सांगतात. घरिं जेवित नाहीत व पंक्तिस येत नाहीत.

सबहिष्कार म्हणतात. शाप व बहिष्कार यांचा अर्थ येक होत नाहि हे तों सर्वांस विदित असे. यद्यापि भानुपुरूस बहिष्कार केला असतां तथापि जाचा अपराध त्यासच होइल जातिसी समंध काय असे याजवरून दिसोन येतें. जें हे पूर्वापारच अपांक्त आहेत असें असोन लटका व्यवहार करीतात हें सर्वास कळतच असेल. तथापि तुम्ही लिहिलें जे शास्त्रींचीं वचनें लिहोन संमतपत्र पाठवून देणे त्याजवरून अनेक पुस्तकें पाहोन धर्मशास्त्रींचीं वचनें लिहिलीं असत. त्याजवरून संशय दूर होइल. यास्तव या पत्रिं सिधातवचनें लिहिणें लागलिं येणें प्रमाणें धर्मशास्त्रें निशिद्धब्राम्हणवचनानि

॥ मत्स्यपुराणें ॥

त्रिशंकून्बर्बरानध्रांस्तथा द्रविडकेरळान् ॥
कुर्नाटकांस्तथाभीरान्कलिंगांश्च विवर्जयेत ॥

॥ सौरपुराणें ॥

अंगवंगकलिंगांश्च सौराष्ट्रान् गुर्जरांस्तथा ॥
आवंत्यान्मागधांश्चैव ब्राम्हणांश्च विवर्जयेत् ॥

॥ पद्मपुराणें ॥

अंगवंगकलिंगाश्च साल्वमाथुरमागधाः ॥
पाशाशामिरतौलाश्च चौलत्रिगुडसौपराः ॥
यमलावंत्यसौराष्ट्रा देवराष्ट्राश्च पाथिकाः ॥
यांदेका निगलाश्चैव सर्वे ते पंक्तिदूषकाः ॥

॥ यमः ॥

राष्ट्राः कामास्तथोन्मताः सर्वे ते पंक्तिदूषकाः ॥

॥ मनुः ॥

सद्भिश्च निंदिताचाराः स्वकर्मपरिवर्जकाः ॥
चतुराश्रमबाह्याश्च सर्वे ते पंक्तिदूषकाः ॥
यस्तेनः पतितः कलीबो ये च नास्तिकवृत्तयः ॥
तान्हव्यकव्ययोर्विप्राननर्हान्मनुरब्रवीत् ॥

॥ स्कांदपुराणे ॥

अन्येपि देवराष्ट्रीया देवराष्ट्रादुपागता : ॥
अपंक्तिया अयाज्याश्च गिरिकांतारवासिन : ॥

इति धर्मशास्त्रपुराणवचनैः देवराष्ट्राणां पंक्तिदूषकामस्त्येव अन्नव्यवहारस्य खपुष्पवदत्यंताभाव एवं ॥ देशाचारतोपि ए(त)द्देश्मनि अन्नव्यवहारो न श्रूयते ॥ तत्र देशाचारग्रामाचारकुलाचारस्यापि प्रामाण्यमस्ति ॥

॥ स्मृत्यर्थसारे ॥

सामयाचारिकाधर्मा ज्ञातिदेशकुलोद्भवाः ॥
ग्रामाचाराः परिग्राह्या येच विध्यविरोचनः ॥

इत्यनेन वचनेनापि देवराष्ट्रियांणां पंक्तिदूषणं निर्णितमिति दिक् ॥ पत्रलेखनार्थप्रमाणमवगम्य सर्वसंमतानि लिख्यंते शके १६४६ क्रोधी संवत्सरे संमतोंयमर्थ सवेषां ॥

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ९, पृ. १८--२१.

३१ मे १७२५ ] (-३४६-) [ अधिक आषाढ शुद्ध १ इंदुवासरे, रा. श. ५२

श्री

[ शिक्का ][1]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५२ विश्वावसु संवत्सरे अधिक आषाढ शुद्ध प्रतिपदा इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणीं वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशिवभट बिन लक्ष्मणभट उपाध्ये उपनाम अरवीरकर [ शिक्का ] [ शिक्का ] गोत्र शाकल्य सूत्र आश्वलायन यांसी दिल्हें वतनपत्र ऐसे जे. तुह्मी स्वामीचे परंपरागत उपाध्ये. तुम्हास स्वामीचा अभ्युदय दिवसेंदिवस अधिकोतर व्हावा हा तुमऱ्या पूर्ण निजध्यास. स्वामीस व स्वामींच्या राज्याचे कल्याण व्हावें यापेक्षां तुम्हास दुसरे अधिकोतर नाहीं. तुमचें सर्वप्रकारें उर्जित करून चालवावे हें स्वामीस परम आवश्यक. यास्तव ताा सातवें व ताा कोडोली प्रांत पनाळा यास दोन्हीं माहालचे नाडगौंडकीचें वतन दिवाणचे होते ते तुम्ही स्वामीचे कुलगुरू यास्तव स्वामी कृपाळू होऊन तुम्हास वंशपरंपरेने दिल्हे असे. माहाल २ दोन यास इनाम जमीन व हक्क लवाजिमा.

इनाम व पालक जमीन ती प्रतीची :

| ताा सातवें इनाम जमीन. | ताा कोडोली. |
|---|---|
| ७१० कसबा सातवे | ७२० कसबा कोडोली |
| ७५ मौजे आरळे | ७२० ऐतवडें खुर्द |
| ७७॥ मौजे मोहरे | ।। मौजे चिकुर्डे |
| ७५ मौजे काखे | ७६ मौजे कर्जवडे |
| ७१५ मौजे बोरपाडळे | ७१० मौजे जाखले |
| ७३ मौजे शहापूर | ७७॥ मौजे केखले |
| ७१५ मौजे मांगले | ७७॥ मौजे पोखले |

१. शिक्का-' प्रतिपश्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता। शंभुछत्रपतेर्मुद्रा रामसूनोविराजते.'

| | |
|---|---|
| ॥६॥ मौजे सावडें | ॥१२ मौजे मालें |
| ॥१० मौजे चरण | ॥६ मौजे गिरोली |
| ॥७ मौजे साळशी | ॥४ मौजे जाफळें. |
| ॥७ मौजे पिशवी | १। १० |
| ॥७॥ मौजे बोरीवडें | |
| ॥२॥ मौजे आवळी | |
| ॥१ मौजे भाडळें | |
| ॥४ मौजे जीऊर | |
| ॥४ मौजे नावली | |
| ॥४ मौजे अवटी | |
| ॥३ मौजे आंबवडें | |
| ॥३ मौजे पिंपळें | |
| १। | |

पाळक दर गांवास खासगत झेस १ एक व चाकराचें घर १ एक. कलम १

हक्क व लवाजिमा.

| | |
|---|---|
| हक्क दिवाण दस्ताचे आकारास रयत भागास दरसदे दोन रुपये २ | साळी व कोष्टी धनगर भागास साल्रीना रुके ... |
| जकाती विश्वा दर बैली भूस व मीठ व तंबाखू रुके २ | तेल्याचे घाणीयास दरमाहा तेल वजन ॥॥१ प्रो सालीना तेल ॥२: |
| दर बैली केणे ॥३ कापड व घोंगडी ॥६ | दर दुकानास सालीना रुके ·॥· |
| | पानाचे नगास पानें विडियाचीं सुमार १०० |

येणेंप्रमाणें सदरहू नाडगौंडकीचें वतनास इनाम गांवगन्ना दोन माहाली चावर २ दोन व पाळक दर माहाली दर गांवास खासगत झेस १ एक व चाकराचें घर १ एक. पालक व हक दिवाण दस्ताचे आकारास रयत भागास दरसदे रुपये दोन व साळी कोष्टी व धनगर भागास सालीना रुके चोवीस रुके व दर दुकानास सालीना चोवीस रुके व तेल्याचे घाण्यास दरमाहे तेल एक शेर प्रो सालीना तेल बारा शेर व पानाचे नगास पानें एकशें व जकाती दर बैली भूस व मीठ दोन रुके व केणे तीन रुके व कापड तंबाखू व घोंगडी सा रुके याप्रमाणें मोईन करून दिल्ही असे. येविषयीं अलाहिदा देशाधिकारीयास सनद सादर आहे. तरी तुह्मी वतनाची सेवा दंडकप्रमाणें करून हें नाडगौंडकीचें वतन तुह्मी व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनुभवून सुखरूप राहणें. निदेश समक्ष. [ शिक्का– ‘ मर्यादेयं विराजते ’ ]
तेरीख २९ रमजान सुा सीत अशरैन ( ३१ मे १७२५ )
बार सुरू सुद बार. रूजू.

धर्म, गुरूवार १४ सप्टेंबर १९०५, पृ. ७०८–७१०.

१३ डिसेंबर १७२५ ] (–३४७–) [ मार्गशीर्ष वद्य ५ सोमवार, रा. श. ५२.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५२ विश्वावसू संवत्सरे मार्गशीर्ष बहुल सप्तमी इंदुवासरे[1] क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी यांणी समस्त राजकार्य-धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बाजिराव पंडितप्रधान यासि आज्ञा केली ऐसी जे. राजश्री पंताजी सिवदेव हे पुरातन स्वामीच्या राज्यांतील येकनिष्ट सेवक. यांणीं कितेक राज्यांत श्रमसाहास केले. याकरितां याचे वंशपरंपरेने चालवणें स्वामीस अवश्यक जाणोन स्वामी कृपाळु होऊन प्रा कल्याण व भिवडी येथील सरमोकदमीचें वतन नूतन अजरामऱ्हामत करून दिल्हें आहे. माहाल बितपसील

सुभा प्रां कल्याण

७ मामले मुरंजन

१ ताा अंबरनाथ व कसबा कल्याण
१ ताा चोण व कसबे बदरापूर
१ ताा वरेडी व कसबा महमदापूर
१ ताा बोरेटी
१ ताा वजखल
१ ताा वाजे व कसबा पणवेली
१ ताा वावजे व कसबा तलोंजी

७

३ पाा नसिरापूर

१ ताा वोसरे
१ ताा बारणका
१ ताा वालास

३

५ पाा करनाले

१ ताा ओरवलीत
१ ताा तुगारतन
१ ताा बारापाड
१ ताा हबरापूर
१ ताा खाबीटे

५

सुभा प्रां भिबडी

मामले इसलामाबाद

१ ताा सोनवले व कसबा भिवंडी
१ ताा बाऱ्हे कसबा तिटवाले
१ ताा वासुंदरी
१ ताा सेरे
१ ताा अलेणी
१ ताा आप्पई व कसबा शाहापूर
१ ताा वांबले
१ ताा कुंद
१ ताा मुगांउ
१ ताा कोहोज
१ ताा मुरबाड
१ ताा कोरकडा
१ ताा पाउलबाऱ्हे
१ ताा राहोर

१४

१ बंदर कसबे भिवडी

६ जकातीचे माहाल

१ पाा डोइभाड
१ पाा वजरजोगी व वाकरवीरा
१ तलघाट अढपा

१. सप्तमीस इंदुवार नाहीं बुधवार आहे. पंचमी मूळांत असावी.

६ पा साकसें ऊर्फ पेण
१ पेण दिा कसबा
१ ताा वासी
१ ताा चिवणखल
१ ताा वाफरुल
१ ताा व्हतिसी
१ ताा दुगहवली
६

४ मीट बंदरे
१ बंदर पेण
१ बंदर कल्याण
१ बंदर पणवेल
१ बंदर तलोन
४
२९

१ तलघाट नाणा
१ तलघाट मालसेज
१ तलघाट चौढामढा
६
२१

४ जकातीचे माहाल
१ पा खोपोली तलघाट बोरघाट
१ विस्वा मुकाम चौक ताा वनखल
१ पा खरवडी घाट राजमाची
१ तलघाट सांवला
४

येणेंप्रो माहाल ३९ पसतीस व मीटबंदरे ५ पांच व जकातीचे माहाल १० दहा यो पनास यथील सरमोकदमींचे वतन वंशपरंपरेकरून दिल्हे असें. या वतनास हक लाजिमा इनाम वगैरे

हक रयत निा दुतर्फा आकार होईल त्यास दर सदे रुपये २

जकातीस दर गोणीस रुका १

इनाम जमीन वहित व पड दर चावरी चावरी बिघे दोन २

लाजिमा सेव धार पानमान तश्रीफ निशाण व वरकड काडबाब बाजे वतनदाराप्रमाणे केले ते

येणें प्रो हक दर सदे रुा दोन व इनाम जमीन दर चावरी बिघे दोन व जकातीस दर गोणीस रुका यक व बाजे काडबाब वरकड वतनदारप्रो करून दिल्हे असे. तरी हे वतन मशारनिलेस पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणें

या पत्राची प्रती लेहून घेऊन हे मुख्य पत्र भोगवटियास परतोन देणें. जाणीजे. बहुत लिहिणे तरी सुज्ञ असां. [ 'मर्या : दयंरा : जते ' –शिक्का ]

बार बार बार

भा. इ. सं. मं. त्रै. व. ६, अं. १–४, पृ. ९१ ते ९२.

१५ डिसेंबर १७२५ ] (– ३४८ –) [ मार्गशीर्ष वद्य ७ बुधवार, रा. श. ५२

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५२ विश्वावसू संवत्सरे मार्गशीर्ष बहुल सप्तमी रविवासरे[1] क्षत्रियेकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामीं याणीं देशमुख व देशपांडे माहाये प्रांत भिवंडी यासि आज्ञा केली ऐसी जे. राजश्री पंताजी सिवदेव हे स्वामीच्या राज्यांतील पुरातन यकनिष्ट सेवक याणी राज्यांत बहुत श्रमसाहास केले. याकरितां [ शिक्का ][2] [ शिक्का ][3] यांचें वंशपरंपरेने चालवणें अवश्यक जाणोन स्वामी कृपाळु होऊन यांस प्रां मारनिले सरमोकदमीचे वतन नूतन अजरामऱ्हामत करून दिल्हे आहे.

१४ मामले इसलामाबाद--

| | |
|---|---|
| १ ता सोनवले व का भिवंडी | १ ता वा( सुंदरी ) |
| १ ता बाऱ्हे का तिटवालें | १ ता सेरे |
| १ ता खांबलें | १ ता अलेणी |
| १ ता कुंद | १ ता अघई व का शाहापूर |
| १ ता मुगांव | १ ता बुरबाड |
| १ ता कोहज | १ ता कारकडा |
| १ ता राहोट | १ ता पाउलबाऱ्हें |
| ७ | ७ |

१ बंदर कसबें भिंवडी

६ जकातीचे माहाल

| | |
|---|---|
| १ पा डोईभाडी | १ तलघाट नाणा |
| १ पा वजरजोगी व टाकरवीरा | १ तलघाट मालसेज |

१. सप्तमीस रविवार नाही बुधवार आहे. रविवाराप्रमाणें चतुर्थी किंवा एकादशी येईल.

२. शिक्का—' श्री : राजा शाहु नरपती : हर्षनिधान बाजीराव : बल्लाळ प्रधान.'

३. शिक्का—' श्री : श्रीआई आदिपु : रुष श्रीराजा शाहु छत्रपति : स्वामी कृपानिधि तस्य : श्रीनिवास परशराम : प्रतिनिधि. '

१ तलघाट आढपा
—
३
—
२१

१ तलघाट चौढामढा
—
३

येणेप्राा माहाल चौदा व बंदर यक व जकातीचे महाल साहा मार येथील सरमोकदमी वतन करून दिल्ही असे. या वतनास हक रयत निा दुतर्फा आकार होईल.

... दर सदे दोनी रुपये २
जकातीस दर गोणीस रुका यक ८१

इनाम जमीन वहीत पड दर चावरी बिघे दोनी ८२
लाजिमा सेव धार पानमान तश्रीफ निशाण व वरकड काडबाब बाजे वतनदाराप्रमोंण कलम १

सदरहू प्रों नेमून दिल्हे. तरी तुम्ही हे वतन मार... पोत्रादि वंशपरंपरेने चालवणें. या पत्रची प्रत... ऊन असलपत्र भोगवटियास परतोन देणें. लेखनालंकार. [ 'मर्या: देयंरा : जते' –शिक्का ]

रूजु सुमत सां सुमंत मंत्री सरकार

बाद सुद सुरू सुद बार बार बार बार [ शिक्का– लेखन सीमा ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १–४, पृ. ९३–९४.

**२४ मार्च १७२६ ] ( – ३४९ – ) [ चैत्र शुद्ध २ शुक्रवार, शके १६४८**

श्री विद्याशंकर

श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्यपदवाक्यप्रमाणपारावारपारिणयमनियमासनप्राणा-[ शिक्का ][1] यामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टांगयोगानुष्ठाननिष्ठागरिष्ठितपश्चक्रवतर्यना-द्यविछिन्नगुरूपरंपराप्राप्तषड्दर्शनस्थापनाचार्यव्याख्यानसिंहासनाधीश्वरसकलवेदार्थप्रका-शकसांख्यत्रयीप्रतिपालसकलागमनिगमागमसारहृदयवैदिकमार्गप्रवर्तकसर्वतंत्रस्वतंत्रादि-राजधानिश्री विद्यानगरमहाराजधानिकर्नाटकसिंहासनप्रतिष्ठापनाचार्यभूरिवारिसांप्रदायपर-मादिवाराहदेवताराधकश्रीमद्राजाधिराजगुरूपृथ्वीधराचार्यतुंगभद्रातीरनिवासऋष्यशृंगपुर-वराधीश्वरविजयभवः ॥

श्रीमत्परमहंसयतंद्रिंप्रतिपालनाधारमतध्वंसारिमर्दनकर्षण्यमतस्थापनषड्गुणैश्वर्या-ढयसकलवेदार्थप्रसंगनिपुणहृदयवैदिकमार्गप्रवर्तनीयमचातुर्यमद्युपायांचितांगसिंहासनाधी

१. शिक्का—'श्री : विद्यालंकार'

कृतजिव्हाचातुर्यदर्शनगुणवत्कलाशेषफणितानिष्ठशंकराचार्यगुरूवरसांप्रदायपरशृंगेरीमठ-चारपद्मभद्रप्राप्तविद्यानगरपीठभाग्यसहितभव्यगुणसांद्रशंकरभारतेंद्राः ॥

श्लोक ॥ नानादुष्टनिवासभूमितल्पामज्जेतपाथोनिधौ ॥
॥ उद्धर्तुं जगदीश्वराषरवपुः संधारयचामतः ॥
॥ विद्या शंकरभारती तत्र सुधापृष्ठे भ्रमन्सर्वदा ॥
॥ ग्राम्याणां मुखमर्दनो विजयते ज्ञानांधकारापहा ॥

वर्षे चैव पराभवे गजयुगारार्तांक्ष्मासंमितं ॥ द्वीते चैत्रसिते गुरूप्रभुकुलै प्रश्नःकृतं सादर ॥ १ ॥ नत्वा शंकरमंत्रिकां गुरूवरं श्रेष्ठं जगन्मानितं ॥ विद्याशंकर-भारतीयतिवरो ब्रूते सभायां स्थितः ॥ २ ॥ मुंबापुरं समागम्य स्थितं वा कतिंचिद्दिनम् ॥ भिक्षार्थं वै समाहूतं प्रभूभिः स्वगृहं प्रति ॥ ३ ॥ शृंगेरीमठमध्ये तु ह्यस्ति सह्याद्रि-खंडकम् ॥ तत्र प्रभूकुलोत्पत्तिं पाठारीयातिविस्तराम् ॥ ४ ॥ सूर्यवंशोद्भवास्तावत्पाठा-रीयास्तु बाहुजाः ॥ षट्कर्मकारिणो विप्राः क्षत्रियास्तु त्रिकर्मणि ॥ ५ ॥ यजनाध्ययनं दानं सर्ववैदिकमार्गजम् ॥ इति सत्यमिदं वाक्यं विद्याशंकरभारती ॥ ६ ॥

The original of this Sammati Patra, which was in the house of the late Rajeshri Sundar Bawaji Navalkar, was given to the Prabhus on Thursday, the 2nd of Chaitra Shudha (March April), Prabhavanam Sawantsar 1648, (A. D. 1726).

The substance of this Sammati Patra is that in a question for representation being submitted to me by the Prabhu community, I Vidyashankar Bharati, the chief of the Saints, whom the world regard as their highest and most exaeted spiritual preceptor, after bowing to Shankar and Ambika, (the God and Goddess) speak while sitting in an Assembly as follows :—

When I visited the houses of several Prabhus at Bombay, for the purpose of receiving Bhikshya, (alms), I gave my indisputable opinion as follows: In the Shrungeri Math there is a work called Sahyadri Khand in which the origin of the Prabhu Caste is given in detail. Under the denomination of Pathariya, Born of the Solar Race, they are called Pathariya, or Bahuja, and while the Vipras (Brahmins) are entitled to perform Shatkarm, these Kshatriyas are entitiled to Tri-karm, namely; Yajaham, Dhyanam, Danam; all these are to be performed according to the Vedic Marg. This is the truth, which I Vidyashankar Bharati have spoken.

This Sammati Patra was given to the Prabhus on the day aforesaid. Afterwards a copy of the abovementioned eight chap-

ters of the Sahyadri Khand was sent to the Prabhus by His Holiness from his monastery of Shrungeri in the Madras Presidency.

प्रभुसेवक, मुंबई, व. १, अं. ४-५, नवंबर-दिसेंबर १९२२, पृ. ६-७.

३१ मार्च १७२६ ] (-३५०-)

श्री

[ शिक्का ][1]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५२ पराभवनाम संवत्सरे चैत्र सुध दसमी गुरुवासरे क्षत्रिये कुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी यांणी महमद अलद वलद सेख मैराज महमद वासी दिल्हे इनामपत्र ऐसे जे. तुम्ही स्वामीसनीध बहुत दिवस [ शिक्का ][2] [ शिक्का ][3] राहोन एकनिष्ठतेनें सेवा केली. याकरितां तुमचें चालवणें अवशक जाणून स्वामी तुम्हांवरी कृपाळु होऊन मौजे पिंपरी समत कोरेगांव प्रां वाई हा गांव तुम्हाकडे पेशजी मुकासा होता तो हाली तुम्हांस इनाम स्वराज्य व मोगलाई एकून दुतर्फा देखील सरदेशमुखी सावोत्रा व इनामतिजाई व हालीपटी व पेस्तरपटी कुलबाब कुलकानू खेरीज इनामदार हकदार तुम्हास तुमचे अवलादअफलादेस इनाम करून दिला असे. तरी तुम्ही मौजे मजकूर चतुःसीमा पूर्व मर्यादेप्रमाणें आपले दुमाला करून घेऊन तुम्ही व तुमचे अवलाद अफलाद अनभऊन सुखरूप राहाणें. लेखनालंकार [ शिक्का—'मर्या : देयं रा : जते' ]

रुजु सुरू समत सां सा. सुमंत मत्री सरकार

तेरीख ८ साबान सुा सीत अशरीन बार सुद्र सुरु सुद्र बार बार बार बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. २२५-२२६.

१७२६-७ इ. स. ] (-३५१-)

श्री

तहनामा राजश्री उदाजी पवार सुा सबा अशरीन मया व अलफ तेह प्रांत गुजराथ व माळवा

---

१. शिक्का—'वर्धिष्णुर्विक्रमै : र्विष्णो: सामूर्तिरिव : वामनी शंभुसुनो : रसौमुद्रा शिवरा : जस्य राजते :'

२. शिक्का—'श्री : राजा शाहु नर : प्रति: हर्ष नीधान : बाजीराव बल्ला : ल प्रधान.'

३. शिक्का—'श्री : श्रीआई आदि पुरु : ष श्री राजा शाहु छत्रप : ति स्वामि कृपानिधि : तस्य श्रीनिवास : परशराम प्रतिनिधि.'

(१) प्रांत मजकूरचा चौथाई व सरदेशमुखीचा येखतियार सर्व तुम्हावर दिल्हा असे. हुजूरुन राजश्री बाजी भिवराऊ तुम्हां समागमे दिल्हे आहेत. सिका रोखा कूच मुकाम त्यांचा. परंतु जे करणें ते तुमच्याच येखतियारें करावें. मुलकी तह–रह त्याणीं तुम्ही करावा. तुम्हांखेरीज त्यांस हरयेक विचार करावयासी प्रयोजन नाही. येखतियार तुम्हांवर. कलम १

(२) प्रांत मजकुरीं जो आकार जमा होईल त्यांत सरदेशमुखी व बाबती चौथाई दस्तूरप्रमाणें काढावी. उरला येवज दामाशाही गणी (गणती) प्रमाणें घ्यावा. शिबंदी तोफखाना व भांडियाच्या खर्च सदरहु उरला येवजावरी मोघम काढून उरला येवज गणतीप्रमाणें दामाशाही घ्यावा. मोकासी कोणी न म्हणावा. सारे जमेचा तह येणे प्रो. करावे. कलम १.

(३) दिवाणचे रुपये येक लक्ष बाबती सरदेशमुखीच्या येवजीं आधीं वारावें. कलम १.

(४) फौज हुजुरून येईल त्यास दामाशाही जास्ती आधीं दिवाणचा येवज वारावा. उरेल येवज त्याची दामाशाही द्यावी व तुम्ही घ्यावी. कलम १

(५) जेथे मुकासियाची ठाणीं बसलीं असतील तेथे बाबती व सरदेशमुखी काढून उरला येवज ठाणियाचे बेगमीस द्यावा. कलम १

(६) चौथाई सरदेशमुखी दिवाणचा येवज काढावा. त्यांत राजश्रीचे देणे वारून बाकी येवज राहील त्यापैकीं एक तक्षीम तुम्हांस सरदारीस दिल्हा. घेणे. दोन तक्षीमा आमचे सरदारीस द्यावे. कलम १

हीं कलमें सारी लिहिलीं आहेत. पैका मातबर मिळाला तरी येणेंप्रमाणें वर्तावें. पैका कदाचित् थोडा मिळाला तरी आधीं दीवाण वारावें. उरलें तें सर्वांनीं समजावें. दिवाणचा येवज न ये तांवरी रुो. कोणी शिबंदी रोजमरा व दारूगोळा शिवाय घेऊं नये. येकूण कलम १

मालव–साहित्य, इंदूर, व. ३, अं. ३–४. १९३२ इ. स., पृ. १७९–८०; भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १–२, पृ. ३९.

१७२६–७ इ. स.] (– ३५२ –) [सबा इसरीन

[फारसी शिक्का] [फारसी मजकूर]

करीना चाल देशपाडेपण भाऊपणियाची देहाये प्रत नेवासे सुरु सन मु॥ इ॥ मुल पुरूष दसखत व सिरपाव व सिरस्ता दप्तर देहात वगैरे बि॥

मूल पुरूष येक त्यास पुत्र २ दोघे तकसीमा बो सनद फर्मान व दिवानी २ सिरपाव दोन

वडील रामाजी देशपांडिये देहात निमे व इनाम येकराम निमे प्रथम सिरपाव व सिरस्त दप्तर १ येक. पुढें विस्तार जालियासी हिसे रसद देहात वाटणी बदभाऊ आपल्या हिस्याच्या गांवावर दसखतें करून हक इनाम घेत असेत. दप्तर सिरस्ता बो॥ सालें २ येके साली येकानें जमा ल्याहावी येकानें वसूल ल्याहावा. कागदपत्र दरबारी जाले तरी जमेवर व बाकीवर दसखात मोहगम देशपाडिये व वसलातीवर दसखत सालाच्या धाणीयाचे नावानें असे. दिवाणचा सिरपाव ज्ञाला तरी वडीलानें कचेरीस घेऊन घरी हिसेप्रमाणें वांटून द्यावा. साले सिरस्ता तकसीमप्रमाणें असेत.

धाकटे मुधाजी देशपांडिये देहात निमे व इनाम येकराम निमे सिरपवा वडिलामागे सिरस्ता दफ्तर दुसरें विस्तार जालियासी हिसेरसद देहात वाटणी बदभाऊ आपल्या हिस्याच्या गावावर दसखानें करून हक इनाम घेत असेत. सिरस्ता बो॥ सालें तपसील प्रमाणें सिरपाव याजपैकी वडील घर आहे. त्यानी दरबारी घेऊन सर्वास हिसेरसद भावास वाटून देत असेत. साले दप्तर तकशीमप्रमाणें असेत.

यादी वर्तनूक दसखत व दफ्तर देशपाडि वडील भाऊ व धाकटे भाऊ

वडील भाऊ दसखत मोहगम देशपाडियान म्हणोन दरबारी कागदावर करितो व दफ्तरें दोघाहि भावाची चालत आहेत या चालीचे प्रगणे

१ प्रा अंबड दफ्तरे सा चालत आहेत
१ प्रा पैठण
१ प्रा नेवासे
—
३
१ प्रा जाल्हनापूर दसखते मोहगम देशपाडियें व दफ्तर शामील
—
४

१ पाथरी तुमारी कागदावरते दसखत वडीलभाऊ मोहगम करितो. खालती दसखतें नांवाची पांचा जनांची होत आहेत. दफ्तरें ५ चालत आहेत.
१ प्रा पडदूर मूल पुरुष येक. त्याचे पुत्र तिघेजण तीन दफ्तरें चालत आहेत
१ प्रा नासीक
१ प्रा सिनेर
—
४

दसखते वेगळाली व दफ्तरें वेगळाली दोघाहि भावाची चालतात या चालीचे प्रगणे

१ प्रा राजणी
१ प्रा सेवली
१ प्रा अकोले

दसखते शामील दोघाचे नावची व दप्तरें शामील

१ प्रा दाभाडी मूल पुरुष यक विस्तार

१ प्रा सिदखेड मूल पुरुष येक त्याचे

४ चौघाच्या हि नावाची दसखते होत आहेत

७ कानुगो सुबे अवरगाबाद याचे दफ्तरच्या करीन्याबमोजीब प्रगणे दसखत शामील व दफ्तर सालबंदी प्रमाणे

१ प्रा रासीन

१ प्रा अष्टी

१ प्रा पाडिये पेडगौ

१ प्रा जामखेड

१ प्रा वांसी

१ प्रा बारसी

१ प्रा तांबसी

८

विस्तार दोघो दोघा जणाचीहि दसखते होत आहेत

१ प्रा चाकणे मूल पुरूष येक त्याचे पुत्र दोघे. याचा कजिया श्रीमंत कैलासवासी याचे वेळेस विल्हे लागला दोघा भावाची दसखते होत आहेत

२

१०

दसखत वडील भाऊ करीत आहे दफ्तर धाकटे भाऊ लिहीत आहे या चालीचे प्रगणे :

१ प्रा भोकर्दन

१ प्रा पाटोदे

१ प्रा रोशनगाव

१ प्रा लोणार

१ प्रा मेहकर मूल पुरूष एक याचे पुत्र तिघे

१ वडील भाऊ दसखत करितो

१ धाकटा भाऊ दफ्तर लिहितो

१ मधील भाऊ रेघ वाढितो

३

१ प्रा ब्राह्मणी

१ अकोटा

१ प्रा अडगाव

२ प्रा जांबूत जलगाऊ

१ प्रा पणज माहागाऊ

१ प्रा सुरजी अजनगाव

१ प्रा अबडापूर

७

प्रा बालापूर तालाद आलजपूर माहाल द्राहावीस. तेथे हि हे चाल आहे

या सिवाये सुबे खानदेश वराड प्रांतीचे हि माहालात चाल आहे. याचा शोध करून बखर पाहावा. प्रांत पुणे येथे हि चाल आहे

भा. इ. सं. मं., वार्षिक इतिवृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ९, पृ. १३१–१३४.

८ फेब्रुवारी १७२७ ] (-३५३-) [ फाल्गुन शुद्ध ९ गुरुवार

श्री

राजश्री सिवराव याची लिखित असे. रुजु.

श्री तीर्थरूप सकल सौभाग्यादि संपन्न मातुश्री बाई वडिलाचे सेवेसी अपत्ये सकल सौभाग्यादि संपन्न जिजाबाई साष्टांग दंडवत प्रणाम विनंति. अत्रत्य कुशल ता। फालगुण शुद्ध नवमी गुरूवासर पर्यंत वडिलाचे आसीरवादे करून वर्तमान येथास्थित असे. या नंतर वडिली आसीरवादपत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन आनंदाते पावलो. राजेश्री जगनाथ कचेस्वरबाबा श्रीदर्शन करून हाली वडिलाकडे आले आहेत. हे सविस्तर निवेदन करिता श्रुत होईल. वरचेवर आसीरवादपत्र येणे. वार्तिकासमवेत पाठऊन सांभाल केला पाहिजे. बहुत लिहिणे तरी वडील असा. हे विनंती.

~~~~~~~~~~~

भारत–सेवक, व. २, अं. १, आक्टोबर १९२८, पृ. १२.

१२ एप्रिल १७२७ ] (-३५४-) [ वैशाख शुद्ध २ बुधवार, शके १६४९

श्री

खरीदीखत शके १६४९ प्लवंग नाम सवछरे वैशाख सुा २ वार बुधवार ते दिवसीं राजश्री कान्होजी बिन तुकोजी आंगरे मो का। चाकण देशमुख प्रा। मजकूर यास हरजी बिन रामजी ठाकूर मोकदम मौजे पिंपरी बु।। प्रा। मजकूर सुा सन हजार ११३६ कारणे खरीदीखत लेहून दिल्हे ऐसे जे. मौजे मजकुरची निमे मोकदमीचे वतन आपले आपल्या आत्मसंतोषे सालगुदस्ता तुम्हास विकत दिल्हे. त्याचे खरीदीखत लेहून दिल्हे ते समई प्रा। मजकूरचे पाटील जे हजर होते त्याच्या शाहिदिया त्या खतावरी जाल्या. बाकी गावगनाचे पाटील व मौजे मजकूराचा कुलकर्णी व बलुते हजीर नवते, त्याच्या साक्षी जाल्या नाहींत. त्यास हाली प्रा। मजकूरचे पाटील वे बलुते आले आहेत. त्याच्या साक्षीनी पत्र करून देणे म्हणून तुम्ही सांगितले. त्यावरून आपण प्रा। मजकूरचे पाटील वगैरे आले होते त्यास हे वर्तमान सांगितलें. त्यांनीं तेविशई आपणास नसीहत केली की हरजी पाटिला वतन विकू नको. देशमुखापासून तुबा रूपये घेतले आसतील ते आम्ही अवघ मिळून देतो आणि खरीदखत सालगुदस्ता लेहून दिल्हे आहे ते हि मागून घेतो म्हऊऊन बहुता प्रकारे सांगितले. याच प्रकारें आपले गावीचा माहादाजी मोरेस्वर जोसी व कुलकर्णी त्यानी आपणास मसीयेत केले. परंतु आपल्या चितांत पहिलेच येऊन सालगुदस्ता आपण वतन मौजे मजकूरचे निमे मोकदमी मानपान वडीलपण होलीची पोली सिराल्सेट आदिकरून दिल्ही त्यासी
~~~~~~~~~~~

कांहीं नौदिगार होत नाहीं. आपण पेशजी खत करून दिल्हे आहे. हली तुमच्या साक्षीनी खरीदखत करून देतो म्हणून प्रा मजकूरच्या मोकदमास व मौजे मजकूरच्या कुलकर्णी यासी जाब दिल्हा. त्यावरून त्याची निशा होऊन हली हे खरीदखत लेहून दिल्हे आसे. मौजे मजकूरची निमे मोकदमी आपली होती ते तुम्हास दिल्ही आसे. तुम्ही आपल्या लेकराचे लेकरी निमे मोकदमी मानपान वडीलपण होलीची पोली सिरालसेट वडिलपणाचे मान समवेत वतनाचा उपभोग करणे. आपणास व आपले तर्फेचा कोणी आसेल त्यास आर्था आर्थी समंध नाही. आपली निमे मोकदमीचे वतन तुम्हास दिल्याची किंमत रुपये ७०० सातसे करार केले ते वारले. आपले रजाबंदीने करार होऊन आपण वतन तुम्हास दिल्हे आसे. आपला तक्षीमदार दताजी ठाकूर बिनं आमाजी ठाकूर निमेचा आहे. त्याचा तो अनभवील. निमे मोकदमी आपली. ते आत्मसंतोषे तुम्हास दिल्ही आसे. आपली काळी व पांढरी तुम्ही आनभवणे. आपले निमे मोकदमीचा इनाम तुमचे स्वाधीन केला आसे. तुम्ही आपला भोगवटा खाणे. आपला घरठाणा मोकदमीचा आहे तो आनभवणे व सेतेहि आनभावणे. हे खरेदीखत लेहून दिल्हे. सही. निा नागर.

बिा माहादजी मोरेश्वर जोसी व कुलकर्णी मौज मजकूर

साक्ष मौजे मजकूर

म्हावजी बिन गणोजी वाळीज चौगुले

सतमाहाल बिन आनमाहाला आरसा

राहूजी बिन बावाजी सुतार किकरे

संकरोजी बिन बापोजी चांभार

संताजी वा कान्होजी परीट मोगरी

आबा नाक बिन नाव नाक

एकनाक बिन खंड नाक एस

नाक बिन नावनाक महार

साक्ष प्रा मजकूर का मजकुर

आवजी बिन भानजी कद्व मोकदम का मजकूर.

संभाजी बिन जावजी नाईक भोसले नाईक वाडी १

आवजी नाईक बिन बगोजी नाईक भोसले नाईक वाडी १

थलकरी माळी व कुणबी

१ येसोजी बिन रायजी पठारे

१ खंडोजी बिन संतोजी नाणेकर

१ कान्होजी बिन बोलाजी खराबे

१ आबाजी बिन रखमाजी मेदिनकर

देवजी बिन रखमाजी पा मो निा नागर व जानो सिवदेव जोसी कुलकर्णी व गोमाजी बिन संतोजी आरगडे चौगुले

मौजे काळोस थलकरी मौजे मजकूर

१ येसाजी खैरा

१ सावजी पोटवडा

१ रघोजी वाटेकर

१ सयाजी भाडले

४

मौजे निघोजे सुभानजी बिन मालजी एलवढे मोकदम १

मौजे माहलुंगे

१ सिदोजी बिन तिमाजी पा माहा

१ विठोजी बिन मोत्याची बोकील
१ मावजी बिन खावजी खेडकर
१ बाळोजी बिन मालजी भुजबळ
१ रतन माळी बिन भिममाळी मेहतरे
१ पद माळी बित नागनमाळी सेवकरी

१७

राणोजी बिन सेटयाजी घाडगा
१ खंडमाळी बिन हरमाळी काटगा
१ बाप माळी बिन जान माळी खेडकर
१ राण माळी बिन मोतवाडी बिरतवडा
१ सुर्याजी बिन मोर माळी
१ कान्होजी गाडपिळा बलुते
१ सख जोसी वल्द कमल जोसी का मजकूर
१ तान्हाजी वलद दसमासी सुतार
१ पालाजी बिन लखूजी कुंभार
२ परीट
१ देवजी बिन रामजी परीट
१ सिवजी बिन जयेतजी परीट

२

१ बावजी बिन रायाजी लोहार
१ संत माहाला बिन जान माहाला
१ राणोजी बिन सटवाजी चांभार
१ माक्षाद नाक माहार
१ भिकाराम मौजे पिपले
१ त्रिंबकजी बिन माहादजी पा। वळेकर उमाजी जगताप
१ आवजी पा। बिन आपाजी बेंडभर
१ त्रिंबकजी व लको चौगुले

ढुंगेकर मोकदम
१ बि॥ सखो माणकेस्वर कुलकर्णी जोसी

२

मौजे आंबेठाण
१ रायाजी बिन जावजी पा। माडेकर मोकदम
१ बि॥ कुसाजी गोविंद जोसी कुलकर्णी मौजे बिरदवाडी
१ बहिरजी बिन मावजी कालडोके मोकदम
१ बि॥ सखो माणकेस्वर जोसी कुलकर्णी

२

मौजे कुरकुंडी देवजी बिन कान्होजी भोकसे मो(क)दम १
मौजे करंदी
१ मल्हारजी पा। टोकले
१ भिकाजी बिन एसाजी जखाते चौगुले

२

मौजे मलकर नामाजी वरपा चौगुले १
मौजे कोयेली
२ बावजी पा। कास्तर व सेकोजी कोलेकर
१ बि॥ गोविंद त्रिंबक कुलकर्णी व जोसी

मौजे वडगाव घेनंद रामजी वा। सुभानजी पा। घेनंद १
मौजे सेलगाव
१ चादजी बिन आमाजी पा। आवटी
मौजे कुरली गूणाजी बिन बागडा १

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. २५३-३५५.

१९ जुलै १७२७ ] (-३५५-) [ श्रावण शुद्ध १३ बुधवार, रा. श. ५४; ११ जिल्हेज, समान अशरीन मया अलफ

श्री

[ शिक्का ][1]

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंगनाम संवत्सरे श्रावण शुद्ध त्रयोदशी सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी याणी राजश्री मुक्तेश्वर गोसावी बिन्न आकण्णा गोसावी गोत्र अत्रि वास्तव्य मौजे कुरूंदवाड यांस दिल्हे इनामपत्र ऐसे जे. तुम्हीं धारूरचे मुक्कामीं स्वामिसन्निध येऊन विदित केलें कीं आपण [ शिक्का ] [ शिक्का ] कुटुंबवत्सल आहों. योगक्षेमास कांहीं उपजीविका नाहीं. आपले पणजे राजश्री थोरले मुक्तेश्वर गोसावी हे श्री एकनाथ स्वामींची कन्या गंगाबाईचे पुत्र. यांचें वृंदावन मौजे तेरवाड, प्रा रायबाग येथें आहे. तेथील पूजा उत्साह ब्राम्हणसंतर्पणादिकांची अनुकूलता होयसारिखें करावयासी महाराज धर्मपरायण आहेत. म्हणून तुम्हीं विदित केलें. त्यावरून मनास आणितां तुम्ही बहुत भले भगवद्भक्त गायनविद्येमध्यें अति निपुण तुमचे कुटुंबाचा योगक्षेम चाले व थोरले मुक्तेश्वर गोसावी यांचा वृंदावनमहोत्सव होय ऐसें केल्यानें स्वामीस परम श्रेयस्कर पाहोन स्वामीनीं यांस मौजे तेरवाड प्रा रायबाग सुभा प्रांत कोल्हापूर हा गांव पेशजीच्या मुकांशियाकडून दूर करून इनाम कुलबाब कुलकानू हालीपट्टी व पेस्तरपट्टी जलतरूतृणपाषाणनिधिनिक्षेपसहित खेरीज इनामदार व हक्कदार करून सर्वमान्य करून दिल्हा असे. येविशीं देशाधिकारियांस व ग्रामाधिकारियांस व बरकडांस अलाहिदा पत्रें सादर केलीं आहेत. तरी तुम्हीं मौजे मजकूर पूर्वील यादीप्रमाणें स्वाधीन करून घेणें आणि इनाम तुम्हीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनुभवून आपला योगक्षेम व वृंदावनीं महोत्सव ब्राम्हणसंतर्पणादिक सांग चालवून स्वामीचें व स्वामीच्या राज्याचें अभीष्ट चिंतून भगवद्भजन करून सुखरुप राहणें. जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब. ता ११ जिल्हेज सुा सन समान अशरीन मया व अलफ.

रूजू सुरू सूद बार बार

ग्रंथमाला, पु. क्र. १२, पृ. २-३.

२३ सप्टेंबर १७२७ ] (-३५६-) [ आश्विन वद्य ५ शनवार, रा. श. ५४.

श्री श्रीकृष्णजयराम

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंग नाम संवत्सरे अस्विन बहुल पंचमी मंद-

१. शिक्का—' श्री : प्रतिपचंद्ररेखेव : वर्धिष्णुर्विश्ववंदिता ॥ : शंभुछत्रपतेर्मुद्रा : रामसूनोर्विराजते ॥ '.

वासरे क्षत्रियेकुलावतंस राजा शंभु छत्रपती स्वामी याणी देशमुख व देशपांडे का निबसोड–माईणी सुभा प्रांत खटाउ यासि आज्ञा केली यैसीजे. राजश्री रुद्रमुनि [ शिक्का ][1] [ शिक्का ][2] संप्रदाय श्री स्वामी याचे मठाकडे अतीत अभ्यागत आन्न-छत्राचे आनकूलतेस मौजे वडगाव का मजकूर हा गांव इनाम सर्वमान्य पहिले पासून चालत आहे. त्याप्रमाणें पुढे ही सुरक्षित इनाम चालविल्याने स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याणावह याकरिता मौजेमजकूर श्री चे मठाकडे पेसजीपासून इनाम चालत आला आहे त्याप्रमाणे पुढे ही चालवायाची आज्ञा करून तुम्हास हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी तुम्ही हे जाणून मौजेमजकूर पुर्ववतप्रमाणे श्री चे मठाकडे इनाम सर्वमान्य चालवीत जाणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षप न करणे. या पत्राची प्रती लेहून घेउनु असल पत्र भोगवटियास परतोन देणे. निदेश समक्ष. [ शिक्का—मर्यादेयं विराजते ]

रुजु सुरनवीस बार सुरुसुद बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३१६.

२५ सप्टेंबर १७२७ ] ( – ३५७ – ) [ २० सफर, समान अशरीन मया अलफ

श्रीसुब्रराज

[ शिक्का ]

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री हिंदुराव घोरपडे सरदेसमुख ममलकतमदार ता मोकदमानी मौजे वडगाव करियात निमसड–मायणी सुभा प्रांत खटाउ सुहुर सन समान असरैन मया अलफ. राजश्री रुद्रमुनि संप्रदाय श्री स्वामीचे मठास अतीतअभ्यागतास अन्नछेत्राबद्दल पहिले पासून चालत आहे. हाली मौजे मजकुरची सरदेसमुखी इनाम करून दिल्ही आहे. मौजे मजकुरची खंडणी आकाराप्रमाणे सरदेसमुखीचा हक दरसदे रुपये १० दाहा प्रा बिलाउजुर देत जाणे. वरूश प्रतिवरुशी नवीन पत्राची आपेक्षा न करिता या पत्राची प्रती लिहून घेऊन मुख्य पत्र भोगवटियासि परतून देणे. छ २० सफर. पा हुजुर रुजु [ शिक्का—'लेखन मर्यादा' ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३१७.

---

१ शिक्का – श्री : राजा शंभु छ : त्रपति हर्षनिधान : रघुनाथसुत तिमा : जी पंडीत मुख्य : प्रधान.

२. शिक्का—श्री : श्रीआई आ : दि पुरुष श्रीराजा : शिवछत्रपति स्वामि : कृपानिधी तस्य प : रशराम त्र्यंबक : प्रतिनिधि .

३० सप्टेंबर १७२७ ] (– ३५८ –) [ २५ सफर, समान अशरीन मया अलफ

श्री

जयराम

छ माा अनाम देशमुख व देशपांडिये कर्योत निंबसोड माईणी सुभा प्रांत खटाव यासी जयसिंग जाधवराउ सेनापती जफतनमुलुक सुा समान अशरीन मयां अलफ. राजेश्री रुद्रमुनी संप्रदाय श्रीस्वामी यान्चे मठाकडे अतीत अभ्यागतास अन्न-छेत्राचे अनकुलतेस मौजे वडगाउ काा मजकूर हा गांव इनाम सर्वमान्ये हुजरून [ शिक्का ][1] पहिले पासून चालत आहे. त्याप्रमाणे पुढेहि इनाम सर्वमान्य पूर्वंतर जे उत्पन्न होत जाईल. ते गावास ताकीद करुनु पावीत जाणे. साल दर साल ताजे सनदेचा उजुर न करणें. या पत्राची प्रती लेहुन घेउनु असल पत्र . भोगवटीयासि पत्र परतुनु देणेंविशीं हुजरून राजेश्री स्वामीचे राजपत्र हि तुम्हास आलाहिदा सादर आहे. त्याप्रमाणे वर्तत जाणे. जाणिजे. रा छ २५ सफर.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३१६–३१७.

३ नोवेंबर १७२७ ] (– ३५९ –) [ मार्गशीर्ष शुद्ध १ शुक्रवार, रा. श. ५४

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंगनाम सवत्छरे मागशीर्ष सुध प्रतिपदा भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी मोकदमानी मौजे येकलारे ताा बेलापूर प्राा सगमनेर यासी आज्ञा केली ऐसी जे. मौजे मजकुर दरगा [ शिक्का ][2] [ शिक्का ][3] हजरत शाहा शरीफ पीर मुकाम आमदानगर यास इनाम देखील सरदेशमुखी राजश्री शाहु राजे याणी दिल्हा आहे. त्याप्रमाणें स्वामीनी इनाम सरदेशमुखी देखिल दिल्हा आहे. तुम्ही यासी रुजु राहोन सरदेशमुखीचा ऐवज पीरजादे याकडे वसूल देणे. या सनदेची तालीक लेहोन घेऊन असल सनद भोगवटि-यास पीरजादे याजवळी परतोन देणें. निदेश समक्ष [ शिक्का—‘ मर्यादेयं विराजते. ’]

रुजु सुरनवीस सुरु सुद बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १८४.

१. शिक्का—‘ श्री : शंभु छत्रप : ति चरणी दृढभा : व सेनापति ज : यसिंग जाधवराव.’

२. शिक्का—‘ श्री : राजा शंभु छ : त्रपति हर्षनिदान : रघुनाथसुत तिमा : जी पंडीत मुख्य : प्रधान.’

३. शिक्का—‘ श्री आई आ : दि पुरुष श्री राजा : शिध छत्रपती स्वामि : कृपानिधि तस्य प : रशुराम त्र्यंबक : प्रतिनिधि.’

६ नवंबर १७२७ ] (–३६०–) [ मार्गशीर्ष शुद्ध ४ सोमवार, रा. श. ५४

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंगनाम सवत्सरे मार्गशीर्ष शुध चतुर्थी इंदुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री सुभेदारानी व कारकुनानी सुभे लष्कर व कमावीसदारान व बाजे यांसि अज्ञा केली ऐसी जे. मौजे [शिक्का][1] [शिक्का][2] यकलार परगणे संगमनेर हा गाव दरगाह हजरत शाहा शरीफ पीर मुकाम आमदानगर यासी इनाम आहे. तेणेप्रो स्वामी करार केले असे. तरी तुम्ही मौजे मजकुरास मुजाहीम न होता कोणेविसी उपसर्ग न देणे. ताकीद असे. जाणिजे. निदेश समक्ष. [शिक्का 'मर्यादेयं विराजते'].

सुरु सुद्र बार रुजु सुरनवीस

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १८३.

जून-जुलै १७२७ ] (–३६१–) [ जिलकाद, समान अशरीन मया अलफ आषाढ

हिसेब जमा यैवज सरकार विद्यमान्य राजश्री पंताजी सिवदेव सुहुर सन समान आसरीन मया अलफ माहे जिल्काद ऊर्फ आषाढ मास यकूण जमाई रुा

४६०० राजश्री पंत प्रधानपैकी

१५०० गुा रामजी नाईक

३१०० गुा बालाजी आनंत

४६००

५०० यादो सामराज माम+पैकी यैवज रसद घेतली आसे

१३५७३ कर्जे गुजराथ सावकाराचे आशाढ... ...

१९०० राजश्री स्वामी पैकी पाा सुमेरगिरी गोसावी

२०० वासुदेव खराट

२०० मोरो आनंत

३०० नानाजी रघुनाथ

१. शिक्का—'श्री : राजा शंभु छ : त्रपति हर्षनिदान : रघुनाथसुत तिमा : जी पंडीत मुख्य : प्रधान.'

२. शिक्का—'श्री आई आ : दि पुरुष श्री राजा : शिव छत्रपती स्वामि : कृपानिधि तस्य प : रशुराम त्र्यंबक : प्रतिनिधि.'

१०९७३ गुा बालाजी आनत
३००० गाहाण गुा रामजी
७९७३ गुा बालाजी पंत
४००० किता
८०० आतवा भिडे
४०० बलिरामगीर
१०२५ जान शकर
५०० किता
१२४८ सुमरेगीर

७९७३

१०९७३

२३५७३
४० चिटको नीलकठ चिटनीस

१३६१३
५० यशवंतराव माहादेव खाजगींपैकीं साल मजकूरचे दर माहे पैकी

१८७६१
खासी खर्च येणेप्रमाणें रुपये
१८६७२।= देणे व्याजपैकीं गुा गोसावी राम
२१५० भजमनगीर
२२३१ तीर्थगीर
२००० भगवंतगीर
२१४ शामगीर गोसावी
२६६ कमलगीर
२५० धरणगीर
९०० गंगागीर
६०० सरुपगीर
३०० सुरतगीर
२००० रुपपुरी पुसेसावलीकर
५० बालैजती
५२८ रुपपुरखुर्द
१२५ नदुगीर गोसावी
२५४ मुरलीगीर

३० संभुगीर
२००० +णगीर
१५०० +चमाणपुरी
४० +मानगीर
२२८४।= बसवंतगीर
१०० कृपाराम
२१८४।= किता
२२८४।=
४०० बलिरामगीर गुा
बालाजी आनत

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १-४, पृ. ९५-९६.

११ फेब्रुवारी १७२८ ] (-३६२-) [ ११ रजब, समान अश-रीन मया अलफ

श्री

राजश्री देशाधिकारी वर्तमान व भावी पा नासीक गोसावी यासि

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो चिमणाजी पंडित प्रधान सुहूरसन समान असरीन मया व अलफ. राजश्री मोरो मल्हार हे राज्यांतील पुरातन सेवक. या निमित्य यांस इनाम मौजे मोहू पा मजकूर हा गाव पूर्वीपासून वंशपरंपरेने दिल्हा आहे. त्याप्रमाणे हालीं करार असे. तरी तुम्ही मौजे मजकुरास ताकीद करून पेशजी-प्रमाणे सुरलीत मारनिलेकडे चालवणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन हे पत्र भोग-वटियास देणे. जाणिजे. छ ११ रजब. आज्ञा प्रमाण. [' शिक्का—लेख : न सीमा स : मुल्लसति ' ] [ शिक्का— श्री : राजा शंभू छ : त्रपति हर्ष निदा : न दामोदर-सुत चि : मणाजी पंडित : मुख्य प्रधान.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १-२, पृ. १०५.

११ फेब्रुवारी १७२८ ] (-३६३-) [ फाल्गुन शुद्ध १३ रविवार, रा. श. ५४; ११ रजब समान अशरीन

[ शिक्का ][१]

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ५४ प्लवंग नाम संवत्सरे फाल्गून शुध त्रयोदसी भानुवासरे क्षत्रीय कुलाबतंस श्री राजा छत्रपति स्वामी यांणी राजश्री मोरो मल्हार

१ शिक्का— ' श्री : प्रतिपश्चंद्ररेखेव : वर्धिष्णुर्विश्ववं : दिता संभुछत्रप : तेर्मुद्रा राम-सूनो : र्विराजते.'

उपनाम मेडजोगी गोत्र कौशीक यांसी दिल्हे इनाम पत्र ऐसे जे. तुम्ही स्वामीच्या [शिक्का] [शिक्का] राज्यांतील पुरातन वडिलवडिलांपासून हा कालर्यंत येकरूप निष्ठेने सेवा करीत आहा तुम्ही स्वामीसंनीध विनंती केली कीं राजश्री शाहूराजे यांणी मौजे मोहू पा नाशीक हा गांव इनाम करून दिल्हा आहे व ता कर्यात मावल येथे आपले वतनाचे गांवी निमे चावर जमीन दिल्ही आहे. माहाराजानी कृपाळू होऊन सदरहूप्रमाणें सनदा सादर करावयास आज्ञा केली पाहिजे. म्हणूत तुम्ही विदित केलें. त्यावरून मनास आणितां तुंम्ही पुरातन सेवक. तुमचें चालवणें स्वामीस परम अवश्यक. यास्तव स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन तुम्हास इनाम कुल बाब कुल कानू हालीं पटी व पेस्तर पटी जल तरू पाषाण निधि निक्षेपसहीत खेरीज हकदार व इनामदार करून इनाम मौजे मोहू पा बिघे

।· मौजे वडगाव बु॥

ता कर्यात मावल पैकी नाशीक सरकार संगमनेर हा गाव देह

८१॥ मौजे वारंजे

८१॥ मौजे वडगाव खुर्द

येणेप्रा गाव येक व जमीन बिघे चावर निमे याप्रमाणे तुम्हास इनाम दिल्हा असे. अलाहिदा सनदा आहेत. तरी तुम्ही सदरहू प्रा इनाम गाव व निमे चावर जमीन इनाम तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभवणें. निदेश समक्ष-

[शिक्का-'मर्यादेयं विराजते']

तेरीख ११ रजब सुहूरसन समान अशरीन.

रुजू सुरु सुद बार बार

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १-२, पृ. १०५-१०६

६ दिसेंबर १७२८] (-३६४-) [१५ जमादिलावल, तिसा अशरीन मया अलफ

[शिका]

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ता मोकदम मौजे भिवडी ता करेपठार प्रात पुणे सुा तिंसा आसरेन मिया आलफ. मौजे मौजकूर खडोजीं भिताडा चाकर सरकार याणे सेत केले आहे. पीक होऊन गोला करून ठेविले आहे. त्यासी तुम्ही कटकट करिता म्हणून हुजूर विदीत जाहले. तर खडोजी मजकूर चाकर सरकारचा आहे. त्यासी सेत वतनात दिल्हे आहे. तर तुम्ही खडोजी जवल कटकट सर्वथा न करणे. दाणे यासि नेऊ देणे. कज... ..करणे कजिया आसिला तर हुजूर...मौजे मजकुरी कजिया न करणे. खडोजी मजकुरास सेत मळून दाणे नेऊ देणे. फिरोन बोभाटा येऊ न देणे. जाणिजे. १५ जमादिलावल पा हुजूर. [शिका-'लेखन सीमा']

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ५४-५५.

१८ दिसेंबर १७२८ ] (–६६५–) [ २७ जमादिलावल, तिसा अशरीन मया अलफ

मो अनाम देशमूख देशपांडे कसबे कासेगांव यांसि श्रीनिवास परशुराम [ शिक्का ][1] प्रतिनिधि सुहुर सन तिसा अशरीन मया अलफ. हरिभक्तपरायण राजश्री श्रीधर गोसावी बिन ब्रह्मानंद गोसावी गोत्र वशिष्ठ सूत्र वाजसनेई वास्तव्य श्रीक्षेत्र पंढरपूर हे बहूत थोर सत्पात्र यांचे चालविलिया राज्यास श्रेयस्कर असे जाणून मौजे टाकली तो मजकूर पेशजीच्या मुकाशियाकडून दूर करून हालीं कुलबाब कुलकानू देखील हाली पट्टी व पेस्तर पट्टी सर्वस्व देखील इनाम तिजाई इनास दिल्हा असे. तरि मौजे मजकूर चतु:सिमापूर्वक हदे प्रमाणें दुमाला करून पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवित जाणे. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे. या पत्राच्या प्रती लेहून घेऊन अस्सल पत्र भोगवटियासि परतोन देणें. छ २७ जमादिलावल. निदेश समक्ष.

विविधज्ञानविस्तार, पु. ४५, अं. १ जानेवारी १९१४, पृ ९.

इ स. १७२८ सुमार (–३६६–)

श्री एकविरा अंबा प्रसन्न

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री विठ्ठलराव देवाजी दिवाण साहेब शहर बडोदे प्रांत बडोदे गुजराथ स्वामींचे सेवेसीं :— पोष्य गोविंद रामाजी व रंगो आत्माजी प्रभू वैद्य देशकुलकर्णी व गांवकुल्कर्णी तपे कानदखोरें प्रांत मावले कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. उपरि. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असले पाहिजे. विशेष आपली स्वारी इकडे मावळ प्रांती आलियावरि आम्हांसीं विचारिले जे : आपले वाडवडिलीं मोठा पराक्रम केला व मोठ मोठ्या मोहीमा केल्या असें आम्हां कांहीं लेखांतरीं व तोंडी सांगण्यावरून समजते. तरी आपल्या वडिलांनीं कोणकोणत्या ठिकाणावरी मोहिमा करून गड कोट व गांव जित केले व पूर्वी महाराजांस व जांब्रास उपयोगी पडले ही हकीकत श्रुत व्हावीं ऐसो बहुत इच्छा आहे. तरी वाडवडिलांच्या कीर्तीचा करीणा सविस्तर लेहून पाठविला पाहिजे म्हणून स्वामींनीं आज्ञा केलीं. त्यास मागील करीण्याची माहिती आम्हीं कागदांपत्रीं अस्सल यावरून व वाडवडिलांनीं आपले मुखें सांगितल्यावरून हकीकती निवेदन करितों जे बितपशील:

आपल्या सर्व कायस्थ प्रभु ज्ञातीचे राहण्याचे ठिकाण अयोध्यापुरी होती व तेच स्थळीं आपले वाडवडिल राहात असावे. पूर्वापार राजेरजवाडे आपले ज्ञातीचे

१. शिक्का :– ‘ श्री आई आणि पुरुष : श्री राजा शाहू छत्रपति : स्वामी कृपानिधि तस्य : श्रीनिवास परशुराम : प्रतिनिधि. ’

होते व सर्व कुले षड्गुण ऐश्वर्य संपन्न ते प्रांतीं रहिवास करीत होती. त्या प्रों आपले गोत्रीची विंझाेदेवी ते नगरीं आद्यापि आहे. अस्तुः आपली ज्ञाती ते स्थलीं सुखक्षेम रहिवास करीत असतां म्लेच्छानें बहुत ताप दिला. त्यामुळें आपली ज्ञाती तो मुलूख सोडून जिकडे तिकडे पळूं लागली. ऐशा समयांत आपले वडिल कोंड प्रभु पळून दक्षिणेंत आले. त्यावेळीं कोंड प्रभु हे अल्पवयी होते. त्यांनीं एका मराठी बादशहाचे पदरी सरदारापाशीं ओळखी पाहून चाकरी पत्करिली. त्यावेळीं महमदशाह पादशाह तक्तावरी होता. त्याचे कारकीर्दीस त्याचे सरदारांनीं गनीमाई केली व दक्षिण मावळ प्रांत फते केला. तेव्हां कोंड प्रभूचा आधार तुटून ते अल्लाउद्दीन हुसेन पादशहाकडे गेले व तेंथेही नोकरी पत्करिली. कोंडोबा तो फार नाणावले ब्राम्हणीवरी शत्रूंनीं जमाव करून चाल केली. अशावेळीं कोंड प्रभूनीं जिवाकडे न पाहातां उपयोगी पडले असें मनांत आणून पादशाहाहीं (नीं) बोलाऊन नेऊन शाबास केली व परगण्यांतील देह ३३ तेहतीस येथील देशकुलकर्णी व गांवकुलकर्णी व इनामती व इसाबती हक्क लवाजिमे गांव सेते पालपालणुकी (पाळपाळणुकी) वगैरे असे करार करून दिल्हे. नंतर कोंडोबांना फर्मोविल्याप्रमाणें दिवाण जफूराई करूं लागले. कोंडोबांनी आपल्यास कुटुंब चउईल नामक अधिकारी कायस्थ प्रभु क्षत्रियाची कन्या केली होती. तिचे पोटीं विसोबा नांवाचे पुत्र जाले. कोंड प्रभु एकसें (शे) पांच वर्षांचे होऊन मृत जाले. ऐसी वडिलवाणी आहे. कोंडोबा मृत जालियावरि विसाजी कारभार करूं लागले. त्यावेळीं त्यांस मातुलपक्षाकडून पुष्कळ मदत होई. पुढें कालगतीने विसाजी मृत जाले. त्यांसी पुत्र गोविंदराव होते. जाल्याबरोबर पादशाई दिल्लीवर जाली. ऐसियासमयीं बेदर (रीं) नवीन पादशहा बसला. त्याणी गोविंदरावांस बोलावून नेले व करीणा विचारून मागील इनाम चालविण्याची रजा फरमाविली. दिल्लीचा बादशहा बाबरशाह मृत जाला. ते समंई हामाई (हुमायून) तख्तावरी बैसला. त्यासी गनीमांनीं हाकलिला. ऐशावेळीं वय बरेच होऊन होऊन गोविंद प्रभु मृत जाले. गोविंद प्रभुस वडील तिमाजी, दुसरा कोंडो प्रभु व धाकटे माहादजी प्रभु ऐसे तिघे पुत्र होते. त्यापैकीं महादजी प्रभूचे नक्कल जाहले व तिमाजी व कोंडाजी प्रभु राहिले. गोविंदराव निवर्तल्यावर त्यांचे वडील पुत्र त्रिमलराव कारभार करूं लागले. त्रिमलराव बहुत सुतें होते. त्यांणीं उत्तम रितीनें दिवाण गफूराई चालविली. पादशाही बहुत चांगली. त्यांनीं त्रिमलास बोलाऊन नेऊन मौजे विंझर तपे कानदखोरें इनाम करार दिल्हे व पत्रही करून दिल्हे व त्याची तालिक आहे. अस्सल पत्र वाळूनें खाहें. त्रिमलराऊस कालगतीनें कालानें गांठलें. त्यांस पुत्र रूद्राजी प्रभु होते. ते पूर्ववत् वडिलवृति चालवूं लागले. पुढें खानाचे राज्य मातले. फार राज्यांत कंथला पडली, त्यामुळें आदिलशाई कुतुबशाई, निजामशाई, बरीदशाई ऐसी पादशाई जाली. आदिलशाई व निजामशाई ऐसी मावळ प्रांत वांटला गेला. का...रूद्रोबास प्राप्त जाला. त्यांणीं बाजी दुसरे तिमाजी तिसरे बालाजी ऐसे तिघे पुत्र. पों वडिल बाजी व तिसरे

बाळाजी यांचे बहुत जाले. तिमाजी राहिले. तिमाजी लहानपणापासून मोठा शूर असे. घोड्यावर बसणें, गोफीण मारणें, दांडपटा खेळणें वगैरे शूरत्वाच्या कला त्यास उत्तम येत असत. वडील निवर्तल्यावर तिमाजीसीं पादशाही बोलाविले. तिमाजी ठाणीयास गेले. करीणा सांगितला व अभयपत्र चालवणुकीचे दिलें. ते घेऊन दिवाण गफुराई करूं लागले. यवनीं जाच बहुत जाला. त्यामुळें मनांत बहुत ताप पावले व ऐशिया दुष्टाचे राज्यांत राहणें हित कैचे. परंतु ज्याचे अन्न खादले त्यास इलाज कोण ऐसे वाटो लागले. तो करनाटकी शाहाजी भोसला विजापुरचे पादशाहाची चाकरी करीत होता. त्यास जाधवाचे कन्येचे पोटी शिवनामें शूभू अवतारिला. पुत्र उत्पन्न जाला होता. त्याणीही लहानपणापासून दांडपट्टा खेळणें, घोडीवर बसणे, गोफीण मारणे वगैरे कला साध्य केल्या होत्या. त्यास आपले राज्य असावें हे यवन नजरेंत नकोत असें वाटों लागले. परंतु या कामास कोणी हुशार माणूस मदत कराल तरच हे काम होईल. एरवीं ते न होई. असे मनांत आणून तलासी लागले. तों तिमाजी प्रभूचा तलास लागला. तिमाजीस बादशहानें राईर परगण्याचे मालक केले आहे व त्याचे प्रांती कांहीं गडकोटही आहेत. तरी त्यांसच आणवावें असें सांगोंन बाजी पासलकर यांस पाठविलें. बाजीनें तिमाजीकडे हे वर्तमान विदित केले. तिमाजीस ती गोष्ट मानवली व प्रथम तोरणा किल्ला फते करून देतो व लोक मदतीस देतों असें वचन देऊन बाजीस रवाना केलें. महाराजांस वर्तमान सांगते जाले. ऐकून फार कुशल जाले. नंतर तिमाजीने तपे कानदखोरें येथील गांव-गन्नाचें लोकांची सल्ला केली व लोकांचा जमाव घेऊन महाराजांचे जमावाशी मिळाले. गडावर चाल केली. वरील किल्लेदारास मुकरा केला व तोरण किल्ला शके १५६८ (१६४६–७ इ.) च्या सुमारास हस्तगत करून घेतला. त्यावेळीं तिमाजीची बहुत वाहवाई जाली व माहाराजांनीं शाबास शाबास म्हणून ऐसी आज्ञा केली कीं मदत करा. धामधूम करून तमाम परगणा एक करूं आणि तुमचें उतरोत्तर चालऊं. पुढे फत्ते केलिया किल्याची दुरूस्ती करण्याचें काम चालविलें. त्यांत खणीत असतां मोहरांचे हांडे सापडले व पादशाही खजीना होता तो लुटून आणिला व दोन लक्ष होन पोत्यास जमा केले. महाराजांनीं तिमाजीस आज्ञा केली जे :– तुम्ही हाच किल्ला सांभाळून राहणे. आम्ही बोलावूं तेव्हां तुम्ही यावें. आपण केली गोष्ट पादशाहास कळली तर फौजा येतील. तरी तुम्ही येथें हजार माणूस घेऊन अलग नोबत चौकी पाहरा करून राहणें. ऐसी आज्ञा जाली. त्याप्रमाणें केलियाची व्यवस्था करून राहिले. माहाराजांस द्रव्य सांपडल्यामुळें आपणही किल्ला बांधावा असें मनांत आणून तिमाजी प्रभूस बोलाऊन विचार केला जे :– मुरूमदेवाचे डोंगरी किल्ला बांधावा असें ठरविले. नंतर आज्ञेने मोरो त्रिंबक पिंगळे टिपणीसीचे कामावरी राहावे असे ठरविलें व तिमाजी त्या कारखानिया देखरेख करूं लागले. दिनसु शुद्धा पाहून काम सुरूं केलें. काम सुरळीत चालले. माणसे पायांत जिता घातली. त्यांचे वंशीकांस वतने करून दिली. तिमाजीने आणली (आंखणी

करून पद्मावती सुवेळा व बालेकिल्ला अशी बांधणी केली. ऐसें काम चालले असतां किती एका खानाच्या झुंडा येत असत. परंतु त्या कामीं इ( वि )श्वासराव प्रभु यांची योजना केली असल्यामुळे कामास व्यत्यय आला नाही. विश्वासराव बहुत शाहाणेसुर्ते व कावेबाज असत. काम शेवटास गेले. आणखीही मावळीचे कोंडाणा, पुरंदर, सुपे परगणा वगैरे हस्तगत करून घेतले. ही बातमी बादशहासी गेलीयावरी पारपत्य करण्याकरितां आबजुलखान आला. त्यास शिवाजींनीं वागनखीं मारिला. या कामीं विश्वासराव तिमाजी बाळोबा चिटणीस असें होते. त्यानीं युक्ति लढवून शिवाजीकडून खानासी मारिला. या उपरि बादशाहासी बातमी गेली जे :– पुंडाने ऐईके अबजुल मारिला. ऐसीयासी बादशाही बहुत ताप येऊन रूस्तुमज( मान ) खान शके १५८२ ( १६६०–६१ इ. स.) चे सुमारास पाठविला. तो आल्याची वार्ता तिमाजीस लागतांच पांचशे लोक किल्यावरी ठेऊन पांचशे लोक बरोबर घेऊन खालीं आले. तो स्वामि पुण्यास होते. तिकडेच खान जात आहे ऐसी बातमी लागतांच तिमाजी आडवे होऊन युद्ध प्रसंग केला. व दुसरेही सरदार आज्ञेनें येऊन त्याणी व यांणी एक होऊन खानासी विजापुरपर्यंत पिटाळून लाविलें व तेथपर्यंत खंडणीं घेतली. ऐसा पराक्रम करून तिमाजी प्रभु परत आले. त्यावेळीं महाराजांनी शाबास शाबास करून वाटेल तें मागा ऐसी आज्ञा केली. तिमाजीनें ऐसें उत्तर दिधले जे :– पादशाही देणगी चालवावी म्हणजे आम्हांसही पुरें आहे. दुसरें स्वामीनी द्यावें असी इच्छा नाहीं. ऐसें ऐकून पूर्वीची बादशाही वृत्ति चालवावी याबद्दल आज्ञा जाली. पत्रें दिधलीं. अशा प्रकारें पराक्रम करीत असतां जहरतीनहबु मुस्तफाखानु मदत खानु खाला यांणीं व हजरती सुलतानु महमदशाह पादशाह विजापुर यांणीं व त्यांचे तर्फे सुभे हजरती औरंगाशाह पादशाह व बाहादुरशाह पादशाह व कचकंटखानु साबताखानु मोंगल यांणी तळकोंकण व मावळ प्रांत हस्तगत करून माहालानिहई ( निहाय ) किल्हेई ( निहाय ) देशपरगणे यांत धामधुम करून किल्ले कोट जित केले होते. त्यांच्या फौजा खाली करण्याकरितां माहाराज छत्रपति स्वामि यांणी आज्ञा माहालनिहाईचे देशमुख देशकुलकर्णी यांसी जाली. त्या समागमें तिमाजीसही आज्ञा जाली. त्यांणीं मावळ्या लोकांचा जमाव करून मोगलांचा पराभव केला. तिमाजी घोड्यावरी स्वारी ठेऊन एक सारखे धूम करीत चालले. त्यांनीं पन्हाळ्यावरील झेंडा चढविला. तेथें अलग नौबत व चौकी पहरा ठेऊन प्रतापगडी येऊन सर्व मोगलांस धांवतां भूमि थोडी ऐसी सरी केली. या लगबगींत सीमारहित एक तारी केली. त्यावरून माहाराजेसाहेबीं आपलें वडील यांस इनाम देऊन पादशाई ५००० पांच हजाराचें इनाम गांव व जमीनी दिधली आहेती व पत्र शाबासकीचें करून दिधले ते आम्हां पो गोविंद रामाजी यांजकडे आहे व तालीक रंगो आत्माजी यांजकडे आहे. अशाप्रकारें पराक्रम करीत असतां हजरती औरंगजेबशहा पादशहा निजामशाई वगैरे सुभे यांणीं आणखी किल्लेकिल्ला खाना करून परत घेतले व शामळानें तोही धामधूम चालविली. यासी शिवछत्रपति माहाराजांनीं

आज्ञा केलीजे :– गनीम निवळावा. त्यावरून तिमाजी प्रभु यांणी ५००० पांच हजार मावळे लोक जमविले व त्या लोकांशिवाय आणखी १००० एक हजार लोक पाहिजेती. तेविसीं (विषयीं) स्वामींची निकड लागली व पैसाही पदरी घातला. त्यामुळें ते लोक मोठे प्रयासीं मिळविले. लोक १५००० पंधरा हजार मिळविले. परंतु लढाई तो पावेतों घेईनात. तेव्हां लोकांसीं तिमाजीने असा करार केला की तुम्हीं दरमहा रूपये १० घेऊन व माहाराजांकडून इनाम व दुमाले करार करून देऊन किल्लेकिल्ला बेहेडे भरून देऊं. ऐसी समजूत घातली. त्यावरून तो धीर वाटून लोक तयार जाले व त्रिमलराऊ बहुत शाहाणे त्यांनीं १५००० पंधरा हजारांचा जमाव करून स्वारी सिध्ध (द्ध) केली. तिमाजी प्रभु व वडील आपाजी दुसरा रूपाजी तिसरा पिलाजी ऐसे तिघे पुत्र होते. त्या प्रों वडील आपाजी व धाकटे पिलाजी हे दोघे मोठे शूर होते व त्यांचा सजणाजी नानाजी व त्याचे पुत्र व्यंकाजी सजणाजी विसाजी गोजईही मोठें पराक्रमी होते. तिमाजी प्रभूने पंधरा हजारांचा जमाव केला. त्यामध्यें त्यांचा वडील पुत्र आपाजी व धाकटे पिलाजी व सजणाजी नानासी व विसाजी गोज ऐसे होते. त्यांणी बहुत लगट करून तापी तीराचे मुक्कामी चाल केली. किल्लेकिल्ला परीघ घातले. येथें जाऊन किल्ले कोट जित केले व शत्रूचे सैन्याचा फडशा उडविला. मागे लागीं तो मुलखी पिवळिले. ऐशा धामधुमा फळींत हातघाई चालली असतां कित्येके सरदारांचीं डोकीं उडविली. मागे लागून महमद पठाण समशेर उपसून तिमाजीवर पांचशे ५०० स्वारांनिशी धाडकन आला. तेव्हां ५० शिपाई मावळे बरोबर घेऊन हरहर महादेव म्हणून लगट केली व पठाणासीही मुकरार केला. त्याचा घोडा छाटून काढिला. या लढाईत एक लाख माणूस पाईचें होते. ऐसी नवद तोफा होत्या. या लढाईंत तिमाजी प्रभु यांणी एक सीमारहित केली. त्याबद्दल शाबास शाबास सर्व सैन्यांत जाली. याप्रमाणें पराक्रम करून तिमाजी जय पावले व पुढें शिवाजी महाराजांस कैलासवास जाल्यावर त्यांचे वडील पुत्र संभाजी महाराज यांस मोगलानें धरून नेले. त्यावेळेस शिवाजीचे धाकटे पुत्र राजाराम महाराज यांस चंजीचें मुक्कामीं राज्याभिषेक करण्याचें कामांत आमचे वडील आपाजी तिमाजी व पिलाजी तिमाजी व सजणाजी नानाजी व विसाजी भोज प्रभु यांणी धनाजी जाधवराऊ या समागमें एकनिष्ठेनें सेवा केली व पूर्वी तांब्राचे कारकीर्दीपासून महाराज कारकीर्दीपर्यंत मजकूर जेजे प्रभु जमीयेदारांनीं केलेला पराक्रम व श्रमसाहस स्वामिकार्यानिमित्य केले तेही ध्यानीं आणून राजश्री राजाराम महाराज छत्रपति स्वामि यांणीं आम्हांवरी कृपाळू होऊन इनाम जमीनी चावर च्यार तर्फ कानदखोरें माहाली जल तरू तृण काष्ट पाषाण निधि निक्षेप सहित दरोबस्त इनाम करार करून दिला. त्याच्या सनदा शके १९ श्रीमुखनाम संवत्सरे सुा सलाल तिसैन (इ. स. १६९३–४) करून दिल्या आहेत त्याप्रमाणे त्यांचे वंशज राजश्रीं छत्रपति स्वामि यांणीं वंशपरंपरेने कित्येक पराक्रम ध्यानी आणून शके ४५ विलंबी नाम संवत्सरे १७१९ इ. स. सात किल्ले साताऱ्याचे

मुक्कामीं इनाम चावर च्यार पूर्वी प्रमाणें करार करून देऊन आह्मांकडे भोगवटा चालवावया व त्याप्रमाणेंच कैलासवासी शंकराजी नारायण व नारो शंकर सचीव यांणी सन तिसा अशर मया अलफ (१७१८-९ इ. स.) सालीं सिंहगड मुक्कामीं व पुरंधरचे मुक्कामीं सुा ईहिदे अशर मया अलफ[1] सालीं माहाराज आज्ञेप्रमाणें इनाम करार देऊन दुमाले पत्रें करून दिधलीं आहेती. ते आम्हाकडे इनाम जमीन चावर दोन व आमचे निमेचे तक्षीमदार सजणोत्रा व विसाजी गोज प्रभु यांजकडे इनाम जमीन चावर दोन यो च्यावर ४ च्यार जमीन जल तृण काष्ट पाषाण निधि निक्षेप सहित दरोबस्त माफीने चालविणेची महाराज यांची आज्ञा आहे तेणें प्रों आमचे वडिलोपार्जित वंशपरंपरेनें चालत आले व त्याचीं पत्रें माहाराज व सचीव यांची आलाहिदा आम्हांजवळ आहेत. त्यावर शके ५४ प्लवनाम संवत्सरे (१७२७-८ इ. स.) या साली धाकटे संभाजी महाराज छत्रपति स्वामि यांणीं स्वामिकार्यानिमित्त मूळ कोंड प्रभु पासून वंशपरंपरेनें केलेले श्रम साहस ध्यानीं आणून व पूर्वी आमचे पूर्वज तिमाजी गोविंद प्रभु यांसीं पादशहा कृपाळु होऊन मौजे विंझर तर्फ कानदखोरें हा गाऊ दरोबस्त इनाम करून दिधला होता ऐशा करीण्यापासून व आमचे कामीं बहुत श्रमसाहस केलें ऐसें पाहून पादशाहाहीं जो विंझर गांव इनाम दिला होता तो आमचे पूर्वज व्यंकाजी सजणाजी प्रभु यांचें नांवें देह १ येक दरोबस्त इनाम कुलबाब व कुलकानु हली पटी पेस्तर पटी तरू पाषाण निधि निक्षेपसहित खेरीज हकदार व इनामदार करून इनाम गांव दिला होता. तो धुमाकुळीमुळें चालत नव्हता. तो सर्व वंशीयांचे परंपरेनें पूर्वमर्यादेप्रमाणें चालविणेंसाठीं चालता केला. याप्रमाणें आमचे वडिलोपार्जित करीणा होत आला तो आपणांस श्रुत होण्याकरितां हें विनंतिपत्र लिहिलें आहे. कळावें बहूत काय लिहिणें कृपालोभाची वृद्धि असावी हे विनंति. छ ५ माहे रमज्यान.

सहविचार, व. ४, अं. ४, फेब्रुवारी १९२६, पृ. १६१-१७४.

२६ जानेवारी १७२९ ] (-३६७-) [ माघ शुद्ध ८ रविवार, रा. श. ५५

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५५ कीलक संवछरे शुध अष्टमी भानुवासर

---

१. अशर बरोबर असेल तर १७१०-११. परंतु तेथें अशरीन असावे.- म्हणजे १७२०-२१ इ. स. येईल.

[ शिक्का ][1] ] शिक्का ][2] क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी यांणीं देशमुख व देशपांडे कर्यात कासेगांव प्रांत माण यांसि आज्ञा केली येसीजें. हरिभग(क्ति) परायेण राजश्री श्रीधर गोसावी बिन ब्रह्मानंद गोसावी उपनाम घोडके नाझरेकर गोत्र वसिष्ठ सूत्र वाजसनी हाली वास्तव्य क्षेत्र पंढरपूर हे भले थोर सत्पात्र. याचे चालविल्या स्वामीस श्रेयस्कर येसे जाणुन स्वामी याजवरि कृपाळु होऊन मौजे टाकळी कर्यात मजकूर हा गाव पेशजीच्या मुकासेयाकडून दूर करून हाली कुलबाब कुलकानु व इनाम तिजाई देखील हालीपट्टी व पेस्तरपट्टी जलतरुतृणकाष्टपाषाण निधि निक्षप आदिकरून खेरीज हकदार व इनामदार यासि याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें नूतन इनाम करून दिला असे. तरि तुम्ही मौज मजकूर चतुःसिमापूर्व मर्यादेप्रमाणे याचें दुमाला करून यांसि व याचे वंशपरंपरेने इनाम चालविणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप व करणे. य. पत्राची प्रती लिहून घेऊन हे पत्र भोगवटियास गोसावियाजवळी परतोन देणे. जाणिजे. लेखनालंकार [ शिक्का– ' मर्यादे : यं राजते ' ]

रुजु समत सा सा सुमंत मंत्री सरकार बार सुद सुरु सुद बार

विविधज्ञानविस्तार, पु. ४५, अं १, जानेवारी १९१४, पृ. ८-९.

३० जानेवारी १७२९] (– ३६८ –) [माघ शुद्ध १२ गुरुवार, रा. श. ५५

श्री.

[ शिक्का ][3]

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५५ कीलक संवत्सरे माघ शुद्ध द्वादसी गुरुवासरे क्षत्रीयेकुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपती स्वामी याणी वेदमूर्ती राजश्री वीरेश्वरभट व [ शिक्का ][4] [ शिक्का ][5] मोरभट बिन त्रयंबकभट उपनाम चीत्रांव गोत्र कौसीके सूत्र अश्वलायेन वास्तव्य कसबे पुणें यासीं दिल्हे इनामपत्र ऐसेजे. तुम्हीं सातारीयाचे

---

१. शिक्का :– श्री : राजा शाहु नरपति : हर्षनिधान बाजीराव बल्लाळ : प्रधान

२. शिक्का :– श्री आई आदीपुरुष : श्री राजा शाहु छत्रपति स्वामी : कृपानीधी तस्य श्री निवास : परशुराम प्रतिनीधी.

३ शिक्का– श्रीः वर्धिष्णु विंक्रमै : विंष्णोः सा मूर्तिरिव : वामनी शंभुसुतो : रसौ मुद्रा शिवराः जस्य राजतेः

४ शिक्का– श्रीः राजा शाहुन : रपती हर्षनिधानः बाजीराव बल्लालः प्रधान.

५ शिक्का– श्री आई आदिपु : रुष श्रीराजा शाह : छत्रपती स्वामी कृपा : नीधी तस्य श्रीनी : वास परशुराम : प्रतिनीधी.

मुकामी हुजुर स्वामी संन्नीध घेऊन विनंती केली कीं आपले आजे गणो गब्राजी यासी निजामशाहा पातशायानी पा मजकुरीं गांवगना ईनाम जमीन दिल्ही बितपसील —

| मौजे येन्हवडे | | मौजे देहूपैकीं बाग जमीन बागा |
|---|---|---|
| सेत पाचुद प्रज पदमाजी राम | कुरण सेत नदिकिनारे महसूल व नख्तया | जाव माली देखील महसूल व नख्तयाती व सेव व बाजेबाब |
| होनप रकम च्यार खंडी साडे आठ कुडो | ती व नख्त कटुबन रकम टके बत्तीस | व पायेपोसी कुलबाब व अंबराई वगैरे पेड तीर व |
| ४। ३॥ | ३२ | बाजे झाडोरा यो बाग १ |

येणेंप्रमाणें वंशपरंरेने इनाम देऊन पत्रें करून दिल्हीं त्याप्रमाणें इनाम अनभवीत आले. त्या अलिकडे माहाराज राजश्री कैलासवासी थोरले स्वामी यांणीं पूर्वील पत्रें मनास आणून सदरहूप्रमाणें ईनाम करार करून देऊन पत्रें करून दिल्हीं आहेत. त्याप्रमाणें स्वामींनी पत्रें करून देऊन चालवावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणून. त्यावरून मनास आणितां तुम्हीं थोर सत्पात्र तुमचें वंशपरंपरेने चालविलीया स्वामीस स्वामीच्या राज्यास श्रेयकर जाणून स्वामी तुम्हावरी कृपाळु होऊन सदरहुप्रमाणें ईनाम कुलबाब कुलकानु दो हालीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार करून ईनाम करार करून दिल्हा आहे. तरी तुम्हीं सदरहू ईनाम चतुःसीमापूर्वक आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरे अनभवून सुखरूप राहणें. जाणीजे. लेखनालंकार. [शिक्का— 'मर्याः देयं राः जते']

रूजु सुरूनवीस संमत सुमंत सा मंत्री सा सरकार बार सुद सुरूसुद बार बार बार बार

भा. इ. सं. मं. व. त्रै. १, अं. २–३. पृ. ३९–४०.

१९ जुलै १७२९ ] (–३६९–) [श्रावण शुद्ध ५, शके १६५१; ३ मोहरम, जुलस ११ फ. स. ११३८

खरीदखद शके १६५१ सौम्य नाम संवत्सरे श्रावण शुा ५ तेरीख ३ माहे मोहरम सन ११ जलूसवाला मुताबीक सन ११३८ फसली व संवत १७८५ ते दिने खरीद कर्दै, बनाम राजश्री उदाजी वलद संभाजी पवार पाटील मोकदम मौजे मलठण प्रांत कर्दै सरकार जुन्नर सुभे खुजिस्ते बुनियाद औरंगाबाद यांस फरोक्त कर्दै. बईसुबाई सुबा औरत नंदलाल वलद नाधू इब्न मानसिंग व मानकचंद वलद दुर्गादास इब्न् लालजी वलद ब्रस (हस) केसो (ब्रस) दास वलद व बकस् इबन् कुवरजी चौधरी मंडलोई देसमुख सरकार मांडो सुबे माळवे आकि आपले वतन बमोजिब असनाद पेशीन सुदामद मामूल चालत आले आहे. दहु वी क र आपला हाल अहवाल

बसबब नादारी व शिकस्त लहवाली मुलें परागंदा व्हावें. यास्तव वतन मजकूर बमोजिब तपशील जेल तुम्हांस विक्रीत निमें बरता आबद रुपये ५००० पांच हजार तुम्हां जवळून घेऊन वतन निमे तुम्हांस विक्रीत करून दिली आहे. तर जो वतनाचा हक्कलाजिमा बमोजिब मामूल तपशील जेल आहे त्याची जे पैदायश होईल त्या पैकीं निमे तुम्हीं घ्यावी व निमे आपण घ्यावी व हकमाकडून व इतराकडून शिरपाव व पान व मान व विडा व टिळा व दसखत वगैरे आधी तुमचें व मग आमचे याप्रमाणें आपण वतन तुम्हांस विक्रीत करून दिले आहे. वतनाचा हक्क लजिमा जो पैदा होईल तो निमे तुम्हीं व निमे आम्हीं घेऊन हकम वगैरेची चाकरी दोघामिळून करावी व जो आमचे वौशात पैदा होईल आणि या फरोक्त खतास इजा हरकत करील तो पिताजात नाहीं व बावा व शेर शरीफ व पंचाचा गुन्हेगार व गोताचा अन्यायी असे. वतनाच्या सनदा ज्या आम्हाजवळ होत्या त्याच्या नकला बमोहर शरियत पुन्हा तुम्हास दिल्हा असेत. हक्क लाजिमाचा तपसील जेल.

तपसील जेल

परगणा जात दरोबस्त महाल

परगणात रुजु अमली

परगणे हवेली बमय कसबा फिले परगणे जहांगींरपूर देह ११ महाल १
देह ११ महाल १ परगणे दिगठाण देह ६५ महाल १
परगणे नालछा देह ५ महाल १ परगणे अमगोर रुजु फुला
पुरगणे चेमटा देह ३९ महाल १ मानपुर देह २७ महाल १
परगणे हसलपूर देह २८ महाल १ प्रो मानपुर देह २८ महाल १
प्रो धार देह १७०महाल १ प्रो अमझरा देह २०० महाल १
प्रो जामली देह ८४ महाल १ प्रो हिंडोला देह ८४ मा १
प्रो मासडे देह १७५मा १ प्रो बाग देह ६४ मा १
प्रो बडोदा देह ४० मा १ प्रो गंधवाणी देह ८५ मा १
प्रो धरमपुरी देह १३ मा १ प्रो महेसर देह ८० मा १
प्रो धरगाव देह ३८ मा १ प्रो कन्हीबागोद देह ५७
प्रो घाबोद देह ५७ मा १ पैकी निमे देह २८॥ मा १
कन्ही देह २८॥ बाकी देह २८॥ प्रो मनावर देह १४ मा १
मा १
प्रो लवाणी देह ३०० मा १

गेर अमली मवास

प्रो बडवाय १ प्रो आलीदेह १९० मा १ मौजे वढवानी मौजे बरखेड प्रो मोसडे देह देह १ १

मौजे ग्ररखेडा देह १ प्रो काटकुद १ प्रो सेलानी देह १ प्रो मदरानी १

प्रो ढोरखेडा १ मौजे राजपुर १ मौजे लिमनपुर १ सत्वास १

मानधाता १ जेतपुर १ कोटखेडा १

इनाम दर परगनात

इनाम देह........ .... ....... ..............परगनात खानगी

प्रो महेसर अज मौ बरवेल १ प्रो धरगांव अज मौ जामली १ मांडव १ जहांगीरपूर १ मानपुर १

प्रो कन्ही अज मौ करवंदा प्रो ब्रापोद अज मौ बसलगाव या तिन्ही परगण्यांत जमीदारी व मोकदमी ब्रिलकुली आपली असें. यात दर सद्दे रुपये ७। आपली असे. निंमे तुम्ही घेणे व निमे आपण वेऊं

× × × ×

सदरहु प्रमाणें खरीद खत लिहून दिले आहे. या तपसीलाप्रमाणें तुम्ही आपल्या पुत्रपौत्री कमावीस करून भाजीचे पान देखील जो लवाजीमा वतनामुळें येइल तो निमेनीम घेत जाणें. यास कोंणी आपले वंशीचा हक हरकत करील तो हकमाचा व शेर शरीफचा व पांचाचा गुन्हेगार व गोताचा अन्यायी असे. हे खरीद लिहून दिल्हे आहे ते सही व अस्सल सनदा आम्हांजवळ आहेत. वक्त जरूरी दरकार जालियाने असल सनद दाखवीत जाऊं व पेशकस वगैरे खर्च दरबार जो बसेल तो ब्रमोजिब हिस्से रसद देऊं.

भा. इ. सं. मं. त्रै. व. ९. अं. १, क्र. ३३, पृ. ५९–६१.

२१ जुलै १७२९ ] (– ३७० –) [ ५ मोहरम, सन ११३९

श्री

ता। मोकदमानी मौजे वांकी बुद्रुक पा। चाकण सु॥ ११३९ मालूम दानद की मौजे मजकूर जागीर व फौजदारी व जिल्हेदारी कुलबाब कुलकानू तनखा सरकारतर्फें वेदमूर्ति महाराज राजश्री कन्चेश्वरबावा यांस दान दिल्हा असे. जोंवरि सरकारांत जागीर बहाल आहे तोवरी तनखा दिल्हा असे: तरी तुम्ही हमेशा मशारनिलेसीं रूजू होऊन कुलकैफियत दखल करून साल वसाल सुरळित वसूल वेदमूर्तीकडे देत जाणे. सरकारच्या अमीलांस व जमीदारांस ताकिदी सादर केल्या आहेत. ते अजार देणार नाहींत. सरकार निसबतीनें नजर वगैरे पटिया अथवा स्वारीशिकारी जाली तरी घासदाणियाचा उपद्रव तुम्हास लागणार नाहीं.

दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणे. ताकीद असे. जाणिजे. रा छ ५ माहे मोहरम. सरकारांतून कुलबाब कुलकानू गांव वेदमूर्तीस दान दिल्हा आहे. तरी जो आकार होईल तो कुली याजकडे वसूल देणे. जाणिजे. दुसरियास एक दामदीरम न देणे. जाणिजे.

श्रीसरस्वतीमंदिर, वर्ष ८, अं. ११-२, क्र. ४५-६ माघ-फाल्गुन शके १८३०, पृ. १७.

१९ सप्टेंबर १७२९ ] (-३७१-) [ २ रबिलावल, सलासीन मया अलफ

श्री

तहनामा सुा सलासीन मया अलफ छ. २ रबिलावल.

साल मजकुरीं गुजराथ व माळवा येथील दिवाणचे रुपये २,२५,००१ सवादोन लक्ष येक द्यावे. वरकड जे मिळेल ते राजश्री चिमणाजी बलाळ व राजश्री उदाजी पवार व राजश्री मल्हारजी होळकर यांनीं गणतीवरी तकसीमप्रमाणें वाटून घ्यावे. हर किराज कारण प्रसंगास खर्चवेंच पडेल तो समायिक काढावा. दिवाणच्या पैका आधीं काढून राहिला एवज तो फौजेवरी गणतीवरी वाटून घ्यावे. कलम १.

आंवदाचा अमल बैसल्यावरी पेस्तर सालीं येणेंप्रमाणे वर्तावे जे निमे गुजरात व निमे माळवा मुकारत आपला. त्यापैकी निमे राजश्री चिमणाजी बलाळ व निमे राहिला त्या पो दोन तकसीमा उदाजी पवार व एक तकसीम मल्हारजी होळकर येणेंप्रमाणें वांटून घ्यावे आणि मोकासे स्वो (खेरीज) बाबती सरदेशमुखीचा अमल सुरळीत चालवावा. कलम १

सदरहूप्रमाणे तहनामा दिल्हा असे. त्याप्रमाणें उभयतांनीं चालावे. छ २ रबिलावल. आज्ञा प्रमाण. [ शिक्का- लेखन सीमा ]

[ शिक्का— 'श्री : राजा शाहू नरपति हर्षनिधान बाजीराव बल्लाळ मुख्य प्रधान' ]

माळव--साहित्य इंदुर, व. ३, अं ३--४, इ. १९३२, पृ. १८१-१८२.

११ एप्रिल १७३० इ. स. ] (-३७२-) [ वैशाख शुद्ध ५ शनवार, रा. श. ५६; ३ सवाल, सलासीन मया अलफ

श्री

[ शिक्का ] [१]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५६ साधारण नाम संवत्सरे वैशाख सुद पंचमी

१. शिक्का- 'श्री : वर्धिष्णु विक्रमै : विष्णो सामूर्ति रिव : वामनी शंभु सुनो : रसौ मुद्रा शिवरा : जस्य राजते.

मंदवासर क्षत्रियकुलवंतस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी वेदमूर्ती राजश्री कन्चेश्वर भट बिन सिधेश्वर भट ब्रह्मे उपाध्ये कसबे चाकण यांसी दिल्हे वृत्तीपत्र ऐसे [शिक्का][1] [शिक्का][2] जें तुम्हीं स्वामीसनीध कसबे उंबरेजेचे मुकामी विनंती केली जे सके १६०७ क्रोधन नाम संवत्सरी (१६८५ इ. स.) पर्जन्न मुतलक गेला. यां निमित्य किलेदार व फौजदार याणी देशमुख व देशपांडिये व मोकदम देहाये पा मजकूर यांसी सांगितलें कीं पा मजकुरी पर्जन्य गेला या कारणें कसबे मजकूरचे व पा मजकूरचे समस्त ब्राह्मण मेळऊन अनुष्टान करून पर्जन्य पडे ऐसी गोष्टी करणें. त्यावरून समस्त ब्राह्मण मेळउन आकरा दिवस अनुष्टान केले. परंतु पर्जन्य पडे ऐसी गोष्टी करणें. त्यावरून समस्त ब्राह्मण मेळवून आकरा दिवस अनुष्टान केले, परंतु पर्जन्य पडिला नाहीं. त्यावरून समस्त ब्राह्मणानी व्यंगोक्ती केली कीं आमचे मुख्य महंत आहेत. त्यासी आम्हामध्यें आणिलें पाहिजे. त्यांवरून त्यानी आम्हास बोलाउन नेऊन सांगितलें कीं तुम्ही आनुष्टानाच्या ब्राह्मणात मिळोन आनुष्टान करून पर्जन्य पडे ते गोष्टी करणें. त्यावर आपण त्यासी उत्तर दिल्हें कीं या ब्राह्मणास आज्ञा देणे आणि श्री हनुमंताच्या देवालई आनंदगिरीच्या मठी मडप देणे. तेथें कथा परमेश्वराची करू व देवाचा धावा करूं म्हणजे पर्जन्य पडेल. संशये नाहीं. ऐसी प्रतिज्ञा केली. त्यावरून ते समस्त मिळोन मडप देऊन हरिकथेचे साहित्य केलें. आपण कथा आरंभिताच पर्जन्य अहोरात्र पडिला. पुरेपुरे केलें. आवघे लोक संतोषी जाहाले. त्यावरून येसाजी व विठोजी बलद बाबाजी देशमुख व नारोजी चंदरस व बालाजी बापोजी देशपांडिये व समस्त मोकदम देहाये पा मजकूर बोलिले जे आपले मनोदय पूर्ण जाहले. स्वामीचे काही उतराई जाहलें पाहिजे. म्हणून कसबे मजकुरी व पा मजकुरी दर गावास टकाशाही १ येक व धान्य उत्तम कैली मापे मण ८१ येक येणेंप्रमाणें सालिना वर्षासन लेकराचे लेकरी करून शके १६०७ क्रोधन नाम संवत्सरे माघ शुद्ध सप्तमी बुधवार ते दिवसी शकतपूर्वक पत्र करून दिल्हे आहे ते स्वामीनी मनांत आणून तेणे प्रमाणे वृत्तीपत्रे करून देऊन वंशपरंपरेने चालविले पाहिजे. म्हणून विनंती केली. त्यांवरून तुम्ही भले सत्पात्र थोर महापुरूष तुमचे चालवणे स्वामीस अवश्यक जाणून तुम्हाकडील पूर्वील पत्रे बजिनस मनास आणून स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन कसबे मजकूरी व देहाये पा मजकुरी प्रतिवर्षी दरगावास वर्षासन करून दिल्हे. बिा शाही टका येक १८ धान्य उत्तम कैला मापे मण ८१ येकूण टका येक व धान्य मण येक येणेप्रमाणें तुम्हास व तुमचें पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने करून दिल्हे असे. तरी तुम्ही सदरहू प्रमाणे कसबे मजकुरी व देहायें

---

१. शिक्का–'श्री: राजा शाह नरप: ति हर्षनिधान बा: जीराव बल्लाळ: मुख्य प्रधान.

२. शिक्का– श्री श्रीआई आदि पुरु: ष श्री राजा शाहू: छत्रपति स्वामि कृपानिधि: तस्य श्रीनिवास परशु: राम प्रतिनिधी.

या मजकूर पैका घेउन वंशपरंपरेनें अनभउन सुखरूप राहणे. जाणिजे. लेखनालंकार
[ शिक्का–मर्या : देयंविरा : जते ]
तेरीख सौवाल सुा सलासीन मया आल्फ
बारसुद सुरूसुद बार बार बार बार
रूजू संमत सा सा
सुमंत मंत्री सरकार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. २५३--५.

१८ दिसेंबर १७३० ] (– ३७३ –) [ मार्गशीर्ष वद्य ५ शुक्रवार, रा. श. ५०

स्वस्ति श्री. राज्याभिषेक शके ५७ साधारण नाम संवत्सरे मार्गशीर्ष बहुल पंचमी भृगुवासरे क्षत्रिय कुलावतंस राजा शंभु छत्रपति स्वामी यांनीं देशमुख [ शिक्का ] व देशपांडे तर्फ तारळे यांस आज्ञा केली ऐसीजे. राजश्री येसशेट पाथरे व त्याचे पुत्र अनंतशेट पाथरे साहुकार हुजुरबाजार हे स्वामींचे पुरातन एकनिष्ठ सेवक. स्वामी राज्यासनारूढ जालीयापासून स्वामीच्या पायांसी निष्ट धरून त्रिकर्णशुद्धीनें सेवा करीत आहेत. लष्करचे स्वारीचे प्रसंगी स्वामी समागमें बहुतच श्रमसायास करून स्वामीची सेवा करून स्वामीस संतोष पाविला. त्यांचे सर्वप्रकारें ऊर्जित करून चालविणें हें स्वामीस परम आवश्यक. यास्तव याजवरी स्वामी कृपाळु होऊन यासी नूतन इनाम कुलहक्क कुलकानु हल्ली पटी व पेस्तर पटी जलतरूपाषाण निधिनिक्षेपसहीत खेरीज हक्कदार व इनाम करून मौजे कौत तर्फ मजकुर हा गांव दर १ एकरास इनाम अजरामरहत करून देऊन सनद अलाहिदा सादर केली आहे. तरी तुम्ही मौजे मजकुर पूर्व मर्यादेप्रमाणे यांचे स्वाधीन करणे आणि इनाम यांसी व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा उजुर न करणें. या पत्राची प्रति लिहून अस्सल याजजवळ भोगवटेस परतोन देणे. जाणिजे. निर्देश समक्ष. [ शिक्का ].

वैश्य, व. ६, अं. १–३, एप्रिल–जून १९१५, पृ. ५४.

१७३० इ. स. ] (– ३७४ –) [

[ निजामुल्मुल्काचें महंमदशहा बादशहाला पत्र ]

विनंति कीं फुटक्या नशिबाचे ( तीरा रोजगार ) आणि कोल्ह्यांच्या वृत्तीचे असलेले ( रूबाह ) मराठे यांची दांडगाई आणि त्यांनी चालविलेला उच्छाद ही अमर्याद झालीं. फुटक्या नशिबाचा आणि निर्दय ( शक्की ) बाजीराव हा त्या दुर्दैवी

लोकांचा पुढारी असून त्या कमनशिब्यांचें जणू दैवतच आहे ( रब्बुल्नौ ). त्याचा स्वभाव मुळापासून कुटिल आणि वृत्ति कलहप्रिय असून तो सैतानांचा दास आहे. सत्ता स्थापन करण्याच्या ईर्ष्येनें तो अखंड प्रयत्न करीत आहे. युद्धें करणें, उच्छाद मांडणें, हा त्याचा स्वभावच आहे. तो नेहमीं त्याच्याच विचारांत असतो. गेल्या दोन तीन वर्षांपासून सगळ्या उच्छादाचें मूळ असलेला बाजीराव याचा नाश ( हदम ) करण्याचे मी प्रयत्न केले. त्याबद्दल मी आपल्याला सगळ्या गोष्टी स्पष्ट करून कळविल्यावर मी मदतीची याचना केली. ती केवळ राजनिष्ठेनें प्रेरित होऊन होय. पण यांतून कांहीं उपयोग झाला नाहीं. दुष्ट हितशत्रूंनीं खोट्यानाट्या गोष्टी पसरविल्या. त्या मूर्ख सैतानभक्तांनी बिनबुडाच्या अशा वाईट गोष्टी सांगून सर्वत्र गोंधळ उडविला. यामुळें त्या फुटक्या नशिब्यांची दांडगाई खुपच वाढली. सर्वत्र उच्छादाला विलक्षण भरतें आलें ( तरक्की अजबी कर्दा ). तो निर्दय आणि दुष्ट बाजीराव यानें गुजरात आणि माळवा या सुभ्यांवर आक्रमण केलें. गिरिधर आणि बंगश यांच्यावर काय गुदरली तें प्रसिद्ध आहे. त्यामुळें त्याचा गर्व विलक्षण वाढला. त्याची आणि त्याच्या दुष्ट जमातीची स्थिति अशी झाली आहे कीं नवीन नवीन उपक्रमामुळें त्यांची डोकीं गर्वानें आकाशापर्यंत चढलीं आहेत.

त्या दुष्टानें ( मकहूर म्हणजे ज्याच्यावर परमेश्वराचा कोप झाला आहे असा ) गुजरातचा सुभा मोकळा आहे हें पाहिलें. बडोदे हे त्या तापदायक जमातीच्या ( मराटे ) ताब्यांत आहे. त्याला त्यानें वेढा घातला. मला वाटलें कीं, परमेश्वर न करो, त्या कमनशिब्याच्या ( बाजीराव ) हातीं बडोदे गेलें तर आपली फार हानि होईल आणि त्या सुभ्यांत त्यांची आक्रमणाचीं सूत्रें बळ भरतील. धर्माचा अभिमान, इस्लामचा अब्रू, आलि खाल्लेल्या मिठाशीं इमान ( याचा हक्क सर्वांपेक्षां अधिक आहे. ) यांचा विचार करून मी निर्धार केला कीं आपण नर्मदा ओलांडावी आणि त्या कुटिल जमातीची पाळेमुळें खणून काढण्यासाठीं त्यांच्यावर घसरावें. केवळ बादशहांची कामगिरी करावी म्हणून मी मोहिमेची आणि त्यांना मोडून काढण्याची तयारी केली. ती ऐकून त्यांनीं ( मराठ्यानीं ) वेढा उठविला. त्यांचा निर्धार नाहींसा झाला आणि त्यांनी सुरतेच्या दिशेनें पळ काढला. अलीमांडनच्या वाटेनें इस्मालचें लष्कर येत आहे हें ऐकून त्यांना दशहत बसली ( गल्बाय रोब ). इस्लामच्या लष्करांत आणि आपल्या फौजेंत जास्तींत जास्त अंतर असावे. हा त्यांचा हेतु होता. बडोदें जिंकून तेथें आपली सता दृढ करावी आणि त्यांतूनच पुढे गुजरातेंतील इतर भागांतून आपला जम बसवावा असा बाजीरावाचा विचार होता. पण महंमदी फौजेच्या भीतीनें त्याचे हातपाय गळाले. त्यानें तांतडीनें नर्मदा ओलांडली आणि तो दक्षिणच्या हद्दींत दाखल झाला. मूर्खपणामुळें ( कोता अंदेशी ) त्याला वाटलें कीं इस्लामचें लष्कर दूर आहे. त्यानें अंकलेश्वरच्या परगण्यांत उच्छाद मांडला. जुलुम आणि पीडा यांची ज्वाळा त्यानें पेटविली. त्याच्या अन्यायाच्या आगींत ओलें सुकें सर्व कांहीं जळून गेलें.

त्यामुळें मी नर्मदेवरील अकबरपूरच्या घाटानें (हा उतार मांडूच्या किल्ला-पाशी आहे) आपले बाजारबुणगे आणि जड तोफा इत्यादि सामान बुऱ्हाणपुरकडे पाठविले. परमेश्वराच्या साहाय्यानें मी अत्यंत तांतडीने नंदुरबार गांठलें. माझ्याबरोबर इतर जडसामान होतें. तोफखानाहि बरोबर होता. त्यांची आवश्यकता होती. पण जलद हालचालीला त्यांचा अडथळा होऊं लागला म्हणून मी तें सामान नंदुरबार येथें सोडलें. नंतर अल्पावधींत मी लांबलांब मजला मारून सुरतेच्या जवळ पोहोंचलों. उल्बार (जलद छापा घालणें) च्या मोहिमेंत उरलेल्या लहान तोफांचीहि अडचण होऊं लागली. म्हणून मी तें आणि इतर सामान काठोरजवळ सोडले.

या मोहिमेंत आमच्या सैन्याला फार कष्ट सहन करावे लागले. अन्नपाण्यावांचून फार हाल झाले. स्वारीचीं आणि सामानसुमान ओढण्याची जनावरें निकामी झाली होतीं. दोन तीन दिवस तर फारच थोडे अन्न आम्हाला मिळाले. अनेक वेळा आम्हाला पाणी नसलेल्या रानावनांतून आणि डोंगराळ मुलखांतून जावे लागले. रस्ता अत्यंत अडचणीचा होता. इस्लामचें लष्कर सडे असे मजला मारीत त्या कमनशिब्यांच्या (मराठ्यांच्या) सैन्याजवळ पोहोंचले. ते अपेशी लोक अगदी गाफील होते. मुजाहिदांचा (धर्मयोद्धे म्हणजे निजामाचे सैन्य) त्यांच्या-वर एकाएकी हल्ला झाला. कल्पांतच आपल्यावर कोसळला असें त्यांना वाटलें. ते मृत्यूप्रमाणें असलेल्या दीर्घ निद्रेंत होते. त्यांतून ते एकदम जागे. झाले दहशत बस-विणारा इस्लामच्या सैन्याचा घोष त्यांच्या कानांत पडला. त्यामुळें घाबरून जाऊन ते मार खाऊन आणि फजीत पाऊन पळाले. (फारसी कविता)

"त्या काळीं जो प्रळय झाला त्यामुळे कल्पांताच्या प्रळयाची आठवण झाली." मुजाहिदांच्या (धर्मयोद्धे म्हणजे निजामाचे सैन्य) माऱ्यामुळें आणि त्यांच्या तेजामुळें ते अपेशी लोक (मराठे) घाबरून त्वरेनें पळाले. रात्रंदिवस ते पळत होते. ती जमात (मराठे) म्हणजे जमिनींत बिळें करून रहाणारे साप, उंदीर, मुंगूस असे प्राणीच (हशरातुलारज) जणूं. त्यांच्यांत जणूं कल्पांताचा प्रळय झाला असें दिसूं लागलें. पलायनाच्या धांदलींत अकाली गर्भिणींचे गर्भपात झाले. नुक्तीच जन्मलेलीं बालकें या पाठलागामुळें मृत्युमुखीं पडलीं. आमच्या सैन्यानें त्यांचा पाठलाग करून त्यांच्यावर हल्ला केला. त्यांच्यावर (मराठ्यांवर) परमेश्वराचा अत्यंत कोप झाला होता. त्यांनीं आम्हांला तोंड दिलें नाही. पलायनाचा डाग अंगावर घेण्यांतच आपली सुटका आहे असें त्यांना वाटलें. त्यांचें पलायन पाहून जंगलांतील भिल्ल आणि कोळी यांनीं त्यांच्या बाजारबुणग्यावर हल्ला केला आणि त्यांना लुटून काढलें. विशेषत: रात्रीच्या वेळीं मराठे पळत असतां त्यांची वाट चुकली. त्यामुळें बरीच लूट (गनायम मुतकासुरा) त्यांच्या (कोळी आणि भिल्ल) हातीं सांपडली. त्या अपेशांचें संपूर्ण नुकसान (खसारत हाये कुली) झालें. ते नर्कवासी (जहन्नमि-यान म्हणजे मराठे) घाबरत पळत असतां समुद्राच्या एका खाडीपाशीं आले. आमच्या गाजींच्या (सैन्याच्या) समशेरी म्हणजे मत्त अजगरांचा श्वोसोच्छ्वासच

होय. किंवा जादूगारांची जादू नाहींशी करणारी पैगंबर मूसाची काठीच होय. इजिप्तचे राजे फिरऊन (फ्यारो) आणि त्याचे सैन्य ज्याप्रमाणें समुद्रांत बुडलें त्याप्रमाणें घाबरून आणि धास्ती खाऊन मराठे समुद्रांत पडले. आणि सर्वनाशाच्या दर्यांत बुडाले. समुद्रांत घोड्यांना सोडून, अतिशय कष्टानें आणि फजीति पावून ते कसेबसे निसटले. रात्रीच्या अंधारांत ते खाडीवर पोहोंचले तेव्हां त्यांची परिस्थिति विचित्र झाली. समोरून समुद्राच्या लाटा यामुळें त्यांचा नाश झाला आणि पाठीमागून आमचे विजयी सैन्य त्यांच्यावर आघात करण्यास टपले होतें.

सारांश, इस्लामचे लष्कर मांडूजवळील अकबरपूरच्या उताऱ्यावरून निघाले. जलद मजल मारीत ते निघाले. खानदेश, सुरत आणि कोंकण हा प्रदेश म्हणजे जंगलांनीं व्याप्त. जाण्यायेण्याच्या वाटा कमीच. तरीपण पाठलाग करीत आमचे सैन्य ऐनवेळीं सुरतेजवळ पोहोंचले आणि त्या त्या अपेशांच्यावर तुटून पडून त्या कुटिल काफरांना (कुफ्फार तीरा दरूनान) दमणपर्यन्त पिटाळीत नेलें. दमण हें फिरंग्यांच्या इलाख्यांत आहे. कोंकणांतील ते एक शहर आहे. तेथे दक्षिणच्या सुभ्याची पश्चिम सीमा संपते. यानंतर ते पशुतुल्य लोक (मराठे) साप आणि मुंग्या या प्राण्याप्रमाणें घनदाट अरण्य आणि अवघड वाटा यांनीं युक्त असलेल्या प्रदेशांत (जेथें कल्पनेचाहि शिरकाव होत नाहीं) घुसले.

यामुळें त्या अपेशी जमातीनें वाट धरली. त्याच्या डाव्या दिशेनें मी परत फिरलों. ते लोक तळकोंकणांतून बालाघाटावर आले, कीं परमेश्वराच्या सहाय्यानें आणि आपल्या भाग्यानें ऐनवेळीं त्यांच्यावर तुटून पडावे आणि त्यांना शिक्षा करावी असा मी निश्चय केला. धन्य परमेश्वराची (अल्हम्दुलिल्लाह) बाजीरावाच्या उच्छादांतून गुजरातचा सुभा मोकळा झाला आहे. माळव्याचा सुभा पण त्या दुष्टाच्या हातून या वर्षी सुरक्षित राहिला आहे. सुरतेचे बंदर म्हणजे मक्का आणि हरमैन शरीफ (करबला इत्यादि क्षेत्रें) यांचे प्रवेशद्वारच होय. तेंही त्या कलह करणाऱ्याच्या (बाजीराव) हातीं लागलें नाहीं. त्यांचीं ठाणी सुरतेच्या जवळ कायम झाली होतीं. सुरतेचे बंदरहि त्याच्या हातीं लागण्याची वेळ आली होती. मग मक्केचे हें प्रवेशद्वार बंद होऊन महमदियांची यात्रा बंद पडली असतां बादशहाचे या बाबीचे उत्पन्न दरवर्षी नष्ट होत गेलें असते. आमच्या गाजींच्या प्रयत्नानें त्या बंडखोरांचा पुंडावा नाहींसा झाला आणि वर उल्लेखिलेलीं स्थळें त्यांच्या हातांतून सुरक्षित राहिलीं. तो दुष्ट (बाजीराव) हा अत्यंत फजीत पावून, पराभूत होऊन आणि हानि सोसून पळून गेला.

आतां मूळ मुद्यांचा विचार केला पाहिजे. या मोहिमा चालू राहिल्या पाहिजेत. त्या दुष्टांची (मराठे) संख्या मुंग्या आणि टोळ यांपेक्षांहि जास्त आहे. विनंती ही कीं मराठ्यांचे जीवच घेतील असे दोन हजार मोगल स्वार आणि एक हजार अरब

बर्कंदाज माझ्याकडे पाठविण्यांत यावे. आपल्याकडून ही फौज आली तर आपली अंतस्थ कृपा माझ्यावर आहेच ती जाहीर होऊन सर्व लहान थोर माणसांच्या मनांत ठसेल. आणि मोहीम चालू ठेविण्यांत त्याचा पूर्ण प्रभाव पडेल. परमेश्वर न करो, उच्छाद (मराठ्याचा) मोडण्याकरितां म्हणून मी जी विनंति केली त्यांत व व त्याप्रमाणें अमलबजावणी होण्यास विलंब लागला तर बाजीरावाचे बळ अधिकच वाढेल. तो गुजरात आणि माळवा या सुभ्याच्या सरहद्दी ओलांडून पुढें सरकेल आणि बादशाही अधिकाऱ्यांचे काम फार कष्टाचें होईल. मग त्यावेळीं जबरदस्त फौजा आपल्याला सरहद्दीवर ठेवून अपार खजिना खर्च करण्याची वेळ येईल. (फारसी कविता) ॥ नदीच्या उगमापाशीं एका खिळ्यानेंहि प्रवास बंद करतां येईल. पण नदींत पाणी भरलें तर हत्तीलाहि नदी ओलांडणें शक्य होणार नाहीं.'' बादशहांची कृपा सदैव माझ्यावर राहो.

आलमगीर, दीपवाळी अंक, १९६१ इ., पृ. १०५–१०८.

एप्रिल १७३१ पूर्वी ] (–३७५–) [

श्री

श्रीमत् सकल तीर्थस्वरूप राजश्रिया विराजमान राजश्री शाहूराजे दाजी वडिलांचे सेवेसी

अपत्यें संभाजी राजे कृतानेक दंडवत् विनंति उपरि. येथील कुशल श्रीकृपे व वडिलांचे आशीर्वादें जाणोन वडिली आशीर्वादपत्रीं कुशल वर्तमान सदैव लेखन करून समाधान पावविले पाहिजे. विशेष. आशीर्वाद पत्र पाठविले ते उत्तम समई प्रविष्ट जालें. कुशलवृत्त अवगत होऊन संतोष प्राप्ती जाली. निरंतर याचरीतीं परामर्ष करणें वडिलांस उचित आहे. तीर्थस्वरूप मातुश्री साहेबीं वडिलांचे ममतेचा अर्थ व उभयेपक्षीं स्नेहांची दृढता होऊन विवेक व्हावा म्हणोन वडिलांचा चित्ताभिप्राये लिहिला तरी हे गोष्टी वडिलांस उचितच आहे. परस्पर विवेक होऊन लोकोत्तर उभयेपक्षीं निर्दोष कीर्ति व्हावी हेंच आम्हांस अगत्य आहे. या अगोदरच मातुश्री साहेबीं राजश्री बाबाजी प्रभु यांसी पाठवावया विशई लिहिलें होते तेव्हांच पाठवावें तरी त्याचे शरीरीं सावकाश नव्हतें. प्रस्तुत मारईलस पाठविलें आहे. सेवेसी आलियानंतर सविस्तर अर्थ विदित करितील. बहुत लिहिणें तरी वडील सुज्ञ असेती.
[ शिक्का– मर्यादेयं विराजते ]

नवयुग व. ५, अं. ७, क्र. ५५, मे १९१८, पृ. ५१९. [ फोटो छापला आहे. ]

१० एप्रिल १७३१ ] (–३७६–)

[ अभयसिंगाचे पत्र ]

परमेश्वरकृपेने आम्हांला विजय प्राप्त झाला. निजामउल्मुल्काची फौज

शत्रूला साहाय्य देई–तिचाहि नाश झाला; आणि सर्व सुरळीत घडलें. परंतु बाजीरावाच्या मदतीबद्दल त्याचे आभार आणि खातरजमा केली गेली नाही. निजाम स्वतः इकडे येणार असेल तर आम्ही त्याची योग्य वाट लावण्यास सिद्ध आहोंत. आम्ही शक्य ते लिहिले व केलें आहे. पण नबाबांकडील बातमी मात्र केलेलें सर्व बिघडवील. पण देवाचीच इच्छा असल्यास तसे घडेल! तुम्ही नबाबाला सर्व सांगून ठरवून घ्यावें.

लौकर पैसा पाठविण्याचीहि व्यवस्था करा. पैशांशिवाय अेक दिवस प्रांताचा कारभार चालणार नाही असें नबाबाला सांगा– येथे उत्पन्नाला जागा नाही... ... आम्ही रजपूत आहो– देव करील तसें होअील असा आमचा विश्वास आहे. पण बादशाहा या प्रांताला मुकणार असें दिसतें. नबाबाला हें सर्व सांगा आणि तो पैसा देत असेल तरच दरबारांत राहा. नाहीतर तसेच परत फिरा असा माझा हुकूम आहे." मोर्तब.

अभयसिंग याचे युवराज रामसिंगजी भांडारी व अमरसिंग पुरोहित यास पत्र गोषवारा :—

पत्र पोंचलें. यापूर्वी नबाब खानडौरान (महमदशाहाचा वजीर) यास दिलेलें पत्र पोचवून त्यांशीं चर्चाहि केली असेल.

त्रिंबकराव दाभाड्याशीं बाजीरावाच्या व आमच्या फौजांचें युध्द झालें. त्यांत त्रिंबकराव, निजामाचा सेनापती मुगल मोमिन्याखान आणि मुला (मलोजी) पंवार मारले गेले. पवार उदा, चिमनाजी दामोदर निजामाच्या बाजूचा ब्राह्मण वकील आणि पिलूचा (पिलाजी गायकवाड) मुलगा असे कैद झाले. आमचा जय झाला हें नबाबास सांगितलें ना?

पिलू, कंठा, आनंदराव वगैरे सैन्य घेऊन पळाले. पिलू डभोईला पळाला, त्याचा भाऊ बडोद्याला आहे. आम्हीं या दोन ठिकाणीं सैन्यें पाठविलीं आहेत. लौकरच तीं ठाणी मोकळीं करूं. कंठा निजामाकडे पळून गेला आहे. तेव्हां निजामाने आमच्या हुकुमांच्या आड येअून कंठा, पिलू वगैरेंना आश्रय देऊं नये म्हणून बादशाहाने कडक हुकूम दिले पाहिजेत, असें नबाबानें बादशाहाला सांगावें.

निजामाचा मोड झालाच आहे. पुनः तो येईल तर पुनःहि लढाई होईल. हें बादशाहाला सांगून हुकूम घेववावे.

या वेळीं बाजीरावाने बादशाहाची मोठी कामगिरी केली आहे. तेव्हां त्याला झगा, फर्मान व हत्ती मिळावे. राजा शाहूलाहि द्यावे. चिमाजी अप्पालाहि सन्मानाचा झगा दिला पाहिजे. नबाबाला सर्व सांगून बाजीरावाला मन्सबहि दिली जावी अशी तजवीज करावी. आमच्या जागिरीचा महत्त्वाचा प्रश्न काढावाच. यशस्वी करा.

मागेंहि आम्हीं बाजीरावाबद्दल लिहिलें. परंतु नबाबाला चांगले कळलें नाहीं. त्रिंबकराव दाभाड्याच्या भीतीनेंच बाजीराव आपल्याला मिळालेला आहे. यामुळें

मोठ्या कामगिरींत तो आपल्याला उपयोगी पडणार नाहीं, असे नबाबाने बादशाहाला सांगितले. पण निजामाच्या आणि त्रिंबकरावाच्या सैन्याने काय काय केलें, हे आता बादशाहाच्या नजरेस आलेंच असेल.

आम्ही हें सगळें नबाबावर विसंबून करीत आहों हें त्याला सांगा. पण नबाब दुर्लक्षच करतो. त्याला पाहिजे आहे तरी काय ? सर बुलंदखानावर (गुजरातचा सुभेदार) स्वारी आमच्याच खर्चाने केली. पैसा सैन्य मागतां, पाठवीत नाही. याने कोणाचे काम दिरंगावर पडतें ? बादशाहाचें का माझें ? दोन शत्रूंचे सैन्य जमलें, नबाबाने तर कांहीच साहित्य केलें नाही. मग पराभव टाळण्यासाठी बाजीरावाला बादशाहाकडे वळविलें. आणि कंठा, पिलू वगैरेंचा पराभव करण्यासाठी तोफखाना व सैन्य पुरविलें. म्हणजे त्यांच्यांत दुही पाडून आमच्या विरूद्ध असलेल्या बंडाचा नायनाट केला.

आम्हाला शाबासकी द्यायचें सोडून नबाब उलट बाजीरावाला हाकून लावा म्हणून लिहितो ! निजामाच्या सांगण्यावरून नबाबाने हें लिहावें ना ? खासा न्याय. काम सोंपविलें आमच्यावर आणि सल्ला घ्यायचा दुसऱ्याचा ? लबाडांनी वाटेल तें सांगावें ! गेल्या ८ वर्षे कंठा. पिलू यांनी गुजरात दडपली त्याचें कांही पहायचें ? त्यांना आश्रय द्यायचा ! आणि मी मोंगलांच्या बाजूला बाजीरावाला वळवून घेतला त्याचें कांहीच नाही ! त्याला पटत नसेल तर मला गुजरात ठेवून करायची आहे काय ? मारवाडच्या उत्पन्नांतून खर्च चालवावा लागतोय ! असें असून जहागिरीबद्दल आणि धाकटे बंधु राजाधिराज यांच्याहि जागिरीबद्दल नबाब कांहीच करीत नाही !

शत्रूने आम्हाला दहशत घातली पण आम्हीच त्यांचेवर डाव उलटविला. नबाबावर विसंबून राहिलों असतो तर हाताला काय लागलें असतें ? नबाब निजामाला सांगतों बाजीरावाला शिक्षा करायला. आम्ही त्याला मोगलाकडे वळवून निजामावर पाठविला त्याचें कांहीच नाही ? बाजीरावाला तसाच सोडला तर तो पिलू आणि कंठाला मिळेल. तसे चालेल ? आमच्यांत आणि नबाबांत वितुष्ट आणण्याला निजाम चुळबुळतो; मग सैन्य घेऊन पुढे कां नाही येत ? अजूनहि येऊं दे. त्याचे त्याला खास प्रायश्चित मिळेल.

नबाबाला सगळें सांगा. आम्हांला गुजरातवरच ठेवायचे असेल तर सर्व व्यवस्था आमच्या पत्राप्रमाणें झाली पाहिजे. नाहीतर आम्ही स्वतः बादशाहाला भेटूं.

सह्याद्रि, वर्ष ६, अंक ५, मे १९४०, पृ. ४६७–८

टीप :— प्रस्तुत गोषवारा सोळाव्या इंडियन हिस्ट्री रेकमिशन (कलकत्ता १३–१४ डिसेंबर १९३९) च्या अधिवेशनापुढे पं. विश्वेश्वरनाथ रेहू साहित्याचार्य, यानी वाचलेल्या 'Maharaja Abhaising of Morwar the Nizam' या निबंधावरून दिलेला आहे.

२१ मे १७३१ ] (– ३७७ –) [ १५ जिल्काद, इहिदे सलासीन मया अलफ

श्री

छ माा अनाम देशमुख व देशकुलकर्णी ताा खेडेबारे यासी नारो शंकर सचीव सुाा इहिदे सलसैन मया अलफ. बकाजी बिन गोमाजी चोधरी चौगुला मौजे अर्वी ताा मजकूर कोंकणांत पुंगावी मुरगडा खाले राहत होता. त्यास गड शामलानी घेतला. ते समई सेल्लकीयाबा गांवीचा बंद धरिला. तेव्हां चौगुले मजकूर बायको देखील शामलाने हस्तगत करून नेऊन बाटविला. राजपुरीस कांही एक दिवस होता. त्याउपरी हालीं कौल देशास जालियावरी गांवास आला. यांचेविशीं तुम्हीं व मोकदम मोजे मजकूर यानें अर्ज केला की चौगुले मजकुरास गोतांत घ्यावे. यैसियास गोतगंगा आहे. साहेबी माहलोमाहालीच्या देशमूख देशपांडियास आपली पत्रे देवणें. जे गोत मेलाऊन चौगुले मजकुरास गोतांत घेत यैसे करवावे. त्यावरून माहालोमाहालीच्या देशमूख देशपांडियास पत्रें दिल्ही आहेत. तें पाठऊन माहालोमाहालीचे गांवगनाचे गोताचे समापत्रे आणऊन गोताचा एक दिवस नेमून समापत्रें हुजूर दाखवणे. तें मनास आणून हुजूरचे पत्रहि तुम्हास करून देऊं. त्या प्राा गोत मेलऊन गोताई करून यास शुध गोतांत घेणें. छ १५ जिल्काद. [ शिक्का– ‘ पत्रावधिरः य लेखना : वधि.’ ]

सुरूसुद

भा. इ. सं. मं. त्रै., व ८, अं. १–२, पृ. २१.

३१ मे १७३१ ] (– ३७८ –) [ ५ जिल्हेज, इसने सलासीन मया अलफ.

श्री

॥ छ माा अनाम देशमूख व देशपांडिये ताा खेडेबारें यासि नारो शंकर सचीव सुाा इसने सलासैन मयां अलफ. बकाजी बिन गोमाजी चौधरी चौगुला मौंजे [ शिक्का ][1] आर्वी ताा मजकूर हा कोकणात असता शामलाने धरून नेऊन बाटविला. हालीं सुटोन देशास वतनावरी आला. याचे सुधतेविसीं कसबे मजकूरच्या मुकामी तुम्ही व मोकंदम मौजे मजकूर याणे विनंती केली कीं जोरावरीनें बाटविली- यास गोतांत घ्यावयास मोकलीक आहे. त्यावरून विनंती मनास आणून बकाजी मजकुरास सुध करावयाविसी यास माहालोमहाल पाठवून सडी आर्णविल्या. त्यास हा माहालोमाहाल जाऊन तेथील सडी घेऊन हाली नेराच्या मुकामी आला. त्यावरून बकाजीस तुकबा (?) तुम्हाकडे पाठऊन हे आज्ञापत्र सादर केले

१. शिक्का— ‘ श्री : शंकराजी : नारायण.’

असे. तरी तुम्ही माहलोमाहालाचे गोत जमा करून यास गोतात घेऊन सुध करणे. गोताईस दिवस नेमाल तो दिवस हुजूर लेहून पाठवणें. हुजरून हरयेक हुजऱ्या व आज्ञापत्र सादर केले जाईल. याचे सिरी प्रायेस्चिताची सेरणी रुा १०० यकसे करार केला आसे. सदरहुची निशा अधी करून घेऊन मग गोतांत घेऊन सुध करणें. छ ५ माहे जिल्हेज. पाा हुजूर [ शिक्का- ' पत्रा : वधिरयं : भाति ' ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १-२, पृ. २२.

७ जून १७३१ ] (-३७९-) [ १३ मोहरम, इसने सलासीन मया अलफ

श्री

खासगत राजश्री भगवतराऊ सोमवसी हवालदार किले सिहीगड ताा बकाजी चौधरी चौगुला मौजे अर्वी ताा खेडेबारे सुहुर सन इसने सलासीन मया अलफ. तुझी गोताई जाली आहे. त्यास सिकियाचा कागद नसता गोताई केली. येसी नादान हाली तुजकडे मुकास बाबचा यैवज रुपये ५० पनास देणे. या कामास भवानजी जाधव व हणगोजी दलवी पाा आहे. यास मसाला रुा २ दोनी देणे छ १३ मोहरम [ शिक्का ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १-२, पृ. २३.

२० जून १७३१ ] (-३८०-) [ २५ जिल्हेज, इसने सलासीन मया अलफ

[ बाजीरावांचें सवाई जयसिंहजीस पत्र ]

छ. २५ माहे जिल्हेज इसने सलासीन मया व आलफ. रायनंदलालजी यांचे नांवे पत्र शिक्का मोहोरी आपला पत्र सवाई जैसिंह महाराज याचे घेऊन मयाराम जोसी वकील मुकाम बऱ्हाणपूरचे येथें भेटले. सर्व मजकूर मदतीचे कळवून नाल्छा व मांडव मुकामी जमाव मदतीचे आहे. दया बहादुरच्या जुलमामुळे जमीदार व प्रजा नाराज म्हणोन आमची खात्री केली. त्यास आम्हीं निघून रेवातीरी आलो आहे. मयाराम बंधु राघोदास असल्यानें नेमाड इलाख्यांतील चौधरी कानुगो ...... पाच हजार जमाव झाल्याने आपलेकडील मदतीचा अनुभव आल्यानें मोटी खुसी जाहाली. जानिजे. छ २५ [ मोर्तब सुद ]

भा. इ. सं. मं. षष्ठ संमेलन वृत्त, शके १८४०, स्वी. ग्रं. क्र. २४, पृ. २१३-४

२५ जून १७३१ ] (-३८१-) [ शके १६५३, आषाढ शुा २

श्री

.॥ छ मा अनाम देशमूख देशपांडे ता खेडेबारे यासि नारो शंकर सचीव सुा इसने सलासैन मया अलफ. तुम्ही समतीपत्र पाठविले ते प्रविस्ट जालें. बकाजी चौधरी [शिक्का][1] चौगुला मौजे अरवी ता मजकूर याची गोतपती अशाड सुध पच्यमीस नेमस्त केली आहे. येविसी हुजरून आज्ञापत्र सादर केलें पाहिजे म्हणून लिहिलें. त्यावरून मानाजी मांडरा दिा स्वारी यास पाठविलें आहे व रा सीवदेव मजमदार माहाली आहेत. त्यांचे विद्यमाने गोतपती विल्हे लावणे. किले सिंहगडासहि पत्र लिहिले आहे. तेथून कोणी हकीम अले तरी बरे. न येत तरी त्याचा उजूर न करितां बकाजी मजकुरास सुध करणे. या प्रायेस्वित समंधे याचे माथा सेरणी रुा १०० येकसे ठेऊन हुजूर वसूल घेऊन हे पत्र तुम्हास सादर केलें असे. यांस गोतात घेऊन सुध करणे. छ १ माहे मोहरम. [ 'पत्रा बंधिरयं भाति' – शिक्का ]

सुरुसुद बार

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १–२, पृ. २२–२३.

१८ जुलै १७३१ ] (-३८२-) [ २४ मोहरम, इसने सलासीन मया अलफ.

श्री

.॥ छ मां अनाम देशमूख व देशपांडे ता खेडेबारे यासि नारो शंकर सचीव सुा इसने सलासैन मया अलफ. तुम्ही समतीपत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन वर्तमान विदित जाले. बकाजी चौगुला मौजे अरवी याची गोतपती अशाड सुध त्रयोदसीस करून सुधता केली. किले सिंहगडास पत्र पाठविले. तेथून सरनोबताचे नावे कागद अला कीं हवालदार आपले नावे पत्र देत नाहीत. हुजुरच्या आज्ञेप्रमाणें दिल्हे लावणे. त्यावरून तुम्ही गोतपत केली. त्या उपरी रा भगवतराऊ सोमवौसी हवालदार किले सिहगड याणी किलाहून मसाला करून मारितां मारितां रुा २० वीस घेतले. म्हणून वर्तमान रा राभो सिवदेव मजमदार याणी लिहिले. बरे ते गोष्टीचे काये आहे. हुजरून सेभर रुा चौगुलियाकडे येवज करार केला. त्यापैकी मजुरा पडतील. तुम्ही चौगुलियास सुध केलें. छ. २४ मोहरम. [ 'पत्रा : वेधिरयं भाति' – शिक्का ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १–२, पृ. २३–२४.

१. शिक्का – 'श्री : शंकराजी : नारायण.'

२. शिक्का— 'श्री : शंकराजी : नारायण'.

१९ नवंबर १७३१ ] (–३८३–) [ २९ जमादिलावल, सन ११४१

दानपत्र वेदमूर्ती महाराज राजश्री देऊराव कचेश्वर व जयकृष्ण कचेश्वर स्वामीचे सेवेसी :–

सेवक राऊ रंभाजी निंबाळकर सा। दंडवत सु॥ ११४१ त्याहावयाकारणें ऐसाजे. मौजे वांकी बुद्रुक पा। चाकण हा गांव सरकारतर्फेनें जागीर व फौजदारी व जिल्हेदारी कुलबाब कुलकानू वेदमूर्ती महाराज राजश्री कचेश्वरबावा कैलासवासी[1] यांस दिल्हा असे. त्यास ईश्वर इच्छेनें त्यांस कैलासवास जाला म्हणोन सरकारच्या अमिलानी तो गांव जप्त केला होता. म्हणोन तुम्हीं लिहिलें. त्याजवरून बदस्तूरसाबिला जागीर व फौजदारी व जिल्हेदारी कुलबाब कुलकानू दरोबस्त तनखा तुम्हां उभयतांस दिल्हा असे. तरी जोंवर जागीर सरकारांत बहाल तोंवर सुखरूप गांव खाऊन स्नानसंध्या करून, आम्हास आशिर्वाद देऊन राहणें. ये बाबे सरकारच्या अमिलांस व जमीदारास ताकीद परवाने सादर केले असत. तरी या उपरि कोण्ही मुजाहीम होणार नाहीं. आपली निशा राखोन गांव आबाद करून खाणें. बहुत काय लिहिणें ? रा। छ २९ जमादिलोवल– हे विनंति.

श्रीसरस्वती मंदिर, व. ८, अं. ११–२, क्र. ४५–६ माघ–फाल्गुन शके १८३०, पृ. १८.

५ फेब्रुवारी १७३२ ] (–३८४–) [ १९ साबान, इसने सलासीन मया अलफ

श्री

[ शिक्का ]

श्री० श्रीशाहुनृपति प्रीःत्या तुकोजी तनुजन्म : नः ॥ कान्होजी सरखे : लस्य मुद्रा जय : ति ...

आज्ञापत्र समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री सखोजी आंगरे सरखेल ता। बाल पाटेल बिन लाहे पाटेल कोली थान जंजिरे कुलाबा सुहुर सन इसने सलासीन मया व अलफ. तुवा हुजुर जजिरे मजकुरचे मुकामी येऊन अर्ज केला कीं कोलवाड कसबा चेऊल येथील कोली यांची पाटेलगी पुरातन आपली वतनी आहे. यैशास आपला बाप लाहे पाटेल यासि माहाराज श्री छत्रपती स्वामी कैलासवासी थोरले स्वामी यांही चाकरीस ठेऊन पदमदुर्ग व कुलाबा ये जागां कोली अरमावरी पाहिजेत म्हणून आणून चाकरीस दिल्हे व राजपुरीची मसलतीसमई मेहनत केली. त्यावरून कुलाबांची कोलीयांची पाटेलगी आपणास सांगितली. त्यापासून

१. कचेश्वरबाबा शके १६५३ फाल्गुन शुद्ध द्वितियेस म्हणजे १६ फेब्रुवारी १७३२ रोजी वारले असावेत.

आपण चालवीत आलो. कोलीयांचे लग्नाचें पानमान चालत आलें आहे व बदअमल कोली लोकामध्यें जाला तरी याचा न्याये दिवाणात न आणावा येसे होतें. आली-कडेस कैलासवासी थोरले सरखेलसाहेब यांचे अमंलात आमचे जातीमध्यें बदअमलाचे कलम होत गेले. ते मनसुबी दिवाणांत आणून खंडदंडही दिवाणांत घेत गेले व कोली-याचे लग्नाचे पानमान आपले असतां राग सारंग व सरतांडेल पानमानापैकी वाटा ध्यावयासि लागले. यैशास साहेबी कृपालु होऊन बदअमलाचे कलम दिवाणात नेतात तें न न्यावे व त्याची मनसुफी आम्ही आपले जातीत करून व पानमानाचा वाटा राग सारंग व सरतांडेल घेतात तो दूर करून आमचे आमचे स्वाधीन करावे आणि येविशी आपणास भोगवटियास सनद सादर करावी म्हणौन. त्यावरून पूर्वापर भागवटा कोलवाड चेऊल कारकीर्दी येदिलशाहा मनास आणुन तुजला कोलियांकडील लग्नमुहूर्तकार्यप्रयोजन होत जाईल त्यास तुमचे पानमान पूर्वापर चालत होते त्याप्रमाणे करार केलें असे व पूर्वी येदिलशाहाचे कारकीर्दीस कोली लोकांमध्ये बदअमल होईल तो दिवाणात जाहीर न करावा. त्याचा न्याये पाटलानी करावा. जातीत वर्तवावा यैसा होत होता. त्याप्रमाणें बदअमलाचे कलम तुमचे जातीस माफ केले असे. त्याचा न्यायेमनसुफी तुम्ही जातीत करीत जाणें. दिवाणात दखल न करणें. तुजला वतनमुले सेरणी रूपये १५० दीडसे करार करून वसूल घेतला असें. तुवा सुखरूप जंजिरे कुलाबाची कोलियाची पाटेलगीचा उपभोग पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने करीत जाणें. जाणिजे. रा छ १९ माहे साबान. [ शिक्का-मोर्तब सुद ]

~~~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १-४, पृ. १३४-१३५.

१२ जून १७३२ ] (-३८५-) [ आषाढ शुद्ध १ सोम-वार, रा. श. ५९

श्री

[ शिक्का ][1]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५९ परिधावीनाम संवत्सरे आषाढ शुद्ध प्रतिपदा इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति स्वामी यांनीं वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशीवभट बिन लक्ष्मणभट उपाध्ये उपनाम अरवीकर गोत्र शाकल्य सूत्र आश्वला-[ शिक्का ][2] यन यांस दिल्हें वतनपत्र ऐसीजे. तुम्हीं स्वामीचे परंपरागत उपाध्ये.

---

१. शिक्का— 'श्री : प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णु : र्विश्ववंदिता शंभुछत्रपते : र्मुद्रा रामसूनो : र्विराजते.'

२. शिक्का— 'श्री : आई आदिपुरूष श्रीराजा : शिवछत्रपति स्वामी कृपा : निधि तस्य कृष्णाजी पर : शराम प्रतिनिधि.'
~~~~~~~~~~~~~~~~

तुम्हास स्वामीचा दिवसेंदिवस अभ्युदय व्हावा यापेक्षां तुम्हांस दुसरे अधिकार नाहीं. स्वामीनीं तुम्हांस वतनें व इनाम गांव देऊन तुमचें सर्व प्रकारें चालवणें हे परम अवश्यक. कल्याणावह. ऐसे जाणोन स्वामीनीं कर्यात वडगांव प्रांत पनाळा येथील नाडगोंडकीचें वतन तुम्हांस मन्हामत करून दिल्हे असे. यास गांवगन्ना देहे १६ बितपशील.

| | |
|---|---|
| कित्ता देहे | कित्ता देहे |
| १ कसबा वडगांव | १ मौजे चावरे |
| १ मौजे भादोले | १ मौजे दरवेसपाडळी |
| १ मौजे कोरगांव | १ मौजे मनपाडळे |
| १ मौजे शिगांव | १ मौजे तासगांव |
| १ मौजे धुणकी | १ मौजे मिणचे |
| १ मौजे वाठार | १ मौजे भेंडवडें |
| १ मौजे पारगांव | १ मौजे लाटवडें |
| १ मौजे तळसंद | १ मौजे नरंदें |
| ८ | ८ |

येणेंप्रमाणें ता। मजकूरचे देहे सोळा. या वतनास इनाम व पाळक व हक्कलवाजिमा बिता।.

इनाम व पाळक.

इनाम गांव मौजे वाठार ता। मजकूर कुलबाब कुलकानू जल तरू पाषाण सहित खेरीज हक्कदार व इनामदार करून देहे एक १

पाळक दर गांवास पाळक हौस १ एक व चाकराचें घर १ एक या प्रमाणें पाळक एा। कलम १

हक व लवाजिमा बिता।.

हक्क दिवाण दस्ताचा आकार होईल त्यास रयत भागापैकी दरसदे दोन २ रुपये जकात दर बैली रूके

भूस वं मीठ दोन रूके ०५ केण्याचे बैलास रूके ०३

कापड तंबाकु व घोंगडी एकूण ०६

साळी व कोष्टी व धनगर याचे मागास सालीना चोवीस रूके ·॥· दर दुकानास सालीना चोवीस रूके ·॥· तेल्याचे घाणीयास दर माहे तेल ०८१ प्रो सालीना तेल वजन ०।२ पानाचे नगास विडीयाचीं पाने सुमार १००

बाजार भरेल त्यास फसकी व उकाळा देश कुलकर्णी यापो कलम १

येणेंप्रमाणें इनाम गांव मौजे वाठार ता। मजकूर पाळक दरगांवांस खासगत हौस एक व चाकराचें घर एक व हक्क लवाजिमा हक्क दिवाणदस्ताचे आकारास रयत भागापैकीं दरसदे दोन रुपये व जकात दर बैली भूस दोन रूके कापड व तंबाकू

घोंगडी सा रूके व केणे तीन रूके व बाजार भरेले. त्यास फसकी उकाळा देशकुलकर्णी यापो घ्यावा व साळी व कोष्टी व धनगर यान्चे मागास सालीना चोवीस रूके व दर दुकानास सालीना चोवीस रूके व तेल्यान्चे घाण्यास दरमाह तेल एक शेरप्रमाणें बारा शेर व विडियाचे पानान्चे नगास पानें सुमार एकशें याप्रमाणें मोइन करून सदरहू नाडगौंडकीचे वतन स्वामींनीं तुह्मांस अजरामऱ्हामत करून दिल्हें आहे. अलाहिदा सनदा सादर आहेत. तुह्मीं दंडकप्रा वतनाची सेवा करीत जाणें आणि नाडगौडकीचें वतन तुह्मी व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून सुखरूप रहाणें. निदेश समक्ष.
[ शिक्का – मर्यादेयं विराजते ]

रुजु सा मंत्री

धर्म, साप्ताहिक, वाई, १४ सप्टेंबर १९०५, पृ. ७११–७१३.

३ जुलै १७३२ ] (– ३८६ –) [ २१ मोहरम, सलास सलासीन मया अलफ

श्री

[ शिक्का ][1]

कौलनामा अज स्वारी राजश्री संभाजी आंगरे सरखुभेदार आरमार ता ... ... चीन दाद महाजनी का मीठगव्हाणे सुहूर सन सलास सलासीन मया अलफ. दिल्हा कौलनामा यैसाजे. तुम्हीं वीजयदूर्गीचे मुकामी येऊनु विनंती केली की आपलें खाजण खारट पुलान नजीक मजेरे दलें का मार येथें आहे. ते पूर्वी आपले आजे गोविंद महाजनी देसाई याणी राजश्री आणाजी दतो यांचे कारकीर्दीस कौल घेउनु बांद बांधोन कमावीस केलें होते. त्यावर सेख निजामाची धामधम जाहाली. ते समई मुलुक खराब जाहाला. तेव्हा खाजणाचा बांद मोडला. तो आजी पावेतों मोडला आहे. बहुत दिवस जाहाले. खाजणामध्यें रान वाढोन तीन खांडी पहिल्या. कादलाची व चीपीची झाडें वाढली. खर्च बहुत दीडदोनसे रुपये पावेतो खर्च पाहिजे. याकरीतां साहेबी तह करून दिल्हा. तरी उमेद धरून कर्जवाम घेऊन खाजणाचा बांध बांधौन म्हणौन व ये बाबे माहादो हरी व बालाजी तमाजी देशकुलकर्णी व महाजनानी का मार याणी मालुमात केली की बहूत दिवस खराब पाडिले आहे तह करून दिल्हा तरी देसाई खाजणाचा बांध बांधतील म्हणौन. बराई अर्ज खातरेस आणुन कौल मऱ्हामत केला आहे. खाजणास खर्च बहुत. बांधास मेहनत फार. याजकरितां तह करून दिल्हा असे. साले १२ बारा यासि बयान सोली

१. शिक्का— ‘श्रीः राजा शाहु चरणीः तत्पर तुकाजी सुतः कान्होजी आंगरे सःरखेल निरंतर.’

माफी ईा सन आर्बा ता सन आबैन
मयां ७ सालें माफी

इस्तावा दर बिघा जमीनीस भात
दसेरी मापे

| | |
|---|---|
| ईहिदे आबैन | ईसने आबैन |
| ८१ ॥· | ८२ |
| सलास आबैन | आर्बा आबैन |
| ८३ | ८४ ॥· |
| खमस आबैन | लग |
| ·।·॥· | ० |

येकून माफी सालें पेस्तर सालापासून सात सालें व तह इस्तावा सालें पांच येकून बारा सालें गोईन करून दिल्ही असे. उमेद धरून खाजणाची कीर्दी करून बांद बांधोन माहामूर करणें. इस्तावा भरलेयावरी खाजणास धारा पुलण व खार वीलायत शर्त खाजणाप्रमाणें जिरब नव्हे येसें जाणोन इस्तावा भरलेयावरी पाहाणी करून खाजणास धारा सवासाहामण प्रा करार करून दिल्हा असे. येणे प्रा दस्तुरची ऊगवणी करणे. खाजणाचे बांधास बांधणें. कुणबी दोन टेवाल त्यास वेठ बेगार माफ असे. घरपटी घेणार नाहीं. खाजणाची सीमा.

पूर्वेस नदी सीमाबांद १

उत्तरेस सेते दलेकर मंडले
व सेलस्या व मृग जैतापुर १

पश्मीमेस बांद भुसकुटी १

दक्षणेस पर्या व मळी खाजण बापट व जाम-
दार मृग जैतापुर

येणे प्रा सीमा असे. उमेद धरून माहामूर करणे. कोणे बाबे शक न धरणे. कौल असे. रा छ मोहरम २१. (!) [ शिक्का— मोर्तब सुद ]

भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ८, पृ. ७९-८०.

२२ जुलै १७३२ ] (–३८७–) [ १० सफर, सलास सला-
सीन मया अलफ

श्री

राजश्री आनंदराऊ पवार गोसावी यांसी

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो बाजीराऊ बलाळ प्रधान आशीर्वाद सुा सलास सलासीन मया अलफ. राजश्री मल्हारजी होळकर व रा राणोजी शिंदे व तुकोजी पवार व जिवाजी पवार यांस व तुम्हांस प्रांत माळवा येथील महालाची वाटणी करून दिल्ही आहे. त्याच्या सनदा सादर आहेत. त्याखेरीज पर मुलक

सुभा अजमेर सुभा प्रयाग व वोडसे व दतिया वगैरे मुलख येथील आकार होईल त्यापैकी दिवाणची बाबती व सरदेशमुखीचा येवज काढून बाकी राहिले येवज त्यास दर सद्दे रूा १६ सोळा प्रमाणें तुम्हीं आपली तक्षीम घेत जाणें. छ १० सफर
[ शिक्का – लेखन सीमा ]
[ शिक्का – श्री : राजा शाहू नरपति : हर्षनिधान बाजीराव : बल्लाळ मुख्य प्रधान ]

मालव–साहित्य, इंदूर, व. ३, अं. ३–४, इ. १९३२, पृ. १८६.

५ सप्टेंबर १७३२ ] (– ३८८ –) [ भाद्रपद वद्य १३ मंगळवार, रा. श. ५९

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५९ परिधाविनाम संवत्सरे भाद्रपद बहुल १३ भोमवासरे क्षेत्रिय कुलावंतस श्रीराजाशाहू छत्रपती स्वामी याणी राजश्री देशाधिकारी [ शिक्का ] [ शिक्का ] व लेखक वर्तमान भावी सुभा प्रांत चेउल यास आज्ञा केली ऐसी जे. संभाजी बाजी यास मौजे गुगुलवाडा तर्फ आतोणे सुभा प्रांत मार हा गांव इनाम आहे. त्यास ते देहअवसान पावले. यावर त्याचे पुत्र गंगाधर संभाजी याजकडे इनाम चालला. तेहि मृत्य जाले. त्याचे पुत्र कृष्णाजी गंगाधर याचे चालवणे स्वामीस अवशक जाणोन स्वामी यावर कृपाळु होऊन मौजे मजकूर कुलबाब कुलकानु देखील हालीपटी पेस्तरपटी खेरीज हकदार ब कदीम इनामदार करून इनामदार केला असे तरी तुम्हीं मौजे मजकूर यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालविणें. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षपं हुजूर न करणे. या पत्राची प्रति लिहून घेऊन हे असल पत्र भोगावटीयास परतोन देणें. जाणिजे. लेखन अलंकार [ शिक्का - मोतब्र सुद ]
रूजुसुरनिवीस

| | | |
|---|---|---|
| समंत | समंत | समंत |
| \| | \| | \| |
| समंत | मंत्री | सरकार |
| \| | \| | \| |
| बार | सुरू सुद | बार बार |

नवा मनु, व. २, अं. ११–१२, मार्च–एप्रिल १९३१, पृ. २४७–२४८.

१२ आक्टोबर १७३२ ] (– ३८९ –) [ कातिक शुद्ध ५ गुरुवार, रा. श. ५९

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५९ परिधावी संवत्सरे कार्तिक शुा ५ गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहूछत्रपती ह्यांणीं देशमुख व देशपांडये ता हवेली परगणे

खटाव यांस आज्ञा केली ऐसी जे. राजश्री दत्तोबा गोसावी व मनोहर गोसावी बिन [ शिक्का ][1] [ शिक्का ][2] श्रीधर गोसावी उपनाम नाझरेकर गोत्र वशिष्ठ सूत्र वाजसनी वास्तव्य क्षेत्र श्रीपंढरपूर यांणीं साताराचे मुक्कामीं स्वामीसंनिध येऊन विनंती केली कीं आपण श्रीचें भजन करून स्वामींस व स्वामींच्या राज्यास अभिष्ट चिंतून आहों. आपल्या कुटुंबाचे योगक्षेमास एक गांव इनाम करून देऊन वंशपरंरेनें चालविलें पाहिजे म्हणोन. त्यावरून मनास आणून गोसावी थोर सत्पात्र त्यांचें चालविलिया श्रेयस्कर जाणोन स्वामी यांणीं कृपाळू होऊन मौजे तडवळें ता मजकूर हा गांव पेशजीच्या मुकाशियाकडून दूर करून हालीं यांस स्वराज्य व मोंगलाई अमल ऐकून दुतर्फा कुलबाब कुलकानू देखील इनाम तिजाई हालींपट्टी व पेस्तरपट्टी खेरीज हकदार व कदीम इनामदार करून नूतन इनाम दिल्हा असे. तरि तुम्ही मौजे मजकूर चतुःसीमापूर्वक मर्यादेप्रमाणें यांचे दुमाले करून पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालविणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लेहून घेऊन हें असल पत्र भोगवटियास यांजवळ परतोन देणें. जाणिजे. लेखनालंकार. [ शिक्का— मर्यादेयं राजते ]

भा. इ. सं. मं. वार्षिक अहवाल, शके १८३३, स्वी. ग्रं. क्र. २, पृ. ११०; विविधज्ञानविस्तार, पु. ४२. अं. ९, सप्तेंबर १९११, पृ. ४१९

१७३३ इ. पूर्वी ] (–३९०–)

श्री

श्रियासह चिरंजीव राजश्री शाहूराजे यांसि प्रीतीपूर्वक श्रीमत् मातुश्री राजसबाई[3] कृतानेक आसीर्वाद. अत्रत्य कुशल जाणऊन स्वकुशलादि वेदकपत्रीं संतोषावाप्ति पाववीत गेलें पाहिजे. विशेष. तुह्मा कारणें संक्रमणप्रयुक्त तिलशर्करा पाठविली असे. स्वीकार करून उत्तर पाठविले पाहिजे. बहुत काय लिहिणे. [ शिक्का— विलसति लेखनावधि ]

नवयुग, वर्ष १०, अंक ४–५, क्र. ११२–१३, एप्रिल–मे १९२३, पृ. १.

२० मे १७३४ अखेर ] (–३९१–) [ २७ जिल्हेज, सन ११४३
३१ मे १७३३ अव्वल

तहनामा राजश्री लाडकोजी बावा आजहाद आंगरे सरखेल मोकदम कसबे

१. शिक्का– ‘श्री : राजा शाहू नरपति : हर्षनिधान : बाजीराव बल्लाळ : प्रधान.’
२. शिक्का– ‘श्री : आई आदि पुरुष श्री : राजा शाहू कृपानिधि तस्य : श्रीनिवास परशुराम : प्रतिनिधि.’
३. संभाजीराजे कोल्हापुरकर यांची आई.

चाकण व देशमुख प्रगणे मजकूर यांसी. तायाजी व कृष्णाजी व जानोजी व सुलतानजी चव्हान कडू मोकदम कसबे मजकूर व देशमुख प्राा मजकूर सन हजार ११४३ कारणे लेहून दिल्हे ऐसे जे. पूर्वी राजश्री सरखेल साहेबापासून १७५०० साडे सत्रा हजार रूपये घेऊन त्यांस दोही वतनाची तिजाई वतन दिल्हे. यासिवाय साहेबापासून आणखी ४२५०० साडे बेचाळीस हजार रूपये घेऊन त्यास कसबे मजकूरची मोकदमी व प्राा मजकूरची देशमुखी दोन्ही वतने दरोबस्त दिल्ही. फिरून राजश्री सरखेल साहेब कृपाळु होऊन आपले तर्फेने दोन्ही वतनांपैकीं निमे आपण घेतले व निमे आम्हांस दिल्हे. पेशजी दरोबस्त दोन्हीं वतनाचे खरेदीखत आम्ही लेहून दिल्हे होते ते आमचे आम्हास परतून दिल्हे. मग आम्हापासून कसबे मजकूरची निमे मोकदमी व प्राा मजकूरची निमे देशमुखी या दोन्ही वतनाचे निमेचे खरीदखत व महजर लेहोन घेतलें. आम्ही मोघम लेहून दिल्हे. तपसीलवार मानपान लेहोन दिल्हे न होते. म्हणोन तुमचा आमचा किंतु पडोन तुम्ही कुलाबियास चालिला. तरी तुम्ही कुलाबियास न जाणे. वतन दरोबस्त तुमचे. आम्ही तुमचे कोण्हाचे सांगितल्यावर चितांत दुसरा विचार न धरावा. मानपान सिका नाव नांगर सिरपाव होळीची पोळी गौरी गणेश व दोन्ही वतनाचा कारभार सदरहू कलमे तुम्हाकडे. या खेरीज पासोडी इनाम इकराम हकदक कानू कायेदे तुम्ही निमे आम्हांस घरांत द्यावें. बाहेर बोलावयासी आम्हास समंध नाहीं. आम्ही तुमचे घरभाऊ. आम्हास घरांत निमे द्यावे व निमे तुम्ही अनभवावे. घरवाडा उजवीकडे तुमचा व डावीकडे अमचा. आघाड तुमची व माघाड आमची. हा तहनामा आपले खुश रजांवदीने लेहून दिल्हा. सही छ २७ माहे जिल्हेज.

गोही

१ संभाजी नाईकवाडी काा मार प्राा मार [ निाा नांगर ]
१ जानवजी नाणेकर थळकरी काा मजकूर.
१ गंगाधर बिन मंग जोशी पुरोहित कसबे मजकूर.
बिाा भास्कर आनाजी देशपांडे कुलकर्णी कसबे मजकूर प्रगणे मजकूर.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. ३५५--३५६

२० जून १७३३ ] ( -३९२- ) [ १८ मोहरम

छ १८ मोहरम श्री

राजश्री जगनाथा यास व राजश्री आंब्रुतराव व राा येसवंतरायास आज्ञा केली ऐसी जे. तुम्ही जाते समाई तुम्हास आज्ञा केली त्या प्रमान वरतनुक होती या नाही तसच लिहिन. तुम्हाबरोबर ऐवज पाटिला आहे तो ज्याचा त्यास पावन विचारास येई तर सेखजीस हुजूर दर्शनास घेऊन येत. तुम्हास त्या प्रतीच वार न लागो देन

विचारास न चुकन बुधीस भरवस( भ्रंश ) न होऊ देन. युक्त चालल तीगत्ता ( तितका ) इचार सागन. घेतली थळाचा सवरक्षण होई ते करन. आम्ही ईश्वरी इच्छा आहे तर सरावनात राहिरी व खोकरीं व बाज किले पाहावयास येऊ. रा प्रतीनिधीसही आजनवेलीविसी लिहिल आहे. बहुत काय लिहित.

पुरवन.

रा सिवाजी म्हाराज व रा आबासाहेब व रा काकासाहेब व मातुश्री ताराबाई यास कोनास न जाहाल ते कारये रा चिरजीव बाबा व रा प्रधान याही केले. ही करित जगात्ती ( जगांतीं ) व निजामनमुलुक व दिली पावेतो जाहली हेचा त्याग ( सांग? ) करून पुना स्वानोभवि सत्ती कराव ऐस नाही. हेही तुम्ही जानतच अहा. जेन करून लोकीक राहे ते करन आसे : अनारभों मनुशानां प्रथमं बुधी लक्षनं व घडीघडी काय लिहिन व घडीघडी मातबर मानुस कोटला यवजन जे सागन तस उभत्तास जाते समही सागीत्तलच आहे. खर्चाची चीत्ता न करन. थोडाबहूत वरचेवर रवाना केला जाईल. वरचेवर या उपर लिहिन्याच व सागोन पाटवायाची सीमा जाहाली. निजामनमुलकासही मुबारखाबादही लिहिली व पइकाही पाटीला पाच हजार ५००० मुबारखाबादीचा. हेही तुम्हास कळवयाकारन लिहिल आस. बहुत काय लिहिन.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ११. अं. १, पृ. ५०–५१.

३ सप्टेंबर १७३३ ] (–३९३–) [५ रबिलाखर, आर्बा सलासीन मया अलफ.

श्री

.॥ छ माा अनाम बाजी साबाजी येशवंतराव पासलकर देशमुख व देशपांडे ताा मोसेखोरे यांसि नारो शंकर सचीव सुाा अर्बा सलासैन मया व अलफ. [ शिक्का ][1] राजश्री स्वामीनी वैशाख मासी साल गुदस्ता राजपुरीवरी मोहिम केली. राजश्री फत्तेसिंग भोसले व राजश्री बाजीराऊ पंडीत प्रधान यास फौजानसी रवाना केले. त्या बराबरी मावल प्रांतीचा हशमाचा जमाव व गडकिलीयाचा जमाव रवाना करावयाची आज्ञा जाहाली. त्यावरून जिल्हे निसबतीने राजश्री आनंदराऊ बहिरव याबराबरी जमाव देऊन रवानगी केली. त्यास राजश्री फत्तेसिंग भोसले मौजे वेळु ताा खेडेबारे या मुकामी अले. तेथील मुकामी तुम्ही अजम सेखजी याचा कबिला घेऊन भेटीस गेले. सला दिला. मारनुल्लेनी मौजे केलवडे ताा खेडेबारे येथें रवाना केला आणि तुम्हास सांगितले कीं मावल प्रांतीचा जमाव तुम्ही गोला करणे म्हणोन सागोन पाचाशा जमावाचा यैवज सिरिस्तियाप्रमाणे रुपये अडीच हजार

१. शिक्का– ‘ श्रीमद्राम : चरणी शरण शंक : रसुत नारायण. ’

तुमचे पदरी घातले. त्यावरून तुम्ही मालाहात येऊन लोक गोळा करितां. मोहिमेची मुराणी अवच्यासी जाहाली. पाचा रुपयाप्रमाणे दरमाहा कोण्ही कबूल करीनात. तेव्हां दर असामीस समजाविसीने सात आठ दाहाबारा पावेतो दरमहा कबूल करून देखील मुठेखोरे मारणे. देसमूख व जनाजीराम यास सामील करून घेऊन दोही माहालीचा मिलोन जमाव केला. तीनसे जमाव करून मौजे बारपे ता पौडखोरे येथील मुकामी येऊन लस्करात दाखल जाहालेत. ते दुसरे दिवसी फौजा घाट उतरोन मजल दरमजल सिखरियास अल्या. वैशाख वद्य अमवाशा छ २८ जिल्हादी खोकरी हस्तगत केली. ते दिवसी तुम्ही अपल्या जमावानसी कस्त करून बाले बले राजा धाकटा नजीक बालपीर येथे निशाने चालऊन मोर्चियास राहिलेत. त्याउपरी राजकोट व राजपुरी हस्तगत जाली. पुढें तुमचा जमाव तुम्ही जे तैनाती केली त्याप्रमाणें सिरिस्ता दरबारीहून होईनासा जाहाला. त्याकरिता लोक दिलगीर होऊन फुटून चालिले. ते समई भीमराव मारणे देसमूख व जनाजीराम देशपाडे मुठे खोरे हे आपले जमावानसी निराले जाहाले, तुम्ही आपला जमाव निराला केला. तुमचा मोर्चा जेथें होता तेथेंच तुम्ही जमावानसी राहिलेत. मुठे खोरियाचा जमावास दुसरा मोर्चा नेमून दिल्हा. त्याउपरी पुढें रायेगड सह वर्तमान कोंकणप्रांतीची देशदुर्गे हस्तगत जाहाली. साहेब काम बहुत जाहाले. ते समई मावलच्या कुल सरदारानी व जमीनदारानी व गडकिलियाच्या लोकानी बोली घातली कीं तख्ताचा जागा रायेगड सुटला. याउपरी मावल प्रातीचा मोगलाईचा कर लोकास खासगत सेतावरी ज्याची त्या बा ? द्यावी. जमीदाराचे इनाम आहेत त्याची मोगलाई त्यास बकसीस करून दुमाला खर्च ल्याहावी. स्वराज्याची इनाम तिजाई मात्र घ्यावी. बाबती स्वतंत्रीक घेउ नयेत म्हणून राजपुरीच्या मुकामी विनंती केली. त्यावरून मनास आणून सदरहूप्रमाणें तह करून मावल प्रातीच्या हशमाच्या सरदारास व गडकिलाच्या लोकास व जमीदारास माहालोमाहाल सनदा सादर केल्या. त्याप्रमाणे सनदाच्याविसी तुम्ही विनंती केली. त्यावरून हे सनद सादर केली आसे तह बितपसील.

चाकरी लोकाची सेते गावगना असतील त्याच्या आकारावरी जे मोगलाई बसेल ते बाधून खर्च ल्याहावी वसूल न घ्यावा कलम १

तरफदार देशमूख देखील तुम्ही गावगना सेते इनाम आहेत व इनाम गाव आहेत नावनिसी बि तपसील

देशमुख व देशपाडियाचे इनाम गांव

देह

१ मौजे सिरकोली

१ मौजे तोब

१ मौजे पाथरसेत

१ मौजे डावीजे

४

१ तर्फ बाजीराव पा
१ तर्फ बालाजी राऊ पासलकर
१ ता अत्माजी बिन सोमाजी राऊ इबिन बाबाजी राऊ पा
१ तर्फ तुळाजी बिन सावजी राऊ पारकर
१ तर्फे कृष्णाजी बिन धावजी ना कडु
१ तर्फ निवगणे त्रिंबकजी नाईक बिन चादजी नाईक निवगणे

६

येकून तरफदार सहाजण याची गावगना इनामसेते आहेत. व कडाकडे मौजे चिखलखुर्द हा गाव इनाम आहे. व नीवगणे याकडे मजरा भाणसदरा मौजी आंबी हे बाडी इनाम आहे. त्यास तेथील आकार होईल त्यापैकी मोगलाईची बेरीज दुमाला घेणे. वसूल न देणे. दोनी तक्षिमा दुमाला घेणे. स्वतंत्रीक बाबती न देणे. कलम १

१ मौजे मुगाव येथील मोगलाई पेसजी दिल्ही त्याप्रा करार करून दिल्हे आहे

५

२ देशपाडे याचे गाव
१ मौजे सागरूण
१ मौजे पानसेत

२

७

सदरहू गावीचा आकार प्रा मोगलाई होईल तो येवज तुमच्या दुमाला दिल्हा आसे. तुम्ही घेणे. वसूल न देणे. स्वराज्याची जे बेरीज होईल त्याची इनाम तिजाई उभे बेरजेस द्यावी. दोनी तक्षिमा तुम्ही दुमाला घेणे. स्वराज्यापैकी स्वतंत्रीक बाबतीत घेताती त्या न देणे. कलम १

बाजे गावगनाचे वतनदार पाटील कुलकर्णी याची इनाम सेते व बलुत्याची बावेली व माहाराच्या माहारक्या देखील आकार होईल त्याची मोगलाई दुमाला ज्याची त्यास देणे. स्वराज्याची तिजाई उभे बेरजेस वसूल देणे. स्वतंत्रीक बाबती न देणे. कलम १

तुमचे इनाम गावी खड गुन्हेगारी बैतल कमावास जें दिवाण रुजू होईल त्याची तिजाई दिवाणात घेतली जाईल. दोनी तक्षिमा तुम्ही दुमाला घेणे. कलम १

येकून कलमे पांच सदरहू प्रमाणे तह केला असे. याप्रमाणे चालविले जाईल. जाजती आकार लागणार नाहीं. तुम्ही वतनाची सेवा करून माहालाची कीर्दी आबादानी करून सुखरूप राहणे. छ ५ रबिलाखर. [ शिक्का– लेखन सीमा ]
[ जोडावर दोन दोन शिक्के ]
पो छ १२ रबिलाखर मुरु सुद बार

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १–४, प. ११४ ते ११६.

४ नोव्हेंबर १७३३ ] (– ३९४ –) [ ७ जमादिलाखर, अर्बा सलासीन मया अलफ

श्री

[शिक्का][1] छ मा। अनाम देसमुख व देशपांडे परगणे वारूण यासि श्रीनिवास परशराम प्रतिनिधि सु॥ अर्बा सलासीन मया अलफ. राजश्री शामराउ रुद्र उपनाम बेदरे गोत्र अत्री सूत्र आश्वलायेन हे रायगडचे स्वारीहून आलियावर यानी सातारियाचे मुकामी विनंती केली जे आपणास येक गाव इनाम करून द्यावा म्हणउन. त्यावरून मनास आणता रायेगडास हबशियाचा वेढा पडला ते समई यानी किला नउ महिने जुजीवला. जातीनिसी खालते येऊन मोर्चे मारले. धनीयाच्या तक्ताचा जागा राखला. बहुत मर्दुमी यानी केली. याजकरता कृपाळू होऊन मौजे खुदलापूर पा। मा। हा गांव यास इनाम करून दिल्हा असे. कुलबाब कुलकानु हली पटी व पेस्तर पटी दुतर्फा देखील इनाम तिंजाई खेरीज हकदार दिल्हा असे. तर याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरने इनाम चालवणे. प्रति वर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन असल पत्र भोगवटीयासि परतून देणें. जाणीजे छ ७ जमादिलाखर. निंदेश समक्ष. [शिक्का-- राजतेः लेखनाः वधी]

बार सुरूसुद बार

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ५८-५९.

१७३३-३४ इ. स. ] (– ३९५ –)

शिद्धी सुरुल गुजरलियावर फिरावन हबसी यांनीं खानजादे यांस मारून आपणच हुकुमत करावयास लागले. खान मशारनईलेचे फर्जंद सिद्धी अबदुल रहमान वगैरा आठ जण बाहेर राजपुरीस शेख याकुब सुभेदार याचे हवेलीस राहिले. त्यांची बेपवाई केली. सबब त्या खानजादे यांहीं हुजूर महाराजांचे बंदगीस अर्ज केलीयावर महाराज राजेसाहेबीं इजानेबांचे हुजुरत अबूबतपन्हा रावसाहेबांस जंजिरेयाची मसलहत फर्माविली कीं आजलग तुम्हांस कैमतंबे हबसी यास तंबी पोहचवावयाबे हुकूम फर्माविले. अंमा तुम्ही आपले जमीदारीचे सबबेकरितां वसूलवस्ती करून हबसी वांचविलात. हल्ली हबसी याची हुकुमत बेबुनीयाद जाली आहे. तर तुम्ही बांफौज व बाआरमार जाऊन बमय जंजिरा व रायगडादेखील किलेजात सरकार तसरुफेंत आणून फिरवान हबसी कैद करणें व याकुदखान मरकुम यांचें फार्जद बाहेर राजपुरीस आहेत त्यांस हुजूर घेऊन येणें. त्यांचा गौरपरदास्त केला (कसरीनें खाल्हे) म्हणोन जुबान मुबारक फर्मा-

१. शिक्का— 'श्रीः श्रीआई आदि पुरु : ष श्री राजा शाहू छत्रप : ती स्वामि कृपानिधी त : स्य श्रीनिवास परश : राम प्रतिनिधि.'

विलीयावर बमोजी बईरशाद रावसाहेब जंजिरे यास खुद बादौलत बाफौज बाआरमार येऊन मोर्चेबंदी केली. याकुदखानाचे फर्जंद आठही जण रावसाहेबांचें बंदगीमध्यें रुजू होऊन आजिजी केली की, आमचे बुजरुगांची जागा आहे. मेहेरबान होऊन फिरावन हबसी यास (तंबी पोहो)चावून आमची जागा आम्हांस बाकरार (कसरीने खाल्ले) जमेदारी (कसरीनें खाल्ले) याची याद धरून आमचा (कसरीनें खाल्ले) रामाहा (कसरीने खाल्ले) साहेबांचे सरकारांत दाखल केली (कसरीनें खाल्ले) हजारो मकांजे किलेजात व कोट व जंजिरे मा (कसरीनें खाल्ले) रांत आहेत त्या सिलसिलेयास हा जंजिराही दाखल होईल. दर्यामध्ये एक घडा पाणी घातल्यानें दर्याची तरकी होते ऐसे नाहीं. आज आमची बुनीयाद वांचवून आमची पुस्तपन्हाडी केलीयानें साहेबांचा औसा फुतमाम आलमावर जाहीर होईल म्हणोन कैईजानें मिनतजारी केलीयावर रावसाहेबीं जमीनदारीचे तरीकेयानें त्यांची दिलवरी केली (कसरीनें खाल्ले) रायगडादेखील तमाम किल्ले सरकारांत दाखल करून जंजिरकर फिरावन मवास हबसी यांस नसीहत करून सिद्धी अबदुल रहमान खानजादे यांस बमय बिरादर जंजिरेयांत मसनदनिशीन करून रावसाहेब खुद बादौलत महाराजांचे मुलाजमतीस सातारे याचे मुक्कामास आले.

~~~~~~~~~~~~~

विविधज्ञानविस्तार, पु. ३९, अं. १०, आक्टोबर १९०८, पृ. ३९९–४००.

२८ मार्च १७३४ ] (– ३९६ –) [ चैत्र शुद्ध ५ गुरुवार
रा. श. ६०

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ६० आनंदनाम संवत्सरे चैत्र शुक्ल पंचमी गुरुवासरे क्षत्रियकुळावंतस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यांणी राजकार्यलेखनधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री जिवाजी खंडेराव चिटणीस यांसीं आज्ञा केली ऐसी जे. तुम्ही विनंती केली. आपले वडील आजे व तीर्थरूप यांणी सेवा केली. त्याजवरून कृपाळू होऊन चिटणीसीचा दरक वतनी वंशपरंपरेनें करून दिला व कारखानिसी व जमेनिसी हे दोन धंदे सर्व राज्यांतील वंशपरंपरेनें करून देऊन शपतयुक्त पत्रें करून दिलीं. त्या अन्वयें स्वामीनींही अभय पत्र दिलें. चिटणीसी वेतनास गांव जमिनी मोकासे लावून दिलें तें इनाम चालावेसें अभय वचन दिलें. त्याप्रमाणें पत्र करून देऊन चालविलें पाहिजे म्हणून. त्यावरून पूर्वीपासून कागदपत्र वृत्त मनास आणितां तुमचे आजे बाळाजी आवजी थोरले कैलासवासी स्वामीनीं राज्य साधन केलें ते समयीं बहुत श्रम साहस करून उपयोगी पडले. त्यानंतर दिल्लीचे जाण्याचे प्रसंगी संकट पडलें असतां बराबर फार सेवा केली व राज्याभिषेकाचे समयीं उपयोगीं पडून मनोरथ सिद्धी केली. त्याजवरून संतोष होऊन अष्टप्रधानांतील पद द्यावयाची योजना केली असतां चिटणीसीच वतनी वंशपरंपरेने द्यावी विनंती केली. त्याजवरून प्रसन्न होऊन शपथयुक्त पत्र करून दिलें. नंतर थोरले महाराज कैलासवासी झाले. यावर
~~~~~~~~~~~~~

कैलासवासी तीर्थरूप स्वामी यांणीं कोणी गैरवाका समजाविल्यावरून राज्यभारप्रसंगीं सरकारातून मुत्सद्दी यांस शिक्षा केल्या, त्यांत त्यासही केली असतां तुमचे वडील खंडो बल्लाळ यांणीं बहुत निष्टेनें वागून स्वामीस गोव्याचे लढाईत शूरत्व करून समुद्राचे भरतीस स्वामीचा घोडा पाण्यांत पोहोणी लागला असतां धरून उडी टाकून घेऊन निघाले. याजवरून बहुतच संतोष होऊन शपथ करून वचन दिलें. सर्व राज्य केलें तोही प्रसंग यवन यांचें प्राबल्य होऊन (?) झाला. स्वामींसही यवनांचे सन्निध जाणें आलें. तेथें गेले असतां कैलासवासी काकासाहेब चंदीकडे जाऊन राज्यरक्षण करण्याचे प्रयत्नास लागले. तेव्हां जातेसमयीं त्यांनीं संकट प्राप्त झालें असतां त्यास काढून देऊन आपण क्लेश भोगिले. त्यानंतर चंदीस जाऊन तेथेंही शेवा निष्ठे केली. तेथें संकटाचा प्रसंग प्राप्त होऊन निघणें दुर्घट पडलें असतां झुलपकारखान व गणोजी शिर्के यांस देऊन त्यांचे मोर्च्यांतून पाळण्यांत बसवून काढून घेऊन येऊन देशीं सेवा केली. त्यानंतर काकासाहेब समाप्त झाले यवनांस दिल्लीचें व्यसन प्राप्त झालें. तेव्हां स्वामींस त्यांणीं निरोप देऊन लावून दिलें. देशीं येणें घडलें असतां काकासाहेब यांची स्त्री आईसाहेब यांस आपला पुत्र घेऊन राज्यकारभार करण्याची इच्छा होऊन दुर्बुद्धि धरली. फौज देऊन सेनापति व परशराम त्रिंबक प्रतिनिधि रवाना केले. त्याबरोबर खंडोबास दिलें असतां स्वामीस गुप्तरूपें भेटून सेनापति व सरदार यांच्या खातर जमा करून सर्वांस स्वामीचे लक्षीं आणिलें. लढाई झाली. प्रतिनिधि पळून गेले. विजयी होऊन राज्यकारभार साधन प्रसंगांत सर्व स्थळें व सरदार प्रतिनिधी सरकारांतून यांस स्वामी लक्षीं लागण्याचें उपयोगी बहुत केलें. पुढें तुम्हीहि त्या अन्वयें स्वामीचें ठायीं एकनिष्ठता धरून आंग्रे वगैरे मातुश्रीचे लक्षांतील सरदार स्थळें वगैरे स्वामीचें लक्षीं वागण्याचा उपयोग करीतां. यावरून तुम्हांवर कृपा करणें अवश्यक जाणून चिटणिसी तुम्हास शपथयुक्त वतनी दिली आहे. तें व कारखानिसी व जमेनिसी हे दोन धंदे राज्यांतील दिले. त्याप्रमाणें करार करून देऊन चिटणिसी वतनास गांव व मोकासे व जमिनी लागल्या आहेत. इनाम करार करून दिले.

येणेंप्रमाणें महाल गांव जमिनी एकंदर ४५ तुम्हांस इनामी करून दिले असत. तरी तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें सदरहू दरक अनुभव करून सुखरूप राहणें. जाणिजे. खास दस्तूर येणेंप्रमाणें शेवा केली असे. वतनी धंदे करून इनाम खाणें. बहुत काय लिहिणें मोर्तब.

चां का. प्रभूच्या इति. साधनें, व. १, अं. १, आगष्ट १८८१, पृ. १३–१४.

४ आक्टोबर १७३४ ] ( – ३९७ – ) [ १७ जमादिलावल, खमस सलासीन मया अलफ

श्री

वेदशास्त्रसंपन्य राजमान्य राजेश्री शीर्ष्ट ब्राह्मण व धर्माधिकारी प्रमुख समस्त ब्राह्मण वास्तव्य कुसबे कराड प्रांत मा। स्वामी गोसावी यास सेवक संभाजी आंगरे

सरखेल दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करणे विशेश. येशो पुरुषोत्तम पळसुरा वास्तव्य मौजे धोपेश्वर ताा राजापूर याची स्त्री बनाम सावित्री हे मौजे रायेपाटण ताा माास आपले माहेरास जात होती. मार्गी मलिक आबदला मुसलमान याणे बळात्कार करून अकर्म केलें. हे वृत्त बाइको मजकुरीनें आपले घरास येऊन आपले स्वमुखे लोकास सांगितले. याची हकीगत हुजूर जजिरे विजयदुर्गीचे मुकामी लेहून आली. त्यावरून मलिक मजकुरास हुजूर आणून गर्दन मारिली. हाली बाइको माानें हुजूर येऊन विनंती केली कीं आपणावरी त्याने बळत्कार केला. पुढें साहेब धर्मस्थापक आहेत. आपणास प्रायश्चित होऊन कृतीत सरती होऊन यथायुग्त वर्तवावयाचा विचार होऊन येई ते करावें म्हणोन. त्यावरून याचा विंचार मनास आणिता माहाक्षेत्र प्रसीध व समस्त सिष्ठ माहाक्षेत्री व समंतात यौग ब्राह्मण याचे संमते प्रायश्चित होऊन कृतीत अधिकार व पंग्तिपावन व्हावया ब्राह्मणाचा विचार आहे तो मान्य असे म्हणऊन हे पत्र तुम्हास लिहिले आहे. तरी शास्त्रसंमतें करून कृतीत अधिकार होऊन येथापूर्व ब्राह्मणात येऊन पावन होये ते बाईकोस आज्ञा करून बाईकाचे वलित सुभा प्रांत राजापूर या जागा संमतें पत्र दिले पाहिजे. जाणिजे. राा छ १७ जमादिलेवल. बहुत काये लिहिणे. सुाा खमस सलासीन मया अलफ. हे विनंती

~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. तृतीय संमेलन वृत्त, शके १८३७. स्वी. ग्रं. क्र. १२, पृ. ९३–९४.

**२० फेब्रुवारी १७३५ वा ] ( – ३९८ – ) [ फाल्गुन शुद्ध ९ गुरुवार १६ फेब्रुवारी १७३८**

श्री

राजश्री सिवराव याची लिखित असे

श्री तीर्थरूप सकल सौभाग्यादि संपन्न मातुश्री बाई वडिलाचे सेवेसी अपत्ये सकल सौभाग्यादि संपन्न जिजाबाई साष्टांग दंडवत प्रणाम विनंति.

अत्रत्य कुशल ताा फाल्गुण शुध नवमी गुरुवासर पर्येत वडिलाचे आसीर्वादें करून वर्तमान येथास्थित असे. या नंतर वडिली आसीरवादपत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन आनंदाते पावलो. राजेश्री जगनाथ कचेस्वर बावा श्रीदर्शन करून हाली वडिलाकडे आले आहेत. हे सविस्तर निवेदन करिता श्रुत होईल. वरचेवर आसीरवादपत्र येणे. वर्तिकासमवेत पाठऊन सांभाल केला पाहिजे. बहुत लिहिणे तरी वडील असा. हे विनंती

~~~~~~~~~~~~

भारत सेवक, व. २, अं. १, आक्टोबर १९२८, पृ. १२

६ मार्च १७३५ ] (-३९९-) [ २१ सवाल, खमस सलासीन मया अलफ

श्री

राजा शाहू नरपती हर्षनिधान बाजीराव बल्लाळ मुख्यप्रधान
मा। तुंगचोरवा पा। खोचीवडें व पापडी शिंदे भंडारी यांस-

बाजीराव बल्लाळ प्रधान. सु।। खमस सलासीन मया अलफ. तुमचें वर्तमान रा। अंताजी रघुनाथ सरदेसाई यांणीं कुळवृत्त विदित केले त्याजवरून कळलें. ऐशास तुमची बोली मारनिलेशी जालीं. धर्मरक्षणांस तुम्ही सिद्ध आहां. तदनुरूपच ईश्वर मनोभिष्ट सिद्धीस पावील. चिंता न करणें. तुमचे ऊर्जित मा।निले सांगतील त्या प्रे।। केलें जाईल छ. २१ सवाल. [शिक्का- लेखन सीमा]

भंडारी विजय, व. ५, अं. ९-१०, सप्टेंबर-आक्टोबर १९२४, पृ. १४२.

१२ मार्च १७३५ ] (-४००-) [ २७ सवाल, खमस सलासीन मया अलफ

श्री

राजा शाहू नरपति हर्ष निधान बाजीराव बल्लाळ मुख्य प्रधान.

छ मा। धाग राऊत गणराऊत शिंदे भंडारी पा। का। बहादरपूर यांस-

बाजीराव बल्लाळ प्रधान सु।। खमस सलासीन मया अलफ. तुमचेविशीं रा। अंताजी रघुनाथ सरदेसाई व सरदेशपांडे प्रा। फिरंगाण यांणीं हुजुर विदित केले. त्याजवरून सविस्तर कळले. ऐशास तुम्ही मा।निलेशी बोली केली. त्या प्रे।। कार्यभागास सिद्ध होऊन निष्ठापूर्वक करणार. बहुत उत्तम आहे. कार्य भाग जालीयावर तुम्हांस गांव दिल्हा जाईल. आपला खातरजमा असों देणें. मा।रनिले सांगतील त्या प्रे।। तुमचे उर्जित केलें जाईल. जाणिजे. छ. २७ सवाल [शिक्का - लेखन सीमा]

भंडारी विजय, वर्ष ५, अंक ९-१०, आक्टोबर १९२४, मुंबई, पृ. १४२-३. राज. खं. ६, पृ. २१३-१४.

२९ सप्टेंबर १७३५ ] (-४०१-) [ आश्विन वद्य ९ सोमवार, रा. श. ६२

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६२ राक्षसनाम संवत्सरे अश्विन बहुल नवमी इंदुवासरे क्षत्रियकुलावंतस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी

राजश्री गंगाधर त्रिमल व रघुनाथ त्रिमल उपनाम हणमंते गोत्र मुग्दल सूत्र अश्वलायन यांसी दिल्हे इनाम पत्र ऐसी जे. तुम्ही साताराचे मुक्कामी स्वामीसन्निध विनंति केली जे. आपले पणजे राजश्री नारायण त्रिमल दीक्षित यांस महाराज राजश्री शाहाजी महाराज याणी मौजे बाणेरे ता। हवेली प्रांत पुणे हा गांव धारादत्त इनाम कुलबाब दरोबस्त वंशपरंपरेने करून दिला. त्याप्रमाणे महाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामी व राजश्री संभाजी महाराज व राजश्री राजारामसाहेब यांचे कारकीर्दीपरियंत इनाम चालला. अलिकडे राजाराम साहेब चंदीस गेले त्या समागमे आपले बाप तिमाजी रघुनाथ चंदीस गेले. जाते समई मौजे मजकूर श्री नारायणदेव चिंचवडकर यांचे स्वाधीन कमाविसीस केला. ते गावचा ऐवज आम्हाकडे पाठवीत होते. त्याउपरि महाराज साहेब मोगलाईतून स्वराज्यास आले. ते समई देवानी कमाविसामुळे वहिवाट चालत होता. त्यामुळें मौजे मजकूर आपणाकडे इनाम करून घेतला. परंतु गावचा ऐवज आम्हाकडेच वसूल देत होते व नारायण देवानीं महाराजांस पत्रहि दिल्हे आहे. जे मौजे मजकूरचा व वडिलास पुरातन इनाम आहे त्याप्रमाणें पत्रें करून देऊन चालविला पाहिजे म्हणून पत्र आहे. तें हि मनास आणून आपला गांव आपणास इनाम करार करून द्यावा म्हणोन विनंती केली व नारायण देवाचे पत्र व पूर्वील पत्र राजश्री महाराज शाहाजी राजे व थोरले कैलासवासी महाराज यांचीं पत्रें आणून दाखविलीं त्याचा मजकूर.

"अजरख्तखाने महाराज राजश्री शहाजी राजे दाइम दौलत हूं बजानेबू कारकुनानी हाल व इस्तकबाल व देशमुखानी प्रांत पुणे बिदानद सु॥ खमसैन अलफ (१६४९-५० इ. स.) दरीविले बाबत इनाम राजश्री नारायण त्रिमल दीक्षीत यास इनाम मौजे बाणेरे ता। हवेली प्रांत पुणे देह एक देखील नख्तयाती व महसूल व बाजे उजबती देखील तालुका ठाणे व तालुका देहाय व ठाणेबाब व सैलबैल मोईन व सादिलवार व खर्चपट्टी व पायपोसी व दसरापट्टी व ठाणेभेट व हुजूरेभट व मोहीमपट्टी व हेलपट्टी व तमाखू व बागाईत व अहिस्थान व विराहिस्थान व मोहतर्फा व थळजकाती निकाळू व पैसाळू व अश्वजकाती व ठाणबंदी व गाडा व घोडा व बंदी व बरदा व मेढी स्थळ व वेसीपेढी व पालभारा व बेगारी व राबता व अडपाली व कानू व गैरकानू व कमावीस हाल व पेस्तर वेठबेगार फर्मासी व सरहरसद व बार नमजग आंबराइ कुलबाब कुलकानू बाब महसुलेसी मौजे मजकूर देह १ अजरामऱ्हामत करून इनाम दिधला असे. दुमाले करणे. अवलाद अफलाद चालविणे. यास मुसल्मान होऊन जो कोण्ही इस्कील करील त्यास मकेमधे सूर मारल्याची सोगंध असे व हिंदु होऊन जो कोण्ही इस्कील करील त्यास कासीमधे गाई मारल्याचें पाप असे. हर दरसाल ताजे खुर्दखताचा उजूर न करणें. तालिक लिहोन घेऊन अस्सल दीक्षीत मजकुरापाशी परतोन देणें. छ १० जिल्हेज (५ डिसेंबर १६४९)."

येणेप्रमाणे पत्र तुम्ही आणून दाखविले व कैलासवासी राजश्री थोरले महाराज तीर्थरूप आबासाहेब व तीर्थरूप काकासाहेब यांची पत्रें आणून दाखविली. ती मनास आणून मौजे मजकूर तुमचा पुरातन इनाम चिंचवडकर देव यांचे कमाविसीचे वहिवाटीमुळें आपणाकडे करून घेतला असे जाणून स्वामी कृपालु होऊन मौजे मजकूर देवाकडून दूर करून हल्ली तुम्हास स्वराज्य व मोंगलाई अमल एकून दुतर्फा कुलबाब कुलकानू देखील इनाम तिजाई व सरदेशमुकी व साहोत्रा व सरपाटीलकी व सरगौडकी व हलीपटी व पेस्तरपटी जल तरु पाषाण निधिनिक्षेप सहित खेरीज हकदार व इनामदार तुम्हास व तुमचे वंशपरंपरेने इनाम करार करून दिला असे. तरी तुम्ही मौजे मजकूर चतुःसीमापूर्वक मर्यादेप्रमाणे आपले दुमाले करून घेऊन मौजे मजकूर सदरहूप्रमाणे तुम्ही व तुमचे वंशपरंपरेने इनाम अनुभवून सुखरूप राहणे.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. १५५–१५७.

१७३५ इ. नंतर ] (–४०२–) [ संवत १७९२

यादी धर्मस्थापना शास्त्र प्रमाण वेद पुरूषाज्ञा प्रमाण नाना धर्म प्रवृत्त होत नाना स्थली.

[ शिक्का – श्री : भवानी शंकर चरणी तत्पर आनंदराव : सुत यशवंतराव पवार निरंतर शके १७९२ ( बहुधा शा. शक नसून संवत असा वा = १७३५ इ. स. ) ]

१ गोत्र प्रवर शाखा सूत्र वेदमंत्रपूर्वक स्नानसंध्यादिक आन्हीककर्म करावे. पूर्व संप्रदाय टाकावा.

२ ब्राम्हण जातीनें घरीं रहाट ( चरका ) न ठेवावा. सुत स्त्रियांनी ..न काढावे पुर्ववृत्त ( वृत्ती ) टाकावी.

३ नवरीचे गळ्यांत जवाळी ( खारका बदाम वैगरेची माळा ). मुचीर्चा केला न घालावी. आपलें घरीं करून घालावी.

४ ब्राम्हण जातीनें एका दशाह द्वादशाह भोजन न करावे. तेरावे दिवशीं ब्राम्हण सुखरूप भोजनास घालावे.

५ सौभाग्यवती स्त्रीनें काचळी धरावी, लाखेचा व नरोटीचा चुडा न धरावा.

६ सौभाग्यवती ब्राम्हण स्त्रीचे पंगतीमध्यें विधवेनें मधी बसोन भोजन न करावें.

७ सौभाग्यवतीनें विधवेचे पंगतीस भोजनास न बसावें.

८ विधवा स्त्रीनें सेंडी धरून, विष्णु पुजा( ज )न करितात ते सेंडी सोडावी. निर्मल मुंडण करावें.

९ ब्राम्हणाहीं विवाहामध्यें नवऱ्यानवरीचे पाई मोचे घालून वैदिक कर्म न करावें.

१० विवाहामध्यें षोडश संस्कारामध्यें ब्राम्हणजातीही भांड अपशद्बोच्चारण-पूर्वक ब्राम्हण स्त्रीनें मणि न धरावे, वेद मंत्रोच्चारण पूर्वक सकल कर्मे करावी

११ समस्त ब्राम्हणाहीं षोडस कर्म सांगता सिध्यर्थ ज्या ज्या संस्कारी यथासामर्थ्य ब्राम्हण जेऊं घालावे.

१२ समस्त ब्राम्हणाही भोजन कर्मान्चें ठाईं पवित्र होऊन स्वयंपाक करावा. पक्वान्नें पापड लोणचे आदि करून.

१३ समस्त ब्राम्हणाहीं विवाहामध्यें नवऱ्यानवरीचें मस्तकीं पुष्पमाला बांधाव्या. मुचियांचें घरचें मोंड (बाशींग) न बांधावे.

१४ गोत्र प्रवर सपिंड निर्णयपूर्वक स्वसूत्रोक्त वेदमंत्रे करून विवाहादिक षोडश संस्कार करावें. पूर्व संप्रदाय टाकावा.

१५ ब्राम्हण जातीच्या समस्त विधवा स्त्रीनें प्रथम रजोदर्शन झाल्यानंतर केश मस्तकीं व आभूषण व चोळी काचोळी लहंगा न धरावी, एकवस्त्र सकच्छ धारण करावें

१६ सौभाग्यवती ब्राम्हण स्त्रीनें नाडें मस्तकीं न बांधावे.

१७ सौभाग्यवती ब्राम्हण स्त्रीने गळ्यापासून मस्तक पर्यन्त यथा सामर्थ्य सुवर्ण आभुषण धरावे. रूप्याचे नग मस्तकीं न धरावे.

१८ सर्व ब्राम्हणाही ब्राम्हणापासून वेद मंत्राचा उपदेश घ्यावा. दंडी संन्यासी जटिल गोसावी बैरागी मात्मसाद असे पाखंडी आहेत त्यांचा मंत्र अथवा त्यांचे आज्ञेमध्यें न चालावें. त्यांचा त्याग करावा.

१९ ब्राम्हण जातीनें ब्राम्हणापासून उपदेश घ्यावा.

२० ब्राम्हण जातीनें आपली कन्या विक्रय करून विवाह न करावा.

२१ सकल ब्राम्हण जातीनें विवाहामध्ये तोटियाचा खेळ न करावा.

२२ नवऱ्यानवरीहीं घरोघरी ही बाना न जेवावें, लहान मुलांसहित समस्त ब्राम्हणास.

२३ सकल ब्राम्हण यांचे स्त्रीनें स्वयंपाक करते वेळेस भोजन करते वेळेस दर्याशची चोळी घालावी किंवा धूतवस्त्र सोवळ्यांत घालावें तें चोळी वस्त्रे धारण करावे.

२४ समस्त ब्राम्हणाही समाराधना व पितृकार्य व विवाह कार्यांचे स्वयंपाक करणें तो स्वयंपाक करणार याणीं उपोषण असतां पाक करावा. अथवा पीठ भक्षावयासी द्यावें. आणखी न सेवावें. खावें.

२५ स्नान करून अस्पर्श धौत वस्त्र परिधान करून संध्या व ब्रम्हयज्ञ तर्पण नवेद्य वैश्वदेव भोजन करावें. पूर्व रीत टकावी.

२६ ब्राम्हण जातीनें प्रथम मागणी न करावी. तत्काल विवाह करावा.

२७ सौभाग्यवती ब्राम्हण स्त्रीनें चोळी धरावी. काचोळी टाकावी.

२८ सौभाग्यवती ब्राम्हण स्त्रीनें काशा पीतळेचे बिछवे न धरावे. रूप्याचे धरावे.

२९ ब्राम्हणाहीं स्त्रियानीं उदक खांद्यावरी व कडेवरी आणावें. मस्तकीं जल न आणावे.

३० ब्राम्हण जातीनें आटा साटा न करावा.

३१ ब्राम्हण जातीनें पेडा देडा दान न करावें.

३२ ब्राम्हणास ज्यास जेवायास सांगितले त्यानें जावें. पोरास समागमें न न्यावें.

३३ ब्राम्हण–भोजन व स्त्री– सवाशिण भोजन यांमध्यें विधवा पंक्तीस नसावी.

३४ ब्राम्हण जातीनें निव्हाऊ न करावे.

३५ समस्त ब्राम्हण जातीनें मृत प्राण्याचे उत्तरक्रिया शास्त्र प्रमाण करावें.

३६ समस्त ब्राम्हण जातीचे स्त्रीनें गुलेचे वस्त्र एकंदर न धरावें.

३७ जो ब्राम्हण मरेल त्याचे स्त्रीचे केश प्रथम अथवा दहावे दिवशीं काढावे तेव्हां शुद्ध.

३८ समस्त ब्राम्हण स्त्रिया यांणीं प्रत्यहीं स्नान सवस्त्र करून वस्त्रें नित्य धुवोन परिधान करावीं. चोळी व लुगडीं व सोवळीं धुवोन ठेवावीं.

३९ यज्ञोपवीत राहाटाचे सुताची न करावी. आपले स्वहस्तें सूत काढून करावी आणि धारण करावें समंत्रक.

४० ब्राम्हण जातीनें ब्राम्हणोदकें करून सर्वदा स्नान करावें. समाराधनादिक करावीं. तेथें शूद्रोदक नसावें.

४१ सर्व ब्राम्हण स्त्रीनें सव्य लुगडे नेसून कच्छ करावा. ल्हंगा टाकावा.

४२ सर्व ब्राम्हणाहीं जेवतेसमई एकास एकानें स्पर्श न करावा.

४३ सौभाग्यवती स्त्रीनें स्पर्श न करावें.

४४ सकल ब्राम्हण जातीनें सातावर्षांनंतर दहावर्षपर्यन्त तत्काल विवाह करावा.

४५ ब्राम्हण जातीनें ज्या गांवीं वधु असेल तेथे सहकुटुंब जाऊन तेथें मंडप घालून देव प्रतिष्ठा धरून लग्न संपादावें.

४६ ब्राम्हणाहीं ब्राम्हविधीनें विवाह करावा.

४७ समस्त ब्राम्हण याचे पुत्रानें वेदाध्यन करावें.

४८ जो ब्राम्हण अनाचार न सोडी त्यास वालीत घालावें. यथोक्त प्रायश्चित देऊन शुद्ध करून घ्यावें.

४९ समस्त ब्राम्हणाहीं यांचे पितृकार्यां वेदपाठी ब्राम्हण सांगावें भोजनास.

५० समस्त ब्राम्हणाहीं पितृ कार्याचे ठायीं ब्राम्हण बोलाविले असतील तितकें जेवुं घालावे.

५१ ब्राह्मणानीं शुद्रांचे घरीं विवाहादिक कर्म करण्यांत कर्म शुद्रकमलाकर ग्रंथ प्रमाणे करावे. वेद प्रमाणे न करावे.

धर्माचरण रीत्या धरून येणें प्रमाणे चालवावें. [ मोर्तब सुद– शिक्का ]

---

सहविचार, व. ३, अं. १, आगष्ट १९२४, पृ. ११–१४.

९ फेब्रुवारी १७३६ ] (–४०३–) [ फाल्गुन शुद्ध ८ सोमवार, शके १६५७

श्री शके १६५७ राक्षसनाम संवत्सरे फालगुण शुद्ध ८ इंदुबारे तदीनें देवालय श्री विश्वेश्वराचे कर्ता राजश्री पोमदेव महाजनी प्रस्तुत जिर्णोद्धार प्रपौत्र महादेव महाजनी अनंत महाजनी वीस महाजनी नाना महाजनी कृष्ण महाजनी बाबदेव महाजनी महादेव महाजनी पारकर. हनरबंद कान सुतारे वाडये......

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १–४, पृ. १२५

१८ डिसेंबर १७३६ ] (–४०४–) [ २५ शाबान, फसली ११४६

[1] [ खर्डे किल्ल्याच्या बाहेरील दरवाजावरील लेख ]

[ फारसी व उर्दू तरजमा मराठी ]

उत्तम व गुणवान अमीर व साहेब मरतबा राजा सुलतानाची निंबाळकर देशमुख देशपांडे मोकदम महाजन सेट वगैरे कसबे सिवपट्टण परगणे जामखेड सरकार अहमदनगर सुबा खुजस्ताबुनियाद औरंगाबाद यांचे कारकिर्दीत किल्ला सुलतानदुर्ग कसबेमजकूरची हद्द ता. २५ माहे शाबान सन ११४६ फसली बरहुकुम माहे हिजरी ११५६ सन ( ३ आक्टोबर १७४३ ) मध्ये तयार झाला.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३६, स्वी. ग्रं. क्रं. ६, पृ. २०० ते २७२

१७३६–३७ इ. स. ] (–४०५–) [ सबा सलासीन मया अलफ.

श्री.

बालाजी विश्वनाथ भट नंतर पेशवे हे याचे देशमुखीचें वतन.

सन सबा सलासीन मया व अलफ ( १७३६–७ इ. स. ) साली बाजीराव भट पेशवे याही करून घेतले जंजिराहून ते माहाल

१ मसल १ गोंवले १ बोरलई = ३

सन सबा सलासीन मया व अलफ ( १७३६–७ इ. स. ) यासालीं जंजिराहून गांवकुलकर्ण करून घेतले ते माहाल

१ श्रीवर्धन, १ दिवे बोरली, १ नांदगांव मुरुड, १ मसल, १ बेरली, १ गोवले, १ निजामपूर, १ गोरेगांव, १ मामले तले, १ घोसाले १ बिरवाडी = ११

१० फसली व हिजरी सनाचा मेळ बसत नाही. दोहोंमधील अंतर यावेळीं ३ चें असावयास पाहिजे.

पैकीं नांदगांव मुरूड येथील देशपांडे हजर जाहाले त्यांचें त्यास दिल्हे. १

बाकी राहिले माहाल त्यापैा देशपांडे याचा व देशमुख याचा कजिया लागला. सबब राजापुरी सुभाकडे जप्तीस गांव कुलकर्ण ठेविले. ते माहाल—

१ तले, १ घोसाले, १ गोरेगांव, १ निजामपूर, १ बिरवाडी, ·॥· गोंवेलें = ५॥

महाराष्ट्र साहित्य, व. १, अं. ५, नवंबर १९१९, पृ. २.

२१ जानेवारी १७३७ ] (–४०६–) [ २१ जानेवारी १७३७

महाराजांच्या, त्यांचे ईश्वर रक्षण करो, तैनांतीतील उमराव कायतानो डीसोझा परेरा, उपरिनिर्दिष्ट राजानें नेमिलेल्या चेउलेच्या किल्ल्यावरील गव्हर्नर व सेनापती.

मी या द्वारें दाखला देतों कीं मी चेऊन किल्ल्यावर राज्य करण्यास आलों तेव्हां भिवाजी नाईक नांवाचा इसम भंडाऱ्यांचा मुख्य होता व माझ्या तीन वर्षांच्या कारकिर्दीच्या मुदतींत सदर इसमांत महाराजांच्या सेवेंत प्रामाणिकपणा, उत्साह व शौर्य आढळून आलें ते असें कीं अहोरात्र तो आपल्या अनुयायांसह सपाटीच्या प्रदेशांत न चुकतां सदैव पहारा करित असें व त्याच्या नेमणूकीन्वयें त्याजवर जीं कर्तव्यें लादलेलीं होतीं ती बजावण्यांत तो चुकत नसे. महाराजांचा–ईश्वर त्यांचे रक्षण करो–सर्व बाबतींत तो राजनिष्ठ प्रजाजन आहे हें निदर्शनास आणित असे व त्यायोगें महाराजांची अशा उमद्या मनुष्यांना बक्षीसें देण्याची चाल जी रूढ झाली आहे त्याअन्वयें अशा सन्मानास व कृपेस पात्र असल्याचें त्यानें दाखविलें आहे. याच्या सत्य प्रतिपादनार्थ माझ्या सही शिक्यानिशीं व यांतील विधानांच्या खरेपणाविषयी शपथ घेऊन हा दाखला दिला आहे. ता. २१ जान्युअरी सन १७३७ रोजीं चेऊल येथील किल्ल्यांत दिला.

कायतानो डीसोझा पेरैरा.

भंडारी विजय, व. २, अं. १, आगष्ट १९२०, पृ. ६–७.

२३ फेब्रुवारी १७३७ ] (–४०७–) [ ३ जिल्काद, सबा सलासीन मया अलफ

श्री.

[ शिक्का ] [१]

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासविनिधि राजमान्य राजश्री बाजीराऊ

१. शिक्का– 'श्रीः राजा शाहू नरः पति हर्ष नीधान : बाजीराव बल्लाः ळ प्रधान.'

पंडित प्रधान ता। मोकदम मांजे पिंपळगाऊ ता। घोडे प्रांत जुनर सु॥ सबा सलासीन मया अलफ. मौजे मजकूर राजश्री वाकोजी ढमढेरे याजकडे मुकासा पेशजी आहे. तेणप्रमाणे सालमजकुरीं करार असे. तरी तुम्ही मशारनिलेसी रुजुवात वतॉन मौजे मजकूरचा मुकासबाबेचा वसूल यांजकडे सुरळीत पावणे जाणिजे. ३ जिलकाद. आज्ञाप्रमाण. [शिक्का- लेखन सीमा]

बार

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. २२३.

२३ मे १७३७] (-४०८-) [जेष्ठ शुद्ध ५, १६५९ शके; सलासीन मया अलफ

[अर्नाळा किल्यावरील शिलालेख]

बाजिराव अमात्य मुख्य सुमति आज्ञापिले शंकरा।
पाश्चात्यांस बघूनि सिंधुउदरि बांधा त्वरे जंजिरा॥
अर्नाळा जळदुर्ग चिंतुनि मनि बाजि तुळाजिसुता।
शिल्पज्ञें दृढ शौर्य जाणुनि तया दुर्गासि संस्थापिता॥ १॥
अंकबाण रस चंद्र शकातें।
जेष्ट पिंगळ सीतेंदु दिनाते।
पंचमी ध्रुवसु पुष्य हि जेव्हा।
येशवंत बुरुजाकृति तेव्हां॥ २॥ १६५९

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १२८.

३१ जानेवारी १७३८] (-४०९-) [२१ सवाल, समान सलासीन मया अलफ

श्री.

राजमान्य राजश्री यशवंतराव महादेव खासनवीस यांस आज्ञा केली ऐसी जे. तुम्हीं हुजुर स्वामी सनिद्ध विनंती केली कीं आपण स्वामींच्या राज्यांतील पुरातन सेवक, वडील वडीलांपासून सेवा करीत आहे. सांप्रत स्वामीनीं किल्ले रायगड व कोट महाड वगैरे खासनीस ठेवून सेवकाचे स्वाधीन केले आहेत. ऐसीयास पो॥ महाड येथील देशपांडेपण व गांकुळकर्णी ही वतनें आपलीं आहेत. जंजीरकरानीं प्रांत घेतला. आपले वडील आपण स्वामीच्या राज्यांत सेवा करीत आले. याजमुळें आपले भाऊबंद व तक्षीमदार वतन खात आले. वतनाचा हक सरकारांत जमेस येत आहे तो आपला आपल्यास देऊन वतन बहाल करून द्यावे व महाराज कैलासवासी स्वामी याणी आपले वडिलांस पो॥ मजकूर पैकीं इनाम गांव चार देखील खोती देऊन

चालविलें. त्याप्रमाणें महाराजानीं कृपाळु होऊन करार करून देऊन वैशपरंपरेनें चालविले पाहिजेत म्हणोन विदीत केले. ऐसीयात तुम्हीं स्वामीच्या राज्यातील पुरातन परंपरागत सेवक इतबारी स्वामी सेवा निष्ठेनें करीत आहा. तुमचें चालवणें स्वामीस आवश्यक जाणून स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन पो महाड मामले रायरी येथील तुमचें देशपांडेपणाचे व गांवकुळकर्णपणाचे वतन तुमचे तुम्हांस बहाल करून वतनाचा हक्क व ईनाम सरकारांत जमेस येत होता तो तुमचा तुम्हास दिला व पो मजकूर पो गांव ईनाम ४ चार पूर्वी तिर्थरूप कैलासवासी महाराज स्वामीनीं देऊन चालविले होते त्याप्रमाणें हल्लीं तुम्हास करार केले असत. बीतपा पो ईनाम गांव

पो महाड पो ईनामगाव बी तो
१ किंजगेली बुद्रुक
१ मौजे चोविंदे
१ मौजे कोल
१ मौजे किंजळकर

४

एकूण गाव चार तुम्हांस ईनाम करार करून दिल्हे असत. तरी सदरहू गाव देखील खोती ईनाम अनभवून गावचा आकार होईल त्यापैकी ईनाम तिजाई सरकारचे मामल्याकडे देऊन दोन तक्षिमा तुम्हीं वंशपरंपरे ईनाम अनभवणें. सदरहू चार गाव तुम्हास ईनाम दिले आहेत. यास तुमचे भावबंदास संबंध नाही.

पो महाड देशपांडेपण व गावकुळकर्णी व इनाम सेते वगैरे बीतपा
१ देशपांडेपण व गावकुळकर्णपणाचा हक सरकारांत जमेस होता तो तुम्हास दिला कदम
१ देशपांडेपणास ईनाम मौजे दादवली हा गाव व कसबे मजकूरी वगैरे गावी शेते व मळखंडे ईनाम आहेत त्याप्रमाणे करार असत.

२

सदरहू प्रमाणे वतने व ईनाम गाव व सेते मळखंडे करार आहेत. त्यास वतनाचा हकाचा आकार होईल त्यापैकी हक चौथाई व ईनाम तिजाई सरकारांत देऊन वतने व ईनाम वंशपरंपरेनें अनभवणें.

येणें प्रमाणें व गावकुळकर्ण वतने व वतन संबंधीं शेते व ईनाम गांव मूळखंडे वतनी हक्क व ईनाम गाव ४ च्यार करार करून दिल्हे आहेत. तरी तुम्ही आपले वंशपरंपरेनें लिहिल्याप्रमाणें अनुभवुन सुखरूप स्वामी सेवा करणे. जाणीजे. छ २१ माहे सवाल सुा समान सलासिन मया व अल्फ. लिहिल्याप्रमाणें वर्तणें. बहुत काय लिहिणें.

~~~~~~~~~~~~~~

नवामनु, व. १, अं. ५, सप्टेंबर १९२९, पृ. ११७–११८.
~~~~~~~~~~~~~~

१५ एप्रिल १७३८ ] (–४१०–) [वैशाख शुद्ध ७ शनिवार, रा. श. ६४

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६४ कालयुक्तनाम संवत्सरे वैशाख शुद्ध सप्तमी मंदवासरे क्षत्रियकुलावतांस श्री राजा शंभु छत्रपति स्वामि यांनीं समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री कृष्णाजी पंडित प्रतिनिधि यांसी आज्ञा केली ऐसी जे. काशीशेट गंगशेट शेट्ये कसबा संगमेश्वर यांचे विसी राजेश्री येसशेट पाथरे सावकार हुजूरबाजार यांनीं विनंति केली कीं शेट्ये मजकूर वतनदार निष्ठेनें वर्ततात. यांसी कसबा मजकुरीं जकात पैकीं कांहीं हक्क करून दिले पाहिजे. म्हणून त्यावरून शेट मजकुरांवर स्वामि कृपाळु होऊन कसबा मजकुरींचे जकातीवर हक्क करून दिले आहे. तपशील–मीठ गोणीस ८१॥ रूके कण गोणीस ८३ रूके. येणेंप्रमाणे मीठ गोणीस दीड रूका व कण गोणीस तीन रूके हक्क करून दिल्हे असें. तरी तुह्मी येणेप्रमाणे या वंशपरंपरेनें चालविणें. या पत्राची प्रति लिहून अस्सल नक्कल देणें. बहुत लिहिणें तरी सूज्ञ असा. समक्ष. [शिक्का]

वैश्य मासिक, व. ६, अं. १०–१२, जानेवारी–मार्च १९१६, पृ. २०७.

६ सप्टेंबर १७३८ ] (–४११–) [२ जमादिलाखर, तिसा सलासीन मया अलफ; जुलूस २१ हि. ११५१

[मोहोर]

बजानेब अमिल्लान हाल व इस्तिकबाल व देशमुखान व देशपांडेयान व अधिकारीयान व जमियत राजीवरयात महालानीहाय तालुके किले महिरूष कोट जंजिरे दंडाराजपुरी सरकार तळकोकण निजामन निजामांजाफे सुभे खुजिस्ते बुनियाद बिदानदके सुासन तिसा सलासीन मया व अलफ आंके बाजीराव बलाळ व चिमणाजी बलाळ देशमुख महालानिहाय मालक दंडाराजपुरी यासी हुजूर जंजिरा इलातिमास केला कीं आमचे बडे याही व आम्ही वतनदारीचे पेशे यांत दरबारी व परदरबारी सरकार तर्फेस रूजू राहून एक साला पणे सरकारची खैरखवाही चाहून कितेक सरकारचे तरतुदीमध्ये असोन जंजिरे याचे चाकरीत असो. याबद्दल मेहरबान होऊन आम्हांस परगणे दिवे व परगणे श्रीवर्धन व प्रा म्हसले व प्रा घोसाल व प्रा बिरवाडी व तपे मांडसले व मामले तले व तपे निजामपूर व तपे गोरेगांव गोवले येथील गांव कुळकर्णीपणाचें वतन करून दिले पाहिजे. आपण कांहीं नजर फरमाऊन वतनास हक्ककरार करून दिला पाहिजे म्हणोन इलतीमास केला. त्याजवरून खातिरेस आणिता बाजीराव बल्लाळ व चिमणाजी बल्लाळ हरदुबीरा हर मशारनिल्हे माहालानीहाय मामले दंडाराजापुरीचे देशमुख वतनदार असेत आणि याचे बडे

याही वतनदारीची तरीके याने सरकारी रूजू राहाने परबारी पदरबारी मेहनत करून सिदला नियेतीने सरकारची खर खयदीच्याहून कित्येक सरकारचे उस्तवारीचे तरतुदीमध्ये असोन जंजीरे याची चाकरी करीत असेत. अईदेसी जंजिरे याची चाकरी करण्याची उमेद राखीत असेत. अजी सबब देशमुख मशारनिल्हे यांचे हुस्नसेट उखवा अकिदत एकसानीवर नजर देऊन अर्जरहा वतन देशमुख मशारनिल्हेस सदरहू माहालानीहायचे गांवकुळकर्णीपणाचें वतन खालीसा व इनामती देखील बिलकूल हाली साल मजकुरापासोन जदीद करार करून ऐनायत केली असे महाल बी तपसील.

| | |
|---|---|
| १ प्रगणे दिवे | १ तपे मांडलें |
| १ प्रगणे श्रीवर्धन | १ मामले तळें |
| १ प्रगणे म्हसले | १ तपे निजामपूर |
| १ प्रगणे घोसाले | १ तपे गोरेगांव |
| १ प्रगणे बिरवाडी | १ गोवेली |
| ५ | ५ =१० |

सदरहूप्रमाणें दस महालाचे गांव कुळकर्णपणाचें वतन देशमुख मशारनिल्हेंस अवलात व अफलात महारामत केला असे. वतनास नजर सरकारी रू.॥ २५५० करार करून सदरहू गांव कुळकर्णाचे वतनास जमाबंदीवर दरखंडीस आदमण गले यासी गला वजनी वगैरे जिनसा जिन्नस नकी बाब दररूपयास ८॥· इकरार करून दिला आसे. तरी सदरहू महालाचे गांव कुळकर्णीचे वतन मशारनिल्हे मयाचे मकार जाणोन गांव कुळकर्णीचे वतनाचे खिजमत सिरस्तेप्रमाणें करून घेत जाणे आणि सदरहू मोजीब जे साली हस्त होत जाईल ते दस्तावर दरखंडीस ८॥· मण गले यासी गला व वजनी वगैरे जिनसा जिन्नस नक्तीबाब दररूपायास निमआणा प्रमाणें गांव कुळकर्णीचे वतनास हक देववीत जाणे. सदरहू भोजीत मशारनिल्हे आपले गांव कुळकर्णीचे वतनाचे उपभोग करितील. त्याचा सालमजकुरापासून भोगवटा जारी करून गाव अवलाद व अफलात चालवीत जाणे. दर हर साल ताजे सनदेचा हुजूर न करणे. नकल घेऊन अस्सल मशारनिल्हेनजीक भोगट्याबद्दल फिरावून देणे. परवानगी हुजूर. रसानगी खुशमहमद जबानी सोमजी ऐनकर अफरात. रवाना छ २ माहे जमादिलाखर सन २१ जुलुस व महमदशाही मुताबिला सन ११५१ हिजरी नवाबी. मोर्तब सुद.

महाराष्ट्र—सारस्वत, व. ४, अं. ११, मे १९२३, पृ. ३६९–३७०.

११ आक्टोबर १७३८ ] (–४१२–) [ आश्विन शुद्ध १० बुधवार, रा. श. ६५

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६५ काल्युक्त नाम संवत्सरे आश्विन शुध

दशमी सौम्यवासरे क्षेत्रियेकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी यांणी राजश्री रामचंद्र बावाजी प्रभु यांसीं दिल्हे इनामपत्र यैसी जे. तुमचे पिते राजश्री बावाजी नीलकंठ पारसनवीस हे पुरातन राज्यांतील प्रमुख सेवक. कैलासवासी थोरले महाराजस्वामीचे कारकीर्दीपासून परंपरेने मातबर स्वामिकार्यें करून स्वामींची कृपा संपादित आले. संस्कृत फारसी हिंदी व कानडी विद्येमध्यें निपुण. यांचे पुत्र तुम्हीं. त्याचप्रमाणें सर्व विद्यानिपुंण नवाब निजामन्मुलुक शिंदे सालर आस्फत्ज्याहा यांची व स्वामींची भेट जाहली ते समई तुम्हीं उभयपक्षींचे मध्यर्स्तीत फारसी विद्येचे निपुणते; जेव्हां बुद्धिकौशल्येकरून नवाब आस्फत्ज्याहा यांसीही संतोषी केलें, स्वामींचीही सेवा अकृत्रिमरीतीनें करून स्वामीस परम संतोषविलें. याकरितां स्वामी तुम्हांवरी कृपाळू होऊन परगणे हल्याळ सरकार तोरगोळ सुभे विज्यापूर येथील मोंगलाई अमल देखील नवाब आस्फत्ज्याहा यांजकडून येकंदर तहामधें (ध्यें) सानक नेम करून घेऊन मोगलाई देखील ठाणें कसबा व देहाये सहित परगणे मजकूर खेरीज हकंदार व इनामदार करून कुलाबाब कुलकानू हालींपटी व पेस्तरपटी जलतरू काष्टपाषाण निधिनिक्षेपसहित बमै सायर व बमै नख्तयाती देखील आजरामन्हामत तुम्हांस इनाम करून दिल्हा असे. तरी तुम्हीं सदर्हु परगणे मजकूर देहात व ठाणें खातें आपले स्वाधीन करून घेऊन इनाम तुम्हीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून सुखरूप राहणें. स्वामी तुम्हांस परगणे मजकूर इनाम वंशपरंपरेने सुरक्षित चालवितील. जाणिजे. निदेश समक्ष. [मर्यादेयं विराजतें—शिक्का]

महाराष्ट्र—सारस्वत, व. ५, अं. ६, दिसेंबर १९२३, पृ. २२५; चां. का. प्र. इति. साधनें, व. १. अं. १२, जुलै १८८२, पृ. ३.

### १७ आक्टोबर १७३८] (—४१३—) [१४ रजब, तिसा सलासीन मया अलफ

[शिक्का][1] नारायेण

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री बाजिराव पंडित प्रधान ताा मोकदम मौजे मोहू पाा नासीक सुाा तिसा स(ला) सीन मया अलफ मौजे मजकूर इनाम पेशजीपासून मोरो मलार यांकडे आहे. तेणे प्रमाणे करार असे. तरी तुम्ही मारनिलेकडे रुजू होऊन चौथाईचा उसूल सुरलीत देणे. सरदेशमुखीचा... पेशजी पासून पावत आसेल तेणेप्रमाणे सुरलीत देत जाणे. जाणिजे. छ १४ रजब. सरदेशमुखीचा यैवज श्री स्वामी यांची समाध मौजे दारणा सागवी पाा

१. शिक्का — 'श्री : राजा शाहू नर : पति हर्ष निधान : बाजीराव बल्ला : ळ प्रधान.'

नाशीक येथे आहे. या पूजेस मारनिलेकडे देविला आहे. तेणेप्राा व... ल देणे. जाणिजे. छ मजकूर. आज्ञाप्रमाण. [ शिक्का : लेखन सीमा ]

बार

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १-२, पृ. १०६-१०७.

३१ जानेवारी १७३९ ] (-४१४-) [ १ जिल्काद, तिसा सलासीन मया अलफ.

श्री

राजमान्य राजश्री कमाविसदार पो चादवड गोसावी यांसी

सेवक चिमणाजी बलाल नमस्कार सुा तिसा सलासैन मया अलफ. मौजे कुरुड गाव पो मजकूर हा गाव पेशजी पासून राजश्री बलवतराव चिमणाजी याजकडे मुकासा आहे. तेथे तुम्ही उपसर्ग करून मुकासबाबेच्या अमलास खलेल केले आहे म्हणोन कलले. तरी याचे अमलास खलेल करावयास तुम्हास प्रयोजन काय. याचा मोकासा बाबेचा अमल पेशजी प्रमाणें सुरलित चालवणे. फिरोन बोभाट येऊ न देणे. जाणिजे. घेतले असेल ते माघारे देणे. छ १ जिल्काद. [ शिक्का – लेखन सीमा ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३२४.

१ मार्च १७३९ ] (-४१५-) [ १ जिल्हेज, तिसा सलासीन मया अलफ

श्री

राजश्री कमाविसदार दिा मोकासी पा चादवड गो

श्रो बाजीराव बलाल. प्रधान सुा तिसा सलासीन मया अलफ. मौजे कुरुड गाउ पो मजकुर हा गाउ रा सिवजी दामोदर याजकडे मोकासा देखील बाबती याजकडे पेशजीपासून चालत आले आहे त्याप्रमाणें करार असे. तरी तुम्ही मौजेमजकुरास उपसर्ग न देणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. जाणिजे छ १ जिल्हेज. आज्ञाप्रमाण. [ शिक्का– लेखन सीमा ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत, शके १८३७, ग्रं. क्र. ११, पृ. ३२२.

९ मार्च १७३९ ] (-४१६-) [ फाल्गुन शुद्ध १० शुक्रवार, रा. श. ६५

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ६५ कालयुक्त नाम संवत्सरे फाल्गुन सुध दशमी भृगुवासरे क्षत्रीये कुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजमान्य

राजश्री बापुजी श्रीपत यांसि आज्ञा केली यैसी जे. राजश्री शंकराजी भानगीरे हवालदार रत्नशाला यांचे मीरासीचें सेत मौजे हडपसर ता। हवेली पुणे या गावी आहे. तें सेत देशमुख ता। हवली मा। याणी व गांवकऱ्याने दुसऱ्या कुणब्यास वतन करुन दिल्हें आहे म्हणून विदित जाले. तरी हे गोष्ट त्यांस करावयास गरज काय. तरी तुम्ही पंचाईत मेलवून पंचाईताचे मते यांचे सेत यांचे दुमाला करणे. पुढें मागे याच्या सेतास काही कुसुर न होये ते गोष्ट करणे. मारनिल्हे हुजुर स्वामीसंनिध निष्ठेने सेवा करितात. यांचे स्वामीस अगत्य आहे तुम्ही अगत्य धरून येविसी साहिता करून यांचे सेत यांचे स्वाधीन होऊन ये ते गोष्ट कर्णें. जाणीजे बहुत काय लिहिणे.

[ शिक्का– मर्यादेयं विराजते ]

सुरू सुद बार. समत सुद बार.

भा. इ. सं. मं. अहवाल १८३४, ( भाग १ ला ), स्वी. ग्रं. क्र. ४, पृ. ६१–६२.

२२ एप्रिल १७३९ ] ( –४१७– ) [ २४ मोहरम, तिसा सला-सीन मया अलफ

[ शिक्का ]

तहनामा करार विदमाने राजश्री वेंकटराव व राजश्री दादाजीराव सरदार राजश्री राव प्रधान व अंतोन करनेल हे आलकास न जुजे पेद्र माऊसकुल येखतदार फिरंगी अमल जंजिरे गोवा तेरीख छ २४ मोहरम सु॥ तिसां सलासीन मया अलफ.

फिरंगी यांच्या मुलकामध्ये फौजा मुकाम जाहल्या आहेत. त्या उठोन जान्याच्या खर्चास फिरंगी याही सद्या द्यावे रुपये लाख सात, दर रूपयास असुरफी २ दोन प्रमाणें देता तपसील :

तहनामेवर उभयतर्फेंने निशाणें व सिके होतांच दोगे फिरंगी मोतबर दोन लाख रुपये बा। घेऊन लस्करात येतील. तेणेकरून पहिली खिस्त फारीक होईल. ते रुपये पावले नंतर साष्टी बारदेशांतील फोज उठवावी आणि कोट व फलकट सोडून देऊन मुलूख खराब जाहला तो आबदानीस यावयास रयत गांवीं येऊन कमाविसी व्हावयाकारणें कुलीं फौज फिरंगी याची सदर सोडून आपल्या कादास जावें आणि कांहीं जमावानसीं एक सरदार फिरंगी याच्या मुलुकाबाहीर सरदरे राहावा. त्या बराबर दुसरे खिस्तीचे रुपये आठा दिवसांत फारीक होई पावे तंव दोगे फिरंगी यांनीं लस्करांत राहावें

ते दुसरे खिस्तीचे रुपये तीन लाख आठ दिवसाच्या वाईद्यामधें द्यावे. त्याचा जिनस नकद व सोने रुपये पोवले व सकलाद द्यावे. येणेप्रमाणें फारीक जाहलें. नां। फिरंगी याचा दोन लाख रु॥ हुंडीबाबत राहिले. ते फारीक करून देत यावेत. दोगे वोलीस मातबर आदमी ठेऊन सदरहु दोगे फिरंगी यानी गोवेस जावे. तेरीख मजकूर

[ लेखन सीमा– शिक्का ]

[ फिरंगीयांच्या तर्फेनें Antonis Carueiro de Alcacoa & Joseph Pedro हे त्या प्रसंगीं Raia येथें हजर होते. ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ५९-६०.

१२ मे १७३९ ] (-४१८-) [ १४ सफर,

श्री

श्रीमत् क्षत्रियकुलावतांस महाराज राजश्री छत्रपति स्वामीचे सेवेसी विनंति. सेवक चिमणाजी बल्लाळ कृतानेक विज्ञापन्हा. शेवकाचें वर्तमान तागायत छ १४ सफर मोकाम वसई महाराजांचे (कृपेनें). येथास्तीत असे विनंति. बसईस मोर्चे छ ८ जिलकादी (७ फेब्रुवारी १७३९) लाविले. वसईचा बिलंद उंच वीस बावीस हात रूंधी. ईमारत बारा हात पकी. गजी तोफा थोर थोर व दारूगोळा व हुके गरनाळांस न्यून्य नाही. वसईच्या कोटास पश्चिमेकडेस समुद्र. दक्षिणेकडे मातबर खाडी. पूर्वेंकडे खाजन चिखल तीन अंगास उपाय नाही. उतेरकडेस खुसगी. तिकडे वाळून्ची जमीन. दोन हात खंटल्याने पाणी लागतें. जागा पका. फिरंगीयांच्या कोटात चार हाजार माणूस. त्यामध्यें एक हजार ढोणे फिरंगी पुर्तुकली. बाकी तीन हजार किरस्तांव वगैरे. एक हजार जुजते माणूस खबरदार होते. आरमार सामान वसईच्या बंदरांत तयार. मोर्चेवर भार कोटाचा व आरमाराचा होत होता. तेव्हा शेवकांनी तीनसे तोफा व दोनसे फटगडया लाग करून रात्रंदिवस मार देऊं लागलो. पांच-सातशे गोळ नित्य कोटास गेला. यानिराळे धंबधंबे पाच. एक दोंनसे हातांवर. दुसरा शंभर हातांवर. तिसरा साठी हातांवर. चवथा तीसा हातांवर. पांचवा कोटा-जवल. याप्रमाणें कोटापासोन तफावतीने बांधोने, करोळ व बंरखंदाज व जतालबाल-दार वरते बसऊन, मार राखोन फिरंगीयांसि सफेलीवर मार करूं लागलों. फिरंगी यानी धंबधंबेवर व मोर्चेवर गरनालाचा भार नित्य सीमेपरता केला. त्यानी मोर्चेतील धंबधंबेतील माणसें जखमी व ठार होत. तथापि महाराजाचे प्रतापें लोकांनी हिंमत न सोडितां जीवत्व त्रुणप्राय साहास करूं लागले. सुरूंगाचा उपाय केला, त्यास जमीन रेतीची. घर नाही. याजकरिता सुरुंग खंडोन दोन बाजूनी खांबावर तख्तपोसी त्याजवर दोनअडीच हात रेती गरनाळेस फुटेना असें करून सुरूंग बारा चवदा चालवितो. हे बातमी फिरंगीयांस कळलियावर सुरूंगावर मोठमोठीया गरनाळा टाकून सुरुंग मोडून टाकिले. दाहा-पांच सुरूंग याच रीतीने विछिन्न केले. तदोपर चोरीने दाहा सुरूंग कोटास न्हेऊन लाग करून टांकीं वाजतां फिरंगीयांनी आइकून पनाळानी पाणी सोडिले. पाण्याचा ऊपाय न चालेसा जाहाला. तेव्हा आगीचा मार करून मोटे मोटे बोडे पेटवून खालीं टाकून त्यावर राळ व तेल टाकून च्यार-पांच रोज डोंब केला. तरी ऊपाय न चालेसा जाहाला. तेव्हा कुसीचे बाजूने नारळीचा

मेढा घालून पेटी भरून तोफा लागू करून तोही तयार जाहाला. शेवकांकडून सुरूं-गाची तयारी छ ३ सफरीं ( १ मे १७३९ ) जाहाली. लस्करच्या लोकांस व हशमास बाजू वांटून देऊन सुरूंगास नगारेची अशारत करून सुरूंग ऊडतांच सर्वांनी ऐलगार करून जागा फते करावा ऐसा सिद्धांत करून सुरूंग भरोन लिपोन घेऊन बत्या भरून आणून छ ४ सफरीं बुधवारीं ( २ मे १७३९ ) प्रातः काळीं दोन घटिका दिवस येतां सुरूंगास बत्या दिल्ह्या.

जेथे बतीस सरदही पोहंचली नाही तो अगोदर उडाला. कांही सारदी पोहंचली त्यास जरा विलंब लागला. दोन सुरूंग उडालेच नाहीत. त्यास प्रथम सुरूंग उडतांच लोकांनी उताविळी करून. हल्यास ऊठले. कांही कोटाखालीं गेले. कांही थोडे थोडे कोटाचे बुरूज उडाले. त्याजवर लोक चढले. तो मागून दुसरे सूरूंग ऊडाले. त्याने लस्करचे व हशमाचे लोक दडपले. कित्येक दगडांनी जखमी जाहाले. कांही लोक बुरूजावर चढले होते ते सुरूंगाने उडोन गेले. तेच फिरंगीयांनी सांभाळून हुके व मरनाळे व दारूचीं मडकीं व तोफाचे रेजगरीचे मार सीमेपरता केला. माणूस जायां व ठार बहुत जाहाले. दोनहि बाजूंनी लोक थडकून कसरले. काम सुत्धारले लोक धीरमोड जाहाले. ते दिवसीं काम कांही जाहालें नाही. उजवे बाजूचा सुरूंग मातबर बांधला होता त्याचा शोध करून पुन्हा सुरूंगांत आणखी दारूचे बुधले घालून बती दुरूस्त करून लिपोन वेधून छ ५ सफरीं ( ३ मे १७३९ ) महाराजाचे नामस्मरण करून लोकांची निवड केली होती त्यांस जोरावार ताकीद केली की पडेल तो पडेल राहेल त्याणे खामखा महाराजाचें निशाण कोटावर चढवावें असे करून बती दिल्ही-सुरूंग उत्तम प्रकारे उडाला. तेच लोकांनी चालोन घेउन निमीं बुरूज उडाला त्याजवर निशाणें चढविली. तो फिरंगीयांनी मेढेयांतून सांभाळून हुके व गरनाळा व दारूचीं मडकीं व दारूचा जोल्या व तोफाचा रेजगार ऐसा मार कुबल केला. तेव्हा लोक भाजून काढिले. फिरंगीयांजवल आगीचे बल भारी. तरी लोकांनी डोया देऊन बुरूजाच्या कराडीयांस दम धरून राहिले. फिरंगी यांनी तीन वेळां आम्हांकडील लोकांवर लगट करून उबलोन दिल्हे. ( ३ मे १७३९ ) तरी लष्करच्या व हमशाच्या लोकांनी छातीचा कोट करून पुनः परडियांसि व बुरूजांच्या बघलीस बसोन काईम जाहाले. तसेंच बुरूजाचे तळवटीस तबकें खाणोन आश्रा केला. दोन रोज येलगार केला. त्यास सुरूंग उडाले. त्याखाली लोक दडपले व जखमी ठार अजमास चार-पांच हजार होतील. तैसेच फिरंगीयांचे दोनहि येलगारां अगोदर दोनसे असे सातसें ठार जाहाले. या निराळे जखमी जाहाले. मेढी मारून फिरंगी बोलावला होता. मेढा जालावयाचा, विचार केला होतो. परंतु ते रात्रीस लाग चालिला नाही. फिरंगी यांनी हिमत धरून सिपाअीगिरी म्हणावी तैसी केली. ज्याचे नाम सिपाअीगिरी. सुरूंग उडाले. बाहेरील लोक निमीं बुर्जास जाळून पोहचले असतां अग्यास्त्रांनी दम धरावा. तेणे प्राप्त काये आहे तेंच फिरंगीच कीं इतुकी मर्दुमी करून, मेढा नूतन व बाहेरून आम्हांकडील लोक जुजले. त्याणीहि भर्दुमी सीमेवरती केली. पूर्वी भारथी

युद्धांत अतीरथी महारथी झुंजले. त्याच न्याये प्रस्तुत काळीं महाराजांचे यकनिष्ट शेवकलोकीं विरथीपण जूझलें. दीड प्रहर परियेंत आगीचा मार प्रजन्य फिरंगीयांनी केला. तितका सोसून राहिले. इतुकी आग पिऊन मराठे फौजेने दम धरिला. असें जाहाले नाही. सीमा केली. जागा कायम राखिला. कोट घेतले खेरीज उठत नाही असें पुर्ते कळले तेव्हा फिरंगी बेहिमत होऊन कौलाची बोली लागली. (४ मे १७३९) मातबर फिरंगी बाहीर येऊन शेवकास भेटले. आठ रोजाची मुदत द्यावी. शंभर गलबतें द्यावीं म्हणजे झाडून मुंबैस जातों असा करार करून गेला. आम्ही जेथिले तेथे मोर्चे काइम राखोन फिरंगी यांसी कौल दिल्हा. फिरंगी यांनी मुंबैहून शेंदीडशें गलबतें भाडेने आणिली व शेवकांनी शंभर गलबतें दिल्हीं. त्यावर कुल कबिले वस्तभाव चढवून छ १३ सफरीं (११ मे १७३९) फिरंगी गेला. जागा महाराजाचे पुण्यप्रतापें फते जाहाला. वसईसारिखा जागा ब्रांका बिलंद. कोणी गोष्टीचा अपाय नाही. याहीमध्ये फिरंगी याचा जागा सर्व गोष्टीने संजुती सामानपुर. लडाईला हे जागा येणें दुराबस्त (दुरापास्त) होती. परंतु महाराज पुण्यप्रतापी. महाराजांचे पुण्यप्रभावास जोड नाही. तत्प्रभावेंकरून फिरंगी या पायांस येऊन जागा हस्तगत जाहाला. अन्यत्रया जाग्यास उपाय आहे असें नाही. महाराजांचे प्रतापतेजोद्भवें सार्वभौमादिक म्लान होऊन महाराजांची कीर्ती समुद्रवलयांकित पृथ्वींत प्रफुल्लित जाहाली आहे. फिरंगी यांचा जागा वसई हस्तगत जाहालियामुळे समुद्रांत सर्वांत दहशत प्राप्त होऊन चौऱ्याशीं बंदरांतरीं महाराजांची सलावत गालीब जाहाली. महाराज ईश्वरी अंश. जे गोष्टी यामागे कर्णद्वारा श्रवण जाहाली ते या कलयुगीं महाराजांचे पुण्यप्रभावें दृष्टीगोचर होते. अघटित गोष्ट घडोन येते. पूर्वी दाशरथी व श्रीकृष्ण व पांडवादिक अवतारी याणी दैत्यांदि दमने करून, देव ब्राम्हणांचा आशीर्वाद घेतला. त्याच न्याये महाराजांनी या युगीं अवतार धरून धर्मद्वेष्टे दैत्यांचा निःपात केला. महाराजांचा स्तुति स्तव मानवी लोकांनी करावा, असें सामर्थ्य काय आहे ! मुख्य गोष्ट महाराजांचे पुण्यें वसई फते जाहाली. अन्यत्रास शेवक लोकांचा उपाय होता असा अर्थ नाही. विस्तारें कृत' महाराजांचे सेवेशी विदित व्हावयास्तव विनंतिपत्र लिहिलें आहे. शेवेसी श्रुत होय. हे विज्ञापन्हा.

~~~~~~~~~~

सह्याद्रि, व. ५, अं. ५, मे १९३९, पृ. ४०४–६.

१९ आगष्ट १७३९] (–४१९–) [श्रावण वद्य १२ रविवार

श्रीमंत राजश्री नानास्वामींचे सेवेसी.

आज्ञाधारक बाबूराव गणेश कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल ता। श्रावण वद्य १२ रविवारपर्यन्त स्वामींचें कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष : डावे बाजूचे लोकांचें वर्तमान तरी श्रावण वद्य ९
~~~~~~~~~~

नवमीचें ( १६ आगष्ट ) दिवशीं आम्हांस प्रातःकाळींच बोलावून नेलें आणि वर्तमान सांगो लागली जे आम्ही मनोभावेंकरून नानास्वामींसी मित्रत्व केलें आणि सा चार महिनेंपर्यंत अतिशयेकरून मित्रत्व चाललें. पुढेंहि न चाले असें जाहलें. होत्साता आपण सर्व लोकामध्यें बदलाम व श्रीमंत राजश्री आप्पासाहेब याजपाशींही आमची बदलामी जाहली. होऊन मागतीं पुढेंही त्यांहीं आम्हांसीं मित्रत्व करून आम्हांवर माया करूं लागलेच होते अथवा न होते यास्तव त्यांचें मत तेच जाणत. परंतु सांप्रत दोनचार महिने आम्हांस कागदही येत नाहीं. लष्करामध्यें दोन बोटे कागद एक दोन वेळां आला होता. प्रस्तुत दोन महिने न आला. यास्तव आम्हांजवळ बहुत दुःखित होऊन पाल्हाळे सांगितलें. ते पत्रीं लिहितां कार्यास न ये. स्वामी म्हणतील कीं इतकें दुःख एकाएकींच आठवावयासी काय कारण ? तरी गोकुळ अष्टमीचे दिवशीं रात्री हरिकीर्तन जाहले. अडीच प्रहर रात्रपर्यंत कथा होऊन मग आपण खासा नृत्यास उभी राहिली होती. तत्समयीं सौ. मातुश्री ताई तेथें गेली होती. त्यांस नात जाहलियावर मातोश्री बोलली कीं नानाचें पत्र आज आम्हांस आलें होतें. खुशाल आहो म्हणून लिहिले होते. त्यावरून त्यांच्या मनांत आले कीं , आठा चौं रोजीं ताईकडे पत्र येतें. आम्हींच काय केलें आहे ? बरे नाना बेइमान जाहले तरी सुखरुप होत. आपण तो त्यांसी एकनिष्ठच होतों व पुढेंहि असूच. परंतु हे गोष्ट कांहीं मित्रपणास विहित नव्हे. ऐशा बहुत गोष्टी सांगितल्या. परंतु त्या पत्रीं कोठवर लिहाव्या ? स्वामींनींही ऐसें न करावें. कागदीं पत्रीं समाचारास अंतर काय निमित्य करावें ? आपण तों सर्व जाणतच आहेत. परंतु जाहलें वर्तमान सेवकानें लिहिलें असे. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें. कृपालोभास अंतर न करावें. हे विज्ञप्ति.

~~~~~~~~~~~~~~

राष्ट्रोदय, व. १, अं. २, सप्टेंबर १९०९, पृ. २३.

१७३९–४० इ. स. ] (–४२०–) [ शके १६६१

यादी सेनापती व मुजुमदार झाले ईा राज्य ताा राज्य हाली शाहूराजा सुाा तपसील शके १६६१ सिद्धार्थीनाम संवत्सरे.

सेनापति आा सुाा वाा

१... दाबतोंडे. सरनौबत हुकुम मानीनासे झाले. मुऱ्हारज गडेनजीक सीवापट्टण तेथे चौरंग करून मारिले.

१ नेताजी पालकर मोगलाईत गेले. स्थान भ्रष्ट झाले व जातिभ्रष्ट झाले.

१ प्रतापराव गुजर. रणमस्तखानाचे लढाईत पडला.

मुजमूदार निमे सेनापती आा

१ प्रथम वेजु मुकुंद दाबतोंडे व पालकरे.

१ कान्हो मोरदेव गुपचुप पालकर व गुजर

१ अनाजी रंगनाथ मलेकर. बहिरराव मोहिते. कारकीर्द सिवाजी राजे.
~~~~~~~~~~~~~~

१ बहिरराव मोहिते वाईस गोळा लागून पडले. कारकीर्द संभाजी राजे.

१ माहादाजी नाईक पानसंबल कारकीर्द राजाराम मुा चंदी कर्नाटक प्रांत.

१ संताजी घोरपडे कारकीर्द राजाराम स्वामी द्रोह केला. राघाई मानीनें निाा .. मारिलें.

१ जेसिंग जाधवराव ताा राजा शाहू वडगांव जिा पन्हाला. गंडमाळा व्यथेनें मेलें.

१ चंद्रसेन जादवराव, पुत्र जाधवराव त्याचे मागें लढाईत गेलें. स्थानभ्रष्ट झाले.

१ संताजी जाधवराव त्याचे पुत्र धनाजी जाधवराव.

१ मानसिंग मोरे.

१ खंडेराव दाभाडे.

१ त्रिंबकराव दाभाडे तांब्राचे .... राजेश्री बाजीराव बल्लाळ मुख्य प्रधान त्याणी युद्धी मारिलें. प्र. गुजराथ.

१ यशंवतराव दाभाडे हल्लीं आहेत.

१ गोविंद गंभीरराव व बहिरराव मोहिते. कारकीर्द संभाजी राजे.

१ महादाजी तुकदेव, बहिरराव मोहिते. कारकीर्द संभाजी राजे. गरबड. झाली ते समई.

१ अनाजी रंगनाथ मलेकर कारकीर्द राजराम मुा चंदी, माहादाजी नाईक यास बल मागती पजमु झाली. निलो बल्लाळ परभू चिटनवीस जमीन निम.

१ कान्हो मोरदेव गपचूप मागती मुा चंदी निाा संताजी घोरपडे.

१ गोपाळ अनंत ठकार कारकीर्द राजाराम धनाजी जाधवराव सेनापती.

१ भवानी त्रिंबक निाा जाधराव कारकीर्द राजाराम ताराबाई.

१ कल्याण सिवदेव निाा संताजी जाधवराव.

१ शामराव आबाजी निाा मानसिंग मोरे.

१ भास्कर बल्लाळ सणवे निाा खंडेराव दाभाडे.

१ हल्ली धनबा सेणवे निाा यशवंत दाभाडे.

१३

सदरहू सेनापती व मुजमुदार झाले. जमीनीविसी पुरातन बाबाजी बाजी परभू त्याची देशकुलकर्णी हिरडस मावल त्याचे पुत्र हल्लीं खंडो बाबाजी परमू जमिनीसी करतात. हल्ली आसेत.

जनसेवा, व. १, अं. १२, मार्च – एप्रिल १९३५, पृ. ५५–५७,

१७४० इ. स. पूर्व ] (–४२१–) [ मार्गशीर्ष शुद्ध ५ शनवार

मार्गेश्वर शुद्ध ५ मंदवारीं रात्रीं मस्तानी राजश्री रायांची कलवंतीण आपलें हवेलींतून निघोन पाटसास रायाकडे गेली. तिचा व रायाचा अतिसहवास जाला. याजमुळें राऊ विलासी फार जाले. याजकरितां मातुश्रींनीं व आपांनीं रायास सांगितले कीं इचा वियोग चार दिवस करावा. ऐसें ह्मणोन तिजला हवेलींत ठेविलें. बाहेर जाईल रायाकडे ह्मणून चौक्या ठेविल्या. राऊ रागेंच कुरकुंबास श्रीच्या दर्शनास

गेले. पाटसीं येऊन राहिले. इजला त्या खेरीज खमेना. त्याजलाही खमेना याजकरितां युक्तीनें हवेलींतून निघून गेली असे.

राष्ट्रोदय, व. १, अं. २, सप्टेंबर १९०९, पृ. २४.

इ. स. १७४० पूर्व ] (-४२२-)

सेवेसी विनंति उपरी राजश्री महादाजीपंत पाटसीं जाऊन चार गोष्टी सांगितल्या व आपणही वरच्चेवरी पत्रें लिहिलीं. त्यावरून मस्तानीस पुण्यास रवाना केले. परंतु आपलें दर्शन जाल्यावरी पाठवावयाचीं पुढें रदबदल करवावी ऐसें आहे. यास्तव काय विचार करावा ? दोन कामें. एक जागिरीचें व एक मुलतानीकडील. हें तों जरूर एक जागा होऊन करावींच लागतात. त्यासी श्रीमंत करतीलच. टाकून जातील ऐसें नाहीं. आपण जाऊन तेथें रदबदलही केली तरी ऐकणें नाहीं. तेव्हां विरूद्ध दिसेल. यास्तव दुरूनच बरें कीं काय ह्मणोन आज्ञा. ऐसियासी राजश्री महादाजीपंत, मोरशेट काका यांजपाशीं बोलोन चालोन तिला वाटे लाविली असेल. पुढेंही आपल्याशीं अंतर न करीत. कदाचित् रदबदलही केलीच तरी उभयतांसीं बोलिलेच आहेत. उभयतांही चार गोष्टी समजावून सांगतील. स्वामी ह्मणतील कीं वऱ्हाड गोष्टीच लिहिल्या. तरी आम्ही चाकर लोक; लटकाच तर्क करून एखादा मतलबा लिहिला. आधीं तो स्वामी सर्वज्ञ आहेत. विचारेंच जें करणें तें करतील. कदाचित् तेंच ध्यानास येऊन केलें. भेटीस न गेलेत आणि त्यांच्या ध्यानांत काहींहि आलें. उभयतांमध्यें विपर्यास आला. तरी केव्हढी दौलत, केव्हडे लौकिक. एखादा अपाय होऊं शके. तेव्हां आम्ही काडीचें माणूस होतों तें लक्षाचें केल्याचें हेंच सार्थक कीं अपायास मूळ जाहलों. तेव्हां आम्हांस इहलोकीं छी थू आणि परलोकीं नरक, दोनी गोष्टी होणार. यास्तव चाकर कोणीही विचारानुरूपच जेथील तेथें मर्जी राखोन सांगेल. परिछिन्न कोणाच्यानें उभयतांस सांगवत नाहीं. परंतु आपण सर्वज्ञ. जे करणें ते विचारें करतील. त्यांचा आब राहोन सर्वा गोष्टींची तूट सोसून त्यांचें बरें होईल ते स्वामी करतील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

राष्ट्रोदय, व. १, अंक २, सप्टेंबर १९०९, पृ. २३-२४.

२६ जानेवारी १७४० ] (-४२३-) [ ७ जिलकाद शनवार

तीर्थरूप अपा स्वामींचे सेवेसी—

अपत्यें नानानें सा० नमस्कार विनंति. येथील वर्तमान ता। छ ७ जिलकाद शनवार संध्याकाळ पर्वतीचा बाग येथें असां. मस्तानीस बागांत बोलावून कैद केली.

कोणीं हत्यार धरीलें नाहीं. रात्रीं घरास घेऊन जाऊं. मग घरीं ठेवावीसा विचार जाहला तर घरांत स्वामींचे लिहिल्याप्रमाणें बंद करून ठेवूं. अथवा चोरून दहा माणसें बराबर देऊन कोथळा धनगड येथें भलते जागा पाठवूं. स्वामींनीं रायाचा जीव जतन करावा. नासरजंगवा मनसबा तों या गोष्टीनें बुडाला. राजाची मर्जी गेली. असें असतां स्वामीची आज्ञा व आमचा तवकल करून येणेंप्रमाणे आज संध्याकाळी जाहलें. येथून घरांत घेऊन गेल्यावर सुचेल ते करूं मारीत नाहीं. घरीं ठेवूं अथवा गडावर चोरून पाठवूं. रायाभोंवती चौकी केली पाहिजे. नासरजंगचा मनसबा तों नाहीं. तवकल करून फंद (?) नियमित केलें. कपाळीं असेल तें होईल. हे विनंति.

राष्ट्रोदय, व. १, अं. २, सप्तेंबर १९०९, पृ. २४.

९ फेब्रुवारी १९४०] (-४२४-) [२१ जिल्काद शनवार

श्री

चिरंजीव राजश्री नाना यास बाजीराउ बलाल आसीर्वाद. उपर येथील कुशलें ताा छ २१ जिल्काद शनवार मुकाम मौजे तादुलवाडी प्राा सेदूरवाद यथास्थित असे. विशेष. काल शुक्रवारी नासरजंग याचें फौजेसी थडक जाली. अर्धी हुजरातेची फौज चिरंजीव राा आपाजवल होती. ते फौज चालून जाउन मोगलाचे ढिगास थडकली. मोगलाच्या आरब्याचा मार सोसून चालीनेच जाऊन सेदोनसे लोकाचे हात लागले. तोफा सोडून मोगल माघारे सरले होते. परतु पहिल्या माराने सेदोनसे घोडे सेपंनास माणूस जाया जाले व त्याकडीलही सरदार फिरोन कुमकेस येऊन पोहचले. त्यामुले काल मोगलाचा आब राहीला. तसेच हरोलोस राणबा (शिंदे व) मल्हारबा (होळकर) यांनीहि उत्तम प्रकारे हत्यार लाविले. उजवे बाजूस फिरगोजी पवारावर राा पिलाजी जाधवराव व संभाजी सिंदे व अणीक पथके होती ते उठली. फिरगोजीस मोडून ढिगास घातला! निराली निराली जुझे जाली. आज साऱ्या फौजा येकावर येक नजर राखून येकदाच साऱ्यानी उठावे येसा करार करतो आणि मानमार्ग पाहून गनिमावर सलाबत बसवितो. जर ये समई महाराजांनी तमाम फौजास आज्ञा करून पुस्तवनी केली तर मोगलाचे निर्मूल करावे येसे आहे. पुस्तवनी न करीत तर जरबेत आणून गनिमावर सलाबत बसऊन सला करीतच आहो. महाराजाचा प्रताप समर्थ आहे तेणेकरून सर्व प्रसंग उत्तम प्रकारेंच शेवटास लागेल. हे आसीर्वाद. पाच सात घोडी मोगलाच्या ढिगातून पाडाव करून आणली. हे आसीर्वाद.

सह्याद्रि, व. १३, अं. १, जानेवारी १९४७, पृ. ३४.

१७४० इ. स. ] (–४२५–)

[ निजामुल्मुलकचें पत्र ]

मी दक्षिणेंतून आपल्या सेवेंत येण्यास निघालों. ज्या लोकांवर मी उपकार केले होते आणि माझा त्यांच्यावर अधिकार पोहोंचत होता अशांना मी निजामुद्दौला (नासिरजंग) यांजपाशीं ठेविलें होतें. ते लोक अदूरदृष्टि, दुष्ट आणि बेमान ठरले. उत्तर हिंदुस्थानांत गोंधळ माजला. (नादिरशहाची स्वारी) त्यामुळें या सेवकाला चार वर्षेंपर्यंत तेथें राहावें लागलें. यामुळें त्या दुष्टांना आपली सैतानी वृत्ति दाखविण्याची संधी मिळाली. नासिरजंग हा वयानें लहान आणि अननुभवी होता. भल्याबुऱ्याची त्याला कल्पना नव्हती. त्याच्या भोंवतीं उपटसुंभ (जमानियान) आणि लुबाडणारे जमले होते. त्यांची त्यानें परीक्षा केली नाहीं. स्वतंत्रपणें राज्य करण्याची कल्पनाही बेभान करणारी आहे. त्या कल्पनेची निशा त्याच्यावर चढली. त्याच्या भोवती जमलेले लोक म्हणजे आपादमस्तक खुशामतखोर होते त्यामुळें तर तो अधिकच धुंद झाला. त्यांनी त्याची खुशामत आणि हांजी हाजी केली. आणि त्याला शहाणपणाच्या आणि ताबेदारीच्या भूमिकेवरून काढलें. कधीं ना कधीं आपला जाब विचारण्यांत येणार आहे याचा त्यांना विसर पडला. त्यांनी आपला स्वार्थ साधण्यास सुरवात केली.

अज्दुद्दौला ऐवजखान याचा मुलगा जमालखान हा वऱ्हाडचा सुभेदार बनला. त्यानें नासिरजंगाकडून नऊ लाखाची सरंजामी जहागीर आणि सात लाखांची माफी जहागीर मिळविली. यावर त्याचें समाधान झालें नाहीं. त्याने सैन्यासाठी म्हणून माझ्या खासगीच्या परगण्यांतून अकरा लाखाची जहागीर घेतली. याशिवाय त्यानें दहा लाख रूपये रोख घेतले. हें सर्व युद्धसामग्रीसाठीं म्हणून त्यानें हस्तगत केलें.

अब्दुल अजीजखानाला औरंगाबाद प्रांताची सुभेदारी देण्यांत आली. सैन्य बाळगण्यासाठीं त्याला बावीस लाखांची जहागीर देण्यांत आली, तीसुद्धां माझ्या खासगीच्या परगण्यांतून. याशिवाय त्यानें आपली मुलें, आप्त आणि इतर संबंधियांसाठीं अयोग्य असे मन्सब आणि किताब मिळविले. आणि अशा रितीनें त्यानें आपलें बस्तान बसविलें. खानेआलम दखनी, सुल्तानजी, जानोजी वगैरे मराठे आणि इतर स्वार्थी सरदार यांनीं खोट्या गोष्टी सांगून आणि लबाडी करून आपल्या मनाप्रमाणें जहागिरी करून घेतल्या. आणि आपापलीं सैन्ये प्रमाणाबाहेर वाढविलीं. त्यांनीं आपली सैतानी वृत्ति आणि हरामखोरी दाखवून व एक होऊन कुटिल कारस्थानें चालू केलीं. आपली पापकृत्यें त्यांनीं निष्ठेच्या आवरणाखालीं झांकली. स्वतःचा उद्धटपणा झाकण्याकरितां आम्हाला दरबारी अदब माहींत नाहीं असें त्यांनीं भासविलें. याप्रमाणें त्यांनीं तयारी केल्यावर त्यांनीं आपलें खरें स्वरूप उघडें केलें.

जहागिरींची अशी खैरात झाली. महसूलांत गोंधळ निर्माण झाला. सर्वत्र बंडाळी वाढूं लागली. खजिना रिकामा झाला. शिपायांचे पगार वाढले, आणि लबाड

लोकांनी शत्रुत्व सुरू केलें. त्यांनी हरप्रकारें बंडखोरी दाखविण्यास सुरुवात केली. दक्षिणचा सुभा मोडण्याची वेळ आली. या वार्ता सतत माझ्या कानावर येऊं लागल्या.

याचा बंदोबस्त करण्यांत थोडा जरी विलंब लागला तरी प्रकरण आंवाक्याबाहेर जाईल याची मला खात्री झाली. प्रांत हातचा जाईल, संपत्ति नष्ट होईल आणि माझा अल्पवयी मुलगा (नासिरजंग) नाश पावेल असें मला वाटलें. म्हणून बादशहांचा निरोप न घेतां हा सेवक माळव्याला आला. नासिरजंगाला उपदेशाचीं आणि तंबीचीं पत्रे पाठविलीं. लबाड लोकांनी अदूरदृष्टी नासिरजंगाला अधिकच बहकाविलें. युद्ध करण्यासाठीं म्हणून त्यांनी त्याला हैद्राबादेहून आणिलें. त्यांनीं अधिकाऱ्यांच्या बरोबर पत्रें पाठवून जुन्या आणि अनुभवी अधिकाऱ्यांना बोलावून घेतलें. प्रत्येकाला आपल्या सैन्यासहित येण्याविषयी ताकीद करण्यांत आली. ते सर्व औरंगाबादेजवळ येऊन या लबाड लोकांना मिळाले. तेथें धूर्तांचा बाजार जहाला आहे हें पाहून त्यांनीं पुन्हां आपल्याकरितां मनसब आणि जहागिरी मिळविल्या. नंतर ते माझ्या विरूद्ध हालचाली करूं लागले. नासिरजंग हा स्वतंत्र सता मिळण्याच्या कल्पनेनें धुंद झाला होता. त्या धूर्तांनी त्याला भडकविलें. परमेश्वर न करो, या वृद्ध सेवकावर पराजित होऊन नष्ट होण्याची वेळ आली तर नाश होईल याचा त्यानें विचार केला नाहीं. तें सोडून दिले आणि त्याचा जय झाला असे मानले तरी त्या हरामखोरांच्यामुळें त्याच्यापाशीं तरी शिल्लक आणि सुरक्षित काय राहाणार होते? एकतर खजिना रिकामा झालेला त्याची उधळपट्टी झालेली; दुसरे शिपायाचा पगारासाठीं तगादा, आणि तिसरें म्हणजे मराठ्यांचे शत्रुत्व. यामुळें सर्वच गोष्टींचा निकाल लागावयाचा. नासिरजंग भारी गर्विष्ठ बनून फर्दापूरच्या घाटापर्यन्त आला. तेथून त्याने तहबुरखान ख्वेशगी आणि अब्दुलहुसेन खान यांस माझ्याकडे पाठविलें. तहबुरखान हा कलहप्रिय आणि धूर्त म्हणून प्रसिद्ध आहे. अब्दुल हुसेन खान हा नासिरजंगाचा खानेसामान (कारभारी) होय. तो तर शुद्ध सैतान आहे. नासिरजंगानें निरोप पाठविला कीं दक्षिणचा राज्य कारभार मी करीन. तुम्ही बादशहाकडे परत जावें. मी उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या. हें करणें बरें नाहीं असें त्या मूर्खाला सांगून पाहिलें. अब्दुलहुसेनखान आणि तहब्बुरखान यांनींहि मारूनमुटकून त्याला लिहिलें. त्याचे डोके भडकलें होतें. सैतानानें त्याला विलक्षण बहकाविलें होतें. त्यानें सरळ वाट सोडून अनर्थाची वाट धरली होती. उपदेशाचें औषध त्याला लागू पडलें नाहीं. शेवटीं निरुपाय होऊन अल्पावधींत मी सैन्य आणि युद्धसामुग्री यांची सिद्धता केली, आणि त्याला तंबी देण्याचा निर्धार केला. परमेश्वराची कृपा झाली. राजनिष्ठेच्या आणि आपल्या दौलतीच्या अभिष्टचिंतनाच्या क्षेत्रांतील हा सेवक प्रवासी आहे. त्यावर आपली कृपा नेहमीच राहत आली आहे. परमेश्वर कृपेनें आणि आपल्या भाग्यानें त्यां लबाड लोकांना दहशत बसली. आपले सैन्य आणि सरदार हे हादरून गेले आहेत हें नासिरजंगाने पाहिलें. त्या दुष्टांचा पाठिंबा मिळेल अशी त्याला आशा राहिली नाहीं. तो दुःखी आणि कष्टी झाला. त्यानें वरकरणीं या प्रकरणांतून अंग

काढून घेतल्यासारखें केलें. मुहतशमखान बख्शी खाने आलम, मुल्तानजी वगैरे सरदार आणि आपल्यापाशीं असलेला तोफखाना आणि इतर सामान त्यानें माझ्याजवळ पाठविलें. आणि स्वतः फकीरीची वस्त्रें अंगावर घालून तो दरवेश बनला. आणि शहाबुरहानुद्दीन गरीषशहाच्या दर्ग्यात जाऊन बसला.

हें विचित्र बंड लबाड लोकांच्या कारस्थानामुळें आकाशापर्यंत पोहोचल्यासारखें झाले होते. आपल्या कृपाभाग्यरूपी पाण्याच्या सिंचनानें दबलें.

अब्दुल अजीतखान आणि फत्तेहयाबखान यांच्या ताब्यांत किल्ले होते. त्यामुळें त्या दोघांना मोठें बळ प्राप्त झालें होते. ते किल्ले त्यांच्या हातांतून हिसकाऊन घेणें जरूर होतें. त्यामुळें हा वृद्ध सेवक बुऱ्हाणपुराहून निघाला. मी अबुल्खैरखान यास औरंगगडची फौजदारी आणि मग कसारीच्या घाटानें मी संगमनेर नाशिकजवळ आलों. तेथें मी अब्दुल अजीजखान यास बोलाविलें. ताबेदारींतच क्षेम आहे हें त्यानें पाहिलें. तो येऊन रूजू झाला. नासिरंजगाकडून त्यानें नुक्तेच दोन किल्ले मागून घेतले होते ते त्याने परत केले. अलंगाचा किल्ला हा मजबूत आणि प्रचंड आहे. केवळ निष्काळजीपणामुळें तो त्या दुष्टांच्या ताब्यांत गेला होता. त्या किल्ल्यावर हल्ला करून तोफा डागण्यांत आल्या आणि मोठे सुरूंग लावण्यांत आले. आणि अल्पावधींतच तो किल्ला त्या हलकट लोकांच्या ताब्यांतून निघून आमच्या हातीं आला.

यावेळीं फतेहयाबखानाचा निकाल लावण्यासाठीं सैन्य नेमलें आहे. त्याचा लवकरच निकाल लागेल. त्याचा किल्ला लवकरच हातांत येईल. इतर किल्लेहि युक्तीनें अगर युद्धानें बंडखोरांच्या ताब्यांतून काढून घेण्यांत येतील. हीं प्रकरणें मी शेवटास नेईन. तो दुष्ट रघु (रघोजी भोसले) मोठें सैन्य गोळा करून हैद्राबाद प्रांतांत धुमाकुळ माजविण्याच्या विचारांत असून त्या दिशेनें जात आहे. त्याला तंबी देऊन आणि त्या प्रांताचा बंदोबस्त करून मी आपल्या सेवेंत हजर होण्यासाठीं रवाना होईन.

आलमगीर, दीपावली अंक, १९६१; इ.; पृ. १०९–१११.

१७४० इ. स. पूर्व ] (–४२६–)

श्री.

राजश्री राउ पंडीत प्रधान गोसावी यांस सकल गुणालंकरण अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो मानाजी आंगरे रामराम विनंति. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. पांडवांचा साहाकारी श्रीमत रमारमण सबाह्य अभ्यंतर असोन राज्य करित असता आरण्यवास द्वादश वर्षे क्रमिला ही इच्छा त्याचीच. तद्वत आम्हाला प्राप्त झाले. हे इच्छा स्वामीची. परंतु विपिनवासानंतर

पदाधिकारि केले. सांप्रत तसे दिवस उदेले. हे ध्यानांत आहेच. सदय होऊन तदन्याय करणार स्वामी समर्थ आहेत. हालि व पेशजीचे सर्वार्थ नूतन निवेदन व्हावे ऐसे नाहीं. अदा अंत पावेतो साकल्यवत जाणतच आहेत. येतद्विषई विस्तारे लेखन काय करावे ? पत्रोत्तराची प्रतिक्षा च्यातकप्राय होत आहे. तर कृपामृत वृष्टी व्हावी. रा छ २२ रबिलाखर. बहुत काय लिहिणे. हे विनंती.

भारत—सेवक, व. २, अं. ५, फेब्रुवारी १९२९, पृ. ११६–११७.

१७४० इ. स. ] (–४२७–)

कान्होजीबावा वारल्यावर सखोजी आंग्रे सरखेली करूं लागले. ते वारल्यानंतर संभाजी आंग्रे धणीपणा करूं लागले. त्यावेळेस मानाजी बावाकडेस कुलाब्याची खबरदारी दरवाज्याच्या किल्ल्या यांजवळच होत्या. दोन तीन महिन्यानंतर मानाजीबावावर खासे राखेजवळ गेल्याचा आरोप आणोन धरावे असें केले. हे यांस समजले. तेव्हां चारपांच हजारांचा विषय जवळ होता तो बांधून पांच असामी माणसे हत्यारबंद तयार करून आपण हात्तेरे बांधून वोटीवर बसले. इतक्यांत संभाजी आंग्रे यांचे बोलावणे आले. त्यांस सांगोन पाठविले कीं, रात्रीस एत नाहीं. सकाळ येऊं. पहाट होतांच पांच असामी बरोबर घेऊन किल्ल्याचा दरवाजा उघडोन बाहेरे पागा होती तेथील खासी नागीण म्हणोन घोडी व सरसबोर म्हणोन घोडा असी दोन घोडी तयार करून निघाले. अगाशीसमोर भाटावर घोडी फेरूं लागले. इतकीयांत संभाजी आंग्रे यांस वर्तमान समजलें कीं मानाजी आंगरे निघोन गेलं. बुरूजावरून पाहूं लागले तो आकसी समोर घोडी फेरीत होते. तोफ भरावयास लागले. अशी चळवळ पाहून घोडी हाकोन रेवदंडियास फिरंगी याजकडेस आले. मागाहून त्यांची स्त्री भागिर्थीबाईसाहेब यांनीं कोळणीचें सोंग घेऊन बयासाहेब लहान होती त्यांस टोपल्यांत घालून रेवदंडियास आली. कान्होजीबावा यांची थोरली स्त्री लक्ष्मीबाई आईसाहेब यांचें पोटी संतान कांहींच नव्हते. त्यांची ममता मानाजी बावावर बहुत होती. सबब त्यांस संभाजी आंगरे यांहीं कुलाबेयांतून घालविली. ती निघोन पुणियास पेशव्याकडेस गेली. पेशवे यांही यांचा सन्मान बहूत केला. त्या वेळेस पेशवे यांही आईसाहेबास कांदले गांव इनाम दिल्हा. ती पुण्यातच होती. संभाजी आंग्रे याही धोंडजी आंग्रे यांस ठेऊन आपण निघोन सुवर्णदुर्गास गेले. इकडेस मानाजीबावांनीं दोन अडिचसे माणूस धरून राजकोट व चऊल मोगलाजवळून आंगरे याही पेशजी घेतला होता. त्याचा भेद करून मानाजीबावानीं घेतला. तेथें पांचसे माणसांचा जमाव जाहला. तेव्हां फिरंगीयाचा मुलाखाच होता. नागावीहून साबाजी तुकाजी येऊन भेटले. नंतर नानाजीबावानीं पालवाचे खाडीत माहागेरीवर दाहिजा पाठवून नागावीयाहून माहदाजी राम व यांचे पुत्र विठ्ठल

महादेव व त्रिंबक महादेव (प्रभू डबीर) असे त्रिवर्ग कुटूंब सुद्धा रेवदंडीयास आणिले. पुढें मसलत करावी तरी जवळ पैका नाहीं व दारूगोळाही नाहीं. पेशव्या-कडून कुमक आणावी तरी लांबणीवर पडते. तेव्हां सर्वांचा विचार ठरला कीं, सध्या इंग्रजास सामील करावा. कारण फिरंगीयांचे पाऊल कांहीं वाकडेसे वाटले म्हणोन माहदाजी राम मुंबईस इंग्रजाकडे गेले. आणि इंग्रजास सांगितले कीं, आमचे साहित्य करावे. त्यानी सांगितले कीं, अंगरे यांचा आमचा दावा त्यापेक्षां आम्हांस त्यांचे साहित्य करावयाचे नाहीं. माहदाजी राम यानी उतर केले कीं, आम्ही तुम्हाकडेस बोलावयास आलो यापेक्षां तुम्ही न ऐकाल तरी आम्ही विलायतेस पितसाव करूं. नंतर दुसरे दिवशीं त्याही आपले कौन्सल भरविलें. त्यांत ठरले की, यावेळेस त्यांचे साहित्य करावे. तेव्हां तह ठराऊन सहा हजार रुपये व पांच खंडीं दारू व चार तोफा दिल्या. फिरंगी कांही काबुवर होता त्यानें सांगितलें कीं, सामान सरंजाम रेवदंडियात उतरावा. तेव्हां यांनी विचार केला कीं, काबुवर फिरंगी खरा. महागेरीया सामान आणावयास मुंबईस रवाना केल्या. त्यांस ताकीद केली कीं, रेवदंडचे बंदरी महागेऱ्या एता चौकशी करितां महागेरीया खला असे बोलतील. परंतु तुम्हीं ऐकिले न ऐकिले असें करून भरघोस राजकोटाखाली जाताच माहागेऱ्या उपसून सामान जिकडिल तिकडेस फारिख करणें. महागेऱ्या रवाना जाहल्या. माहदाजी राम याही सदरहू प्रमाणें सामान घेऊन आले. बंदरात चौकसी होत आहे तो भरबोसें माहागेऱ्या राजकोटाखाली जातांच सामान उतरून जिकडिल तिकडेस फरिख केले. हें फिरंगीयास समजलें त्याणी मानाजीबावास सांगोन पाठविलें की, हे काय सामान रेव-दंडेयांत उतरावे ते परभारा चौकसी न होतां राजकोटास गेले. तेव्हां मानाजीबावा राजकोटचे अमलदारावर फिरंगी याचे समाधानानुरूप रागे भरिले. याजकडिल लोकांची कुटुंबें रेवदंडियातच होती. फिरंगीयांणीं मानाजीबावास धरावें असें केले. हें रात्रीस समजतांच आपले कडील लोक हुशार करून शहराचे दरवाज्यामधी मोठा फिरंगा होता त्या जवळ दरवाजाच्या किल्या होत्या. मानाजीबावानी आपणच तरवार उपसून त्या जवळ उभे राहिले आणि सांगितले कीं, दरवाजाच्या किल्या टाक. नाहीं तरी जीवे मेला जासील. धास्तीनें त्याणें किल्या दिल्या. त्या घेऊन शहराचा दरवाजा उघडोन आपलेकडील लोकांची सारी कुटुंबें काढोन घेऊन चेउलास फरमानबागात राहिले. तेथें पांच सहासें माणसांचा जमाव धरिला. नंतर कुमकेविसी पेशव्याकडेस राजकारण केले. त्याजकडून कुमक येई तों फिरंगीयाणी त्रेऊलची मसीद धरून तेथे मोरचा उभा करून राजकोटावर तोफांचा मार चालविला. तेथें एक लढाई मातबर जाहली. फिरंगी-याचा जमाव भारी. त्या लढाईत मानाजीबावाकडील लोक कच करून घायाळ बहुत झाले. पैका नाही व दारूगोळाहि नाहीं. टिकाव कसा निघतो. तेव्हां मानाजीबावा विरागी होऊन कारभारी यांस बोलले कीं आम्हीं देशांतरास जातो. तेव्हां साबाजी तुकाजी सुद्धां अवध्याचा विचार होऊन त्रिंबक महादेव यांही उतर केलें कीं, साहेब असे बोलतात तेव्हां आम्ही आमची कुटुंबेसुद्धां आपले बरोबर निघालों. पुढें आमची

वाट काय ? तरी चार दिवस वाट पहावी. जे दिवशीं परिणाम नच लागे ते दिवशी आपले जवळ अडीचतीनसे माणुस आहे भलते ठिकाणी जाऊन बच्याव करूं. नाहीं तरी आम्ही चार असामी आहों. चवघेजण भिक्षा मागोन आपले पोटास घालूं. हा आमचा निश्चय आहे. आपण धीर सोडूं नये. नंतर लोकांस भरंवसा देऊन चार दिवस तसेच टाकुन टोकानें राहिले. इतकीयात पेशवे यांजकडून कांहीं दारूगोळा व पांचसे माणूस पुढे येऊन पोहचले. मागाहून रामाजीपंत व दुबाजीपंत पंधरासे माणूस घेऊन येऊन दाखल जाहले. एकूण अडिच हजार माणसांचा भरणा जाहला. सारे लोकांनी तयारी करून फिरंगी मशिदीत होता त्याजवर घातले. मोठी लढाई जाहली. फिरंगीयाचा मोड होऊन पळोन रेवदंडियास आला. नंतर कुलाब्यांत भेदाचे राजकारण चालले. मल्हारजी कासार याजकडे हावाल्याचे काम होते. तो प्रतम भेदक. त्यास दहा हजार रुपये देऊं केले. नंतर कांहीं सरदार भेदले. मल्हारजी कासार याणी कुलाब्याचे दरवाजे उघडे ठेऊन इशारा देताच दोन हजार माणूस घेऊन मानाजी-बावा कुलाबेयांत शिरोन धोंडजी अंगरे यांस कैद केले. किल्याचा बंदोबस्त करून ज्या ज्या ठिकाणी जे जे सरदार व दरकदार व कारकून कारखान्यावर होते त्यास दीलभरंवसा देऊन त्या त्या ठिकाणी कायम करून बराबरचे माणूस पांचसहासे दरवाज्याचे बंदोबस्तास ठेऊन बाकी लोक घेऊन अलिबागेत आले. इतकियात हिराकोटचे व सागरगडचे लोक येऊन तेही दोनी किल्ले हस्तगत जाहले. पेशवे यांजकडील कुलबेयात पांच सहासे माणूस सिरले. तेव्हां रामजीपंतास व दुबाजीपंतास कुबुद्धि जाहली कीं, अनायासे ठिकाण हस्तगत जाहले. त्याही थोरले बाजीराव साहेबास लिहीलें कीं वेळ हीच आहे तरी आपण त्वरा करून दिडा दिवसांत येऊन पोहोचावे. हा मजकूर समजतांच खांदेरीचे संधान आले होते. पेशवे सारे गुंडळीतात तेव्हां रामाजीपंतास सांगितले कीं खांदेरीचें संधान आले आहे तरी खांदेरीस चलावें. लढा हापसी याजकडे होता. त्याचे वेढ्यास रामाजी साबाजीस संभाजी आंगरे यांजकडून दीड हाजार माणूस घेऊन तेथें होते. तेही लोक सुद्धा येऊन भेटले. कुलाब्याचे बंदोबस्तास त्रिंबक महादेव (डबीर) राहिले. त्याजवळ आठसे माणूस कुलाब्या-खेरीज आपले जिव्हाळ्याचे ठेऊन बाकी सारा जमाव घेऊन खांदेरीस चालिले. गलबतें महागेरिया भरून निघालरी. गलबताच्या नाली बाहेर दिल्या. रामजीपंतास व देसचे लोक होते त्यास दर्या लागोन वोकू लागले. तेव्हां बोलो लागले कीं, आमचा उपाय नाहीं. खांदेरी केधवा हातास येईल. त्यांस सांगितले आज एईल आसें दिसत नाहीं. ते बोलले कीं, आमचा परिणाम नाहीं. त्यावेळेस त्यास तळास उतरून मानाजीबावा लोक-सुद्धां खांदेरीत शिरोन तेथील बंदोबस्तास आपले लोक ठेऊन बाकी लोक, घेऊन निघाले. तों दीड दिवसांत बाजिरावसाहेब पालीस आले. इतक्यांत त्रिंबक महादेव याणी कुलाब्याचे दरवाज्याचा बंदोबस्त करून आंतील लोकांस ताकीद केली कीं, पाण्याचा तोटा आहे, तरी ज्यास पाणी पाहिजे त्याणी बाहेर जाऊन पाणी घेऊन यावें. दरवाज्यास ताकीद केली कीं, बाहेर जाईल त्यास आंत घेऊं नये. जो पाणी

वगैरे आणावयास बाहेर गेला त्यास आंत घेतला नाहीं. दोन प्रहर होतां पेशव्याकडील लोक बहुतेक बाहेर काढिले. दीड दोनशें माणूस त्याचे आंत राहिले. हजार माणासांचा आपला भरणा करून बंदोबस्त केला. बाजीरावसाहेब दुसरे दिवशी अलिबागेस येऊन दाखल जाहले. मानाजीबावाही खांदेरीहून आलीबागेस आले. तेथें पेशव्याकडील लोकाखेरीज मानाजीबावाचा आठ हजार माणासांचा भरणा जाहला. हे बाजिरावसाहेब यांही पाहून स्तब्ध राहिले. रामाजीपंतास व दुबाजीपंतास सिवीगाळ केली कीं इतके लोकांचा भरणा व असा किल्ल्यांतील बंदोबस्त असोन कसें लिहीलेत ? येथें आणोन फिके पाडिलेत. मीं बाजीराव आणि नामोहरा होऊन चालिलो इतकें अपयश माझें पदरीं तुम्हीं आणिलेत. मानाजीबावास बोलले कीं, आमचा खर्चवेच जाहला त्यापेक्षां आम्हास कांहीं तरी असावे. त्यावेळेस यांची आपली गोडी असावी हा विचार करून बाजीरावसाहेब यांस राजमाची व कोथळा हे दोन किल्ले व आघई चोण नसरापूर हे तीन महाल साठ हजाराचे देऊन सरस्य राखिले. त्यावेळेस बाजीरावसाहेब यांहीं जानव्यांत हात घालोन मानाजीबावाजवळ निखालसपणाची शपथ केली आणि सांगितले कीं, ज्यासमई तुम्हास काम पडेल त्यावेळेस आम्ही तुमचे साहित्य करूं. अश निखालसपणाच्या शपता होऊन बाजीरावसाहेब निघोन गेले. नंतर साबाजी तुकाजी प्रभु यांची रवानगी सातारियास माहाराजाकडून बंदोबस्त करून घ्यावयास केली. ते जाऊन गोविंदराव चिटणीस महाराजाकडेस वकील करून बोलणें लाविले. गोविंदराव चिटणीस याही महाराजास अर्ज केला कीं, कुलाबाचे संस्थानमधीं जवळ शत्रु एकिकडेस इंग्रेज व एकिकडेस हाबसी. संभाजी अंगरे यांचा कारभार अव्यवस्थ. सबब मानाजी अंगरे याही तें संस्थान काबीज केलें. किल्ले कोट माहराजांचेही ठिकाणें मानाजी आंगरे याशिवाय यांचे रक्षण होणार नाही. याजकरितां कुलाबाचे संस्थान मानाजी अंगरे याजकडेसच काईम व्हावयाची अज्ञा जाहली की मानाजी मर्द खरा या सारिखा शिपाई नाही. ही ठिकाणें तोच राखिल. कुलाबाचे संस्थान त्यास बक्षीस आहे. त्याणीं येऊन वस्त्रें घेऊन जावें. अशी आज्ञा जाहली. त्यावरून गोविंदराव चिटणीस याही साबाजी तुकाजी यांची रवानगी कुलबियास केली. ते आल्यावरी सातारियास राजदर्शनास जावयाची तयारी करून बराबर कारभारी साबाजी तुकाजी व त्रिंबक महादेव घेऊन खासा स्वारी निघोन दरकूच सातारियास आली.

तिसरे दिवशीं वस्त्रे घ्यावयास जाण्याचे बेताप्रमाणें तयारी केली. महाराज दरबारास सारे मंडल सुद्धां येऊन बसले आणि मानाजीबावास बोलावणें आले. तो तयारीच होती. तसेच निघोन गेले. महाराजांनीं नवा मरातब वजारतमाब असा देऊन कुलाबाचे संस्थानाची वस्त्रें मानाजीबावास देऊन खानगिचे विडे दिल्हे. गोटांत आल्यावर त्याचवेळेस दोघां कारभाऱ्याही मोठी चाकरी बजाविली सबब दोघांस दोन गांव दिल्हे. चावरें गांव साबाजी तुकाजीस व बोरघर गांव त्रिंबक महादेव यास व दोन गांव गोविंदराव चिटणीस यास मानाजीरावानीं दरोबस्त इनाम दिल्हे आणि मानाजी पुण्यास येऊन आईसाहेब बराबर घेऊन कुलाब्यास आले.

पुढें संभ जी अंगरे कुलाब्यावर चढाई करून आरमार सरंजाम घेऊन आलिबागेंत उतरोन हिराकोट घेऊन कुलाबेया भवती जखडबंदी केली. कुलाबेयांत लोकांचा भरणा थोडका. किल्याकिल्याचे लोक कुमकेस आणावे तरी एऊन पोचत नाहीं व किल्याचा भरवसा राहीला नाहीं. साबाजी तुकाजी उरणचे किल्याचे बंदोबस्तास गेले होते ते तिकडून पुण्यास गेले. संभाजी आंगरे यांचा सरंजाम पोक्त व लोकांचा जमाव भारी. किल्यातील लोक हावालदील जाहले. हिराकोटावरून मारगिरी तोफांची कुलाबेयावर होऊं लागली. आंत सिपाई लोकांची वगैरेयांची कुटुंबे खांदेरीस काढावी असा बेत जहाला. परंतु कुलाबेया भोवती संभाजी आंगर यांचा बंदोबस्त बहुत. जाण्याची निभावणी कसी पडते. सिलेपोस तीन महागेऱ्या तयार करून त्रिंबक महादेव यांस सांगितलें कीं, मुलामाणसाबरोबर तुम्ही जाऊन खांदेरीचा बंदोबस्त पक्का करून मुलें माणसें तेथें ठेऊन या. दिवाणसाहेब सुद्धां झाडून खासी माणसें व कांहीं सिपाई लोकांचे कबिले तीन माहागेऱ्या भरून पाऊणसे माणूस नामीनामी धारकरी चढऊन माहागेऱ्यावर सुतार चढविले आणि त्रिंबकजीबाबास एकंदर ताकीत कीं, खबरदार. जर करितां संभाजी अंगरे यांचे आरमाराचीं गांठ पडली तरी निभावणी न झाल्यास महागेऱ्यांस गामडी करून बुडवून टाका व दारूचे आग घाला. सारांष त्यांचे हाती मुलें माणसे न लागेल असे करावे. विठ्ठल महादेव यांची रवानगी मुंबईस इंग्रेजास कुमकेस आणावा म्हणोन केली. (त्रिंबकजीच्या) महागेऱ्या रात्रींस हाकारल्या त्या प्रहर रात्र राहातां खांदेरीचे बंदरांत दाखल जाहल्या. किल्याचा हावालदार आंत घेइनासा जाहला त्यांस सांगितलें कीं तुम्हास सरकारची खूण काय पाहिजे आहे. त्यानें सांगितलें कीं त्रिंबकजीबावाचे हातची चिटी मसमु. तेव्हां त्रिंबकजीबावानीं सांगितलें की बाबासाहेबांस आम्हींच घेऊन आलों. तुम्हीं आंत घेत असलां तरी बरे, नाहीं तरी आम्हीं माहागेऱ्या हाकारोन असेंच उरणास जाऊं अथवा मुंबईस जातों. तेव्हां त्यानीं विचार करून तुम्हीं एकटे आंत या म्हणौन सांगितले. याही उत्तर केले कीं आम्हीं एकटे एणार नाहीं, पंचवीस आसामी येऊं. त्याणें या म्हणोन सांगितले. ते समयीं त्रिंबकजीबावानी चांगले पन्नास माणूस बरोबर घेऊन ते भरघोस जाऊन दरवाजा काबीज केला. पंचवीस माणूस दरवाज्यांत ठेऊन पंचवीस असामी बरोबर घेऊन श्री वेताळाचे देवळांत गेले. तेथें च्यार सरदार व हावालदार व नाईकवडी जमा करून त्यांस विचारिलें कीं तुमचें मनांत काय आहे ते वेताळाचें समक्ष बोला. त्याणी आपला साऱ्यांनीं विचार करून सांगितले कीं एक वर्ष तुमची चाकरी बिन रोजमुऱ्याशिवाय फुकट करूं तेव्हां त्रिंबकजीबावांनीं सांगितलें कीं हे निखालसपणें बोलतां. याप्रमाणे वेताळावर क्रिया करावी. त्याणी साऱ्यानीं क्रिया केली. तेव्हां मुले माणसे आंत उतरलीं. साबाजी तुकाजी प्रभु पुणियास गेले होते त्यांही कुमकेस नानासाहेब व चिमाजी आपा पेशवे घेऊन आले. इकडेस विठ्ठल महादेव प्रभु (डबीर) मुंबईस गेले होते ते जाताच इंग्रेजानीं दोन ग्यालऱ्या रवाना केल्या. त्या घेऊन विठ्ठल महादेव खांदेरिस आले. ते

तेथें बाबासाहेबाजवळ राहिले. त्रिंबकजीबाबा याहि आपले बराबरचे माणूस पन्नास खांदेरीत ठेवून खांदेरीचें पाऊणसें माणूस माहागेन्यावर कुलाबेयांस रवाना करून आपण इंग्रेजी ग्यालीवर चढोन आले. संभाजी आंगरे यांचे आरमारांनीं बाऱ्यावर इंग्रेजी ग्याला पाहतांच पावडे उठवून गुराबा गलबते निघोन रेवदंडेयासमोर आली. इंग्रेजी ग्याल्या ऐऊन नांगरवाड्याजवळ बसल्या तेव्हां संभाजी आंगरे यांची गलबल जाहली बाहेर पडावयास वाट नाहीं तेव्हां मानाजी बावाकडेस सांगोन पाठविले कीं यामागें जाहले ते तुम्हीं विसरून यावेळेस जीवदान द्यावे. याहि विचार केला कीं, पेशवे सध्या जबरदस्त हे सांपडलें असतां दोही दौलतीस आपाय, दौलती बुडतात म्हणोन युक्तीवता काढोन दिले. संभाजी आंगरे यांची भेट कोळशाचे बुरजाखाली होऊन तेथें त्यांची शपथ बेलभंडार जाहाला कीं, संभाजी आंगरे याही कुलाबाचे दौलतीकडे पाहू नये व मानाजी आंगरे यांही सुवर्णदुर्गापलिकडे दौलतींत पाहू नये. असे परस्परा लेखही होऊन संभाजी आंगरे यांस काढोन दिले आणि ग्याल्यास इशारा केला कीं तोफांचे आवाज रिकामे मारित मारित जाबलीचे बाऱ्या पावेतों पोंहचावून ग्याल्या माघारां फिरल्या. नानासाहेब व चिमाजीआपा हे कुमकेस आले. त्यांची समजूत काढिली पाहिजे. संभाजी आंगरे वेढ्यास आले. त्या गलबलीत उरणचा व पालीचा दोनी हावालदार नानासाहेब भेदोन दोन्ही किल्ले त्यास दिल्हे. तेंच मानाजीबावानीं नानासाहेबास बक्षिस दिल्हे असा करार करून दिल्हा. त्यावेळेस बाजीरावसाहेब वारले ही बातमी आली. त्यांची क्रिया नानासाहेबानी मुळ्याचे संगमावर करून पुणियास गेले.

भारत सेवक, व. १, अं. १२, सप्टेंबर १९२८, पृ. २८५-२८८, व व. २, अं. २-३, नोव्हेंबर-डिसेंबर १९२८, पृ. ५१-५४.

१७४० इ. स. सुमार ] (-४२८-)

विनंती. सौभाग्यवती मातुश्री ताईस एकदोनदां आम्ही बोललों. त्यांनीं निश्चयपूर्वक आण वाहिली कीं कधीं घेणार नाहीं. मागतीं एक दोहों दिवसां आण एकदोनदां घेतलें. मागतीं आम्हीं म्हटलें कीं आणं वाहून हे काय? अतःपर आम्हीं तुम्हाकडे येणार नाहीं. ऐसें बहुत कष्टयुक्त सुबराव जेटीपाशीं सांगून पाठविले. त्यावरून बहुत फजित जाहली. येणेंप्रमाणें आजतागाईत त्यांचें आमचे वर्तमान जाहालें. कालरात्रीं ताईनीं कृष्णंभटास बोलावून वर्तमान सांगितले कीं ग्रहणास भीमेस गेलों होतो. त्या तगाईत त्यांची नानाची मैत्रिकी फार जाहली. दोहों प्रहर रात्रीं आज ते तेथें नानाकडे आली होती. ऐसें वर्तमान बहुतां प्रकारें सांगितलें. लोकही बाहेर बोलूं लागले आहेत कीं नानांची मस्तनीची मैत्रिकी जाहली. ताई स्वामींस हें वर्तमान लिहितील यास्तव लिहिलें असे. पुढें जशी आज्ञा होईल. तशी वर्तणूक करूं.

मस्तानी येथें. आम्हांस आठ दहा दिवशीं स्वामींकडे गेलें पाहिजे. हें ठीक घरीं कशी राहते याची काय तजवीज करावी हें लिहिलें पांहिजे.

राष्ट्रोदय, व. १, अं. २, सप्टेंबर १९०९, पृ. २३.

१७४० इ. स. सुमार ] (-४२९-)

श्री

राजश्री महिपत राऊजी चिटणीवीस गोसावी यांस छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो मानाजी आंगरे वजारतमाव रामराम. विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित गेले पाहिजे. विशेष. बहुत दिवस जाले. परंतु स्मरणपूर्वक पत्र पाठवून संतोषकृत लेखन तोषविले नाहीं. हे स्नेहाचे जागा उचित नसे. निरंतर प्रेसित पत्रीं आनंदवीत जावे. राजश्री पेशव्यासनिधी राजश्री साबाजी प्रभु यास पाठविले. यास बहुत दिवस झाले. अद्याप कार्य सिद्धीसह वर्तमान येऊन पावले नाहीं. म्हणून प्रतिक्षा करित असो. आपण आमच्या कार्याचे ठाई साहील्यास आंतर करित नाहीं हे मारानिले लिहित आहेतच व आपण साहित्य करावें हे उचितच आहे. हेविसी कितेक वृत्त कळावें यास्तव मारनिलेस लिहीले आहे. ते ध्यानांत आणोन खानगी मारनिलेंची आविलंबे होऊन येत येसे करावे. आपल्या कारणे खीशक्रमणाचे तीळशर्करायुक्त थैली पाठविली आहे. ती घेऊन स्वीकारून पावल्याचे उत्तर पाठवावे. ता छ १ माहे रबिलाखर. बहुत काय लिहीणें. लोभ असो दीजे. हे विनंती.

भारत–सेवक, व. २, अं. ५, फेब्रुवारी १९२९, पृ. ११७.

१७४० इ. स. नंतर ] (-४३०-)

श्री

राजश्री नानापंडीत प्रधान गोसावी यांसी :

छ सकलगुणालंकार अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नाो राघोजी आंगरे बज्जारतमाब रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लेखन आज्ञा केली पाहिजे. राजश्री साबाजी तुकाजी यांसी सेवेशी पाठविलें. त्यास बहूत दिवस झाले. सरंजाम न होय. सांप्रत कांहीं आज्ञा झाली जो ऐवज हुजूरचे कारकून घेऊन येणार मारनिल्हे सेवेशी राहाणार मागाहून येणार म्हणोन कळले. मारनिल्हेकडून संकलित लेहून आले. ऐशास कैलासवासी तीर्थरूपाप्रभाणें आमचा पराक्रम बुधी आहे ती कळतच असे. तथापि गवरावतेचे पद दिल्हे. तेव्हां आणि ऐवज हुजूरचे कारकून घेऊन येणार मारनिल्हेस कितेक आज्ञा करणें म्हणोन ठेवणार फार उतम. परंतु आमचा लौकिक व मामले याची आमची मार्गक्षीत पुस्त पुन्हां कांहींच राहिला

नाहीं सरकारातोन ऐवज आजपावेतो देणे तो माारनिल्हेजवळ पावत आला. घेऊन यत गेले. कैलासवासीपासोन श्रमसाहास सेवेशी करणे तेहि माारनिल्हेच करती आलें. आम्ही त्याजकडूनच करऊ. माारिल्हे विना आणिक विचार नाहीं. कैलासवासी तीर्थ-पुढेंहि आम्हांविसी श्रमसाहास व अर्ज विनंती करणें तरीहि माारनिल्हेच करितील. रूप वर्तमान असतां माारनिल्हेचे ठाई विश्वास धरीत आले. असो. परंतु देवाज्ञा झालीयावरी परीक्षा पिंडास आम्ही श्रम करून पाहिले. कावळा स्पर्श न करीत. तेव्हां माारनिल्हेकडून आम्ही बोलविले. माानिल्हे बोलतांच कावळ्यांनी स्पर्श केला. याप्रमाणे माारनिल्हेची निष्टा व सेवा सीणेसीच करितात. स्वामीजवळ आमचे तर्फेने निशा कसा काय जाहाला असेल तो क्षमा करावा. माानिल्हे विनंती करितील त्याप्रमाणे पोख्त सरंजामाची आज्ञा करून परवानगी करावी. हे न होय आणि हुजूर कारकून ऐवज घेऊन येत असतील तर मीच सेवेसी सर्व सोडून येऊन राहतो. मजला आणिक जोड नाहीं. माार निल्हे विना ऐवज न पाठवावा. हेच विनंती. आमची घरफुट स्वामीनी न करावी. घरस्फुट झाली म्हणजे वेर्थ जाहाले. रवाना छ १७ माहे... बहुत काय लिहिणें. कृपा वर्धमान करावी हे विनंति.

भारत–सेवक, व. २, अं. ११, आगष्ट, १९२९, पृ. २७६–७.

१७४० इ. स. नंतर ] (–४३१–)

श्री

राजश्री माहादजीपंत आठवले मुा पुणे गोसावी यांस स्नो मानाजी आंगरे रामराम विनंति उपरी. तुम्हाकडून माार कांहींच कळत नाहीं व पेशजी पत्र पाठविले होते त्यांचे उत्तरही नाहीं. असें न करावें. सवित्तर मजकुर लेहून पाठवावे. हालि श्रीमंतास पत्र पाठविले आहे. प्रविष्ट करून उत्तर घेऊन पाठवावे. सर्व भरंवसा तुमचा आहे. कामेकाजे जसजसी सवड बनेल तसतसी हरप्रेत्न करून उलगडून द्यावी. विसावा खाण्याचे दिवस श्रीकृपेकरून पुढें येतील. श्रमाची वेळ हीच आहे. सुज्ञास बहुत काय लिहिणें. पत्रें इकडील पक्षपातीयांचे दृष्टीस पडो न द्यावी. बहुत काय लिहिणें. पत्रे दृष्टीस न पडावी म्हणोन लिहिले. याचे कारण आक्षर ओलखीत येईल. रा छ २२ राखर. बहुत काय लिहिणे. लोभ करावा हे विनंती.

भारत–सेवक, व. २, अं. ५, फेब्रुवारी १९२९, पृ. ११६

१० मे १७४१ ] (–४३२–) [ जेष्ठ शुद्ध ७ रविवार, शके १६६३; ५ रबिलावल हि. ११५४

श्रीमोरया

[ फारसी मजकूर ] [ फारसी शिक्के ]

सके १६६३ दुरमती नाम सवंत्छरे जेस्ट सुध ७ रविवार छ ५ माहे रबिलाबल

सन ११५० सन हिजरी ११५४ सन महमदशाहा पातशाही ते दिवसी मिरासपत्र लिखिते. बो आबदुल रहिमान वल्ली महमद वलदशाहा महमद ईा शरीफ महमद सैवदागर बेपारी सा शहर अहमदनगर वस्ती मालीवाडा यासि हतीम आली वलद बयेराम ? बेग ईा रमजान बेग सा शहर मजकूर शाही जी म (?) पुरा तुम्हास आपले खुशरजावदीने राजी होऊन तुम्हास लेहून दिधले आसे जे. आपले कर्ज आगा· हसन वलद सिपी दी मुफातान खान त्याजवर होते. त्यासी आपले जात (?) त्यानी आपणास आपली हवेली नव खरीद केली होती. ते बमये हमाम पोख्त व च्यार दिवाल व देवज व जमीन व घोडा व भेडा वगैरे आपले जोहरनसी लेहून दिघले होते. ते जमीन व हमास(म) वगैरे आपण तुम्हास फरोखत केले असे व आगा हसनचे मोहरनसी कागद आपणापासी होते आपण तुम्हास दिधले आसेत. बितपसील

पछमेस सेरी जमीन आफताबता टा न के वारीस महल्लेदार न्यामतखान पलिकडे अहमदजी वलद परिजा सैदागर

| | | | |
|---|---|---|---|
| मुल पुरव ...? | ० | मुल दक्षण उत्तर | अज पूर्व पछेम |
| गज १४ | कुवा | गज २० | गज १८ |
| आज दक्षणउत्तर | टकडा दुसरा | आज पूर्वपछम | |
| गज १९ | मूल दक्षण | गज १६ | |

मूळ गज पूर्वपछम गज उत्तर गज ५
आज दक्षेण उत्तर गज ७

(डाव्याबाजूस लिहिलेला मजकूर)
जमीन आफताब आज दक्षण उत्तर
पूरवपछमगज २७ गज १०
दक्षणेसी शेर आम वाट लोकाची
पैलींकडे मोहबतबेग व गयासी
बेग महल्लेदार

(उजव्या बाजूस लिहिलेला मजकूर)
उत्तरेसी पोखत माहल बारीसे न्याम-
तखान गिरवी मासुमदेल वलद हजी
हमदू दरवेश हली वातीबेखाडी

उतरेसी मुफताखान नेव खरीददार वेसे महमद वलद फकीर महमद फउजदार व हवेलीचा दरवाजा आसे. पुढे जमीन आफताब.

सदरहू येणेप्रमाने हदमहदूद आसे. मुकर रुमालीगज २६६०॥ याची किमीत रुो १०१५ (?) पाचेस येक याचे निमे रुाये साडेपणास याचे दुनीने तमाम वजन साडे अकरामासी रोख घेऊन ते जमीन सकेत समेत हमाम पोखत व देवज व च्यार व दिवाली व धोडा व भेडा व झाडझुडुले व वगैर रजात, राजी होऊन तुम्हास फरोखत केले आसे. तेथे माणाल ते इमारत बांधोन आपले लेकराचे लेकरी राहने. सानियेणहलने दिगर आपले भाऊबद वगैरे आपले वारिसेदार आगर आनिक कोन्ही या हमा... चा आगर या जागीचा वारिसा करील तो बातील असे. तुम्हासी समध नाहीं. आपण त्यासी समजाऊ. तुम्ही सुदी नादने. हे मिरासपत्र

लिहिले. सही श्रा शिवराम शामजी आा माधोराये कृष्ण कुलकर्नी सा शहर मजकूर

गोही

राजी सेटे चौवरी सेहर आमदानगर व ... गयेर पत्रप्रमाणें साक्ष राणोजी वलद मालजी पाटील मौजे चावरणा खुर्द पा हवेली मजकूर पत्रप्रमाणें साक्षे तुमोजी वलद सतोजी ईा दारवाजी देवकर तेली सा मजकूर

गोही

पत्र परमान साक्ष गिरमाजी माहजन सहर आमदानगर

पत्रप्रमाण साक्ष मुकदजी वलद सभाजी पाटील मौजे चावराणा खुर्द पा हवेली मजकूर

फारसी सह्या सुमार १० ब्रा माधोराये कृष्णाजी दे ... ... व देशपाडिये प्रगने हवेली ... ...

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. ३, पृ. १२९-१३१.

६ सप्टेंबर १७४१ ] (-४३३-) [ ६ रजब, इसने आर्बैन मया अलफ

श्री

राजश्री सुभानजी थोरात हवालदार व कारकून किले पुरंधर गोसावी यासी अखंडीत लक्षूमी आलंकृत राजमान्य स्नो बालाजी बाजिरावऊ प्रधान आसिर्वाद व नमस्कार सुा ईसने आर्बैन मया व अलफ. गणेश शंकर सरनाईक किले मजकुर यांची सरनाईकी पुरातन किले मजकूरची आहे. त्यास ते श्री माहायात्रेस गेले. ते समई त्याचे पुत्र सखो गणेश यांस सरनाईकी सांगोन किले मजकुरास पाठविले. त्यास सखो गणेश निलकंठराव यास वसईस गोला लागोन देवाज्ञा जाहाली. त्याचे पुत्र निलो सखाजी सरनाईकी सांगोन पाठविले आहेत. हे किले मजकुरी सरनाइकीची सेवा करितील. याचे हातून सेवा चाकरी घेऊन याचे चालवीत जाणे. वेतन पेशजीप्रमाणे करार केले असे. त्याप्रमाणे देत जाणे आणि सरनाइकीची सेवा चाकरा यांचे हातून घेत जाणे. जाणिजे. छ. ६ रजबू. पा हुजूर. [ शिका-लेखन सीमा ].

सह्विचार, व. २, अं. १, आगष्ट १९२३, पृ. ४३.

२९ सप्टेंबर १७४१ ] (-४३४-) [ आश्विन शुद्ध १, शके १६६३

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजेश्री आबाजी भट्ट वारे यासि विद्यार्थी विश्वनाथ भट्ट पिते बाळकृष्ण भटः अज नागेश भट्टः बंधु विनायक भट्टः व दादंभट्टः ब्राह्मण ऋग्वेदी

उपनाम : प्रभवणे गोत्र : वासिष्ठ : ग्राम माहोली संगमचे ज्योतीषी लेहुन दिल्हे असे जे. आमुचे वंशी जे येतील तुमचे पूजन कर्तील. शक्के १६६३ दुर्मती नाम संवत्सरे आश्वीन शुद्ध प्रतिपदा हस्ताक्षर. खुद्द

भा. इ. सं. मं. त्रै., व. २१, अं. १, क्र. ८१, पृ. १–७.

२३ दिसेंबर १७४१ ] (–४३५–) [ २५ सवाल, इसने आर्बैन मया अलफ

श्री

राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी सुभा प्रांत राजपुरी गोसावी यांस–

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये श्नो बालाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद व नमस्कार सुा। इसने आर्बैन मया व अलफ. राजश्री खंडोजी माणकर याणी पुणे-याचे मुकामीं हुजूर विनंती केली कीं आपण निष्ठापूर्वक सेवाचाकरी जिवाभ्येश्रम बहुता जागा केली व पुढेंही स्वामीसेवा धडावी ही उमेद धरितो. तरी आपणास नूतन इनाम गांव देववावा म्हणोन. त्याजवरून मनास आणितां मारनिल्हेनी राजपुर प्रांते व साष्टी प्रांते व वसई प्रांते श्रम साहास बहुत केले व पुढेंही नि साहास कर्माची उमेद करितात व स्वामीसेवेसी एकनिष्ठपणें वर्ततात. हें जाणोन मारनिल्हेवर कृपाळू होऊन मौजे खरवली मामले तळे हा गांव सालमजकुरापासून नूतन इनाम दरोबस्त जिरायेत व बागायेत व मोहतर्फा देखील हलीपटी व पेस्तरपटी जल तरू पाशाण निधि (फाटले) कुलबाब कुलकानू इनाम दिल्हा असे. तरी तुम्हीं मौजे मजकूर यांस व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रत लेहून घेऊन अस्सल पत्र भोगवटीयास मारनिल्हेजवळ परतोन देणें. जाणिजे. रा छ २५ माहे सवाल.

विविधज्ञानविस्तार, व. ५८, अं. १, जानेवारी १९२७, पृ. २३.

३० जानेवारी १७४२ ] (–४३६–) [ ४ जिल्हेज, इसने आर्बैन मया अलफ

श्रीदत्तात्रेय सोपानदेव

हरिभक्तपरायण राजश्री सित्धानंद गोसावी परंपरा श्री वास्तव्य का। सासवड स्वामीचे शेवेसी

सेवक देवराव मेघःशाम नमस्कार विनंति उपरी सुा। इसने आर्बैन मया अलफ. तुम्ही हुजूर येऊन पूर्वील राजपत्रे व राजश्री नारो शंकर सचिव याचे पत्र इनामाचे दाखविलें की श्री याची समाधी का। मजकुरी आहे. त्यास नैवेद्य व नंदा-

दीपाची मोइन सेत कास मण ·।४॥ साडे नव मण पुरातन आहे. त्याप्रमाणे चालत आहे. त्यास राजश्री पंत सचिव याचे निसबतीस कसबे मजकूर मुकासा होता. हाली कसबे मजकूर खासगीकडे होऊन आपले निसबतीस आमल आहे. तरी आपली पत्र पूर्ववतप्रमाणे करून दिल्ही पाहिजेत म्हणून हुजूर येऊन विदित केलेत. त्यावरून मनास आणून सनद केली आसे.

| | |
|---|---|
| | बीतपसील |
| मुजरीपैकी जमीन देवाभोवताली | जकात व बाजारपकी दररोज मोईन साला |
| ८४॥ थळ भाडल | बादप्रो जोरी कैली नैवेद्य तेल दिवाबतीस |
| ·।· किता जमीन भागीरथी पावेतो | वजन टकबंदी ८८॥· |
| कास | |
| ·।४॥ | ८८॥ |

येणेप्रो थळ कास साडे नव मण व दररोज तेल नंदादीपास आदसर व जोरी नैवेद्यास अधेली रास करार करून का मजकूरचे कमाविसदारास व जमीदारास आलाहि(दा) सनद सादर केली असे. तरी परंपरेनें कसबे येणेप्रमाणें कसबे मजकूरचे यैवजपैकीं घेऊन श्री ची पूजाउर्जा करून सुखरूप राहणे. रा छ ४ माहे जिल्हेज. बहुत काय लिहिणे. [शिक्का– लेखन मीमा]
[शिक्का– 'श्री: राजा शाहू छ: त्रपति स्वामिचर: णी तत्पर देवराव: मेघश्याम नी: रंतर.'

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ १६२.

१२ मार्च १७४३ ] (–४३७–) [ २७ जिल्हेज, सलास आर्बैन मया अलफ

श्री

वेदमूर्ति राजश्री बाळजोशी बिन यादवजोशी वेखंडे गोवर्द्धन जोतिषी, धर्माधिकारी व उपाध्ये वस्ती पेण गोसावी यांसी

पो सदाशिव चिमणाजी नमस्कार. सुा सलास आर्बैन मया व आलफ. पा साकसें येथील वृत्ति तुमची असतां वे. रा. विश्वनाथ जोशी बिन् मोरजोशी याणी कानोजी आंगरे यांचे कारकीर्दीत कलह मांडिला. त्याचा निर्गम कुलाबियाचे मुकामी जाला. ते तुम्ही सरकारांत येऊन जाहीर करावे तें न केलें. सबब हालीं तुम्हांस हुजूर आणोन करार केले. रूपये ५० पन्नास करार केले असत. याची उगवणी करून वृत्तीचा उपभोग करीत जाणे. जाणिजे. छ २७ माहे जिल्हेज.
[शिक्का– 'लेखन सीमा']

संजीवन, दादर, पुस्तक १ ले., अं. १० वा, जानेवारी १९२३, पृ ३४०; पुस्तक ४ थे, अं. ६–८, सप्टेंबर--नव्हेंबर १९२५, पृ. २२१--२२२.

३ आक्टोबर १७४३ ] (–४३८–) [ आश्विन वद्य १२, शके १६६५

[ खर्डे किल्याचे आंतील दरवाजावरील गणेशपाटीवरचा शिलालेख ]

॥ श्री ॐकारेश्वर प्रसन्न ॥

स्वस्ती श्रीनृपशालीवाहन शके १६६५ रूधिरोधगारीनामसंत्सरे अश्वीन वद्य द्वादशी तद्दिनौ ( ३ आक्टोबर १७४३ ) राजश्री सुलतानजी निंबाळकर देशमूख देशपांडे व मोकदम कसबे सिवपट्टण व अष्टाधिकारी पेठ कसबे मजकूर परगणे जामखेड सरकार अहमदनगर सुभे खुजस्ताबुनियाद औरंगाबाद यानी केले. सुलतान दुर्गाचे रचनेस प्रारंभ केला सन ११५६ शुभं भवतु हिजरी. ( १७४३–४४ इ. स. )

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्रं. ६. पृ. २००–२०२.

२६ एप्रिल १७४४ ] (–४३९–) [ चैत्र वद्य ९ सोमवार, रक्ताक्षी; २४ रबिलावल

वेदमूर्ति समस्त ब्राम्हण मौजे नागरगांव ऊर्फ तुळपूर तर्फ सांडस प्रांत पुणें यांसि दिल्हे अग्रहारपत्र ऐसेजे. वेदमूर्ति खंडभट बिन बापदेवभट तुळापुरकर व देवभट बिन कचेश्वरभट ब्रम्हे यांणी शाहूनगर नजीक किल्ले सातारा येथील मुक्कामीं स्वामी संनिध येऊन विनंती केली जे समस्त ब्राम्हण वास्तव्य क्षेत्र मजकूर यांस पूर्वी राजेश्री मुरार जगदेवराव यांणीं मौजे मजकूर चतुःसीमा पूर्वमर्यादेप्रमाणें कुलबाब कुलकानू हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी देखील जल तरू तृण काष्ट पाषाण निधि निक्षेप सहित धारादत्त अग्रहार इनाम करून देऊन विजापूरकर पादशहाचीं पत्रें करून दिली. त्याप्रमाणें महाराज राजेश्री शाहाजीराजे व थोरले कैलासवासी महाराज यांनीं पत्रें करून देऊन मौजेमजकूर पूर्ववत प्रमाणें समस्त ब्राम्हणांस इनाम अग्रहार चालविला. त्याउपरी अलमगीर बादशहाचा मुक्काम तुळापूर मजकुरीं होता. ते समयीं समस्त ब्राम्हणांनीं पूर्वील पत्रें पादशहाचीं दाखवून अर्ज केला. त्यावरून अलमगीर पातशहांनीं दिवाणी परवाना करून देऊन मौजे मजकूर समस्त ब्राम्हणांस इनाम चालविला व महाराज राजेश्री काकासाहेब यांनीं इनाम चालविला. कुलबाब कुलकानू देखील सरदेशमुख व इनाम तिजाई हल्लीपट्टी व पेस्तरपटी खेरीज हक्कदार करून इनाम करून दिल्हा. यानंतर महाराज राजेश्री स्वामींनींहि आपलें पत्र राज्याभिषेक शके ४५ विलंबीनाम संवत्सरे आश्विन बहुल दशमी मंदवारी ( ८ आक्टोबर १७१८ ) पत्र करून दिल्हे आहे जे. मौजे मजकूर सर्वमान्य पूर्वीपासून अग्रहार इनाम आहे. त्याप्रमाणे करार असे म्हणोन महाराज स्वामींनीं पत्र दिल्हे आहे. त्याप्रमाणे मौजे मजकूर समस्त ब्राम्हण वास्तव्य क्षेत्र मजकूर सर्वमान्य इनाम चालत आहे. पूर्वील पत्रें आहेत तीं

जीर्ण जाहलीं आहेत. भोगवटीयास महाराज स्वामीनीं पत्रें करून देऊन मौजे मजकूर समस्त ब्राम्हण क्षेत्रमजकूर यांस वंशपरंपरेने अग्रहार इनाम आणोन स्वामी कृपाळू होऊन मौजे मजकूर तुम्हां समस्तांस अग्रहार इनाम आहे त्याप्रमाणे स्वराज्य व मोगलाइ अम्मल एकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई कुलबाब कुलकानू हलीपट्टी व पेस्तरपट्टी देखील सरपाटिलकी जल तरू तृण काष्ट पाषाण निधि निक्षेप सहित खेरीज हक्कदार करून तुम्हां समस्त ब्राम्हणांस क्षेत्र मजकूर पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने मौजे मजकूर चतुःसीमा पूर्वमर्यादेप्रमाणें समस्त ब्राम्हण अग्रहार इनाम अनुभवून सुखरूप राहणे. येविशीं पत्रें चैत्र वद्य नवमी इंदुवासर रक्ताक्षी नाम संवत्सरे छ २४ रबिलावल. चिटणिशी पत्रे.

१ समस्त ब्राम्हणाचें नांवें
१ मोकदम मौजे मजकूर
१ देशमुख व देशपांडे
१ देशाधिकारी
१ रा. पंतप्रधान

भा. इ. सं. मं., षाण्मासिक वृत्त, शके १८३४, भाग २ रा, स्वी. ग्रं. क्र. ४, पृ. २६९–७०.

ता. २६ जुलै १७४४ ] (–४४०–) [ २६ जमादिलाखर, खमस आर्बैन मया अलफ.

श्री

छ मा। अनाम देशमुख व देशपांडे प्रांत पुणें यासि बालाजी बाजीराव प्रधान सुहुर सन खमस आर्बैन मया व अलफ. राजश्री गणेश शंकर निलकंठराऊ सरनाईक [ शिक्का ][1] किले पुरंधर यानी हूजूर येऊन विदित केले की आपणांस प्रांत मजकुरी इनाम देखील आंबराया कदीम बितपसील.

मौजे चांबली तर्फ करेपठार कास रुके ८१ आबराई जिराइत १
१८१

मौजे जेजुरी तर्फ करेपठार जमीन आंबराइ बिघे ८१० मौजे किकवी तर्फ निरथडी देखील
आंबराईकास रुके
८३ जिराइत
८१॥ बागाईत
८४॥

१. शिक्का– ‘श्री : राजा शाहु नरप : ति हर्षनिधान बा : ळाजी बाजीराव : मुख्य प्रधान.’

मौजे पूरतर्फ करेपठार आंबराई चावर ०।०

एकूण कास टके एक टका साडेपांच रुके व बिघे चाळीस येणेप्रमाणे चालत आले आहे. त्याची इनाम तिजाई पूर्वीपासून आपणास माफ आहे. परंतु आंबराईचे आंबे अलिकडे मोगलाचे धामधुमेपासून तिजाइ दिवाणात घेतात. ते स्वामींनी कृपाळू होऊन माफ करावे. म्हणून विनंती केली. त्यावरून मनास आणिता इनामतिजाई पूर्वीपासून माफ असता आंबराइच्या आंब्याची तिजाई यांजपासून ध्यावी ऐसे नाही जाणोन सदरहू आंबराइच्या आंब्याची तिजाई देखील इनाम सुदामत चालत आल्याप्रमाणें व आंबराईचे आंबे तिजाई देखील यास व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणे. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे. या पत्राची प्रती लेहून घेऊन असल पत्र मशारनिलेजवळ भोगवटियास परतोन देणे. जाणिजे. २६ जमादिलाखर. आज्ञा प्रमाण. मोर्तब.

भा. इं. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ५६-५७.

१८ डिसेंबर १७४४ ] (-४४१-) [ २४ जिल्काद, खमस आर्बैन मया अलफ.

श्री

राजश्री खंडेराव बरगे गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद सुा खमस आर्बैन मया व अलफ. दरगाहा शाहाशरीफ पीर आमदनगर यास मौजे येकलारे पाा संगमनेर हा गाव मोगलाईतर्फेने इनाम आहे व स्वराज्यातर्फेने-हि राजपत्रे सादर आहेत. त्यास तुम्हाकडील येसाजी बरगा मौजे मजकुरास उपसर्ग देतो. तरी त्यास ताकीद करून सुदामत गांव पीराकडे चालतो त्याप्रो चालो देणे. तुम्ही मौजे मजकुरास उपसर्ग न देणे. जाणीजे. छ २४ जिल्काद. बहुत काय लिहिणें. [ शिक्का- लेखन सीमा ]

[ शिक्का- 'श्री : राजा शाहु नरप : ति हर्षनिधान बा : ळाजी बाजीराव : मुख्य प्रधा : न' ( उलरा न ) ]

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १८२.

१७४४-५६ इ. स. ] (-४४२-)

श्री

पुरवणी राजश्री साबाजीप्रभु चिटनिवीस गोसावी यांसी उपरी. तुमचे विनंती-पत्राचे जाब सविस्तर लेहून लखमोजी कदम याची रवानगी केली आहे. त्या पत्रावरून

कळले. राजश्री कृष्णाजीप्रभु यांची रवानगी कबिलासुधा लग्नाकरितां करावी म्हणून लिहिलेत. त्यावरून मारनिलेस रवाना केले आहेत. मनसबीयाचे हरद्र रुयत तुम्हांस लेहून जात आहे व तुमचेहि ध्यानांन येतच आहे. प्राप्त प्रसंगावरून तरी हेहि मनसबीयाचा विचार सुधा होईल असे दिसत नाहीं. येविशीच्याहि कितेक कल्पना तुम्ही शोधन सवज्ञापूर्वक विनंती लिहून पाठविलीच होती. ते विचार अप्रमाण असतील असें नाहीच. तथापि त्याचाहि विचार व मनसबीयाचे सौरक्षणाच्या गोष्टी तुमचे युक्तीवर व विचारावरही आहेत. लग्नकार्य उरकोन व ऐवजाचा निर्तला करून तुम्हींहि लौकरच याल व आलेच पाहिजे. प्रसंग परम दुर्घट होत चालला आहे. पदरीचे लोकांत सत्य सुकुत राहिले नाहीं. तेव्हां शामल इंग्रज ईष्टमित्रत्वात आहेत. तऱ्ही त्याचा भरवसा कळत आहे. समयानरूप प्रसंग काढोन सर्वासी मिळोन असावे. या विचारे विचार होतच आहे. मनसबीयाचे हरद्र व आवतर मुल्की सर्व मारनिले सांगतील त्यावरून कळेल. येथील बेगमीचीहि आज्ञा केली आहे. त्याप्रमाणे नक्त व कापड येऊन पावेतें करा वें. विजयदुर्गाकडील बातम्या येऊन पावल्याचे वृत्त कदमासमागमेस संकलीत लिहिले आहे. सांप्रत मारनिलेनी किल्ल्याप्रमाणें सांगतील तथ्य मिथ्य म्हणवत नाहीं. कदाचित तसाच प्रसंग घडला तर ईश्वरगतीस उपाय नाहीं. हरएक विचार तुम्हास असलेले सुचेल ते लेहून पाठवाल व पाठवीत जावा. घडून आले प्रसंगावरून चिंता प्राप्त जाली आहे तें लिहिता व बोलता येत नाहीं. जाणिजे. पत्र मनन रूकन फाडून टाकावें. रा छ १८ माहे जमादिलावल. बहुत काय लिहिणें. मार्तब सुा

भारत सेवक, व. २, अं. ११, आगष्ट १९२९, पृ. २७७-८.

१५ सप्तेंबर १७४५ ] ( - ४४३ - ) [ २९ साबान, सीत आर्बैन मया अलफ

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजश्री समस्त ब्राह्मण क्षेत्र कसबा कराड स्वामी गोसावी सेवक श्रीनिवास परशराम प्रतिनिधी नमस्कार सुा सीत अर्बैन मया व अलफ. अपाजीराम वस्ती मसूर याचें आईवर बदअमल याचा दोश येऊन ती माहेरास गेली. त्यास अपाजी गैरमजकूर यास अनवेव्हार जाहला पाहिजे. याजकरिता प्रार्याश्चत देऊन सूध करविले आहे. तर समस्त ब्राम्हण मिळून सूध करणे. अनवेव्हार करवणे. छ २९ साबान. बहुत काय लिहिणे. [ शिक्का– 'राजत : लेखना : वधी' ]

भा. इ. सं. मं. तृतीय संमेलन वृत्त, स्वी. ग्रं. क्र. १२, पृ. ९६.

७ जुलै १७४६ ] (–४४४–) [ आषाढ वद्य ३०, सोमवार

पै. छ १ रजब ( ९ जुलै १७४६ )

श्री

चिरंजीव राजमान्य राजश्री नाना यांस–

प्रति राधाबाई आशीर्वाद उपरी. कुशल येथील तागाईत आषाढ वद्य अमावास्या इंदुवार जाणोन स्वकीय लिहीत गेले पाहिजे. विशेष :– राजश्री गोविंद हरीं यांचे घरीं बटीक महारीण निघाली. त्याचे वृत्त कालरोजीं राजश्री अंतोबांनी तुम्हांस लेहून पाठविले आहे. त्यावरून सविस्तर कळलेंच असेल. त्यांचे घरीं मुलामाणसांचा उपाषणानें आट जाला. त्यांणीं ब्राम्हणांस व पंडितांस बोलावूं पाठविल्यास जमा न होत. याकरितां आम्ही व राजश्री अंताजीपंत राजश्री जिवाजीपंताचे घरीं जाऊन जितके ब्राम्हण थोर थोर पंडित व वैदिक जमा करून बाळंभट यांस (यांजकडून) प्रायश्चित द्यावयाचा निश्चय केला. त्यांमध्यें कितेक ब्राम्हणांनीं अट केली कीं प्रार्याश्चत द्यावयाची आज्ञा प्रभूची पाहिजे. त्यास आम्हीं सर्व पंडितांस व ब्राम्हणांस आज्ञा केली कीं तुम्हीं प्रायश्चित देणें. आम्हीं आज्ञा केली तेच आज्ञा प्रभूजी आहे. दुसरा अर्थ चितांत न आणणें. त्यावरून आजच प्रायाश्चित दिले. तेथील विचार पंडितराव यांस कळविला. उपरी उपद्याप करून राजश्रीचे कानावर घालून फंद फैलाव होईल. याकरितां अगोदर जो बंदोबस्त करणे तो केला पाहिजे. यासाठीं ताबडतोब हे पत्र लिहिलें आहे. तर राजश्रीचे कानावर घालणें. पंडितराव यांजकडील बंदोबस्त करणें तो तुम्ही करालच. सूचना लिहिली आहे. वरकड ब्राम्हणांची याद व प्रायश्चिताचा सिद्धांत अलाहिदा पत्रीं लिहिला आहे. त्यावरून कळेल. राजश्रीचे कानावर घालावयाचा विचार तुमचे चित्तांत आला तर घालणें. राजश्रीचे व पंडितराव यांचे कानावर घातल्यानें अधिक चिकटेसे असिले तर न घालणें. बहुत काय लिहिणे. हा आशीर्वाद.

मासिक मनोरंजन, पु. १५, अं. २ फेब्रुवारी १९१०, पृ. ११२–११३.

१७४६–४७ इ. ] (–४४५–) [ सबा आर्बैन मया अलफ

श्री

राजश्री देवजी ताकपीर गोसावी यांसि अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो॥ बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद सुाा सबा आर्बैन मया व अलफ. तुम्ही कितेक मनसुबीयाचा मजकुर राजश्री गोविंदराव चिटनीवीस यास लिहिला. त्यांनीं सविस्तर अवगत केले. त्याजवरून कळों आले. ऐशास तुम्हीं पदरचे. सर्व प्रकारें तुमच्या मन-

सुबीयाची पुष्टता करून सिद्धीस पावावी हें अगत्य आहे. प्रस्तुत आम्हीं राजश्री स्वामिसंनिध असो. येथील गुंता उरकलीयावर पुण्यास येऊन गोविंदरायास बरोबर घेऊन येऊन. तुम्हीही भेटीस यालच. तदोत्तर तुमच्या मुखें सर्व अर्थ मनास आणून गोविंदरावचे विचारें उचित मनसुबा कर्तव्य तो केला जाईल. येविसीचा कितेक.. गोविंदराव यांस सांगितला असे. हे तुम्हांस लिहितील. त्याजवरून कलेल. तुम्हीं आपले समाधान असो देणें.

बार बार बार

~~~~~~~~~~~~~~~~

महाराष्ट्र साहित्य, व. ५, अं. ७, जानेवारी १९४४ पृ. ३०८,

१७४७ इ. स. पूर्व ] (–४४६–)

( सवाई जयसिंगास निजान्मुलुकाचें पत्र )

यापूर्वी आपण दोनदा मला लिहिलें होतें, त्यांत आपण आणि महाराणाजी यांचा मानमरातब वाढल्याचें आपण कळविलेंत. मराठे व रामपुरा आणि खादोदा या प्रांताच्या हद्दींत पसरले आहेत. त्यांत ते लुटालूट करीत आहेत. तेथून ते बुंदी आणि कोटा या राज्यांच्या सरहद्दीवर पोहोंचले असून तेथून आपल्या राज्याच्या सीमा जवळ आहेत हेंही आपण लिहिलेत. हे निर्बुद्ध लोक ( जाला म्हणजे हरवलेले, भटकलेले ) माळवा आणि गुजरात या सुभ्यांत पसरलेले आहेत. त्यांनीं रयतेला जी पीडा आणि दुःख ( आसेब व अजियत ) दिलें आहे तें इतकें जगजाहीर आहे कीं त्याबद्दल लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

बादशहांच्या मनांत असें भरविण्यांत आलें आहे, की ही जमात ( मराठे ) माझ्या इशाऱ्यानें आणि सूचनेनें गुजरात आणि माळवा या सुभ्यांत पसरली आहे. याचा बंदोबस्त करण्याबद्दल बादशहांनी वरचेवर फर्मानें आणि हुकम पाठविले आहेत. यासंबधीं जे जे म्हणून प्रयत्न करणें आवश्यक होते ते मी केले आहेत.

शाहूला मी पुन्हां पुन्हां उपदेशाच्या गोष्टी सांगून पत्रें लिहिलीं, कीं मराठ्यांनीं माळवा आणि गुजरात येथें लुटालुट करण्यासाठीं जाणें बरें नाहीं. हें बादशहाच्या मर्जीविरूद्ध होत आहे. तुम्ही आपल्या फौजेला ताकीद करा, कीं तिनें नर्मदा ओलाडूं नये. मी किती तरी वेळा शाहूला ताकीद केली आणि भीति दाखविली पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ती कोणाच्याच अधिकारांत नाहीं. त्यांना मना करतां आलें नाहीं.

बादशहाच्या आज्ञेचे पालन म्हणून, आपल्या उत्तम प्रेमाखातर, आणि महाराणा आणि आपण यांचे वैभव वाढावें, म्हणून परमेश्वर कृपेनें मी शाहूचा प्रतिस्पर्धी राजा संभाजी याचें मन वळवून ( इस्तिमालत ) त्याला आपल्यापाशीं बोलाविले. शाहूला तंबी देऊन त्याची पाळेमुळें उखडून काढण्यासाठीं ( इस्तीसाल ) मी
~~~~~~~~~~~~~~~~

राजा संभाजीला नेमलें. शत्रूंचा सरलष्कर सुल्तानजीराव हा येऊन मला भेटला. राजा संभाजीच्या सैन्यावर मी त्याची नेमणूक केली. मी आशा करतों कीं, परमेश्वरकृपेनें शाहूचे इतर सहकारी त्याच्यापासून वेगळे होऊन निघून येतील. शाहूचे उरलेले लोक यांचाहि मोड (गसेख्ता) होईल. परमेश्वर कृपेने मनासारखे घडून येईल.

मुबारजखानाच्या युद्धानंतर सुभे हैद्राबादचा बंदोबस्त करणें प्राप्त झाले. त्या निमित्तानें माझी विजयी फौज शिकाकोलच्या दिशेनें निघाली. बंगाल तेथून जवळ होता. माझे सगळे लोक म्हणूं लागले, "आपले शत्रू स्वार्थाने प्रेरित होऊन आणि मनांत हेवेदावे ठेवून बादशहाला खोट्यानाट्या गोष्टी सांगत आहेत. ही संधि चांगली आहे. लवकर बंगाल प्रांताला जाऊन तो ताब्यांत घ्यावा." अशा प्रकारच्या अनेक सूचना मला करण्यांत आल्या. पण बादशहाशीं निष्ठा बाळगून त्यांच्या दौलतीचे हितचिंतन करणे ही माझी प्रवृत्ति असल्यामुळें मी अशा गोष्टींचा विचारहि केला नाहीं. मग ती अंमलांत आणणे दूरच राहीलें.

या काळांत बादशहाचीं स्वदस्तूरचीं सारखीं पत्रें येत होतीं. शाहूला शिक्षा (तंबी) करावी असा त्यांत मजकूर होता. हरप्रकारें तुमच्या सैन्याला मदत करण्यांत येईल. लोकांनी खोटेनाटें सांगावें आणि काम बिघडून जावे असें कधींहि घडणार नाहीं असें बादशहांनीं लिहिलें. बादशहाबद्दल मनांत असलेला आदर, शत्रूंचीं तोंडे बंद करून त्यांना शरमिंधे करण्याची इच्छा या कारणांनी मी ही मोठी मोहीम चालविणें आवश्यक समजतों. (इल्तिजाम नमूदा) बादशहाबद्दल माझ्या मनांत वसत असलेली निष्ठा, आणि माझा सच्चेपणा याचें यापेक्षां अधिक असें प्रमाण असूं शकणार नाहीं. नाहींतर यावेळीं मराठ्यांशीं बिघाड करणें योग्य नव्हतें.

औरंगजेबाच्या (खुल्दमकान) काळीं आणि मागील राजवटींत मराठ्यांची ही शक्ति, हा निर्धार आणि इतकी संख्या नव्हती. असें असूनहि कितीतरी संपति या कार्यावर खर्च करावी लागली. कितीतरी मोठमोठे राजे, नगद नेमणूक असलेले मनसबदार, जहागिरदार आणि प्रशासक यांना नेमावे लागले. यावेळीं मराठ्यांनीं साऱ्या देशांत उच्छाद पसरविला आहे. त्यांची शक्ति आणि कुवतही प्रमाणाबाहेर वाढली आहेत. केवळ परमेश्वराच्या कृपेवर भरंवसा ठेवून आणि बादशहांच्या सहाय्याची अपेक्षा बाळगून मी मोहीम हातीं घेतली आहे.

आलमगीर, दीपावळी अंक, १९६१ इ. स., पृ. १०४–१०५.

१८ जून १७४७ ] (-४४७-) [ २० जमादिलाखर, समान अर्बैन मया अलफ

राजमान्य राजश्री रघुनाथ हवालदार व कारकून पा पेण पंचमहाल गोसावी यांसी—

सेवक सदाशिव चिमणाजी नमस्कार सु. समान अर्बैन मया व आलफ. वेदमूर्ति बाळजोशी बिन यादव जोशी वेखंडे गोर्वधन वृत्यंशी प. साकसे यांणीं हुजूर येऊन विनंति केली कीं परगणे मजकूर येथील ज्योतिषपण व उपाधीक (उपाध्यापण) धर्माधिकारणा यें वतन आपले आहे. त्यास इतर ब्राम्हण व प्रभु वगैरे यांनीं कार्य प्रयोजन केलें तर आपल्यासच बोलावून आपले हाते कार्य प्रयोजन चालवित नाहींत. ब्राम्हणांकडे व प्रभूकडे कार्य प्रयोजन जाले तर घटिका इत्यादिक जोतिषपणाचें प्रयोजन व उपाध्यीक आपण चालवित आलों. सोनार कासार व शूद्र जाति देखील वगैरें यांचे घरीं कार्य प्रयोजन जालें तर तेथेंही सर्व अधिकार आपणच चालवितो. ऐसे असोन सांप्रत ब्राम्हण व प्रभू व सोनार कासार दुसरे ब्राम्हणाकडून कार्य चालवून आपले वृत्तीचा लोप करितात. त्यास येविशीं राजश्री मानाजी आंगरे यांजकडून निर्वाह होऊन पत्र भोगवटिया करितां त्यांणीं दिल्हे आहे. त्यास सरकारचे पत्र असलियाने नवदिगर कोणी करणार नाहीं. सुधामत प्रा चालवितील म्हणून. त्यावरून राजश्री मानाजी आंगरे यांचेकडे निर्गम होऊन पत्र दिल्हे आहे. त्याचा अर्थ ध्यानास आणिला. त्याजमध्यें निर्वाह कीं ब्राम्हण प्रभू सोनार कासार वगैरे यांजकडील कार्य प्रयोजन गोवर्धनब्राम्हण चालवित आले आहेत. त्याजप्रमाणें यांणीं चालवावें. ऐसी चाल कल्याण व भिवंडी प्रांतांतही आहे. म्हणून मशारनिल्हेचा पत्रार्थ आहे. जोशीमजकूर यांणी ताकीद पत्रें नेलींच आहेत. ऐसें असोन जे यांचे वृत्तीचा लोप करितील त्यांस ताकीद करून सुधामतप्रमाणे चालविणें. ब्राम्हण प्रभू सोनार व कासार यांजकडील कार्य प्रयोजन वे. रा. बाळजोशी गोवर्धन हे चालवितील. या अन्वयें पूर्वी चालत आलेला दाखला पाहून ताकीद करून चालविणें. ब्राम्हण प्रभू सोनार कासार यांनीं याजवितरिक्त कार्य चालविलें तर त्याची क्षमा होणार नाहीं. येविशीं ताकीद करणें. या पत्राची नकल घेऊन असल पत्र भोगवटियास परतोन देणें. जाणिजे. रा छ २० जमादिलावर. पा हुजूर. [ शिक्का— लेखन सीमा ]

संजीवन, दादर, पु. १, अं. १०, जानेवारी १९२३, पृ. ३४२, व पुस्तक ४, अं. ६-८, सप्टेंबर-नवंबर १९२५, पृ. २२२-२३.

९ जानेवारी १७४८ ] ( – ४४८ – ) [ १९ मोहरम, सन ११५७

श्री

[ शिक्का ]

करारनामा राजश्री मानाजी आंगरे वजारतमाहा यासी दमाजी गाईकवाड समशेर बाहदर यानी लेहोन दिल्हा सन ११५७ मुा आश्वीनीकुमार.

आम्ही आपले शेरीकर मोकदम आपण आमचे धणी हकम आपले हकमीची कैद कानू हुकमत चालत आली आहे. त्याप्रमाणे आपल्या हुकमात राहून वर्तणूक करीत जाऊं. आंतर करणार नाहीं कलम १

आपल्याकडेस स्वराज्याचा आमल सुभा मोकासा व सरदेशमुखी (व)गैरे बाबती आहे. त्याचे खंडणी खेरीज दोन मण ।॥। पंधरा व कडबा व फार फर्मास वेठ बिगार सालाबाद चालत आले आहे त्याजप्रो समाकुल पांढरी मिळोन चालवीत जाऊं हिला हरकत होऊ पावणार नाहीं. कलम १

आपले तर्फेस संगमसेत सेटया खेरीज खंडणी चालत आले आहेत. त्याप्राणे सालदरसाल बंदिकत समाकुल पांढरी मिळून चालवीत जाऊ. यास आंतर करणार नाही कलम १

आम्हाकडेस निमे मोकदमी करार जाल्यावरून समाकुल पांढरीच्या व पोवल्याचे विद्यमाने वडीलपणाचा मान आम्हाकडेस या अन्वयावरून खरीद खताबरहुकूम आम्हा व पोवलीयानी पुस्त दरपुस्त वर्तणूक करीत जावी म्हणोन आमचा त्याचा करारनामा अलाहिदा जाला आहे. तो आपणास कळावा म्हणोन कलमबंदी सुभानजी मोरे मोखतेस्वर समाकुल पांढरी मौजे कामस ताा चाकण प्राा जुनर येथील मोकदमी पोवलियाची त्यास कासाराची कजिया निमित्य राजद्वारी खर्च पडला. त्याचा तपसील खरीदखतात आलाहिदा आसे म्हणौन पोवलियानी जानोजी सेपले यास निमे मोकदमी देऊन पैका घेऊन खर्च केला. त्याजवर सेवलियाचा गुमास्ता मौजे मजकुरी येऊन पाटिलकीची गुमास्तगिरी करू लागला. तो येथारीत सोडून मनमानेती आपणासी वर्तू लागला. त्याजवरून आपण माहाराजास पत्र लेहून सेवली याकडील पाटीलकी दूर करविली आणि पोवलियानी सेवलियाचे रूपये घेतले होते माघारे देविले. तेव्हां पोवले पाटील समाकुल पांढरी कुलाबा येऊन जाले की निमे मोकदमी आपण घेऊन सेवलियाचे देणे वारावयास ऐवज द्यावा. तेव्हां आमची ममता धरून आपल्याकडील गुमास्ते व पोवले पाटील व समाकुल पांढरी मौजे दवडीस पाठऊन ऐवज नेऊन सेवलियाचे लचांड वारिले. त्याजवर व्याज मुदल पैका मुबगल पोवलियाकडे जाला. त्याचे ऐवजी निमे मोकदमी सेवालियाचे सिरस्ते प्रमाणे आपण करार करून खरीदखत करून देविले. बाकी पैका पोवल्याकडे राहिला. तो द्यावयास ताकद नाहीं म्हणौन स

व विसाजी लखाजी व काजी याजबार पाठविली आहे त्याजवरून कळेल. मारनिलेनी विदित केले की सेवली याजकडेस पाटीलकी गेली असता आपण राजद्वारी विनंती केली म्हणोन महराज कृपाळु होऊन सोडऊन दिल्ही. तेव्हां आपण आमची ममता धरून स्नेहममतापूर्वक घरोब्याचा विचार चित्तांत आणून अगत्य जाणोन आम्हाकडेस पाटीलकी पोवल्यांकडून निमे करार करून देविल्यामुळे आम्ही मौजे मजकुरी वाडा बांधणार, तैसा तुमचा सरकारचा वाडा जीर्ण जाला आहे तो नूतन विस्तीर्ण बांधोन द्यावा म्हणौन त्रिवर्गानी विदित केलें. तरी आपले कृपेममतेपेक्षां अधिकोत्तर काय आहे. निमे मोकदमी आम्हाकडेस करार करून देविली हे साहित्य आपणाकडून जाले ते आमचे आंतरांत येऊन गेलेच आहे. आम्ही आपला वाडा दुमजला पुढें सोपे सावे व कोठी व जामदारखाना याप्रमाणें बांधोन दिला जाईल. येविशई आंतर सहसा होणार नाही. कलम १

कार महसली साऱ्याची जमीन पोवालियाचे थळेगा समाकुल पाढरीने व पोवालियाने आपले खुश रजाबंदीने सवा दोन खंडी इनाम करून दिल्हे आणि कर्ज फारखत करून दिल्हे. जमिनीचा उपयोग आम्ही पुस्तदर पुस्त करीत जावा. जमिनीचा सारा समाकुल पांढरी सरकारांत देत जावा. ऐसा करार ठरला आहे तरी आपण कृपा करून करार ठरल्याप्रो बेदिकत चालविले पाहिजे. कलम १

आपले तर्फेने हकिमीचे व देशमुखीचें कारभारास गुमास्ते मौजे काळोसच्या ठाण्यात राहतच आहेत. आमचे तर्फे मोकदमीचे वतनी कारभारावर गुमास्ते ठेऊ. त्याजपासून वर्तणूक येथारीतीने न जाली. तरी मातुश्री सखुबाई दावडीस आहेत. त्यास कलवावे गुमास्तेयापासून आंतर पडिले ऐसे जाले तरी तो गुमास्त काढून आपले मर्जीप्रमाणें दुसरा ठेवितील. हकिमीचे रीतीने कृपा करून गुमास्तीयाचे हातून सेवा घेत जावी. कलम १

एकूण कलमे ३ करार मदार शरयेत पन्हा काजी व राजश्री सुभानजी मोरे व विसाजी लखाजी याचे विद्यमाने आपल्या पत्रावरून जाले आसे. त्याप्रमाणे आम्हाकडून चालत जाईल. आपणहि चालवीत जावे. छ १९ माहे मोहरम मजकूर सन मोर्तब सुद.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५ स्वी. ग्रं. क्र. ७. पृ. ३५६-८.

२५ एप्रिल १७४८ ] (-४४९-) [ ७ जमादिलावल, समान आँबैन मया अलफ

श्री

राजश्री देशाधिकारी लेखक वर्तमान व भावी ता उमटे मामले चेऊल गोसावी यांस :—

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री मानाजी आंगरे वज्जारतमाब सुा सबान अर्बैन मया व आलफ. राजश्री साबाजी तुकाजी व कृष्णाजी तुकाजी कायस्थप्रभु पुरातन राज्यांतील सेवक एकनिष्टपणें राजश्री स्वामीचे राज्यांतील सेवा श्रमसाहास करीत आले. साप्रतहि सेवाधर्मे एकनिष्ठपणें वर्तणुक पाहून मौजे चावरे तपे उमटे मौजे मजकूर हा गांव देखील मजरे व खारवट व जिरायेत बागायत नख्त बाब हाली पटी पेस्तरपटी आदीकरून कुलबाब कुलकानु दरोबास्त मारनिलेस इनाम करार करून इनामपत्र मारनिलेचे नांवें सादर केलें असे, त्याप्रो पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनी मजकूरचा उपभोग इनामतीचा करीत जातील. मौ मारचा आकार होईल तो खेरीज. हा करार इनाम खर्च पडत जाईल. वसुलाचा व ज्ञाहज फर्मासीचा उपसर्ग काडीमात्र मौजे मजकुरास न करणें. दरसाल ताजे सनदेचा ऊजूर न करणें. हे पत्राची नक्कल घेऊन असल पत्र उपभोगास मानिलेस देणें. रा छ ७ माहे जमादिलावल.

भारत सेवक, व. २, अं. ११, आगष्ट १९२९, पृ. २७५-२७६.

२५ एप्रिल १७४८] (-४५०-) [७ जमादिलावल. समान आर्बेन मया अलफ

श्री

(शिक्का)

छ मा अजम जमिदार मामले चेऊल यांस मानाजी आंगरे वजारतमाब सुहुर सन समान आर्बेन मया व अलफ. राजश्री साबाजी तुकाजी व कृष्णाजी तुकाजी कायेस्त प्रभु पुरातन राज्यांतील सेवक परंपरागत राजश्री स्वामीचे राज्यांतील येकनिष्ठपणें सेवा श्रमसाहास करित आले व पुढेंही एकनिष्ठपणें वर्तणूक करून सेवाधर्मी तत्परता पाहून कुटुंबाचे योग्यक्षेम करितां मौजे चावरे ताो उमटे मौा* मजकूर हा गाव देखील मजेरेव खारवट जमीन व जिरायेत बागायेत बाब हालि पटी पेस्तर पटी वेंठबेगार आदीकरून कुलकानु दरोबस्त इनाम करार करून इनाम सादर केले असे. तर मौजे मजकुरचे इनामतीचा उपभोग वौशपरपरेनी करित जातील. मौजे मजकुरचा आकार जो होईल तो खेरीज हकदार पेस्तर सालापासून साल दरसाल हरदु मारनिलेचे नावे इनाम खर्च लिहीत जाणे. दरसाल ताजे सनदेचा उजुर न करणे. हे पत्राची नकल घेऊन असल पत्र मारनिलेस भोगवटीयास देणें. रा छ ७ माहे जमादिलावल.

भारत-सेवक, व. २, अं ५, फेब्रुवारी १९२९, पु. ११७.

२५ एप्रिल १७४८ ] (-४५१-) [ ७ जमादिलावल, समान आर्बैन मया अलफ

श्री.

इनामपत्र समस्त राजकार्यें धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री मानाजी आंगरे वजारतमाब राजश्री साबाजी तुकाजी व कृष्णाजी तुकाजी सुहूर सन समान आर्बैन मया व आलफ दिल्हे इनामपत्र ऐसाजे. तुम्ही पुरातन राज्यातील सेवक एकनिष्ठपणें परंपरागत राजश्री स्वामीचें अभिष्ट चिंतोन श्रमसाहासेकडून सेवा चाकरी करीत आहा. सांप्रत तुमचे सेवेस साहस व एकनिष्ठता पाहून तुमचे कुटुंबाचा योग्यक्षेम चालिला पाहिजे. याजवरी दृष्ट देऊन कृपाळूपणें मौा चावरे ताा उमटे मामले चेऊल हा गांव देखील मजरे व खारवट जमिन प्राचीन रिवाजामतें दरोबास्त निरायत बागायत व नख्त बाब हालीपटी व पेस्तरपटी देखील इनाम तुम्हांस पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने करार करून इनामपत्र सादर केलें असे. तर पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनी मौजे माारचा उपभोग करीत जाणे. राा छ ७ माहे जमादिलावल.

~~~~~~~~~~~~~

भारत सेवक, व. २, अं. ११, आगष्ट १९२९, पृ. २७५.

२१ मे १७४८] (-४५२-) [४ जमादिलाखर हि. ११६१

[नबाब निजामउल्मुलुखचा नासिरजंगास उपदेश]

छ. ४ जमादिलाखर ११६१ हिजरी.

१. दक्षिणचे सुभेदारानें सर्व प्रकारें महाराष्ट्र राजांशीं स्नेह राखावा हें उचित. महाराष्ट्र दक्षिणचे जमीनदार आहेत.

२. माणसाचे वधास विचार दूरवर करावा. दाण्याचीं कणसें नाहींत कीं वर्षास नवीन उत्पन्न होतील. दंड योग्य असेल त्यास काजीकडे हवाला घालावा व धर्मशास्त्राचा भार काजीवर ठेवावा.

३. मुशाफरींत वय न्यावें. नित्य नवें उदक व नवें स्थळ व डेरियाची सावली अनुभवावी मुशाफरींत लाभ बहुत आहे व मुलखाची उस्तवारी होते. पर्जन्यकाळीं एके ठिकाणीं रहावें. पर्जन्य काळांत प्राणिमात्रास श्रम होतो. वंश उच्छेद न व्हावा हें मुख्य कारण समजावें.

४. लोकांचीं कामें आपले आधीन आहेत. ये विषयीं केवळ ईश्वराची कृपा जाणून शास्त्राप्रमाणें आपला स्वधर्म करून दिवस काळी व मुलकी कामांत वाढून मोहसबा (हिशेब) इहालोक व परलोक विषयीं घेत जावा.

५. दौलतीची कायमी महापुरुषाचे कृपेनें असते. केवळ बाह्य साहित्यानें निर्वाह नाहीं. यास्तव सर्वभावें महापुरुषास शरण असावें.
~~~~~~~~~~~~~

६. आकाश, पृथ्वी व विश्व अनादि आहे. सर्व भूमंडळास आपलाच विभाग समजून हक्क कोणाचा बुडवूं नये.

७. दक्षिण सहा सुभे आहे. पूर्वी दर सुभ्यास पातशहा वेगळाच होता. औरंगजेबापासून दरोबस्त तालुका एकास होऊं लागला. यास्तव वेगळीं वेगळीं घराणदार माणसें ध्यानांत आणून काम काज सांगत जावें. वर्षा दो वर्षांनीं तालुकियाची तगीरी बदली करीत जावी. यांत विभाग सर्वांस पावता होतो.

८. भावा बंदांची परिवारिष करीत असावी. बाहूब्ळ व अब्रुचें रक्षण यांत आहे. बेदिल असल्यास दौलतीस धक्का व फितुर करितात. केवळ अन्यायास प्रवर्तलियास शिक्षाही करावी.

९. हलके मनुष्यास दरवाजावर उभें राहूं न द्यावें. सहवास तर बहुत दूर.

१०. उमदे माणसास हलकें काम व हलके माणसास उमदें काम सहसा न सांगावें.

११. दक्षिण सुभेदारी वतन नाहीं. धनीयाची मर्यादा पाळीत जावी. विपरीत वर्तणूक जाहलिया ईश्वरापाशीं अन्याय व लोकांत दुर्नाम होते.

१२. लढाईस आपणाकडून कदापि उद्योग न करावा. आपण बलिष्ट व शत्रु दुर्बळ असे न समजावें. भार ईश्वरास पडतो. गर्व आवडत नाहीं. जेथवर प्रसंग न पडे तेथवर प्रयत्न करावा. शत्रू अमर्यादेस प्रवर्तलिया हक्क आपला जाणून ईश्वरास साह्य समजून पराक्रम करावा. भगवान् अवश्य जय करितो.

१३. खजिना स्वारी समागमें जरूर असावा. येणेंकरून फौजेची खातरजमा असते. साहुकारमंडळी सरकारचे खजिन्यावर समाधान राखिते व शत्रूचा पराभव होतो.

१४. फौजेचा हक्क आपल्यावर ठेवीत न जावा. आपले फौजेस शत्रूचे फौजेपेक्षां अधिक भीत असावें.

महाराष्ट्र कोकिल, पु. ४, अं. २, फेब्रुवारी १८९५, पृ. १-२.

८ आगष्ट १७४८ ] (–४५३–) [ २४ साबान, तिसा आर्बैन मया अलफ

श्री

छ मा। अनाम देशमुख व देशपांडे पा कोतूल सरकार जुनर सुभे खुजस्ते बुनियाद यांसि बालाजी बाजीराव प्रधान सहुर सन तिसा आर्बैन मया अलफ. यादव [शिक्का][1] मोरेश्वर बापुजी रामाजी उपनाम उपासनी गोत्र सैधवायन शाखा वाजश्री व मोकदम देहाये बिा

१. शिक्का– 'श्री: राजा शाहु नरप: ति हर्ष नीधान बा: ळाजी बाजीराव: मुख्य प्रधा: न.'

कसबे कोतूल देशमुखी व मोकदमी वतन चौथी तक्षीम १

देशमुखीच्या वतनाचे दरोबास्त देह १४

| | |
|---|---|
| १ मौजे मोगरस | १ मौजे पाडलणे |
| १ मौजे नाचणठाव | १ मौजे आंबिटखिंड |
| १ मौजे चिंचवणे | १ मौजे साकिरवाडी |
| १ मौजे सारोले | १ मौजे वाजुल शेत |
| १ मौजे विहीर | १ मौजे पिपलगाव देपा |
| १ मौजे केली | १ मौजे चास ता पवार |
| १ मौजे कुंभशेत | १ मौजे बोरी |
| ७ | ७ |

हटीदरोतेलवार येथील देशमुखीचे वतन दरोबास्त १

येणे प्रमाणे कसबे देशमुखी व मोकदमी चौथी तक्षीम देहाये चौदा व हटीदरातेलवर येथील देशमुखी पा मजकूर याजवर भागोजी बीन रंगोजी इबीन सूर्याजः ढगे देशमुख पा मजकूर याणी राजश्री-स्वामी सन्नीध येऊन फिर्याद केली जे पा मजकूरचे देशमुखीचे वतन आपले वडील भाऊ शहाजी बिन कोंडाजी इबिन नानाजी ढगे याचे व आपले. त्यापैकीं यादव मोरेश्वर कसबांची देशमुखी व मोकादमी चौथी तक्षीम व देहाये चौदा व हाटीदारातेलवर येथील देशमुखीचे वतन जबरदस्तीनें अनभवित आहेत. त्यास हुजूर आणून इनसाफ केला पाहिजे म्हणोन त्याजवरून यादव मोरेश्वर यास तलब करून किले सिंहगडीं अटकेंत ठेविले. तेथून किले राजगडावरी नेऊन ठेविले. तेथें तहकिकात करितां वतने खरेदी केली आहेत म्हणोन राजश्री स्वामीस विदित जाहले. त्याजवरून हुजूर नेऊन करिना मनास आणितां यादव मोरेश्वर याणी विदित केले जें, पा मजकूरचे देशमुखीचे वतन पुरातन ढग्याचे खरे. परंतु त्यांस वतन संबंधे व संसारिके मुळे कसाला पडोन कर्जदार जाहले. यानिमित्य त्यानी आत्मसंतोषें आपले वतनपैकीं सदरहु देह आपणास विकत देऊन खरेदीपत्रें व महजर व काजी व मोगलाई तालुकीयाचे हकीम व जमीदार व मोकदम पा मजकूर व गिर्दनवाईचे जमीदार पा याचे साक्षीनसी करून दिल्ही आहेत. त्याप्रमाणे सदरहु वतने आपण अनभवीत आहो. त्याची खरेदीपत्रें व महजर आपणापाशी आहेत. ती व साक्षमोझे मनास आणून वाजवी करून वतनावारी स्थापना करावी म्हणोन विनंती केली व खरदि खते व महजर व परवाने आणून दाखविले. बीतपसील.

शहाजी वलद कोंडाजी ईबिन् नानाजी व शिवाजी वलद बाबाजी इबिन् बलाळजी ढगे देशमुख पा कोतुळ ता निमेपैकी तक्षीम तिसरी व मोकदमी का मजकूर निमेपैकी तिसरी तक्षीम यानें यादव मोरेश्वर यांस शालिवान शके १६६२ रौद्र नाम संवत्सरे आश्विन शुद्ध प्रतिपदा सन ११५० या दिवशी खरीदपत्र गोही साक्षीनसीं

लेहून दिल्हे आहे. जे आपले वतनपैकीं आत्मसंतोषे तुम्हास वतन विकत दिल्हे पुस्त दर पुस्त.

कसबे मजकुर देशमुखी व मोकदमीत ता। निमे पै॥ आपली तक्षीम तिसरी याची जमीन मीरजुमले कसबाची जमीन चावर २४ चोवीस पैकी निमे चावर १२ त्या पैकी तिसरी तक्षीम चावर ४ च्यार आपली पैकी निमे तुम्हास दिल्हे चावर २ बागायेत व जिरायेत किस्तकारी जमीन व पाढर व मिरासीची सेतें मळे घरठाव व आपले कानुकायदे हक लवाजिमे पानमान सीरपाव पासोडीची जमीन बिघे ८१० दहा येणे प्रा॥ आपले आहे त्यापैकी निमे तुम्हास वतन विकत दिल्हे असे म्हणोन लिहिले आहे कलम १

देशमुखीचे वतनाचे देह साहा
५ दरोबास्त देह
१ मौजे मोगरस
१ मौजे नाचणठाव
१ मौजे सारोले
१ मौजे चिंचवणे
१ मौजे विहिर
——
५
१ शराकतीचे देह २ दोन पैकी निमे
॥· मौजे केळा
॥· मौजे कुंभखेत
——
१
——
६

हटीदरा हटीतेलवर येथील देशमुख वतन निमे आपले ते तुम्हास दिल्हे असे म्हणौन लिहिले असे कलम १

येणे प्रा॥ कसबे मजकूरची देशमुखी व मुकदमी ता। निमे पैकी तिसरी तक्षीम पैकी निमे येकूण चावर २ दोन व देशमुखीचे गांव साहा व निमे हटीदराची देशमुखी विकत देऊन खरीदपत्र करून दिल्हे असे. पत्र १

भागोजी वलद रंगोजी इबीन सूर्याजी व गंगाजी वलद येमाजी इबीन सूर्याजी ढगे देशमुख तक्षीम चौथी पा॥ कोतूळ व मोकदम व देशमुखी चौथी तक्षीम को॥ मजकूर यानी यादव मोरेश्वर यास शालिवान शके १६६२ रौद्रनाम संवत्सरे कार्तिक शुद्ध प्रतिपदा सन ११५० (१० आक्टोबर १७४०) ते दिवशी खरीदखत लेहून दिल्हे यैसे जे. आपले वतन पैकी आत्मसंतोषें तुम्हांस वतन दिल्हे असे. बितपसील

कसबे मजकूर देशमुखी व मोकदमी तक्षीम चौथी येकूण जमीन चावर ६ साहा पैकी निमे तुम्हास दिल्हे असे. बागाइत व जिरातेत किस्तकारी जमीन व पांढर व मिरासीचे मळे सेते व घरठाव

देशमुखीच्या वतनाचे देह ७ सात
६ दरोबास्त देह
१ मौजे अंबीटखिंड
१ मौजे पाठलणे
१ मौजे साकारवाडी

आपले कानुकायदे पानमान तसरीफ व पासोंडीची जमीन बिघे १५ पंधरा येणें-प्रो तुम्हास निमेनिम जमीन चावर ३ तीन समेत पासोडी व घरठाव दिल्हा असेत. म्हणोन खरीदीखत लिहिले असे कलम १

१ मौजे वाजूल सेत
१ मौजे पिंपलगाव देषा (?)
१ मौजे चास ता पवार

---

६

१ शराकतीचे देह २ दोन पैकी निमे शाहाजी निमे आपली तक्षीम ते तुम्हास दिल्ही असे.

॥ मौजे केली
॥ मौजे कुंभसेत

७

---

कटीदरा तेलघर येथील देशमुखी वतन निमे आपले ते तुम्हास दिल्हे अस कलम १

येणे प्रमाणे कसबे मजकूरची देशमुखी व मोकदमी चौथी तक्षीम पैकी निमे येकूण चावर ३ तीन व देशमुखीच्या वतनाचे देह सात व निमे हटीदरातेलवर येथील देशमुखीचें वतन येणेप्रो विकत देऊन खरीदीपत्रें करून दिल्ही असेत. वंशपरंपरेनें अनभवणे म्हणून.

आपाजी गंगाराम व दयाजी बिन परशराम उपनाम परशरामी यानी पूर्वी पा मजकूर पैकीं वतने विकत घेतली होती. तीं यादव मोरेश्वर यांस विकत देऊन खरीदीपत्रें वंशपरंपरेनें आनभवणें म्हणोन करून दिल्हे असे. ब्रितपसील

पत्र शालिवान शके १६६७ क्रोधननाम संवत्सर कार्तिक शुद्ध प्रतिपदा (१४ आक्टोबर १७४५) दिवसी पत्रि लेहून दिल्हे. को कातूळ येथील देशमुखी व मोकदमी आपलें वतन जमीन चावर १ येक आहे ते काली पांढरी झाडझाडोरा व घरठाव वाडा हक लवाजिमा व आंबराईचा वाटा मानपान देखील आहे ते तुम्हास दिलेहे असे म्हणून पत्र १

पत्र शालिनान शके १६६७ क्रोधननाम संवत्सरे माघ शुद्ध त्रयोदशी सन ११५५ (२३ जानेवारी १७४६) खरीदी पत्र लेहून दिल्हे मौजे बोरी दरोबस्त व मौजे केली पैकीं तक्षीम साहावी व कुंभसेत व हटीदरापैकी तक्षीम बारावीची देशमुखीचे वतन आपले होते ते तुम्हास दिल्हे असे म्हणो खरीदी पत्र १

येकूण दोन पत्रें आपाजी व गंगाजी व दयाजी परशराम याच्या बापाने वतने खरीदी केली होती. त्यानी यादव मोरेश्वर यास विकत देऊन खरीद पत्रें करून दिल्ही. पत्रे २

येणेंप्रमाणे शाहाजी ढगे याजकडून कसबाची मोकदमी व देशमुखी जमीन चावर दोन व देशमुखीचे देह ६ साहा व हटीदरातेलवर येथील देशमुखी निमे याचे खरीपत्र १ येक व भागोजी देशमूख ढगे याजकडून कसबाची मोकदमी व देशमुखी जमीन चावर ३ तीन व देशमुखीचे देह ७ सात व निमे हटीदरातेलवर येथील देशमुखी याचे खरेदीपत्र १ येक व आपाजी व गंगाजी व दयाजी बिन परशराम याजकडून कसबांची देशमुखी व मोंकदमी जमीन चावर १ येक याचे खरीदी पत्र १ येक व मौजे बोरीचे देशमुखीचे वगैरे हिसे याचे देशमुखीचे येकूण पत्र १ येक यैसी आपाजी परशराम याजकडून खरीदी पत्रें २ दोन येकूण च्यार खरीदी पत्रें व महजर व मोगलाई परवाने सिकीयानसी आणून दाखविले. त्याजकरून मनास आणितां मजकूर अज रकम जमीन चावर २४ चोवीस पैकीं यांजकडे देशमुखी व मोकदमी चावर ६ साहा येकूण को। मजकूर दरोबस्त पकीं चौथी तक्षीम व देशमुखीचे देह १४ चौदा व हटीदरातेलवर येथील देशमुखीचे वतन यादव मोरेश्वर याणी खरीदी केली आहेत. त्यास सदरहु पत्रावरील साक्ष मोझे शहाजी व भागोजी ढगे याचे रुबरू मनास आणिले व गीदनवाईच्या परगण्याचे जमीनदाराच्या सडी आणविल्या, त्यावरून मनास आणून यांसी ढगे वतन संबंधे कजिया करीत होते. यैसीयास त्यानी विकत वतने देऊन खरीदी पत्रेंकरून दिल्ही असतां व ये गोष्टीचे साक्ष मोझे व सडी फरत (?) असतां कजिया करितात. हे गैरवाजवी ढगे मजकूर खोटे जाहले. यादव मोरेश्वर याणी खरीदखते व महजर व परवानीया प्रो। वतने वंशपरंपरेने अनभवावी. ढगीयास अर्थाअर्थी संमंध नाही. यैसे रुजु मोझ्यानें खरे जाहाले. त्याजवरून यादव मोरेश्वर यांजवरी राजश्री स्वामी कृपाळु होऊन सदरहु प्रमाणें राजपत्रें सादर केली असेत. तरी तुम्ही कसबे मजकूरचे देशमुखीचे व मोकदमीचे वतन जमीन चावर ६ साहा येकूण दरोबस्त कसबापैकीं चौथी तक्षीम व देह १४ चौदा व हटीदरातेलवर येथील देशमुखीचे वतनाचे मानपान सीरपाव नावनागर दस्तखत मोहर व इनाम जमीन व मिरासीची सेते व मळे व पासोडीची जमीन व मिरासीचे वाडे धरठाव आब्र आबली झाडझाडोरा होलीस पोळीं व गवरीचा मान व हकलवाजिमे व कायदे कानु व सेव सबजी राजपत्राप्रमाणें यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे. या पत्राची प्रत लेहून घेऊन असल पत्र भोगवटिंयास परतोन याजवळ देणे. जाणिजे, छ २४ शाबान. आज्ञाप्रमाण [शिक्का लेखन सीमा]

~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. त्रै., व. ६, अं. १-४, पृ. १७५ ते १७९.
~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~

२३ डिसेंबर १७४८ ] (-४५४-) [ २ मोहरम, समान आर्बेन मया अलफ.

श्री

[ शिक्का ][1]

आज्ञा पत्र राजश्री पंत- प्रधान ता। मोकदम मौजे भिवंडी ता। करेपठार प्रांत पुणें सु॥ समान आर्बेन मयां अलफ बदल देणे जानोजी भिंताडा खिजमतदार यास सेत सनद रु॥ १५ पंधरा देविले असेत. साल मजकूरचे ऐवजी याचे सेत पैकीं पावते करणे. जाणिजे. छ २ मोहरम [ शिक्का- लेखन सीमा ]

भा. इ. सं. मं. त्रै. व. ७, अं. १-४, पृ. ५५

१७४९ इ. स. पूर्व ] (-४५५-)

श्री

श्रीमत् सकल तीर्थस्वरूप राजश्रीया विराजमान राजश्रि शाहूराजे दाजी वडीलांचे सेवेसी अपत्यें संभाजी राजे कृतानेक दंडवत उपरि येथील कुशल श्रीकृपे (पें) वडीलांचे आशीर्वादें जाणोन स्वकुशल लेखने समाधान पावविलें पाहिजे. विशेष दैवगतीनें सौभाग्यवती मातुश्री सावित्रीबाई यांसी परलोकवास जाला म्हणोन वर्तमान अवगत होऊन चितास परम श्रम प्राप्त जाले. इश्वर इच्छेस व आफतमर्यादेस येत्न काये आहे ? वडील विवेकी आहेत. गतशोकाचा विवेकेकडून परिहार होये ते करावे. ये विशई तीर्थस्वरूप श्रीमत् मातुश्री साहेब विवेक फक्त आज्ञा करितील तदनुरूप शांतवन होये ते केले पाहिजे. बहुतां लिहिणे तरी वडील सुज्ञ असेती. [ मर्यादेयं विराजते.- शिक्का ].

महाराष्ट्र-साहित्य, व. ४, अं. ८-९, फेब्रुवारी-मार्च १९२३, पृ. ३००.

इ. स. १७४९ पूर्व ] (-४५६-)

श्री

श्रीमत् सकल तीर्थस्वरूप राजश्रिया विराजमान राजश्री शाहूराजे दाजी वडिलांचे सेवेशी. अपत्यें संभाजी राजे दंडवत्. प्रणाम. उपरि अत्रत्य कुशल श्री... कृपावार्धिष्णु जाणोन स्वीय कुशल लेखनी चित सानंदित करीत असले पाहिजे. विशेष. सांप्रत वेदशास्त्रसंपन्न राजश्री मुद्‌गलभट उपाध्याय श्री यात्रोद्देशें आज्ञा- समीप अले.

१. शिक्का- 'श्री : राजा शाहू नर : पति हर्ष निधान : बाळाजी बाजी : राव प्रधान '.

दर्शन जालें व वडिलांचे कुशल व ममतातिशविषदें श्रुत केला. त्यावरून प(र)त संतोषावानि जाली. निरंतर स्वकुशलपत्रप्रेरणादि उचित व्यवहारें निर्व्याज ममताभिवृद्धि करणें विहितच आहे. प्रस्तुत भट गोंसावी यांसी पुढें श्री यात्रेस रवाना केलें. वडिलांस कलावें यास्तव लेखन केले असे. भट गोंसावीही लिहितील. बहुत लिहिणें तरी वडील सुज्ञ असेती. [शिक्का–मर्यादेयं विराजते]

~~~~~~~~~~~~~

महाराष्ट्र–साहित्य, व. ५, अं. २, आगष्ट १९२३, पृ. ११६,

८ जून १७४९ ] (–४५७–) [ आषाढ शुद्ध ५ गुरुवार, शके १६७१

श्री

निवाडपत्र शके १६७१ शुक्ल नाम संवछर आषाढ शु ५ गुरु ते दिवर्सी राजश्री यशवंतराव माहादेव प्रभु व गोविंद खंडेराव चिटणीस व समस्त गोत्र प्रभु याणी सातारेच्या मोकामीं श्रीमन्महाराज छत्रपतीस्वामीं संनिध विनंती केली जे: व्रतबंध गायत्री उपदेश करुन ब्रम्हकर्मास अधिकार व्हावा ऐसीयास स्वामी उभयतांचे अगत्यच होते. त्याचे कार्य करून द्यावे हा मनोगत. आणि यासमई त्यांजवर सर्व कारकून व वेदशास्त्रसंपन्न राजश्री माहादेव भट्ट उपनाम आठले कऱ्हाडे सूत्र आश्वलायन व गोविंदभट व रामभट्ट वगैरे ब्राह्मण समुदाय प्रभुपक्षीं असतां या उभयतां प्रभूंशी चालं दरबारी कारभारसमंध बहुत त्याजमुळें राजश्री बाळाजी पंडित प्रधान व यांचे कारभारी राजश्री महादाजी अंबाजी पुरंदरे यास व मुत्सद्दीमंडळी सरकारातून अष्टप्रधान यांविसीं विदित जाहाले तपसील नावानिसी

| | |
|---|---|
| १ प्रतिनिधी | १ सुमंत |
| १ प्रधान | १ पंडितराव |
| १ सचीव | १ सेनापति |
| १ आमात्य | १ न्यायाधीश |
| ४ | ४ |

हे मुख्य व दारबारी मुत्सद्दी व ब्राम्हण सिष्ट नगरांतील एकत्र होऊन विचार मनास आणितां अगोदर दोन च्यार वर्षपर्यंत गांठ घालून आपले जागां प्रभु यांणी परभारे वश केला असतां बहुतकरून द्रव्यद्वारा व कारभारामुळें जड भारी पडून गेली. कोणाचा उपाव नांही. तेव्हां राजश्री यमाजी शिवदेव व कारभार निसबत राजश्री जगजीवनपंडित प्रतिनिधी यांजकडील कारकून यांस बहुत श्रुत समयोचित जाबसाल सुचविणार यांणी मनावर धरून आपले आंग न दाखवितां परभारे ब्राह्मणास ताकीदपत्र पाठवून आणविले. ते तपसील
~~~~~~~~~~~~~

१ कऱ्हाडकर
१ पेणकर
१ माहुलीकर
१ कृष्णाविणीतीरचे
१ वाईकर
१ नाशिककर
१ माहुलीसंगमीं
१ .. .........

त्यांस आणवून मनास आणितां प्राचीन कर्म नसोन सांप्रत काळाचें ठाई नूतन ब्रह्मकर्म करावयास अधिकार करितात हें खोटें. श्रीमंत महाराज छत्रपती स्वामी यांचे आग्रहामुळें कोणाच्यानें जाबसाल संनिध होत नाही. ते समई येमाजीपंत यांणी वाराणसीक्षेत्रीं मंदाकिनीतीरीं श्रीशंकराचार्य वौशपरंपरानुग्रहित श्रीमत् गौडाचार्य सरस्वती षड्शास्त्रवित्पन्न स्वामी समर्थ श्रेष्ट मान श्रेष्ठ स्वामी वंद्य वगैरे श्रेष्ठ स्वामी अन्यस्थळीचे वर्तमांनी वर्तमान निवेदन केलें त्याजवर स्वामीस विशाद दिसोन आलें जे – नूतन अधिकार द्यावयास नसोन ब्राह्मण कर्मे होतात याजवरून अपूर्व दिसून आले. याचप्रकारें श्रीशृंगेरी मठाहून श्रीमत् परमहंस स्वामीस निवेदन केलें. उभयतांस ही गोष्ट मान्य जाहाली नाही. त्यांणीं उतर दिले कीं कलि धर्मावतावर प्रघट जाहाला कीं यवंनी एकमय जाहाली अंती होणार असे भविष्य आहे. तो समय सांप्रतच दिसतो. परंतु दोनीं क्षेत्रीं धर्मस्थान धर्माचरण न करितील त्यांस सिक्षा करावयास योग्य समर्थ येथनिमित्य दौंही स्थलींहून वेदशास्त्रसंपन्न ब्रह्मवृंद रवाना करून दिले त्रितपसील

शृंगेरी मठाहून आले :—
१ गोपाळाचार्य
१ व्यंकटेश पंडीत
१ वेणीराम पंडीत
१ श्रीनिवास पंडीत
१ माधवाचार्य
———
५

श्रीं वाराणसीक्षेत्राहून आले :—
१ गुणाकार पंडीत
१ पुरुषोत्तम पंडीत
१ नारायणराव पंडीत
१ गोविंदाचार्य
१ गोविंदनाथ देव
———
५

———

१०

येणेप्रो पंडीत व आणखी ब्राह्मण दशग्रंथी समुदायेशाहा वर्तमान सातारेच्या मुक्कामी आले. ते समई अन्यस्थलींच्या व कऱ्हाड-वांईकर वगैरे एकत्र ब्राह्मण मिळोन दाहा हजारपर्यन्त दरबारी प्रसंग केला. जे प्रभु यास पुरातनपासोन जे कर्म नसतां नवीन कर्मांचा सांक्षेप येदर्थी कलीमधें वर्ण दोन ब्राह्मण व शूद्र राहिले क्षत्री व वैश्य या दोनी वर्णांचा क्षय जाहला. क्षय जाहला स(ह) देवासी येक पुत्र राहिला तो बद्रिकाश्रमी होता. त्याकरितां कली धर्माचा नाश कलंकी अवतारीं करील, मग क्षेत्रीपुत्रास राज्यास्थानीं स्थापील. तेव्हां प्रभु यास तीन कर्मांस अधिकार कोठून द्यावा. मग भट आठलेकर तसखी यांणी उत्तर केले जे शाणवई यांसी

शठकर्माचा अधिकार आहे आणि यास नांही याचा आर्थ काये म्हणतांच मग दोनी स्थळींहून दशविध ब्राह्मणाच्या वंशपरंपरा क्षेयद्रीखंडी समूळ आद्यांत आहे ती श्रीगरी मटाहून आणविली. ती त्यांत संविस्तर ब्राह्मणाचा आच्यार व देश तपसील

पंचगौड ते कोण
१ मुख्य गौड
१ कानकुबज
१ मयथील
१ सरस्वत्य
१ उतकील

पंचद्रवीड ते कोण
१ मुख्य द्रवीड
१ महाराष्ट्र
१ तलंग
१ कर्नाटक
१ गुर्जर

---

५

येणेप्रों दशविध ब्राम्हणाचा कुळियामधें जेष्ट घर गाडे यास निमित्येन वेदशास्त्रसंपन्न पुराणोत्पन्न श्रीवाराणसी पूर्वदेशीं विद्याजन्म येत्र येत्र स्थलीं याजकरितां वडिलपणाचा अधिकार त्यांजवल व दुसरे द्राविडांकडे जे श्रीक्षेत्राहून विद्याभ्यासी प्राप्त याप्रमाणें म्हणोन कनिष्ठ व पंचगौडामध्यें विच्यार व द्रविडामधें आच्यार हे दोनी मार्ग पुरातनपासोन चालत आहे असे आसतां त्रेतांयुगीं श्रीपरशराम अवतार क्षत्रीये कुळीं सहश्रार्जुन माहाबाहूचें होऊन व्योभिच्यार धर्म वर्तणूक सर्व हि क्षेत्रीं करूं लागले. तेव्हां परशरामानें एकवीसवेळां निक्षेत्री पृथवी करुन सुमंत पंच क्षेत्री रूधीयच नधीमधें तिळोदक मंत्र येज्ञास्थव ब्राम्हण येज्ञ केला. उपरांत क्षत्रीय कुल आपण सवंहार केला. ब्राम्हणहत्या पातकें जाहलीं म्हणोन पश्चाताप बहुत होऊन पृथ्वीचें राज्य आपले घरास आले. आपणास राज्य काय करावे. आपण ब्राम्हण तप करीत असावे. भुमीभार उतरुन स्वस्थ असावे. हा विचार चितांत आणून संपूर्ण पृथवीचे राज्य ब्राम्हणांस दान दिल्हे. आपणास राहावयास स्थल पाहिजे म्हणोन समुद्रापासून जागा चौदा कोश रूंदी व चौऱ्याहत्तर गांव लांबी घेऊन तेथे ब्राम्हण स्थापना केली. ता

१ कल्याणच्या नदीपासून राजापूरचे पो महाराष्ट्र देशीचे ब्राह्मण न्हेऊन स्थापना केली आणि चितपावन नामाधान ठेविले.

कमल

१ राजापूरचे नदीपासून आचरेचे नदी-नदी पर्यन्त जागा कराडे यास दिली. हेहि देसीहून न्हेऊन स्थापना केली. आश्वलायन शाखी दुसरीशाखा नाहीं. हे विषमारक जणावे

कलम

१ रगवेदी अश्वलायन गोत्र
१ आपस्तंब यजुशाखी

---

४

येणेप्रों पुढें मसूरचे नदीपासून आंकलेश्वरचे नदीपासून माहाल कुडालचे नदी- पर्यंत आपणास राहावयास स्थान टेविलें. हरमल तर्फ पेडणें येथें राहिले. येज्ञास प्रारंभ आश्वीनमासांमधें करून दोषाचा नाश करावा येदर्थी सर्व साहित्य करून येज्ञास प्रारंभ केला. तो येज्ञसमुदाय गौडब्राह्मण पाहिजे, तेव्हां गौडदेशाहून सारस्वत्य ब्राह्मण त्रिहोत्रपूर नामक क्षेत्र आहे तेथून दशगोत्री आश्वलायन शाखा रगवेदी आणून स्थापना केली. मसूरचे नदीपासून आंकलेश्वरचे नदीपर्यंत हा देश शाश्वत ब्राह्मणास दिला. सारस्वत्य ब्राह्मणामध्यें मुख्य शिवशर्मा व देवशर्मा आत्रीगोत्री व विष्णुशर्मा वछ गोत्री कवडण्य गोत्री व कंवशीक गोत्री हे तीन गोत्री मुख्य. यासमंधी भारद्वाज सत्य यैकून दशगोत्री यांस शाश्वत स्थापन यांस मोकासा कसबें मजकूर पाों निमे स्थळ देऊन केळोसी कुश स्थली साष्टीनजीक गोमांतक त्रिवर्गासी देऊन मसुरेपासून आंकले सिव्हेश्वरपर्यंत बारदेसयास दिला. तेव्हां दोन प्रस्था पडलीं. जे सेणवाई म्हणावयास कारण काय तर ब्राह्मण तमाम कारकून रोजगार करून कालक्षेप केल्यास त्यास पंत अथवा सेणवाई म्हणावें. हें पुरातन शैयाद्रीखंडीं कथा आहे असे सांगतांच सर्वांसी समज पडला. मग परभुची उत्पती कोठून म्हणोन प्रच्छा केली. तेव्हां दालभ्य रूषी होते त्याचे दासीपासून त्यांची उत्पति. त्यांसी अधिकार कोणतेच गोष्टीचा नांही केवळ शूद्रापासून उत्पन्न म्हणून परभू हे नामाभिधान याप्रकारें वर्तमान असतां अन्यथा मार्ग पदवी जर यांसी दिली तर सिद्धीस जाणें कठीण. पहिले वेदशास्त्रसंपन्न कैलासवासी गागाभट यांणी क्षेत्रीशर्मास अधिकार राज्यास वृतबंध करून गाईत्री उपदेश करुन स्थापिलें. त कर्म सिद्धीस गेले नाही. दोनीहि वंशाचे निर्मूळ जाहाले हे प्रत्यक्ष जाणून आमार्गानें वर्तल्यास साध्य श्री कृपा नांही. आपापले मार्गी तत्पर असावे हे उचित असे व सर्व वृत्तांत श्रीमहाराज राजश्री शाहू छत्रपती स्वामीची निशाखातरी होऊन माहाराजांनीं खोटपत्र ल्याहावयाला आज्ञा केली. दुसरे येमाजीपंत याणी पाटाच्या स्त्रीया प्रभुच्या घरीं पांच सात पाठविल्या. त्या स्त्रीया कुडाळ खोरें वगैरे स्थळांहून आणऊन प्रत्यक्ष दाखविल्या. तेव्हां माहाराजांची नाखुषी होऊन खोटपत्रें भाद्रपद शु १३ योदशीचीं जाहाली. एवंच्य प्रभु याचा अधिकार कोणत्याच मार्गाचाच नांही असे खोटे ठरवून ब्राह्मणांनीं सर्वत्र माहावैदिक दशग्रंथी व पंडित व शास्त्रीं या सर्वांनीं एक विचार करुन माहादेव भट्ट आठले आणखी तत्पक्षी ब्राम्हण द्रव्य भक्षून त्यासारिख्या गोष्टी सांगोन व्यभिचार धर्म करावयास प्रारंभ केला. त्यास कांही शिक्षा करावी. परंतु ब्राम्हण येदं–निमित्य वाळीत घालून पंक्ती वेगळे केले. मग ब्रांह्मणांस संकट पडले. सर्व मंडळीस शरण आले. आम्ही शरण आलो. आम्हांस मुक्त करावे म्हणाले. तेव्हां सर्वांनी आज्ञा केली जे श्रीकाशीक्षेत्रीं जाऊन श्रीगौडाचार्य स्वामी सारस्वत्य यांस शरण गेल्यास ते कृपा करितील आणि पंक्तिपावन करितील. हा उपाय सांगोन माहायात्रेस ते भट सर्व आठवले वगैरे श्रीक्षेत्रास जाऊन केले कर्माचा उच्चार करुन सर्व स्वामीपांसी विनंति करुन घेतली. नंतर स्वामी कृपाळु होऊन त्यांस पंक्तिपावन केलं. नंतर श्रीस्थळी यात्रा करुन

भटजीमंडळीसह वर्तमान माघारे सातेंन्यास आले. ते मोकामीं माहाराज शाहूछपत्रती यांजपाशीं आले. परशराम अवतार भृगुवंशी धरुन भुमीभार उतरुन अश्वमेघ केला त्याची साक्ष अद्यापिं आहे. नवे विभूतीचा टिळा दिसतो. याची साक्ष पहावयास मौजे हरमल येथे हुजरे व ब्राम्हण आपले पाठविले. ते पाहून आले आणि महाराजांस विदित केलें. सारस्वत्य ब्राम्हण रगवेदी आश्वलायनशाखी हे आपले स्वदेशास जाणेस आज्ञा घेऊन गेले आणि भार्गवराम क्षत्रीं आपण राहिले. इतुकें वर्तमान जाहाले. येणेंप्रा। निवाडपत्र जाहाले असे.

भा. इ. सं. मं. अहवाल शकें १८३४, स्वी. ग्रं. क्र. ४, पृ. ९३-९७.

४ नवंबर १७४९ ] (-४५८-) [ ४ जिल्हेज, खमसैन मया अलफ '

श्री

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री ब्रजाजी माधवराव गोसावी यांसि-सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार, सुा खमसैन मया व अलफ. तुम्ही विनंतीपत्र छ २५ जिल्कादचें पाठविलें तें पावलें. लिहिला मजकुर कळला. नबाबाचे मनसुबीयाचा भाव समरुषीकडून प्रेप्र जाहाले. तद्विषयीं बहुत संतोषी होऊन आमच्या पक्षीं विकृत भाव चितांत आणलीयाचें व रघोजी भोंसले व चिमाबाई इत्यादि यास बोलाविली. यांची व मुजफरजंगाची शेंना साछील ? पडलीयाचा मजकुर लिहिला. तो कळला. अतःपरही तेथील अंतरबाह्य मजकुर निरंतर लिहित जाणें. तुम्हीं दरबारांत पईस बरा केला व रा। मोरोपंतांची घास पाहिली म्हणोन तर हेही मोठी गोष्ट केलीत. सारांश वर्तमान हकीकत सर्वदा लिहित जाणें. राजश्री स्वामीच्या वेथेस उतार आहे. श्रीकृपे अविलंबेच आरोग्य होऊन येईल. नबाब वाजरातीरास (मांजरा तीरास) किती दिवस राहणार. कोणत्या मार्गें जाणार. कसकसा विचार तो वरच्यावरी लिहित जाणें. तुम्हांस खर्चास तीनसे रुपये पाठविले. ते पावलेच असतील. जाणिजे. छ ४ जिल्हेज.

बार बार

महाराष्ट्र-साहित्य, व. ५, अं. ७, जानेवारी १९२४, पृ. ३०८.

१६ दिसेंबर १७४९ ] (-४५९-) [ ६ मोहरम, तिसा आर्बैन मया अलफ

अखण्डित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री रामजी महादेव नामजाद प्रांत साष्टी गोसावी यांसी —

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सुा सन तिसा आर्बैन मया व अलफ (शके १६७०). पळशे ब्राम्हण वतनदार प्रांत मजकूर यांणीं कसबे पुणें येथील मुकामी हुजुर येऊन विनंति केली कीं आपण पुरातन वतनदार उपाध्येपण व जोशीपण आपले आहे.

श्रीमंत कैलासवासी आपासाहेबीं साष्टी प्रांत फत्ते केला तेसमयीं आपण भयास्तव परागंदा होऊन मुंबईप्रांती गेलो होतो. श्रीमंतांचें दर्शनास यावे त्यास आम्हीं फिरंगाणचे राहणार. या राज्याची स्थितरीत ठावकी नाहीं. भयानें दर्शनास न आलो. वसई व बेलापूर येथील जोशी उपाध्ये हजर होते. त्यांची वतनें चालतात आणि आम्ही समयीं नव्हतों याजकरितां आमची वतने सरकारांत अमानत करून कमाविसीस सरकारचा गुमास्ता ठेविला. त्यास वसई फत्ते जाहली ते समयीं श्रीमंत ठाणीयास आले. तेव्हां आमचे दोघेजण ब्राम्हण येऊन श्रीमंताचे चरणांजवळ अर्ज केला कीं आम्ही गरीब आमचीं वतनें सरकारीं अनामत ठेविलीं आहेत तीं स्वामींनीं कृपाळू होऊन आमचीं आम्हांस द्यावीं. त्यावरून श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं सांप्रत पुण्यास जावयाची उतावळी आहे. पुढे खासा स्वारी या प्रांतीं होईल तेव्हां मनास आणून तुमचीं वतने तुम्हांस दिली जातील. म्हणून आज्ञा केलीं होती. त्यास श्रीमंत आपासाहेब कैलासवासी जाहले. यामुळें आमचीं वतनें तशींच राहिलीं. त्यास अलीकडे चार पांच वर्षें आम्हीं हुजूर अर्ज करावयासीं येतों. स्वामींनीं कृपाळू होऊन आमचीं वतनें आम्हांस द्यावीं. म्हणून अर्ज केला व येविसीं आम्ही प्रां मजकूरचे पाटील म्हात्रे आणून गांवगंना चौकशी करून जोशी उपाध्ये पुरातन खरे वतनदार होते त्याप्रमाणें कदबे लेहून घेतले आहेत म्हणून विनंति केली. त्याजवरून पळशे व गोवर्धन मजकूर यांचीं वतनें यांस उपभोग करावयासीं आज्ञा केली असे.

देह झाडा बितपशील :-

| | | |
|---|---|---|
| २७ ता तुर्भे | २४ ता ठाणें | पैकीं वजा अमानत वारीस- |
| ३३ ता मालाड | ५ ता घोडबंदर. | दार नाहींत सबब जोशी |
| २४ ता मरोळ | ४ ता धारावी. | उपाध्येपण सरकारी देहे |
| १ को वांदरे. | —— | ........ सुमार :- |
| —— | २३ | १३ ता तुर्भे. |
| ८५ | —— | ८ ता मालाड |
| | १०८ | १४ ता मरोळ. |

| | | |
|---|---|---|
| बाकी निसबत वतनदार देहे-सुमार | | ३ ता ठाणें. |
| १४ ता तुर्भे. | ११ ता ठाणें | —— |
| २५ ता मालाड | ५ ता घोडबंदर | ३८ |
| १० ता मरोळ. | ४ ता धारावी. | |
| १ को वांदरे | —— | |
| —— | २० | |
| ५० | —— | |
| | ७० | |

यांसीं नांवनिशी जोशी, उपाध्ये

रामभट्ट व नागेशभट्ट गांव :–
५ ताा ठाणे कोा मजकूर.
पाखाड्या
१ चरई
१ सिध्देश्वर
१ पांचघर
१ कोलवड
१ हजवड
—
५
गांव निम्में.
५ ताा मरोळ :–
१ मौजे मुलुंड
१ मौजे चांदूर
१ मौजे ठाणें
१ मौजे भांडूप
१ मौजे कान्देरी
—
५
१ मालवडी
६
कृष्ण उपाध्ये, गांव :–
५ ताा मरोळ
१ मौजे व्याहाड
१ मौजे गुणगांव
१ मौजे साई
१ मौजे पसपवली
१ मौजे पवई
—
५
१ मौजे तुळशी ताा मालाड
—
६
शंकरभट्ट
ताा ठाणें गांव :–

विनायक पंडित गांव :–
ताा ठाणें.
१ मौजे चेन्दणी
१ मौजे नवपाडा
१ मौजे कोा ठाणें,
पाखाड्या
१ महागिरी.
१ राहवड.
१ भोगेत.
——
३
गांव निम्मे.
बापूभट्ट
१ मौजे कावसेर ताा ठाणें
गांव १.

केरभट्ट गोर्वधन.
१ मौजे वाडवली ताा ठाणें
गांव १

गोविंदभट्ट गोवर्धन.
ताा ठाणें गांव
१ मौजे वोवळे
१ मौजे चेंने
१ मौजे हेरिवड
—
३

धांगभट्ट.
१ मौजे तुर्भें, कोलशेंत
ताा ठाणें गांव १

माधव जोशी :–
॥ मौजे वरसावें
ताा चेण निम्मे गांव.

१ मौजे बाळखूम
१ मौजे माजिवडें

——

२

ताा घोडबंदर
·।· मौजे काशी
·॥· को मजकूर

——

१

——

१॥

शंकरभट्ट व रामभट्ट

ताा तुर्भे गांव :-

१ मौजे बरेले
१ मौजे वाडवली
१ मौजे देवनरें
१ मौजे अणीक
१ मौजे वाणवू

——

५

१ मौजे माणखूर्द
१ मौजे मांडाळे
१ १ को तुर्भे
१ मौजे नानाळें
१ मौजे नारिवली

——

५

—

१०

दामुलजोशी यांचा आईकडील आजा नारायण नाईक निपुत्रिक याणें लेकीचे वंशास दामुल जोशी यासी दिले :-

गांव :-
·॥· मौजे वरसावें ताा ठाणें

१ ताा घोडबंदर
·॥· मौजे काशी
·॥· को मजकूर

—

१

—

१॥

पोसम्भट व शामभट्ट
१ मौजे चेंबूर ताा तुर्भे गांव १.
गोपाळभट्ट व बापूभट्ट
१ मौजे माहूल ताा तुर्भे गांव १.
शिवराम जोशी गांव :-
१ मौजे मिरें ताा घोडबंदर
१ मौजे दहींस ताा मालाड

—

२

धाकं भट्ट
मौजे वेसावें ताा मालाड
·॥· कालवड गांव.
बेंडफाटक. गांव :-
२ ताा मालाड.
१ मौजे आकसें
१ मौजे मरसें

—

२

विठ्ठल नाईक याचा पुत्र
वेठनाईक ताा मालाड. गांव :—
१ मौजे कान्दवली
१ मौजे मालवणी
१ दारवली
१ मौजे चारखोप

—

४

गोविंद नाईक व जीवननाईक
कावळे वामन नाईक गांव :-
२ ताा तुर्भे.
१ मौजे आंभेरी
१ मौजे जुहूं

—

२

४ ता धारावी.
१ मौजे उतन
१ मौजे गोराई
१ मौजे मनोरी
१ मौजे डोंगरी
—
४
—
४ रामनाईक गोवर्धन
५ ता मालाड गांव :–
१ मौजे सिंदवली
१ मौजे हेरीवली
१ मौजे मागाठणें
१ मौजे कणेरी
१ मौजे एकसर
——
५
रणेसोड नाईक बस्ती वसई
ता घोडबंदर गांव,
१ मौजे भाइंदर
१ मौजे मुर्धे
——
२

२१॥ ता मालाड
१ को मालाड
१ मौजे वलनई
१ दिंडोसी
१ मौजे कुरार
१ मौजे चिंचोली
१ मौजे गोरेगांव
१ मौजे आरे
१ मौजे वेसारें
१ मौजे पहाडी
१ मौजे मोगरे
१ मौजे माजास
॥ मौजे वेसावें
खेरीज कालवड निम्मे
——
११॥
१ को वान्दरें व दांडें
——
१४॥

येणेंप्रमाणें असामी वीस यांस देहे बाहात्तर पैकीं सत्तर गांव व पाखाड्यांपैकीं दोन गांव यांचीं वतनें यांस द्यावयाचीं करार केलीं असत. तर जोशी उपाध्येपण फिरंगी यांचे अमलांत सुदामत चालत होतें. त्याची चौकशी करून पूर्वी चालत आल्याप्रमाणें हल्लीं ईा छ १५ मोहरमापासून सदहू असामींचें जोशी उपाध्येपण चालवणें. सदहू वतनसंबंधें पळशे व गोवर्धन जोशी उपाध्ये यांजकडे सरकारची नजर करार केली रूपये २००१ यासीं मुदती

१००० सालमजकुरीं अखेर सालीं घेणें.

१००१ पेस्तर सालीं सन खमसैनांत अखेर सालीं घेणें.

——
२००१

येणेंप्रमाणें दोन हजार एक रुपये करार केला असे. सदर्हू मुदतीप्रमाणें वसूल घेणें. याखेरीज अडतीस गांव आहेत. त्यांस वारिसदार कोणी नाहीं. सबब जोशी व उपाध्येपण सरकारांत ठेविलें असे. तरी सरकारचे गुमास्ते ठेऊन जोशी उपाध्येपण चालविणें. छ ६ मोहरम. बहुत काय लिहिणें. [ शिक्का- लेखन सीमा ]

~~~~~~~~~~~~~~~~~~~~~

संजीवन, व. २, अं. ११, फेब्रुवारी १९२४, पृ. ३२५-३९.

१७५० इ. स. पूर्व ] (-४६०-)

श्रीशंकर

श्रीमंत माहाराज राजेश्री छत्रपती माहाराजांचे सेवेसी.

आज्ञाधारक रघोजी भोसले सेनासाहेब सुभा दंडवत विनंती विज्ञापन्हा ऐसीजे. महाराजांचा निरोप घेऊन स्वार जालो ते मजल दर मजल नागपूर दाखल जालो. तेथे चौ मासा राहून पुढे स्वारीस निघालो तो मागाहून आज्ञापत्र सादर जाले की तुम्ही ढाका बंगाला सर करून त्या मुलखाचे कारभार घेऊन पाठवून व जागजाग पुंडपालेगार आहेत त्यास परभवाते पावऊन आपली ठानी बसवून. यावरून महाराजाचे आज्ञापत्र मस्तकी वंदून सभागमे फौज वीस हजार २०,००० व तोफा सुमारे ३०० तीनसे व पावण्यादे सुमार पचेवीस हजार २५,००० येनप्रमाम सरजाज घेऊन बगालियात चालिलो. तो पज्याब्याला जाट मधेच उभा राहिला. तो आडवा देऊन झुंजलो व तो तीन महिने जुजला. त्यास किल्याचा आसरा व आम्ही उघडे. आणि जुझता माहाराजाचे पुनेप्रतापेकडून जै आला. जाट पलून झाडीत गेला. किला सर करून माहाराजाचा झेडा लावून द्वाही माहाराजाची फिरावून तेथ हजार राऊत व प्यादे दोन हजार ऐसे किल्याचे बदोबस्तीस ठेऊन किल्यातील ऐवज नेमणुक सरकारात आली. बिा

| | |
|---|---|
| १ पलंग खासा जडावाचा | नख्त मोहोरा सुमार १००० व |
| ९ कडी जडावाची | रूपये वीस हजार २०,००० |
| ११ कड्या जडाव्याच्या | घोडे १०० |
| | हती २५ |

येनप्रमान लूट सरकारात आली त्यापैकी माहाराजास नजर बिा

| | | | |
|---|---|---|---|
| १ पलंग | १ कडी जडावाची | व | कडी ५ |
| घोडे १५ | हत्ती ५ | | मोहोरा ५०० |

येनप्रमान पाठविले असे नजरेस आलियावरि याचे उत्तर पाठवन. येथून पुढें जे होईल ते सेवेसी लेहून पाठऊ. बहुत काय लिा. हे विज्ञापन्हा.

~~~~~~~~~~~~~~~~~~~~~

चित्रमयजगत, व. १, अं. ५, मे १९१०. पृ. ७०

१७५० इ. स. पूर्व ] (–४६१–)

श्रीशंकर

श्रीमंत माहाराज राजेश्री छत्रपती माहाराजाचे सेवेसी

आज्ञाधारक रघोजी भोसले सेनासाहेब सुभा प्रात टाका बगाला सीरसाष्टाग दडवत विनती विज्ञापन्हा ऐसीजे. माहाराजे आज्ञापत्र सादर केले की ताब्रवर जाऊन तब्री पोहचाऊन आपली ठानी बसवन त्यासी आज्ञाप्रमान आज्ञा मस्तकी वदून मजल दर मजल उब्रावतीस जाऊन त्यास सागून पाठविले की किला खाली करून देनं. त्याने प्रतिउत्तर केले की तुम्हाजवल दारूगोला नसला तर आम्हापासून घेऊन जाने. मर्द सीपाई असला तर चालून येन. तुमच्या आमच्या जुंझिया जालियावर ज्यासी महादेव येश देईल त्याने ध्यावे. ऐसा स्पस्ट जाबसाल आलें. त्या उपरातीक माहाराजाचे नाव घेऊन मजल दर मजल किल्यानजीक ती कोसावर मुकाम केला. तो त्यान दोन तीन तोफा डागल्या. तोफगोळे येऊन लस्करात पडले. तेंनेकडून लस्करचा पना न जाला. तेथून कुच करून किल्यानजीक एका कोसावर उतरून तेच दिवसी हला केली. ते आपले लोक जाऊन खदक घेतला. तो किल्यावरून मार भारी जाला. तो माहाराजाचे पुनेप्रतापे आपनाकडील कोन्ही जाया जाले नाही. किल्यावरील येक गोलदाज जो करता पुरुश होता त्यास गोल्या लागून हार जाला. त्याचे तो आम्हाकडील लोकानी जाऊन दरवाजा घेतला ( अपूर्ण )

चित्रमयजगत्, व. १, अं. ५, मे १९१०, पृ. ७०.

५ जानेवारी १७५० ] (–४६२–) [ ७ सफर, खमसेन मया अलफ.

श्री

[ शिक्का ][1]

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान ताा मौजे मोह पाा नासीक सुा खुमैस मया व अलफ. मौजे मजकूर चौथाई व सरदेशमुखी पेशजीपासून मोरो मल्हार यांस इनाम आहे. सनदा पत्र सादर आहे. तरी तुम्ही रुजू होऊन सुदाम याजकडे इनाम चालत आल्यः प्रो चालवणे. उजूर न करणे. जाणिजे. छ ७ सफर. [ शिक्का– लेखन सीमा ]

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १–२, पृ. १०७.

१. शिक्का– श्री : राजा शाहुनरप : तिहर्ष नीधान बा : ळाजी बाजीराव : मुख्य प्रधा : न ( उलटा ).

१ मार्च १७५० ] (–४६३–) [ फाल्गुन शुद्ध ५ गुरुवार, रा. श. ७६.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७६ शुक्लनाम संवत्सरे फाल्गूण शुध पंचमी गुरुवासरे क्षेत्रियकुलवंतस श्री राजाराम छत्रपति यांणी समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराउ पंडित अमात्य हुकमतपन्हा व राजश्री शिवराम पंडित छंदोग अमात्य मुतालीक यासी आज्ञा केली ऐसी जे

निळो सोनदेव यांसी तीर्थस्वरूप कैलासवासी थोरले शिवाजी महाराज यांणी राज्य संपादन केलें. तें समयीं वतनी मजमु सांगोन त्यासी सर्व लिहिण्याचें यख्त्यार करून दिल्हा. महाराजांनीं व त्यांणीं बहुत प्रेत्नें किले कोट जुने होते त्याचा पुस्तपन्हा करून नवे किले बांधिले. उपरांत विज्यापूर, भागानगर दोलताबादच्या पातशाहांनीं फौजा रवाना केल्या. त्यांसी लढाया देऊन पराभव केले. पुढें दिल्लीहून सुभे आले तेहि पराभविले. जेसिंग यांणीं थोरले महाराज व संभाजी महाराज दिल्लीस नेलें. ते समयीं निळो सोनदेव यांणी राज्य रक्षिलें. दिल्लीहून आल्यावर निळो सोनदेव मृत्यू पावले. नंतर राज्याभिषेक जाला. त्याजवर तुमचे बाप रामचंद्र निळकंठ यासीं मजमूचे दरख दिल्हे. तीर्थस्वरूप कैलासवासी संभाजी राजे व शाहूराजे पातशाहास हस्तगत जाले. तीर्थस्वरूप कैलासवासी राजारामसाहेब चंजीस गेले. मागें पातशाहासी रामचंद्रपंतांनीं लढाया देऊन राज्य संरक्षिलें. तीर्थस्वरूप महाराज मातुश्री आईसाहेब व आमचे तीर्थरूप शिवाजी महाराज व तीर्थस्वरूप संभाजी महाराज रांगणियाचे मुलकीं असतां तीर्थस्वरूप कैलासवासी शाहूमहाराज दिल्लीहून आले. ते समयीं त्यासी अनकूल न व्हावें म्हणोन मातुश्री साहेबी व तीर्थरूपांनीं रामचंद्रपंताजवळ शफत घेतली. यामुळें शाहूमहाराज सातारियास राहिले.। आमचे तीर्थरूप व चुलते पनाळियास राहिले. त्याजवरून शाहूमहाराज आबासाहेब यांणीं तुमचें अमात्यपद दुसरियास दिल्हे. आमच्या तीर्थरूपांस आमच्या चुलत्यांनीं नजरबंद ठेविलें. उपरांत तुम्ही कीलक संवत्सरीं सातारियासी येतांच तुमचें अमात्यपद व दरख तुम्हांस दिल्हे. याजकरितां आबासाहेब यांणी वारणेचा तह करून तुम्हांस घेऊन गेल. पनाळियास तीर्थरूप नजरबंद असतां आमचा जन्म जाला. ते काळीं वडिलांनीं आम्हांस शिवराम पंडित यांचे स्वाधीन केलें. त्यांणी आपली स्त्री सौा दुर्गाबाई याजवळ बावडियास ठेविलें. त्यांणी पंधरा सोळा वर्षे पुत्रापेक्षांहीं लोभ करून संगोपन केलें. ते वेळेस मातुश्रीसाहेबांनीं राजश्री भगवंतराव हरी दफ्तरदार यांस तीर्थस्वरूप आबासाहेब यांच्या अनुमतें नेहमीं बावडियास जाऊन साहेबांस व माहाराजांस हरवख्त वर्तमान कळवीत आले. तेथें बोभाट होऊं लागला. यांजकरितां पानगांवीं पोहोंचविलें. तेथें व तुळजापुरीं हा कालपर्यन्त अज्ञातवास कर्मिला. हल्ली आबासाहेब यांणी सातारियाचे मुकामीं आणून प्रकट करावयासी तुम्हांस शिराळियाहून आणिलें. तों त्यांचे शरीरीं स्वस्थ नाहीं. आरोग्यता

जालियावर प्रकट करावें. इतकियांत कैलासवासी जाला. हल्लीं मातुश्री साहेबीं राजश्री बाळाजी पंडित प्रधान व गोविंद खंडेराव चिटणीस यांसी आज्ञा करून आम्हांस आणून सिंव्हासनारूढ करून लग्न केलें. तुमचे दरख पूर्ववत तुम्हांस द्यावे म्हणोन आज्ञा जाली. त्याजवरून पेशजीचे दरखदारांकडून दूर करून तुमचें अमात्यपद व सर्व लिहिण्याचे दरख करार करून दिल्हे. याची तैनात सालीना बो मानी होन पातशाही :—

१२००० खुद्द तुम्हांस अमात्यपद
६००० राजश्री शिवराम पंडित यांसी छंदोग अमात्य मुतालीक.
५००० राजश्री बाबूराव शिवराम यांसी फडनीस.
२००० राजश्री नारायण शिवराम यांसी दफ्तरदारी-

२५०००

एकूण पंचवीस हजार होन जातीस तैनात करार केली असे. खेरीज तुम्हांस जिल्हा व पूर्वील वतनें व इनाम गांव व बाग शेऱ्या व कुरणें करार करून दिल्हे जातील. व संपूर्ण राज्यांतील मजमू व फडणिशा व दप्तरच्या व किल्लेहायच्या सबनिशा याप्रो वतनी दरख पेशजीप्रो तुह्मांस करार करून दिल्हे असेत. पहिले दप्तरदार व मदतनीस तुह्मीं आपले निसबतीस ठेविले आहेत त्यांची तहगिरी बदली तुम्हांकडे. याखेरीज लिहिण्यास मदतनीस लागतील ते ठेवणें. त्याची तैनात हुजुरून पावेल. ठाई ठाई लिहिण्याचे दरख लिहितात त्याप्रो होणार नाहीं. सर्व लिहिणें तुमचें तुम्हीं करीत जाणें. येविशीं आबासाहेबीं तुम्हांस इमानपत्र पाठविलें आहे. सदर्हूप्रों तुमचे दरख तुम्हांकडे वतनी पाठविले जातील. यास आम्ही अगर आमचे वंसीचे दिवकत करणार नाहीत. लिा प्रों तुमची तैनात व सरंजाम जिल्हा व वतनें चालवावयास अंतर करील, त्यास श्री शंभुमहादेव व आंबाबाईची शफत असे. बहूत लिहिणें तरी सुज्ञ असा.

ग्रंथमाला, क्र-१२०, व. १०, अं. १२, मार्च १९०४, पृ. ५-७.

२१ मार्च १७५०] (-४६४-) २३ रबिलाखर, खमसैन मया अलफ

श्री

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री नारो आपाजी गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सुा खमसैन मया व अलफ. राजश्री विठोबा गोसावी परंपरा श्री-वास्तव्य काा सासवड यांणी हुजूर येऊन विदित केले की काा मजकुरी श्रीची समाधी आहे. त्यास नैवेद्य व नंदादीपाची मोईन व इनाम सेत कास मण ·।४॥· साडे नव मण वगैरे पुरातन पासून आहे. त्याची राजपत्रे सादर आहेत. बीाा

मुजेरी पैकीं जमीन देवा भोवताली
  ८४॥. थळ भाडले
  ।. किता जमीन भागीरथी पावेतो
  ।४॥.

जकात व बाजारपैकी दररोज मोईन सालाबादे
तेल दिवाबतीस जोरी कैली नैवद्य
वजन टकबंदी
८८॥. ८८.॥.

येणे प्रो थळ कास साडे नव मण व दररोज तेल नंदादीपास अदसर व जांरी नैवेद्यास अधोली व याखेरीज श्रीच्या मोहछवाकारणे दरसाल नक्त रुपये २ व सेरी पैकी जोरीं बारुले कैली ८२ दोन मण याप्रो चालत आले आहे. त्यास काा मजकूरचा अमल खासगीकडे होता तो हाली सरकारात जाला आहे. या करिता सरकारचे पत्र करून द्यावे म्हणोन विदित केले. त्याजवरून राजपत्र व राजश्री देवराव मेघशाम याचे पत्रावरून मनास आणून हे पत्र सादर केले असे. तरी सदरहुप्रमाणे इनाम व मोईन राजपत्राची व देवराव मेघशाम यांचे पत्राप्रमाणे श्री कडे चालत आल्याप्रमाणे सुरळीत चालवणे.; या पत्राची प्रती लिहून घेऊन मुख्य पत्र याजवळ भोगवटियास परतोन देणे. जाणिजे. छ २३ रबिलावर, बहुत काय लिहिणे. [शिक्का–'लेखन–सीमा']

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, स्वी. ग्रं. क्र. १७, पृ. १६३.

१७५० इ. स. सुमार ] (–४६५–)

रामशास्त्रि पिते विश्वनाथ भट्ट अजे बालकृष्ण भट्ट पणजे नागेश भट्ट चुलते विनायकपंत व दादंबाजि बंधु अनंत भट्ट मातोश्रि पार्वति बाई ब्राम्हण ऋग्वेदी प्रभवणे उपनाव गव माहोलिकर जोशि. अपल्या वंशिचे येतील ते तुम्हास पुजितील. नासिकचे तीर्थ पुरोहित वेदमूर्ति गंगाधरभट वारे. हे लिहले. सही

भा. इ. सं. मं. त्रै., व. २१, अं १, पृ. १७.

१७५० इ. स. नंतर ] (–४६६–)

श्री

राजश्रियां विराजित राजमान्य राजश्री बलवंतराव स्वामी गोसांवी यासि

पो सखाराम भगवंत सां नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन केले पाहिजे विशेष. करोलाचा मजकूर अमृतरायाकडे द्यावयाचा तुम्ही पहिले लिहिला होता. त्यास अशा प्रकारे तों गणती किंमतवार द्यावी आणि हुजरातीस असावे. चाकरी अमृतरायाकडे अगर हरकोणाकडे... करावे व तुम्हीहि रदबदली... वट पावेतो श्रीमंतानी बोदिले. तरी सुखरूप जसी आज्ञा करितील तसे मान्य करावें. मग अमृतरायाचेच अर्जव करावें. त्याचा गुंता काये. दुसरे

वर्तमान यैकतों की फिरगोजी आपला हिसेब कितेब निरालाच सरकारात करणार व सेरखानास कारभारातून काढणार. यैशास निराले हिसेब तरी पहिलेपासून आहेत. गुंता काये आहे. यैंदा त्याच्या मनात अवजें पाहावयाचे आसिले तरी अमची काही गुंजावीस नाही. सारे अवजें मिलोन गुदस्ता कारकुनींचे पावणे पाचसे रुो अवज्यांवरी आहेत ते खेरीज करून अठसे रुो गुंजावीस आहे. त्याखेरीज पैसा नाही. यैशास येदांच्या सालापासूस सरकारची कारकुनी देतात. तीहि श्रीमंताचे विचारे जाली की न द्यावी तरी त्यास पुसोन आज्ञा करितील. त्याप्रो करणे. अठसे रुा गुंजावीस आहे ते न ठेवितां ज्याचा रुपया त्यास श्रीमंताचे रूबरू समजाऊन देणे म्हणजे अवघा भ्रम फिटतो व करोलाची व खावदाची दामीलवारी वारते. यात आम्हास संतोष फार आहे. अलस कराल तरी अमची शफत आहे. सेरखानाने कारभार कऱ्याचा करावा. ज्याचा हिसेब त्यास समजाऊन द्यावा. आपली कारकुनी करारप्रो काढून घ्यावी. त्याच्या चितास येईल तसे करितील. पुर्वले तरी राहातील नाही तरी जातीऌ. परंतु येक वेल खामखाहा प्रो करून भ्रम फेडून टाकणे. बहुताचा संशय वारेल यैसे आहे. जरूर जरूर करणें. नालबंदी समजाविसीचे रुो त्याचे पदरी घालावें. दरबारचा कारभार जावे यावे हे सेरखान करितो. ते मात्र त्याचे मंगलसूत्र राखावें. त्याचे हातून सा. . बा खावदानी घ्यावा. इतकें मात्र श्रीमंतांनीं केले तरी करावे. नाहीं तरी जसी मर्जी असल तसें करावे. खावदास माझे चालवणे जरूर आहे. कारकुनीचा यैवज येखाद्या गरीबाचा देवितात. तेथें माझे चालवितील यांत गुता नाही. यासाठी ज्याचा अवजो.. ... त्यास किमत वर डेन्याज ... ... येईल तेथे सांगावी. सेरखानाचे कराभारात मात्र थोंडेसे स्वरूप राखावें ह्या च्यारी गोष्टी आमच्या मते कराव्या यैसे आहे. यांत जसी खावदाची मर्जी तुम्हांस अढलेल तैसें करणें. तटी लाविलियास तूर्त हिमायेत दिसेल आणि गरिबाची फजिती होईल. यासाठी विस्तारे लिहिले आहे. जसी आज्ञा करितील तसे करणें. दुराग्रह न करणें. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १–२, पृ. ९०–९१.

इ. १७५० नंतरचे ] (– ४६७ –)

राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री गोविंदराव गोसावी यांशीं स्नेहपूर्वक यमाजी शीवदेव विनंती. येथीऌ कुशल जाणोन स्वकीय लेखन केलें पाहिजे. विशेष कालीं छ २५ साबानीं श्रीमंत, राजश्री प्रतिनिधी यांचे व श्रीमंत मातुश्रीचें दर्शन घेऊन वाड्यांत येऊन राहिले. आम्हीही समागमें होतों. आम्हांस आपले वाड्यांत राहणें म्हणोन आज्ञा केली. त्याजवरून राहिलों. आपल्यास वर्तमान कळावें म्हणोन लिहिलें आहे. तुम्ही पत्र पाठविलें तें पावोन परम समाधान झालें, तें पत्रीं लिहितां येत नाहीं. भेट व्हावी हा हेतू चित्तांत उत्पन्न होऊन आपल्या मनांत...... पत्रीं

लिहिला पाहिजे. सारांश गोष्टीनें... अंतूत विपर्यास येता तोच प्रकार घडोन आलो नाहीं. तरी तुमच्या आमच्या स्नेहांत प्रीतीअंतर पडावें असें नव्हते. झाल्या गोष्टी त्या कालानुरूप घडोन आल्या. त्यांचे स्मरण ही करू नये. पुढें पूर्ववतप्रमाणें प्रीतीची वृद्धि करणें विहित आहे... लोभ असो दीजे हे विनंती.

चां का. प्रभूंच्या इति. साधनें, व. १, अं. ५, डिसेंबर १८८१, पृ. ४.

## (–४६८–)

राजश्री वणगपाळ नाईक देशमुख परगणे फलटण आपला घोडा मनोहार आडावला चागफणी खाई. मग आपण पदाजी पुजारी यासी तसदी केली की आपला घोडा आरा केला म्हंजे देव जे सांगेल ते करू. नाहींतर तुमचा मुलाजा होणार नाहीं. मग पदाजी पुजारी यानी देवास स्तव केला. मग देवानी आज्ञा केली की आपला मंडप येके रातीतुन बांधील तर आपण घोडा उठऊ. मग पदाजी पुजारी यानी आपणास सांगीतले. मध आपण पंधरा दिवस मुदत मागीतली. मग घोडा उठोन उभा राहिला. मग पंधरा रोजा मंडप तयार केला. मग आपण पुजारी यासी मेहेरबान जाले. मग तीन वतने दीली व कावडी नवसाच्या...दील्या व...ना...ला ना.. म...आप होइल बानी ..ल वा वे न मानवणे—

भा. इ. सं. मं. त्रै., व. १९, अं. ३, पृ, ८९.

## (–४६९–)

श्रीराम

देशमूख देसपांडे वगैरे ता॥ मजकूर यांस

या विद्यमाने बकाजी बिन गोमाजी चौधरी चौगुला मौजे आरवी ता॥ खेडेबारे यासि करून दिल्हे गोतपत्र ऐसे जे. तुवां कसबे मजकुरास येऊन गोतास विदित केले की पेसजी मुलुक वैरान झाला ते समई आपण पोट भरावयास पर मुलुकास गेलो. तेव्हां कोंकणांत सूरगडाखाले मौजे पुंगावीं राहात होतों. त्यास किला शामलाने घेतला. ते समई सेलकीयाबा गावीचा बंद धरिला. ते समई आपली स्त्री व दोन्ही मुलें व आपण शामलास हस्तगत जालो. तेव्हां बलात्कार करून चौघासहि बाटविले. राजपुरीस कांहीं येक दिवस होतो. त्याउपरी ... ... शास आलो. आपणावरी जुलुम जाहाला आहे तरी आपण सुध होऊन गोतात पडे तो अर्थ केला पाहिजे म्हणून विदित केले. त्याजवरून देशमूख व देशपांडे व मोकदा मौजे अर्वी ता॥ मजकूर याणी राजश्री पंतसचीव यासी कसबे खेड ता॥ मजकूर येथील मुकामी अर्ज

केला कीं चौगुला मजकूर पेसजी सुरगडाखाले पुगावी होता. सेलकियाच्या कथल्या बाबत शामलनें सुरगड घेऊन गावीचा बंद धरिला. तेव्हां हि चौघेंजण सांपडली. बलात्कार करून बाटवीली. काही येक दिवस राजपुरीस होता. मुलुकास कौल जालियावरी देशास आला. हा बळात्काराचा प्रसंग आहे. याजवरी कृपालु होऊन याची गोताई होऊन सुध होय तो अर्थ करावया स्वामी खावंद आहेत म्हणून विनंती केली. तेव्हां त्याणी आज्ञा केला की या कार्यास गोताचे समत पाहिजे. हुजरून चौ माहालास पत्रे पाठवू. त्याची समते येतील. त्यासारिखा विचार करणें तो केला जाईल. तुम्हीहि माहालोमाहालास आपले कागद पाठवणे. जाब येतील ते हुजर पाठविणे म्हणून आज्ञा करून हुजूरची पत्रे दिल्ही. ते व देशमुख देशपांडे ता खेडेबारे याणी आपले कागद देशकास पाठविलें बिा.

| | | |
|---|---|---|
| ता कार्यातमावल | ता मोसेखोरे | गुजनमावल |
| १ | १ | १ |
| ता कानदखोरे | | |
| १ ... | ... ... | ... |

मजकुरास माहाला माहालास पाठविली. त्याची प्रतिउत्तरे आलीं की हा जुलमाचा प्रसंग आहे. शास्त्रधारें सुध करून गोताईचा येक दिवस नेमून लेहून पाठविले पाहिजेत. गोतांचे लेकरू आहे. गोतांत घेऊ म्हणून जाब आले. ते कागद व देशमुख देशपांडे ता मजकूर याणीं विनंतीपत्र लेहून आशाड सुध पंचमीचा दिवस नेमून राजश्री पंतसचीव यांजकडे पाठविली. तेथून छ १ मोहरमीचे पत्र सादर जाले की आशाड सुध पंचमीस गोताईचा दिवस करार केला आहे. रा राघो सिवदेऊ मजमदार ता मजकूर माहाली आहेत-... ... ...व हुजरून मानाजी माडरा याचा व याचा शास्त्रार्थ कलला पाहिजे. याजकरितां जोतिसी ता मजकूर यासी जमा करून हे वर्तमान सांगोन शास्त्रविध पुसिला. तेव्हां त्याच्या विचारें देशमूख देसपाडे ता मजकूर याणी रा रघुनाथभट ठकार वास्तव्य कसबे सासवड यासी पत्र लेहून महादेवभट ठकार जोतिसी ता मजकूर पाठविलें. तेव्हां त्याणी शास्त्रार्थ मनास आणून पत्र पाठविलें व प्रायश्चीत–विधीची यादी नेमून दिल्ही. माहालोमाहालाची समताची पत्रे आली होती. ते व देशमूख देशपाडे ता मजकूर याणी विनंतीपत्र लेहून आशाड सुध पंचमीस गोताईचा दिवस नेमून राजश्री पंतसचीव याजकडे पत्रें पाठविली. तेथून छ १ मोहरमीचे आज्ञापत्र सादर जाले की आशाड सुध पंचमीस गोताईचा दिवस करार केला असे. प्रायश्चित समध्ये बकाजी मजकुराकडे सेरणी रुपये संभर करार केलें असेत. तरी रा राघो सिवदेऊ मजमदार ता मजकूर माहाली आहेत व हुजरून मानाजी माडरा दिल्हे दिा स्वारि पाठविला आहे. याचे विद्यमाने श्रीराजेश्वरी प्रायश्चीतविध करून सुध करणे. ते आज्ञेप्रमाणें जोतिसी ठकार ता मजकूर याणी चौगुले मजकुरास श्री राजेस्वरास नेऊन यथाविध हा समत रा रघुनाथभट ठकार यथाशस्त (शास्त्र) प्रमाणें प्रायस्चीत विध करून

सुध केले. पचमीचे पत्र होते. त्यास पर्जन्या ....... चार दिवस आणीक लागले. आशाड सुध त्रयोदसीस मौजे अरवीस समस्त गोत जमा होऊन अवघ्या गोताचे मते सिधांत जाला की चौगुले मजकुरावरी जुलमाचा प्रसंग जाला आहे. हा गरीब अनाथ बेमवसर शास्त्राधारें हि निर्वाह त्यास येविसी राजश्री पंतसचीव स्वामीची पत्रे व किले सिहगडचें पत्र अलाहिदा आहेत. ते समस्त गोताने वाचून पाहून सर्वांच्या विचारे जाले की बकाजी चौगुला यास सहपरिवारे सुध करून गोतात घेयाचे यैसा निर्वाह जाला. त्याजवरून तुजला सुध करून गोतात घेतलें असे. याउपरी कोण्ही तुजला प्रतिवायें लावावा यैसे नाही. जो कोण्ही कथला करील तो गोताचा आन्याई. हे गोतपत्र करून दिल्हे. सही.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. १-२, पृ. २४ ते २६.

## -( -४७० )-

[ शिका व फारसी मजकुर ]

चकनामा जमीन दरवजे मदत मा अश फजालतमाआब काजी शमशादीन कसबे उबरें बमोजिब परवाना इनामदार दर सवाद मौजे गोलेगो ता हवेली सा जुन्नर सुा सन ( २० १.. ) बमोजिब परवाना नवाब मुस्तताब मांला यंकाबे...दाये गाजी... जमीन अमताबा सनवाती येक जिराती खाडीज जमा मौजे मजकुरी जमीन येक चावर तुम्हास इमान दीधला असे. चक बितपसील

| | |
|---|---|
| ...मा टीके अहमद शेटी | कटिक जाते खानी टिके |
| जमीन बिघे ८ | तीन ३ |
| अवडावे टिके सेजार उतरेस मुला सुलतान जमीन. | मोकरा जमीन नीम चावर ·।।·. |

या सेताची हदबुद्ध पुर्वेस सेत इनाम मिय्या फतेमहमद इनामदार व नाला असे दक्षिणेस...बुजी पाटल सेत अहमद पोटी असे.

पच्चेमेस गणेश डोंगराची वाट असे. उतरेस सेजार मुला सुलतान इनामदार असे. ते जमिन सेत मोकरर करून दीधले असे.

| | |
|---|---|
| दाा गोमाई व हरी त्री बक देसपाडिये पाा जुनर | श्री प्रल्हाद अनत |
| दाा सखोजी लिलोजी हांडे देसमुख पाा जुनर | अजहती देसपाडिये कुलकर्ण मौजे मजकुर |

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १-४, पृ. १६४.

## ( -४७१- )

श्रीराम :

छत्रपती

राजश्री गोपाल शंकर गोसावी यासी

छ अखंडीत लक्षुमी अलंकृत सदा प्रसन्न राजमान्ये जो नेताजी राजे व नरहर सींगजी राजे पालकर रामराम विनंती उपरी उपरी येथील क्षेम जाणून गोसावी यांनीं स्वकीय कुशल निरंतर लिहिले पाहिंजे विशेष. मौजे तांदली प्रां करडें हा गांव आपला वतनी आहे....गये पासून पिढी दर पिढी आपली वतनाची नीव चालत आली आहे. त्यास पूर्वी पातशहा अहमदनगरी होते. त्या समयातला कलसकर मुसलमान होऊन अदालतींत फिर्याद जाले. तेव्हां पातशहांनी अदालत करून देशमुख व देशपांडीये व जव्हायेरचे गोत व पांढरी हुजुर बोलावून हक ईनसाब केला तेव्हां वतन पालकरांचे साबुत जालें. कलसकर खोटे जालें. त्यापासून मुचलका घेतला जे या उपरी आपण वतनाचें नांव घेऊं तर गर्दन मारले जाऊं. ऐसा मुचलन घेऊन कचेरींतून काढून दिधलें. त्या उपरी महाराज राजेश्री साहेबाजवलंहि फिर्याद जाले होते. त्यांनींहि वतनाची कैफियत मनास आणितां कलसकर खोटे जाले व वतन पालकरांचे साबूत जाले. त्यास आजीपरीयत आपली वतनाची नीव भोगवटा चालत आला आहे. हलीं मागती कलसकर गावावर येऊन कैफीयतीच्या गोष्टी सांगतात. आपण तो याप्रांते सेवेमुले दूर राहिलो. हे वतन महाराजाचे आहे आणि आपण पुरातन सेवक स्वराज्यातीलच आहों. वडिला वडिली सेवा केली आहे. सांप्रत प्रसंगी आपण आहेत. हरएक विशई साहेता करून वतनाची नीव चालविली पाहिंजे. भोगवटा वतनाचा चालत आला आहे. हेच आपली सनद आहे. हे गोष्टीची तहकीकांत आपणहि परस्परे षाहिली पाहिजे. ते कोणे सनदेनें कैफीयतीच्या गोष्टी सांगतात हें मनास आणिले पाहिंजे. विशेष काय लिहिणें. हे विनंती.

~~~~~~~~~~~~

भा. इ. सं मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३२८-३२९.

## (-४७२-)

[ फारसी मजकूर ]

...त जबानी देशमुखानीं व नाईकवाडियानी व मोकदमानी पाा अहंमदाबाद उरूफ पाटोदे सुाा इहिंदे......साहेबी देशपाडेपण......याबदल हुजुरू बोलाविले ......जुरुन मदारूलमाहामी हुमल-तुल-मुल्की वजारतपनाहः दि...ये सादर जाहाला आहे जे: देसपाडे ताा पाटोदे याची हकीकत...आहे. हे कुल ईाा पासून अजी
~~~~~~~~~~~~

ता इलाही साहीवालाई जैसी असेन तैसी लेहोन देणे म्हणौनु हुकूम, तरी साहेबा सलामत हकीकत इहातिदा पासून ऐसी आहे. मुलपुरुष ता पाटोदे येथील देसपाडेपण बयाजी नरसिंह यासी दोनी औरता

पहिली औरत राजाई तिची संतती    दुसरी औरत बालाई तिची संतती
एक फर्जद तिमाजी बायदेऊ    लेक १ कृष्णाजी...लेकी बायदेऊ

बयाजी नरसिंह मयत जाहालीयावरी तिमाजी बायदेऊ...करितां कितेक मुदती जाहाली......ला मुलुख तमाम खराब व वैरान जाहाला. बहुत लोक मेले. (दुक) लामध्यें दौलताबादेस फतेखान फर्जद मलिक अंबर राजे चालावित असतां मुरूरखान पाा मजकूर येउनु तिमाजी बायदेऊ देसपाडे पागणाचें कामाबदल धरून दौलताबादेस नेला. मारो लागले. तिमाजी बायदेऊ यास मार करितां तीमाजी बायदेऊ मयत जाहाला. गावी माणसे होती ते कृष्णाजी बायदेऊ यास तारा निवेच ना. दुकाल थोर काल मोठा. मग कृष्णाजी बायदेऊ याची आई बालाई व बहीण अंबाई व खासा ... मौजे चाटोरी पाा गुलसनाबाद तेथील कुलकरणी का... त ते सोयरे होती म्हणौनु कृष्णाजी बायदेऊ तेथे गेला. कृष्णाजीने काय मामला केला तो आपणास ठावका नाही. ते मु... कृष्णाजी बायदेऊ आगरियाकडे काकाजी दतो मोहबत खानाकडे गेला. याकडे काय मामला केला तो आपणाला ठावका नाहीं. त्यावरी मुलकाची अबादानी जाहाली... पाा मजकुरास देसपाडे कोण्ही न होतें. देखौन रंगोजी पटवारी का चाटोरी पाा गुलसनाबाद पैदा जाहाला. यास मिरासदार... पुसों लागले कीं तूं का आला आहेस. त्यास रंगोजीने जबाब दिधला जे निमे देसपाडेगिरी आपणास कृष्णाजी बायदेऊ याणे विकिली आहे. मग लोकानी सोनाजी देसमुख यास पुसिले कीं रंगोजी का आला आहे. तरी सोनाजी देसमुख बोलिला कीं रंगोजी चाटोरीकर म्हणतो कीं आपणास कृष्णाजीने निमे देसपाडेपण विकिले आहे. कृष्णाजी बायदेऊ हि येईलच. अमा कृष्णाजीने निमे देसपाडेपण रंगोजीस विकिले हे आपणास ठावके नाही. यावरी सैद अबदुलवाह याची जागीर तगैर होऊनु मरहूमी कजीलबाशखान यास सन हजार .. पाा माा जागीर जाहाली तेवख्ती कृष्णाजी बायदेऊ अकबराबादेहून आला मरहूमी कजीलबाशखान यापासी बादख्वाह: जाहाला. त्यावरी मरहूमीखान मााइलेने तमाम पाा मजकुरीचे कुलकणि यांस बोलाउनु आणौनु कृष्णाजी बायदेऊ तुमचा देसपाडिया... होये ऐसे पुसतां तमाम रयतानी बोलिले की कृष्णाजी बायद्या आपला देसपाडिया होय. ते वख्ती मगोराम अमीन सुबे दखन तेही मरहुमीखान मााइले पासी आले होते. त्याचे हवाला रंगोजीस व कृष्णाजी बायदेऊ देसपाडे यास केलें कीं हरदो जणाची बरहक मुनसफी मनास आणौनु निवाडा करणें. मग मगोराम येही मुनसफी मनास आणिता कृष्णाजी बायदेऊ यास पुसिले कीं तुवां पैके देऊनु निमे देसपाडेपण विकिले आहे हे खरे. त्यास कृष्णाजी बायद्या बोलिला जे आपणापासून कागद लिहिला घेतला आणि एक रूका दिधला नाहीं. पावलीयाची माझे कबज... ते काढवा. मग

रंगोजीस पावले पैकीयाचे कबज पुसतां कबज नाहीं म्हणौनु बोलिला. यावरून तहकीक जाहाले कीं रंगोजीने पैके दिधले नाहीत. मग रंगोजीस मगोराम अमीन वेही कैद करून कृष्णाजी बायदेऊ याचे देसपाडेपण यास दिधले. कृष्णाजी बायदेऊ याणे सन १०६४ (१६५३–इ. स.) पावेतो देसपांडे चालविले. सन १०६५ (१६५४–५ इ. स.) मध्यें कृष्णाजी बायदेऊ फौत जाहाला. कृष्णाजी बायदेउ फौत जाहालिया-वेरी रंगोजीनें अमीलानि पा मजकूर यासी साजीश करून गंगाई कोम तिमाई बायदेऊ इस दूर करून आपण देसपाडेगिरी पा मो साजीशीच्या बले चालवू लागला. हे हकीकत देशपाडेगिरीची ऐवजाची आहे. रंगोजीने कृष्णाजी बायद्यापासून लेहोन घेतले ते व तमाम कागद साजिशीश...... केलें आहेती ते रद आहे. ती त्याणे कांही एक रूका कृष्णाजीस दिला नाहीं. हाली विसाजीराम कृष्णाजी बायदेऊ याचा फर्जंद हा अफराद देसपाडेगिरीचा वारिसी होय. साहेब आरीफ आहेती. ज्याचे हक त्यास पोहचाविले पाहिजे. वतन तेव्हडे पादशाही आहे. वारीसदार बंदे पादशाही आहेती. जे साहेबास मानेल ते केले पाहिजे. हे हकीकती ऐवजेची आहे. ऐसी वाके इवाजीब होती, ते बंदगीस तहकीक अर्ज केला आहे. लिहिले दिधले असे. रंगोजीपासी कागद आहेती. त्यावरी आपले नागर निशान काही नाही व सोनाजी देशमुख सांगत होता कीं रंगोजीचा भाऊ फतेखानाचा दिवाण होता. आपणहि फतेखानाचे बदी होतो ते बख्तीं आपला नांगर करून...ला आहे. आपण नांगर न करितां तिमाजी बायदेऊ...बंदीखानांत मयत जाहाला. तैसेच आपणांस हि होणार. साहेबी त्याचा आपणास उजूर करितां येत न होतो आपणा देखतां काही...नाही. हे लिहिले तकरीर सही

२

......याची हकीकत करार वाके...खातिरेसी आणून महजर करून दिधला ऐसाजे तिमाजी व कृष्णाजी यावरी वख्त पडला .याबद्दल विसोजीराम यास देसपाडे-पण विकीले. बदल खरिदीखत मजमून ऐसा...१५५९ क्षयनाम संबसरे वैशाख शुध पाडवा (१५४८ ? ६ एप्रिल १७२७) ते दिवसी विसाजीराम ख्वाहरजादे यास तिमाजीं व कृष्णाजी बाय देउ देसपांडिये पा अहमदाबाद उा पाटोदे मुा सन समान सन १०३७ (१६२८ इ. ?) खरदखत लिहून दिधले ऐसे जे. तरफ पाटवदे देसपाडेपण मिरासी दरकुरसी आपली आहे. आपल्या वडिला वडिला पासौन चालत आला आहे. हाली सालमजकुराकरणे परगणीयात... सा पडला व राहूजी गोपीनाथ सबनवीस ... ... हजूर दौलताबादेस जाऊन नफराई पा मजकुरावरी... १००००० एक लाख करून आला. सुरूखान हवालदार याचे नावाचा ( शुका ) आणिला की पैके तहसील करून हजूर दौलताबादेस पा... सुरूखाने सोनाजी देसमुखास व आपणास कैदें... ... करून देणे उगवणी करणे पटी करून तोवरी सोनाजी देसमुखास व आपणास अ... ... स यामधे पाईजजीरीया देऊन ठेविले. यावरी सुरूखाने हमीदखानास फर्माविले की परगणीयात तहसील करणे. हमीदखान

या बराबरी स्वार से एक देऊनु देशमुख देसपाडीयाचे तरफेने .. देऊ मुतालिक देऊन तहसील केली. पाटवदा साउकार ... गावगना तहसील जाली. होन पाऊण लाख बाकी राहिली. होन पंचवीस हजार ते परगणीयात वसूल न होतीं. यावरी सोनाजी देसमुखास व आपणास रोज बरोज मार करीत. घरीं तो बिसात काही खावयास नाही. सुरूखाने हजूर लिहिले. हुजुरून हुकूम आला की देसमुख-देसपाडी-यांस हजूर घेऊन येणे. हजूर गेलियावरी सुटका होणे मुस्कील आहे. काल्या कोटा-मध्ये सडोन मरावे. रोज बरोज हा मार सोसवेना. पैकीयाचा इलाज तरी होता दिसेना. आपणास आणखी कोण्ही सोडविता नाही. जरूर जालेयावरी तुम्हासी हकिकत सांगितली. सदरहू होन पंचवीस हजार... सोनाजी देसमुख होन साडेबारा हजार देई... रा हजार होन आपणास देणे लागले. आपणास द्यावयास नाही. जिवावरी गोष्टी येऊन लागली. जरूर जाले. मग तुमच्यापासी बोलिलो की तुम्हीं आपले बहिणीचे पुत्र, आमचे भाचे व आपणास तरी पुत्रसंतान नाहीं. तुम्हास वारसा पोहचतो. तुम्हास मवसर हि आहे तरी आपणास सदरहू होन देऊन सोडवणे. आपले वतन देसपाडेपण तुम्हास देतो. यावरी तुम्ही बोलिला की आजी काल पडला आहे. वाचा-वयाची मुस्कील येऊन पडली आहे. वतन कोण्हास पाहिजे. यावरी आपण तुमची मिनतवारी केली कीं हे वतन देसपाडेपण तुम्ही घेणे आणि आपणास सोडवणें. मग तुम्हीं जरूर जाणोन कबूल केले. सदरहू होन हजार १२५०० साडेबारा हजार रोख दिधले. तुम्हापासी आपला भाऊ कृष्णाजी बायदेव व अंबाई बहीण आपली ऐसी तुम्हापासी पाठविली. त्यांचे गुजरातीनें सदरहू होन हजार साडेबारा याबराबरी आपणास पावले. आपले देसपाडेपण तरफ.........आपण आपले खुसीने रजावंदीने ...असे. सुखे लेकराचे लेकरी अर्जानी करणें. तरफ माचा देसपाडेपणाचा हक लवाजीमा जमाबंदीची व रोदेहबादेचे उतपन जे होईल ते तुम्ही खाणे व इनाम खाणे. सर तरफ व दिवाणीचा सिरपाव व पाने मान माननुक देसमुखामागें तुम्ही घेणें. सर दफतर तुमचे आहे. येणेप्रमाणे खरिदीखत तहबंद करून दिधले असे. सुखे देसपाडेपणाचा कारभार करणे. पुढें हर कोण्ही आपला वारिसदार आणिक कोण्ही हिला हरकत करील त्यास तालुक नाहीं. तो गुन्हेगार. हे लिा सही ऐसी सदर्हु ......... जालीयाबदल देसपाडेपण विकिले यावरी कितीयेका रोजी तिमाजी बायदेव फौत जाले. काल मोठा पडला. मुलुक कुल वैराण जाला. परगणा कुल खराब पडला. लोक परा-गंदा होऊन जागा जागा गेले. विसाजीरामहि पोट भरावयास हिंदुस्थानात गेले. कितेक दिवस जालियावरी मुलुक वसाहती होऊ लागला. मोगलाई जाली. देसमुख व मोकदम म्हणो लागले जे देसपाडेपण तिमाजी व कृष्णाजी देवें विसाजी राम यास विकिले आहे. तरी तो येथे हजर नाही. तो ये तोवरी कृष्णाजी बावा देव त्याचा मामा चटोरीस कालामधे गेला आहे. त्यास घेऊन यावे. चंदरोज कामकाज चालवील. म्हणौन देसमुखें कृष्णाजी मजकुरास बोलाऊन आणून कामकाज सोपिले. त्यावरी

कृष्णाजीने देसमुखापासी व तमाम मोकदमापासी हकिकत जाहीर केली जे आपले सिरी वख्त पडला. एक तरी काल पडला. दुसरे रगवणे पडली. त्याबदल वतन विकिले. परागंदा होऊन चटोरीस गेलो. तेथील रंगोजी पटवारी यासी आशनाई होती. त्या आसरियानें राहिलो. हाल जबून होता व माहाग मोठे रंगोजी कांही खबर ...देत असता रंगोजीने आपणासी रदबारी लाविली जे तुम्हावरी वख्त... ... तुम्ही देसपाडेपण निमे आपणास देणे. म्हणौन... ... जाला. आपण त्यास जाब दिधला जे आपणास दिवाणीची नागवण पडली. त्याबद्दल विसाजीराम आपले भाचे याजपासोन होन साडेबारा हजार घेऊन देसपाडेपण ता। माानें दरोबस्त त्यांस दिधले आणि नागवण भरिली. ऐसी हकीकत जाली. म्हणौन जाहीर केले. अमातोनमानी हुकमी लिहिल्या चिस्या आणौन आपण त्यास झाडझाडू टाकिंत असता त्याणें ते जागा आपणास दर सबब जेर केले व एखादे हालामधे पाडावे अगर महारामांगाहाती मारून टाकावे ऐसे हुन्नर करो लागला. दर घडी दबाऊ लागला. त्यावरी आपण वख्तावरी नजर दिधली. आणिखी कोठे तूर्त जावयास जागा नाही ये हालापासून सुटावे म्हणौन त्याने मागितले तैसे त्यास लिहून दिधले. आमात्याणे आपणास एकदम .....ऐसी हकिकत जाहीर केली आणि म्हणो लागला जे विसाजीराम हिंदुस्थानास गेला. मागे परगणा दुज वसाहात जाला. रंगोजी मजकूर पा। मजकुरास येऊन देशमुखाची भेट घेतली आणि जाहीर केले जे कृष्णाजी बायदेवे आपणास लिहून दिधलें आहे व गुमास्तगिरी दरोबस्त सोपिली आहे. आपणापासून कामकाज घेणे. ऐसे जाहीर केले. यावरी फडावरी कोण्ही नवीसिंदा नव्हता. म्हणौन कामकाज चालवित असता चंदेरोद गुदरलीयावरी रयतीसी बदसलूख केला. रयती रोन पडली. खान कतलबाजखानास जागीर होती. तमाम रयती अहमदनगरास जाऊन फिर्याद जाली. चवदा हजार रुपये रंगोजीवरी तकरीर साबुत पोहचविली. त्याबदल नफर मजकुरास बंदखाना घातले. त्यावरी तकरिरीबदल देसपाडेपणासी समंध नाहीं. ऐसे करून बेदखल करून रयतीस सोडविले. त्यावरी कृष्णाजी बायदेवहि हिंदुस्थानीहून फिरून पा। मजकुरास आला. विसाजीराम रूस्तुमखानाचे सरकारांत चाकर जाले होते. त्यांस यावयास फुरसत जाली नाही. याबदल आपण पा। मजकुरास आलो. रंगोजीची हकिकत जाहीर जाली. यावरी देसमुखी व मोकदमी कृष्णाजीचे हवाला देसपांडेपण केले. कामकाज चालवित असतां चंदरोज गुदरलीयावर कृष्णाजी बायदेवाची स्त्री पडली. रंगोजी मजकुरे रदबारी लाविली जे आपली लेकी नवरी आहे ते कबूल करणे. ... देव दरम्यान घातले. बजोर गला पडोन बेटी देऊन साईरीक केली. चंद रोज गुदरलीयावरी... तिमाजी बदल घेऊन गेला. तेथे जहर घातले. नियत धरिली जे हा मेलियावरी वतन दरोबस्त लेकीचे होईल, मग आपल्या हातास येईल. हा हुनर केला. कृष्णाजी मजकुरे देसमुखापासी ... माणुस पाठविले जे पटवारी मजकुरे आपणास जहर घातलें. आपण आता वाचत नाही. तरी तुम्ही आपणास पाटवादीयास घेऊन जाणे. देसमुखे

माणसे पाठऊन डोली करून पाटवदीयास आणिले. रूद्राजा वैद्य चांदवडकर त्यास बोलाऊन आणिले जे याची वेथा दूर करणे. हा वांचे ऐसा उपाय करणे. रूद्राजी म्हणो लागला जे यास जहर हरताळ घातला आहे. हा हरगीस वाचणार नाहीं. त्यावरी कृष्णाजी महिने ६ सा दुखी पडला. बेंड पोटातील गळोन पडो लागली. मग त्याच आजारें तो मरोन गेला. त्यावरी देसमुखें व मोकदमीं विचार केला जे देसपाडेपण त्याचे त्यास सोपावे. ऐसा विचार करून विसाजी गोपीनाथ सबनवीस व अंबाई विसाजी रामाची माऊसी त्यांस सांगितले. त्यावरी अंबाई हिंदुस्थानास जाऊन विसाजीस सांगितले जे वतनावरी खावंद कोण्ही नाही. रंगोजी संचरला आहे. तो डहुळा करितो. तरी अगती चलणें त्यावरी विसाजीरामें चाकरी टाकून एक दसबल हुकूम बुरून नबाब शाईस्ताखान व अमानतखान दिवाण याचे नांवे घेऊन पा। मजकुरास आला. नवाबाचा हुकुम अमानतखान दिवाण व महमद अमी अमीनखान पा। वैजापुरास आले होते त्यांस दिधला. तेही तमाम देसमुख व कदम गांवगनाचे बोलाऊन हकिकत तमाम दर कूल इा। पासून खातिरेसी आणिली. देश-मुखी व रयतीने हकिकत जाहीर केली जे वतनासी खावंद विसाजी राम आहे. यास वतन विकिले आहे व हा त्याचा भाचा आहे. वतनाचा वारसा यास पोहचतो हे आपण जाणतो. आपण रजावंद आहो. त्यावरून देसपाडेपण विसाजी रामाचे हवाला अमानतखान दिवाणें केले. सन... पासून अमल चाली लागला. त्यावरी सन ४ मधे रंगोजी मजकूर अवरगाबादेस बाजी सफीखान दिवाण यापासी फिर्याद जाला की आपणापासी सनद इसनाद आहे म्हणौन जाहीर केले व रयतीमधे बाजे कोण्ही तुफानी होते त्यास मिलोन कांही तकरीर केली. याबदल दिवाणसाहेबी देसमुखास व तमाम गावगनाचे मोकदमास तलब पाठविली. कुल जाऊन रूजू जाले. दिवाण साहेबी इनसाफ केला. देसपाडेपणाची हकिकत कुल मनास आणिली. रयतीस पुरसीस केली. त्यावरी देसमुखी व मोकदमी जाहीर केले जे वतनाचा वारसा विसाजीस पोहचतो. हा खावंद आहे. रंगोजी मजकुरापासी लिहिले आहे ते बातल आहे. कृष्णाजी बाय-देवास कालामधे दबाऊन एकले सापडऊन अडऊन कागद करून घेतला आहे. असा एक दाम त्यास दिधला नाही व त्यास मेहमानीबदल गावास नेले आणि जहर घातले. त्याच अजारे तो मरोन गेला. ऐसी खून खराबी केली आहे. ऐसी रंगोजीने हजर हकिकत जाहीर केली. त्यावरी रंगोजी पटबारी मौजे चाटोरी पा। गुलशनाबाद मुलाजीस जाला. त्यास धके देऊन दूर केले आणि वतन विसाजी रामाचे हवाला केले, देसपांडेपण करारवाके विसाजी रामाचे जाले. तकरीर केली होती. ते हकनाहक साबूत केली. याबदल विसाजीराम मुसलमान जाला आणि दिवाणसाहेबी तकरीर माफ केली. सिरपाव व परवाना देऊन बिदा केले. त्यावरी अब्दुल सलाम उर्फ विसाजीराम परवाना घेऊन पा। मजकूर आले. कितीयेक मुदत अब्दुल सलामे देसपाडेपणाचा कारबार चालविला. त्यावरी नियत धरिली जे आपला पिरीवरूत जाला. आता मकेस जावे ऐसी तजवीज केली. आणि मलजी व राघोजी दोघे फर्जंद

त्याख जाले त्यास बोलावून फर्माविले जे आपली नियत मकेस जावयाची आहे. खर्चाचा सरंजाम पाहिजे. तरी कांहीं आपणास खर्चास सरंजाम करून देणे. आणि आपले वतन देसपाडेपण ता पाटवदे पा मा आहे ते दरोबस्त तुम्हास बकसीस करून देतो. तुम्ही अर्जानी करणे. एक तरी फर्जंद दुसरे त्याख आह्मा. तिसरे आपणास खर्चास पाहिजे. ऐसे फर्माऊन बजीद आले. त्यावरी मलजी व राघोजी येही खर्चाचा सरंजाम करून दिधले. त्यावरी अब्दुल सलामे बकसीसनामा करून देऊन वतन मलजी राघोजीचे हवाला केले. सन १०७७ (१६६६–७ इ.). त्यावरी अब्दुल सलामे त्यापासून रुपये घेऊन खैरखैरात केली. मकेस जावयाची नियत धरिली होती तो सन १०९५ (१६८४–५ इ.) मधे फौत जाले. त्याउपरी त्यामागे अजितागाईत राघोजी देसपांडेपणाचा कारबार चालवित असे. कामकाजामधे चौकसकार अमदानी सरबराहकार बसलुख फामिदा आहे.

भा. इ. सं. मं. षाण्मासिक वृत्त, शके १८३४, भाग २ रा, स्वी. ग्रं. क्र. ४, पृ. १३७–४५.

## (–४७३–)

श्री

तीर्थरूप राजश्री सिवाजीपंत काका स्वामीचे शेवेसीं

अपत्यासमान चिमाजीने नमस्कार विनंती. उपर येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन लेखनश्रवणें करून संतोष जाला. ऐसेच निरंतर पत्र पाठवून सविस्तर कुशल वृत्त लिहित जाणें. तेणेकरून समाधान असे. वरकड कितेक अर्थ स्वकीयें पत्री लिहिला तो सविस्तर कलला. मौजे कुरुड गावीचे विसी लिहिले. त्यावरून राजश्री देवजी सोमवंसी यासी पत्र लिहिले असे. त्याचे तर्फेने कोणेविसीं काही उपद्रव लागणार नाहीं. त्याजकडून तुमच्या साहित्यास कधीं अंतर होणार नाहीं. कलले पाहिजे. बहुत काय लिहिणे. लोभ असो दिला पाहिजे. हे विनंती.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३२३.

## (–४७४–)

श्री

राजश्री देवजी सोमवंसी हिंदुराव गोसावी यांसी

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो। चिमणाजी बलाल आसीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. मौजे कुरडगाव पो

चादवड हा गाव राजश्री सिवजी दामोदर याजकडे मुकासा देखील बाबती आहे तेणे प्रमाणे करार आहे. तरी आपले कडील कमाविसदार असतील त्यास ताकीदपत्र देऊन कोणेविसीं उपसर्ग न लागता सुरलित चालें ते गोष्टी करणें. जाणिजे. छ ४ साबान. बहुत काय लिहिणे. [शिक्का- 'लेखन : सीमा ']
[शिक्का- ' श्री : राजा शाहु नर : पति हर्षनिदान : बाजीराव बल्लाळ : प्रधान. '

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७. स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. ३२३.

## (-४७५-)

श्री

स्वस्ति श्रीमत् भगवद्भजनपरायण सद्गुणाधिष्ठान विवेकसागर राजमान विराजित नाना स्वामी गोस्वामि यांसि-

अपत्ये कचेश्वरें नमस्कार विशेष. चऱ्होलीची जमाबंदी २६१ दोनिसें एकसष्टी. त्या पैकीं खर्च

| | |
|---|---|
| २५ प्रभाकर | १३ कोनेरपंत सेकदार |
| ३० सिबंदी | ५० बाबाजी गोसांवी देशमुख देशपांडये. |
| | १२ यांचा शिरपाव |
| ५५ | ७५ |

येकूण १३० येकसे तीस. बाकी १३१ येकसेयेकतीस राहिले आहेत. विशेष. आमच्या ऋणाची चिंता स्वामीस आहे. हे विनंति.

श्रीसरस्वतीमंदिर, व. ८, अं. ११-१२, क्र. ४५-६, माघ-फाल्गुन १८३० शके, पृ. १५-१६.

## (-४७६-)

श्रीशंकर

सहस्त्रायु चिरंजीव कचेश्वरास सिद्धेश्वरभटीं अनेक आसीरवाद. उपरी आम्हीं गावांस आलो, तो प्रजन्य फार लागला आहे. रा उधोपंताची भेटी घेतली, त्यांस त्याणीं उतर दिल्हें कीं प्रजन्य उघडिल्यावरि तुमचा प्रसंग करून व तेथे शंकराजी व काशीबा व नारायण ऐसे आले आहेत यांचें राजकारण गणजोशाचा हातें तारा-अल्लीकडे आहे व रायभानजी भोसले याकडे आहे. कळलें असावें. तुम्ही सांगितलें होते कीं शंकर भटास पाठविणें. तर येथें पाऊस बहुतच अतीशय ऐसा लागला आहे. नदियांनीं पात्रें टाकिलीं आहेत. पाऊस उघडिलियावरी शंकरभटास पाठवून व

तुम्ही जे हस्ताक्षराची तजवीज सांगितली होती ते दोनी दिवस राहिली. कळलें पाहिजे व सीऊजी देशमुखास किलेदाराच्या परवानियाचें पुसिलें. त्यास त्याणे उतर दिल्हे कीं रा भास्करराऊ याच्या हातें दिवाणी परवाना करून घेणें ते तेणेकरून पुढें बहुत दिवस चाले. आम्ही तो चालवून. परंतु दिवाणी परवानिया वेगळें रुजूं पडत नाहीं. तरी तूं रायास लागू होऊन दिवाणी परवाना करून घेणें व रा उधोपंताचें बिन्हाड तो रा. अनाजीपंताचे घरींच आहे. कळलें पाहिजे. आमचा प्रसंग एका दों दिवस पाऊस वारल्यावरी होईल. मग लेहोन वाठवून. तुमची गाय व्याली. गोऱ्हा जाला. मुलेलेकरे सुखें आहेत. द्वारकेसही बरें वाटतें. कळलें असावें. तुम्हांसही आंव पडित होते. तें काय वर्तमान ते लेहोन पाठवणें. याचें उतर रा गोविंद श्रीपती याचें माणूस येईल त्याजबराबरी पाठवणें. बहुत काय लिहिणें. हे आसीरवाद.

श्रीसरस्वतीमंदिर, व. ८, अं. ११–१२, क्र. ४५–६, माघ–फाल्गुन शके १८३०, पृ. १६–७.

## (–४७७–)

१

॥ श्री मुद्गलोजयति ॥

स्वस्ति श्रीमत् श्रौतस्मार्तकर्मानुष्ठाननिरतेषु सकलवेदशास्त्राभिज्ञेषु राजमान्य धुरंधरेषु करहाटकक्षेत्रस्थ धर्माधिकारीप्रभृति समस्तभि विद्वद्वृंदेषु।

स्नेहाभिलाषी मुद्गल भट्ट पंडितराय कृत ॥ शतशो नतयः शमत्र श्रीमत् कुशल मेघमानमाशास्महे विशेषस्तु. वैराट क्षेत्रस्थ लक्ष्मण गगने हा ब्राह्मण आपले कर्ज मागावयास खानदेशांत एक्या ग्रहस्ताच्या घरास गेला होता. तेथें आठ चार दिवस उपोषणें केली. त्याउपरि याच्या चितास विक्षेप जाला. त्या उपरि यज्ञोपवीत वस्त्र त्याग करून स्थळोस्थळी अन्नोदक व्यवहार केला. त्यास याचा पुत्र बऱ्हाणपुरप्रांती राजश्री चिमणाजीपंत त्यापासी होता. त्या ब्राह्मणांनीं सांगितले कीं, तुझा पिता भ्रष्ट जाला. त्याजवरून तूं पंक्तिपावन नाहीस. तूं घटस्फोट करून शुद्ध होणे. त्याजवरून त्यानें पित्याच्या मार्ग न लक्षिता व सर्वही बांधवाचे सानिध्य नसतां काळ प्रतिक्षाही न करिता घटस्फोट विधि केला. त्या उपरि दो मासानि स्वच्छ होऊन पुत्रापासि आला. त्याउपरि कितेक लोक संन्निध होते. ते बोलिले कीं तुझा घटस्फोट जाला. तूं दर्शनायोग्य नव्हेस. त्यावरून तो वाराणशी यात्रेस गेला. वाराणसी यात्रा करून श्री सेतु यात्रा करून संपूण दक्षिण तीर्थें करून पांचा वर्षांनि आला. त्या उपरि महाराज छत्रपति स्वामि संनिध आला. त्यावरून अज्ञा केली जे तुमच्या शास्त्र संमतेकरून हा संव्यवहार्य आहे किंवा नाहीं ऐसी आज्ञा केलि त्यावरून आम्ही मिताक्षरादिक प्रायश्चित ग्रंथावलोकने करून प्रायश्चित प्रायश्री परिग्रह विधि पुनः संस्कार विधि

हा विधि केलियानें संव्यवहार्य होतो हा निश्चय समस्त ब्राह्मणासंमते करून केला आसे. ऐसीयासि तुम्हीं क्षेत्रस्थ समस्त ब्राह्मण थोर असा. तुमच्या संमतेकरून करावया-स्तव तुम्हा प्रति पाठविला आहे. तर तुम्हीं सकळ ग्रंथावलोकानेंकरून करावा. यास्तव तुम्हीं प्रति पाठविला आहे. विशेष काय आसेल तो लिहुन पाठवणें. त्यावरून याची विषय व्यवस्था होईल. इत्यलमति पल्लवितेन छ.

चित्रमयजगत्, व. १८, अं. ५, मे १९२७, पृ. १. (पत्राचा फोटो छापला आहे.)

( - ४७८ - )

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेशीं

विनंति सेवक नारो शंकर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे. सेवकाचें वर्तमान ता. छ ९ माहे मोहरम पावेतों स्वामीचे प्रतापें करून कुशल असे. बहुत दिनावधि जाली. पत्र पाठऊन परामर्श न जाला. याकरितां चित सापेक्ष असे. कृपापत्र पाठऊन सांभाळ केला पाहिजे. तेणें करून सेवकाचें चित आनंदातें पावेल या प्रांताचें वर्तमान तरी वोरसे प्रांताचे हरामखोर सर्व एकत्र होऊन कुंवर भूपालसिंग राजे याचा कनिष्ट नातु यास शिर उपस्थाई पुढें करून खरगापूरवाले व उष्ट्रानवाले व पलेरावाले व कटारे व धमना वगैरे बुंदेले धंदेर पवार तीन चार सहस्र पांवलोक, पांच सातशें स्वार जमा होऊन दुंडी केली. वोरशाचे राज्याचा मुलूख ताराज केला. व सरकार खालशाचें गांव मउराणीपुरा कुरेछा वगैरे प्रांताचे चाळीस पंनास गांव मारून मुलकांत बखेडा बहुतच केला. देशीं नानाप्रकारेचें वर्तमान व पठाणाचे युद्धांच्या लबाडीच्या अवाई उठवून धूम केली. यामुळें सरकारचें नुकसान जालें. राजीयास तो ऐवज येणें ठिकाणच नाहींसें केलें. मागील बोलापैकी राजे यानें निकाल करून मुलकांत ऐवज नेमून दिला. तो गर्दीस मेळविला. तेव्हां आम्ही फरोकाबाद प्रांतीं होतों. हें वर्तमान ऐकून या प्रांतें आलों. तों दिवस पर्जन्याचे. यामुळें फौजा जागां जागां पाठविल्या, बंदोबस्त केला, तरी चार महिने दंगाच राहिला. उपरांतिक विजयादशमी झालियावर राजीयास समागमें घेऊन मुलकांत गेलों. हरामखोरांस पराभवातें पावून राजे याचे मुलकाचा व सरकारच्या मुलकाचा बंदोबस्त करून, कुंवरभूपालसिंगास शिक्षा करून ठिकाणीं ठेविलें. तों मागती राजश्री सरदारांचीं पत्रें आलीं कीं, पठाणांनीं बळ केलें आहे. फौजेसहवर्तमान सत्वर येणें. त्यावरून तिकडे दरमजल जावयाचा विचार केला, तों राजे प्रीथीसिंग यांस व्यथा निर्माण होऊन निधन पावले. राणीसुद्धां अकरा स्त्रियांनीं सहगमन केलें. मागती नवा मनसबा निर्माण जाला. तेव्हा कुंवर सांवतशिंग यास राजतिलक मार्गशीर्ष शुध्द १० दशमीस सर्व राज्याचे मतें झाला. सरकारचा नजराणा

येणें प्रमाणें ठरविला – ऐन ७५०००, कारकुनी रु. १५०००, व मशारनिल्हेस सरकारांतून हत्ती शिरपाव द्यावयाचा ते रुपये १००००, एकूण एकंदर एक लक्ष रुपये ठरविले. ऐवजाचा विचार त्याचे घरचा स्वामी जाणतच आहेत. दोन तीन सालांत राज्यांतून तजवीज करून घ्यावी तेव्हां वसुलांत येईल. याप्रमाणें इकडील बंदोबस्त करून दरमजल राजश्री सरदारांकडे जात असों. राजे सांवतशिंग यास शिरपाव वस्त्रें पाठवावीं. हती सरकारांतूनच दिल्हा तरी दहा हजार रुपये नुकसान होणार नाहीं. नाहीं तरी रुपये देणें लागतील. ये विषयीं आज्ञा कर्तव्य ते केली पाहिजे. वस्त्रें व खातर जमेचे पत्र राजे मजकुरास पाठवावयास आज्ञा करावी. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

महाराष्ट्र कोकिळ, पु. ३, अं. ७–८, मे जून १८९४, पृ. ३–४.

## (– ४७९ –)

पुरवणी राजश्री त्र्यंबकपंत स्वामी गोसावी यांस उतरी प्रचंडगडचे वर्तमान पूर्वी तुम्हांस लिहिलेंच आहे. आम्हीं रायरेस्वरास आलियावरी सेजार लोक पाठविले. यैवज कापड पाठविलें. ते तेथें पावले. आणिखी लोकाची तरतूद केली होती राजश्री परशरामपंत याकडे लोकाबद्दल पत्राउपरीं पत्रें पाठविली होती. सें पन्नास लोक कोळी सुधागडाकडून आणविले होते. त्यास जागा अफाट जेथें दीड हजार दोन हजार माणूस कनिष्ट पक्षें असावें तेथें जसें तसें चारसे माणूस जाले होते. गनीमानें चहूंकडून लगट केला. दोन वेळ सुलतान चढवे केले. ते आपल्या लोकीं मारून काढिले. त्यावरी तिसरीयानें छ १४ जिलकादी हुताशनीचे दिवशीं गुरुवारी प्रहरा दिवसापासून गनीमानें आयालगार केला. ते आहोरात्री राहिले नाहींत. प्रातःकाळची दोन तास रात्रीपुरता जुझार जाला व विठोजी करका व सोना टोसर व हुमा बोकड यांनीं माळा लाऊन गड घेतला. रात्रीचा... सा घेतला. तेथें जास्ती माळीत १२–१५ लोक होते. त्यामध्यें सोनाजी धीर पंचहजारी व तिघे रजपुत होते. ते हुजुराते मारिले. बाद माणुस धरून नेलें. ते दुसरे दिवशीं हती फिरोन घातले. दिवस उगवलीयावरी चहूंकडून लगट करून वरते चढीले. हरी बापूजी व हवालदार लोक देखील धरून नेऊन गर्दना मारीत होते. त्यावरी रोहिलाखान यानें पूर्व बाजूस संधान करून पादशहास अर्ज करून वस्त्रशस्त्र घेऊन जीव मात्र रक्षून सोडिले. प्रचंडगडासारखें स्थळ जमाव थोरसा... नाहीं. यामुळें दगीयानें बेगीयानी घेतले आणि पुढें ही शत्रू बंसजारी जाला. दोन अडीच मास उष्णकाळ आहे. दुसरी शिरवळावरी येईल किंवा पुणीयावर जाईल हें कळत नाहीं. तिकडे गेला तरी कोरीकडे शह आहे. इकडे आला तरी ती पर्वतावरी रोख आहे का मध्ये. ईश्वरी इच्छा प्रमाण. तुम्ही लगट करुन चार टके घ्यावयाचे ते घेणे. पुण्यावरी औरंगजेब आलियावरी त्या प्रांते शह बसेल या करतां दुरी करणें. यैवज वरचे

वर पाठविणें. तुम्ही यैवज पाठविला तो तोरणीयास पाठविला. शेवट टकाही गेला आणि स्थलही गेले. या करतां यैवज लौकर पाठवणें.

सहविचार, वर्ष २, अं. ४, मे १९२४, पृ. १७५-१७६.

## (-४८०-)

श्री

क्षेत्रीये कुलावंतस महाराज राजश्री छत्रपती स्वामीचे सेवेसी:

विनंति सेवक विठोजी सिरके सेवेसी विज्ञापना, छ २७ रजेब पर्यंत ये प्रातींचे व सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. किले सारंगगड येथील चालीस माणूस राजश्री नारो पंडित...ही हुजूर नेले आहे. त्यामध्यें सुलतानजी काठकर व खेोजी सिर्का व गंगोजी बामणा या तिघांची नातवानी बहूतच आहे. कुटुंब फार आहे आणि यांचे मागे कोणी नाही. या करिता स्वामींनी कृपाळू होऊन..... यास आज्ञा दिली तरी......सेवा घेऊन. यांत स्वामी धणी आहेत. सेवेसी श्रुत होय हे विदनाषना.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ७, अं. १-४, पृ. ९१.

## (-४८१-)

श्री सोपान

सवस्तांना श्री वास्तव्य कसबे सासवड येथील अधीकारी मुळ पुरुषें गुरुसिष्ये सांप्रदाईक श्रीची समाधी भूमिगत...होती. ती सिध्यानंदस्वामी ब्रह्मचारी श्रीचे सांप्रदाई सासवडी आले. त्यास द्रिष्टांत जाला. त्याणी समाधी प्रसिद्धांत आणिली. श्री संनिध पर्णकुटी करून राहिले. समाधीस पाप्राणाचें गडगे रचून शेवा करून होते. त्याचें शिष्ये रामानंद स्वामी आले. तेही श्रीची शेवा करून गुरुपासी राहिले. काही दिवसानी सिवाजी महाराज याणी देवाचे नेवेद्यनंदादीपास देवासंनिध जमीन दिल्ही व गावची फसकी व नंदादीपास तेल्याकडील तेल करून दिल्हे. त्याजवरी वर भिक्षेवरी चरितार्थ करीत होते. निर्जेलीचा उछाह करीत होते. सिधानंद स्वामी समाधिस्त जाहले. नंतर रामानंद स्वामीनी संवस्तान चालविले त्याचे शिष्ये यादोबा गोसावी सासवडकर रामानंदस्वामीचें उपदेसी होऊन श्रीची सेवा करून गुरुपासं होते. रामानंद स्वामी समाधीस्त जाल्याउपरी यादोबा गोसावी श्रीची शेवा करून संवस्थान चालविले. त्यास दोबे पुत्र, वडील विठोबा गोसावी व धाकटे रामाजी गोसावी दोघे होते. यादोबा समाधीस्त जाले. त्यांस रामाजी गोसावी रोजगार धंदे करू लागले. पैका मिळू लागला. तेंच त्यास चांगले वाटले. विठोबा गोसावी श्रीची शेवा करून होते. रामाजीबावा रोजगार करून घरी आले आणि विभक्त जाहाले. त्याणी विठोबा गोसावी

यास सांगितले की आम्ही आपले संतोषानें तुम्हास सवस्थान सोपिले आहे. तुम्ही श्रीची शेवा करून असावे. आम्हास यासंमधी काही लागत नाही ऐसे बोलिले आणि विभक्त जाहले. विठोबा गोसावी याजवरी श्रीची व गुरुकृपा चांगली, त्यास संवस्थानाबा आंणखी जमीन वर्षासने मिळाली. देवाची शेवा करून होते. त्यास दोघे पुत्र. मनोहर गोसावी वडील धाकटे महीपत गोसावी दोघे होते. महीपत गोसावी यांची प्रकृत येक प्रकारची होती. त्याणी मनोहरबावासी कजीया करोन दोन सहस्त्रांचा विशेय घेऊन स्त्री व आपण उभयता माहायात्रेस गेली. सवस्थानी रहावयास अनुकुल पडले नाही व आम्हास सवस्थानचे कांहीं लागत नाही. आम्ही क्षेत्रवास करावयास जातो याप्रो करून गेले. मनोहर गोसावी याणी संवस्थान चालविले. ते समाधिस्त जाहले. त्यास पुत्र वडील श्रीधर गोसावी दुसरे विठल गोसावी व रामानंद गोसावी व नरसिंह गोसावी व महादेव गोसावी व रघुनाथ गोसावी सहाजण आहेत. काहीं दिवस येकत्रच होते. श्रीधर गोसावी यास शरीरास समाधान नाही ऐसें जाले. तेव्हा विठल गोसावी याणी सहा जणाच्या फारखती त्याजपासोन करून सवस्थानचे उत्पन्न श्रीचे उछांहाची बेगमी ठेऊन वाटून घेऊन कागद केले. काही दिवसांनी श्रीधरबावा शांत जाले. नंतर पाचजण येकत्र होते. काही दिवसांनी परस्परे कटकट करू लागले. तेव्हा अवघे विभक्त जाहले. पाच भाऊ व मातुश्री एकत्र बसून विचार करून श्रीचे उछांहास व नदादीपाची बेगमी वेगली करून बाकी जमीन वार्सिक वाटून घ्यावी व कर्जही आहे ते वाटून घ्यावी परस्परे कलह करून नये असे ठरावून यादी केली. त्याप्रो वहिवाट चालती करून श्रीची शेवा महिने ठरावून करीत होतो. सुरक्षित चालत असता विठल गोसावी याणी नाना पुरधंरे याचे आर्जव करून मातुश्रीस व चौघा भावास संवस्थान पैकी काही देऊ नये माझी करावे आणि विठल गोसावी यास पंटाचा अधिकार द्यावा येसे केले. पुरंधरे याणी अगत्यवाद धरून शके १७२२ रौद्रनाम संवछरे जेष्ट वाो ११ येकादसी ( १७ जून १८०० ) ते दिवसी विठल गोसावी यास भगवे वस्त्रे दिल्ही. त्याची मातुश्री व भाऊ याणी शपथ घातली. तेही कोणी मानली नाहीं व त्यास संनिध येऊ दिल्हे नाही. सांप्रदायेरूप केले नाही. नरसोबा गोसावी समाधीजवल गाभाऱ्यात होते. त्यास पुरंधरे याणी सीपाई याजकरवी हाती धरून ओढून काढिले. श्रीची व ब्राह्मण्याची मर्यादा ठेवली नाही. याप्रो चौघावरी जुलूम केला आहे. च्यार महिने जाहाले. आमची दाद कोठें लागत नाही. स्वामीनी कृपाळू होऊन श्री येकनाथस्वामी व चिंचवड देहू व रंगनाथ स्वामी वगैरे सवस्थान आहेत. त्यानी भावाबंदाची व्यवस्था करून दिल्ही आहे. तेथील चाल ध्यानास आणून आम्हास त्याप्रमाणें करून द्यावे. श्रीची शेवा करून राज्यास अभीष्ट चिंतन करू.

---

भा. इ. सं. मं. त्रै., व. ४, अं. १–४, क्र. १३–१६, पृ. ६८–६९.

## (-४८२-)

श्री

श्री कृष्णापा अपास्वामी वडगांवास आले तेथोन संप्रदाई सिष ब्रह्मच्यारी ब्रह्मनिष्ठ प्रतापी जाहले व गुरुसेवेचीं त्यानी पराकाष्ठा केली व गांव दरोबस्त इनाम मेळविले व वार्षिके व इनाम जमिनी मेळवून ब्राम्हणसंतर्पण अवीट करीत आले त्याचा तपसील

१ कृष्णापास्वामी उरणब्हेकर
१ जयरामस्वामी कात्राबाज मांडवगणचे देशपांडे
१ गोपाळस्वामी
१ विठावास्वामी हे म्हसवडकर पारखे याची स्वामीनी आग्रहाने दोन तीन लग्ने करविली. परंतु लग्न करताच बायका मेल्या. अतेव ते ब्रह्मचारी.
१ मुनेश्वरस्वामी
१ साबाजीबावा भंडारे वडगाव( कर )
१ महादेवबावा धारासीव वडगावकर

७

तपसील

६ समाधी वटग्रामी आहेत

१ कृष्णापास्वामी मुख्ये
१ जयराम स्वामीची दुसरी
१ गोपाळस्वामीची तिसरी
१ विठास्वामीची चवथी
१ मुनेश्वरस्वामीची पान्चवी
१ माहादेवस्वामीची साहावी

६

१ साबाजी बावाची समाधी नाहीं.

७

याणी स्नानसंध्या केली त्याचा तपसील वर्षे.

४५ कृष्णाप्पा स्वामी वटग्रामास आले सके १५०४ ते सके १५४५ रुधिरोंद्गारीनाम संवछरे माघ शुा १५ (२५ जानेवारी १६२४) समाधिस्त जाहाले, स्नानसंध्या केली.

४५ जयराम स्वामी सके १५९४ परिधावीनाम संवछरे भाद्रपद वद्य ११ (४ मार्च १६७३) समाधिस्त जाहाले. स्नानसंध्या आपास्वामीचे माथे केली.

२८ गोपाळस्वामी शके १६१२ प्रमोदी संवछरे अस्वीन वा। १ (९ आक्टोबर १६९०) समाधिस्त जाहाले. स्नानसंध्या केली.

२९ विठोबास्वामी शके १६४१ कार्तिक वद्य १० गुरुवारी (२६ नवंबर १७१९)....त चेतुर्थाश्रम घेऊन समाधिस्त जाहाले. स्नानसंध्या केली.

२७ मुनेश्वर स्वामी शके १६६८ क्षयनाम संवछरे फालगुन वद्य (२३ फेब्रुवारी १७४७) समाधिस्त जाहाले. स्नानसंध्या केली.

७ साबाजीबावा सके १६७५ (१७५३-४ इ.) सात वर्षे मठाची वहिवाट करून होते.

४६ महादेवस्वामी शके १७२१ सिधार्थी संवछर कार्तिक वा। ५ भानुवारी (१७ नवंबर १७९९) समाधिस्त जाहाले. स्नानसंध्या केली.

----

२१७

७३ आलीकडे शके १७२१ ता। शके १७९४ (१८७२ इ.) परयंत वर्षे च्यहतर कारकिर्दी बावाच्या.

१ आपाजी बावा वर्षे २०
१ गोपाळ बावा वर्षे १२
१ बाळकृष्ण बावा वर्षे ४
१ कृष्णाजी बावा वर्षे २६
१ रामकृष्ण बापा उर्फ नारायण बावा वर्षे ११

--

५

----

२९०

येकूण मंडळीनी स्नानसंध्या केली त्याचा विस्तार प्रथम कृष्णापा आपा हे उरण-बहेचे कुलकर्णी कृष्णातीरी पवित्रभूमी तेथें जन्म कृष्णातीरी वास्तव्य पूर्व पुण्याई सबळ या योगे काही दिवस तेथे होते लग्न हि केले होते: ते कुटुंब निवर्तल्या नंतर सर्वस्वाचा त्याग करून

(अपूर्ण)

~~~~~~

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. १२०-१२२.
~~~~~~

# (-४८३-)

[चतुर-साबाजी : बखर]

एक जागा जहाले तिथी वार नक्षेत्र दर...मुहूर्त पाहून आपले पागेचे हाती आणून नाहूं घालून दखत...करावी. छावा सिंघारून गंधाक्षद धूप दिप करून त्याचे सोंडेवरी एक फुलाची माळ...पेठे मधी फिरविला. कोण्हाच्या गळां माळ घाली त्यास पाछाहि देणें...मनास आणून थोर थोर वजीर...तम नगरातून माणूस जितके होते तितके वस्त्र भूषणें घालून तमासा पहावयास आली व गांवें गांवचे बाजे नगरचें पाहूं आलें व पेठेपेठेचे सौदागर व वजीर जाथे शिलेदार व सरदार व नामोषाचें पटाईत व दांडाईत व अति सुलक्षणिक सामोद्रिकक्षणाचे असे लोक कुशल पेरावा करून एकापुढें एक उभे राहून बाजे नगारे व खाळी नगारे बाजंत्री चार हजार व कर्णे मेळ चारशें व बाकी मेळ दोन हजार व दिंडीर मेळ दोनशें व कलावंत तार्फे दहा हजार व भाट...व नटनाटक ऐसे आनंद गरजेस्सी चार पेठेंतून मिरवूं लागले. लोकाचे मनची वासना कीं कोण्हावर तुष्टमान देव होई कोणाचे गळां फुलाची माळ परमेश्वर घालील हें न कळे. त्यामध्यें एकेकडे निराळे आहमदशहा उभा राहिला होता. ऐसे आसता तितकिआ लोकांतून निवडून आहमदशहाचे गळां फुलाची माळ घातली. सोंडेन उचलून वरते बैसविला. मग तमाम लोकांनी आश्चर्य करून मग दुंदुमी व बाजंत्री नाना वाद्याची एक घाई जहाली कीं देवलोकीं ऐसा आनंद नाहीं व इंद्रलोकीं ऐसा आनंद नाहीं. नाद करून लोक थकित जहाले. हे खबर पातशहास जाहीर जहाले. यावरी सुलतान आहमदशाहाचे गला माल घातली. मग राजीयाते बहुत कुशी बेसावयासी आरंभ करावयास धरिला. मग सुलतान आहमदशहा गंगरस पंताच्या धरास पायीं चालत जाऊन त्यास नमस्कार घालून व त्याचे बायलेस नमस्कार घालून त्याचे तर्फेचे लोक इत्यादिक लोक बाजे लोक लहान थोर बरवे सीच इष्टमित्र जे कोणी होते त्यास हि नमस्कार घालून मग राजेश्री गंगरसपंताचे डोईवर छत्र धरविले पाहिजे म्हणून सुलतान अहमदशहा बोलिले. त्यावरि गंगरसपंत बोलो लागला जे : हे पातशाही माझीच आहे. मजवरी छत्र धरविलीयास तमाम लोक फिसाद करतील व गवगवा फार होईल. तुझे परमेश्वर तुज पातशाहि दिल्ही कांहीं चिंता नाहीं. सुखरूप राज्य करणे म्हणून पौटेसी धरून हातधरणी चालत बाहेर बितक्त चालून गेले. अवघे मिळून तक्तावर बैसविले. छेत्र धरविले. आनंद गजर केला. ... केली. धर्महि केला. वस्त्रें शीरपाव देनगी केली. भले लोक पातशाहाजादे व हुजुरादिचे होते त्यास कपडे दिल्हे. त्यावर आपलें नांव हासन गंगू बामणी पातशाहि म्हणून नांव ठेवून घेतले. किताबतिमधीही तमाम विलायेतीमधें लिहिणें म्हणून फरमाविले. परवाणीयामध्येंही ऐसेच लिहिले पाहिजे... नांव पहिले हासन म्हणून होते. मग आहमदशहा म्हणवून पातशाहाजीनें नांव ठेविले. ऐसेयासी आतां माझे बापाचे नांव गंगरसपंत. आतां हसनगगूं बाहमणी

पातशाही ऐसा किताब जहाला, हें च नांव जागाजागा विलायतीमधें व वरवाणीमधें चालविणे मग पातशाही बेपक करूं लागला. यावरी कोण्हे एके दिवशीं तमाम लोकांस तश्रीफा देऊन नवाजीस केले व प्रजालोक यांस खुसीनें पालीग्रहण करूं लागला. बरवी वर्तणूक करूं लागला. ऐसे असतां कोण्हे ऐके दिवशीं आपले तमाम हुकमती लोक बोलावून यांस पुसतो कीं पूर्व दिसेस किती किती विलायेती आहे आणि काये काये देवस्थान आहे. ऐसे पहावयाची वासना आहे म्हणून स्वारी फरमाविली. तमाम वजीरी दुनादीव नव सिलेदार व सरदार व वजीर व मोरीर व कारकून व जोरीक अहीर बानायीत व पटाईत मुदेन पठाण लोक यास आपला हुजरातीं नेकी थालेदार ताकीद करून पाठविलें. तेथ वक्ती लस्कर ताबडतोबीन तयार करून आपले थोड हारदारी मुस्तेदर करून बाहीर निघाला. तमाम लोक बाहीर जुम्मामसीदीपासी जमा करून सिकारी खेळत खेळत भिवरे नजीक येऊन उतरले. तेथें येऊन एक कोट बांधला. त्या कोटाचें फिरोजाबाद म्हणून नांवे ठेविले. त्या बाबद नजीक एक कोट बांधिला त्या कोटाचें नांव कलबुर्गे म्हणून बोलताती. आपले आपले महेजबामध्यें शहर वसवावे म्हणून नांव ठविलें व तेथून सिकार खेळत खेळत व निरेचि कांठीं येऊन राहिले. मग तेथेहि कोट बांधला. त्या कोटाचे नांव ठेविलें कीं सिकारखाना म्हणून ठेविले. मग तेथेंच मुकाम जाहले. वर आणीक एके दिवशीं बंदरास स्वारी फर्माविली. तेथें सिकारीबद्दल जातां जातां कुतरा एक चावर तेथें एक ससा पैदा जाला. त्याने कुतरीयाचा दुमाला घेऊन कुतरा मारिला. पातशहाचे नजरेसी पडला. यावर पातशहा बहुत हैरान जाहले. दंग आपले जागा होऊन जवलिया लोकांस बोलो लागला जे हे तमासा अजब आहे. कुतरीया दुमाला घेऊन ससीयानें कुतरा (मारिला) हे कोठेंहि तमासा देखला नाहीं. ये जागीयेचा गूण काय आहे. मग जवलिया लोकांस अर्ज करूं लागला कीं हें भोये मरदानगीची आहे. येसवंतहि आहे. या जागीया एक कोट बांधावा. ऐसे बोलतां तेथें डोंगर होता त्या जागा डोंगरातून शोध करून ससा कोठे रहातो ते पाहाऊन ते वेळेसी ससीयानें कुतरा मारिला तो जागा पाहावून कोट बांधावयाची तजवीज केलीयावरी पुढें तमाम लस्कर पेसाहून हायरान होऊन पाणीयासाठी जेर जहले. तितकियावरि तेथें एक धनगर बकरिया चारीत होता. त्यास लस्करचे लोक पुसो लागले पातशहा पाणीयामुळें...सा जहाला आहे. पाणी कोठे आहे. बहुत जेर जहाला म्हणवून बाजद होऊन पुसो लागले जे पाणी येथे मिळेल कीं न मिले हें सांगणें ऐसें पुसो लागले जे. मग तो धनगर बोलिला जे एक कुंड आहे त्या कुंडातून जितुके पाणी पाहिजे तितुके आणून देणें. मग तेथून पाणी आणून पातशहाजीस पाजिले. मग त्या कुंडातून घोडा व हती व राऊत पायीक परवार येऊन कुंड भरिले जैसेच तैसे उरले. हे पातशहानें देखुन बहूत आश्चर्य करून राहिले. त्यांस नाव दिल्हे. मग त्या धनगरास जवळ बोलावून पाने व कपडे देऊन खुशीहाल करून पुसो लागले जे तुझें नांव काय आहे. तूं या जागीं हात काये निमित्य राहिलास. मग तो धनगर बोलिला जे माझें नांव हेमगवड. हे जागा पहिले वीरसंगीया म्हणोन राज्ये करीत होता आणि

परमेश्वराचा भक्त होता आणि त्याचे आंगीं करामतहि बहूत होती आणि धर्मपरायण गोब्राह्मण प्रतिपालक आणि हरीकथापरायणश्रवण आणि नीत्य पुराणपठण आणि सदाशिवाचें भजन ऐस ते वेळेस जहाले. आता दुसरा मुदासूद भालगीस भाल्हेराव म्हणून राज्य करीत होते आणि भास्करराव होता आणि चिंचोलीस सिदगिरी भाल्हे-राव होता व कल्याणीस बेलराव होता व बीजनगरी बीजराव होता व चाळकापुरी चाळकराय होता. ऐसे श्रीभक्त राज्यें करीत होते. ते अवघे संपोन गेले. मी एक धनगर बकरीया चारी बैसलो आहे. तुम्ही पातशाहा आहां. जे काय होतें ते हकीकत साहेबाचे चरणी जाहीर केलें. हें कथानक थोर आहे. मीं काय सांगू ऐसे बोलता पातशहाजीने बहुत खुसी होऊन त्यास कपडे देऊन पुसो लागला जे हे भोये बहुत मरदानी आहे. आम्ही कोट बांधो म्हणतो तर तुझे मनास कैसे येते सागणें. मग धनगर बोलिला जे मी तुझी रयत जातीचा धनगर मज काय पुसतोस. मग ते स्थानीं डोंगरामध्ये राहून ते जागा कोट बांधून मग त्या त्या कोटाचे नांव हिंदू लोक बेदर म्हणून ठेविले. मुसल्मान शहर अहमदाबाद ऐसे बोलो लागले. त्या बाजत तेथें मोकाम राहिले. पातशाही करूं लागला. आपले नांव हासन गंगू बामनी पातशहा तैसे आपले किताबतीमधे लेहून घेतलें. कोट बांधिल्यावर मग दोनी तीनी थट्टराजे केले. मग त्यास एक पुत्र जाहला. तो पातशहाखुदायेमिस्त पावला. मग त्याचा घुमठ बांधिला. मग तेथेहि करामती बहुवजेनें चालविल्या. मग मुसल्मान अहमद सुलतान शहा ऐसे नांव ठेविलें. मग तो हि पातशाही करूं लागला मग उतरेकडून एक फकीर मरवतमशहा म्हणून खाणज्या आला. त्यानें येते वेळेस मायेची रजा घेतां ते बोलो लागली जे तुला काय उणे जहाले. तिकडे जाऊन दोन्ही हाती खासी ऐसे बोलतां मग तो मायेंची बगररजेनें पातशहाची भेट घेतली. मग पातशहाने त्यास आपलेपासी ठेविले. मग पातशहानें आपला हुकूमत दिधिलियानें आपले मनी बोलू लागला जे मायनें तिकडे जाऊन दोन्ही हाती काय खासील ऐसे हिणावले म्हणून आंबो. याची जहाडे (झाडे) लाविली. तेव्हां दक्षिण विलायेतीमधें प्रकट जहाले. पाहिले हे विलायेतींत आंबे नव्हते. मग त्यानें कोटाबाहेर एक मजलस बांधायास यत्न लागला-जे... वयदा करून ते जागा वाहू लागला जे ऐसी यास ते जागा पहिले बुनीयादी लोहारवर होते. तो दुकान घालून आपला उदीम करीत होता. मग मजालस बैसावयास तो जागा पाहून चौकसूद पाहन बुनियादी शोधिती लोहाराचें घर उठो लागले. मग मल्कुमखानजादा बोलो लागला जे हा जागा काय काय केलीयास सोडणार नाहीं. मग मल्कुमखानजादा पातशाहास बोलो लागला. मग पातशाहीने त्यास बालावून बहूत रितीने खातरनिशा करून बोलिला जे तुज जागा पाहिजे तर जागा देईन. पैका पाहिजे तर पैका देईन. गांवमोकासा पाहिजे तर गांवमोकासा देईन. ऐसीया कांहीं केल्या तो लोहार एकीनासा जहाला. तर लोहार बोलो लागला जे तू मजवरी जुलूम केलीया तुझें नगर सोडोन बाहेर जाईन. परंतु जागा देणार नाही. जुलूम करून घेत असाल तर माझें कांहीं चालणार नाही. ऐसे बोलता पातशहा बोलिला जे जुलूम जाचती आम्ही

कोणावर करणार नाही. मग तो जागा सोडोन मजालसी बांधिली. परंतु तो जागा तैसाच राहिला. मग लोहाराची पिढी दर पिढी अद्याप तेथेंच नादत आहे. तो पादशहा धर्मराज करीत होता. त्या बाजत पिढी दर पिढी परयंत पादशाही तेथें केली. त्या बाजद सुलतान करीमुल्ला याचें छत्र पुढे चालले. मग त्याचे वेळेसी साबाजी अनंत सेकदार करीत होता. तो चवसष्टी कलाविद्याप्रविण परनारी सोदर म्हणवून त्याचे धीर गंभीर उदार गोब्राम्हणप्रतिपालक निराधिरीयासी आधार म्हणवून जाहीर जहाले. त्याचे वेळेसी घोडाराउत गणती जहाली होती कीं नर्मदेपासून दक्षिण विलायती व कृष्णा धरून व श्वेतबंदरामेश्वरापासून व कर्नाट अच्चुत राये व कृष्णराये राज्य करीत असता मग पूर्व दिसेस उडीया जगन्नाथ म्हणवून राज्य करीत करीत होता. त्याचे नाव नरपति ओडिया जगन्नाथ. मग सुलतान अह्मदशहा राज्य करीत होता. मग त्यावरी सुलतान करीमुल्ला दवलताबादेहून पैदा जहाला. तेच वेळेसी साबाजी आनंत होता, त्याची त्याची कीर्ति दूरवरी विस्तारिली म्हणून ते गोष्टी ऐकून त्याचे विद्येची परीक्षा घ्यावयासाठी शहर बैदरची कलवातीन तेही विद्याबंद होती. त्या कलवातीने आपले जमावानीसी बेदरापासी कमठाणावरील येवून उतरली. तिजपासी घोडाराऊत चार हजार पावलोक पांचशे हती सुमारे वीस उंट सुमारे शंभर व नगारे दहा भांडेदार घेऊन आली. ते गोष्टी सांगता अजब तमासा ऐसीयास ते कलवातीन आपले पालखीत बैसोन खरा जंगले देखोन उतरले आणि आपली विद्या जे काय होती ते रागज्ञान करून...गंधर्व गायन करूं लागले. मग जितकी हरणे होती तितकीं हरणे जवळ येवून उभी राहिली. मग त्यांतून एक हरणाचे गळां नवरत्नाचा हार आपले गळांतून काढून त्याच्या गळा घातला. मग आपले पालखींत बैसून आपले बिन्हाडास येवून उतरले. मग दुसरे रोजीं पातशहाचे सदरीस येवून उभी राहिले. फिरोद केली कीं तुझे भर दरबारामधे मजवरी चोर पडले. माझे गळाचा नवरत्नाचा हार हे माना काय आहे. हा दरबारामधे मुनसबी नाहीं. हे गोष्टी ऐकून पातशहा हैरान जहाला. ते वक्ती राजेश्री साबाजी अनंतास बोलावून आणून पुसो लागला जे चोरांनीं कलावातीणीवरील घाला घालून गळ्याचा नवरत्नाचा हार घेवून गेले. म्हणून फिर्याद करीती. हे काय माना ते मना आणून तलास करून देवणे. मग राजेश्री साबाजी अनंत आपले घरासी जावोन आपले आत्मज्ञानामधे विचार करून पाहता रांडेन तकसुबी करून आली आहे. हार हरणाचा गळा घालून फिर्याद आली आहे. आपण ऐके दिवशी रागज्ञानेकरून हरण आपणापाशी आणोन तैसीच हरणें पातशहापासी नेवून उभी करविलीं. मग पातशहान त्या कलवातणीस हुजूर बोलावून आणवून ते हरणे दाखविली. पुसो लागला कीं हें मायना आहे. तूंच चोर आहेस आणि हरणाचे गळां हार घालून आणि आपणावरी घाला पडला म्हणून फिर्याद जहाली. मग कलवातीण पातशहासी मुजरा केला. मग बोलली कीं म्या साबाजी आनंताची कीर्त दूरवर ऐकिली. ऐकोन आली कीं चवकलापूर्व गुणी गंभीर उदार च्यातुर ह्याची परीक्षा पहावयास आले आणि तुम्ही

पातशहा या गोष्टीची समस्या पुरविली पाहिजे. नाहीतरी तैसी च तुमची कीर्त अपयश घेऊन जाईल. हें राजीयाची सत्व जाते. आतां दुसरा मतलब आहे कीं साबाजी आनतासी भोग करावा असा अर्ज करून आपली विद्या संपूर्ण जे काय होती ते दाखवून पातशहास खुसी करून पातशहान सदर बकसीस करूं लागला व घोडे सीरपाऊ ऊंच कपडे चादरा नाना जिणसाची वस्त्र भूशने इनाम गांव मोकासे देत होता. परंतु न घेता बोलों लागली कांहीं मजला लागत नाहीं. साबाजी अनंतास मज एक रात्रीं दिल्हा म्हणजे सर्वेहि पावले. यैसे यैकोन पातशहा हैरान होऊन बोलूं लागला जे हे गोष्टी तो बहुत अजब आहे. माझेन हे काम होत नाहीं साबाजी अनंत तो परनारी सोदर आहे. यैसीयास तुझे तूच त्यास पुसने. हे बोलोन यैकोने साबाजी अनंत उभा राहून पातशहाजीस अर्ज करूं लागला जे हे गोष्टीचे तिचे समाधान पुरवितो. काही चिंता नाहीं. म्हणून कलवातिणीस जाब दिल्हा जे आज सायंकाली आमचे घरासी येणें. यावरि आपण घरासी जाऊन तजवीज करून सिडीचा पाये कढून टेविला की वरील चढता पाव दूर पाडिला सारिखी विद्या केली आणि आपण उपर माडीवर जाऊन पलंग घालून वाट पाहात बैसला. घरचे लोकास ताकीद केली जे कलावात आलियावरी हे स्थळ दाखवणें. यैसीयासी ते कलवातीण रात्री प्रहरी एक जाहाल्यावरि परिमल द्रव्ये व पान गंगेरी व सुपारी कापुरी कातकेवडा वस्त्रें उंच पराव करून साबाजी अनंताच्या घराप्रती जाण्यास तयार जाहाली' सांगाते आले दूति दोनी चारी घेऊन आली. मग साबाजी अनंताच्या घरासी लोकांस पुसों लागली जे पंत कोण्या जागीयांत आहेत. ते स्थल सांगणे. हे गोष्टी पंती यैकोन तीस उत्तर दिल्हे की हे जाग्यांत बसलो आहो. उपर माडिवीर येणें. मी सिडी लाविली आहे. ते चढोन येणें. यैसीयास ते कलवातीण सिडी चढो लागली. तीन पायेरिया चढली. पुढें चढावयास पाव न पुरे. कैसी वरि येऊं म्हणउन शोध करिता मग साबाजी अनंत हासोन आपण खासा येऊन हात इकडे देणें म्हणउन तिचा हात धरून तिची मदनाची सिरकला दाबिली. मग तिचा मदन पलोन लुगडियांत खलोन वीर्यें गेले. वासना भोगाची राहिली. मलुल होऊन शरमिंदि जाहाली. ते लज्या सांगतां येत नाहीं. मग काही आपले बोलणे चालणे कला कुशलता व कथा वार्ता करून रात्र क्रमिली मग नमस्कार करून तू माझा बाप मी तुझी लेक म्हणून निरोप घेऊन रात्री दोन तास असता आपले घराप्रति गेली. मग प्रातःकालीं पातशाहापासी सलाम करून सांगों लागली जे साबाजी अनंत परनारी सोदर हे खरेच आहे. सौसष्ठ कला-परिपूर्ण ज्ञाता हे खरे आहे. .. त्रिभुवनामधे नाही हे कोठेहि होणार नाही. यैसी वाखाणू लागली. यावर मग दुसरे रोजी पातशाहाचा निरोप घेऊन आपले नगरासी माघार फिरली. यैसा मतलब जाहाला. पेस्तर आतां दुसरें पुढें काय अरिष्ट होईल ते पाहाणे

जे हे बोलणे जाहाले ते पातशहाचे राणीवसात जाहीर जाहाले जे साबाजी अनंत दिव्य पुरूष अति सुलक्षणिक विद्यापूर्ण गुणगंभीर उदार चतुर त्याचे भेटीस

कलत्रातीण त्यास भोगावयास आली होती म्हणऊन कळले. त्यावरी पातशहाची बाईल मनामधे विकार धरून कुबुद्धि धरून ते आता पुढे शाहाणपण धरून कोण्हे येके दिवसी प्रेत्न करून आपले घरापासून साबाजीपंताच्या घरापावेतो साबाजी अनंताच्या निजल्या घरच्या पलंगापावेतों खाणून सुरूंग केला. हे चरित्र स्त्रीचे चरित्र कलेना जे देवा अगोचरि त्यापून अधिक केलें. ते तुम्ही पाहणे येक पाहून येक दिवस बरवा मुहूर्त वेल बरवापाहून ते दिवसी रात्री मधानी आपले महालांतून उठोन साबाजी पंताच्या पलंगापासी येकायेकी जाऊन उभी राहिली. मग पंताचे पायावरि डोई ठेऊन पंतासी उठविती जाहाली. मग पंत घाबिरे होऊन उठून... की पातशाहाची राणी आहे. हे कयसी (कैसी) आली. हे काये आश्चिर्य आहे म्हणऊन आपले जागा घाबिरा होऊन दंग जाहाला. आपले ठायी तजवीज करून लागला जे की आपले अस्टी आज आमची हयात खुंटली यैसे भविश्य केले. मग पातशहाची राणीस बोलला जे तू माझी माता मी तुझा बेटा आहे. हे गोस्टी बरवी नव्हे ...मध्ये घर बुडवायासी काये निमिते आलीस. बर आता जे वाटेने जैसी आलीस तैसी जाणे म्हणऊन निरोप दिल्हा. ते बायको आपले माहालासी जाते जाहाली. मग राजेश्री पंत बहुत दिलगीर होऊन निजल्यावरी मग पातशहाची राणी कपाळावरी मुंट घालून निजली. दुसरे रोजी पातशहा तिचे महालासी आल्यावरि पाहता राणी निजली आहे यैसियास पुसता बोलली तू दादुलपणे...तूं सिरावरी असता मजवरि हे ...तुझा कारकून साबाजी अनंत याने सुरूंग करून माझे महालासी येऊन मज झोंबला आहे. हे लटके म्हणाल तर सुरंग दाखविला, मग पातशाहा बहुत हैराण होऊन क्रोधसंतप्त जाहला. मग पातशहानें तेच वक्ती साबाजी पंतास बोलाऊन आणून पुसन येतां येकायेकी हातीच्या पायाखाले घालून मारिले यैसा आहवाल जाहला. मग साबाजीपंता मरते वेळीं श्राप दिल्हा की तुझें भाग्य सर्वही जाईल औसा बोलिला. मग प्राण सोडिला. रांडेचे बोले मारिलें. मग त्याचे बारा तेरा दिवस जाहले. क्रिया कर्म जाहले मग परस्परे खबर ऐकिली कीं नाहक बायकोन तुफान घेतले. साबाजी अनंताचा गुन्हा काही नाहीं. मग बायकोस मारिले. मग पातशाहास ब्राम्हणहत्या लागली. त्या दोषेकरून पातशाहा दिवाना जाहला. त्याची गोहि कोणीहि मानीना सारिखे जाहली. मग थोर थोर वजीर च्यार चहुकडे बिघडोन गेले. मो(का)सी लोक होते ते हि निघोन गेले व कारकूनहि निघून गेले धामधुमहि राजकारणे मांडिले. जवळ सलगी नाती नाहीसी जाहाली. शहर बेदरी मलिक अंबरी सरफदारी करीत होता होता तो च पातशाही करू लागला. यैसी अहाकिनी जाहाली. तेच वक्ती पातशाहास जेर बक्स अलियावरी मग आपले छेत्र (हरीबास?) देऊन आपण खुदायेभिस्त पावला. ईदलशाहा पखालजी होता व निजामशहाचे हवालासी कारीकुर (कारभार) होती व मलिक अंबरियाचे हवाला खिजमत होती. ते च पातशाहास... बरी पारखे जाहाले. आपले जागा पातशाही करूं लागले. तबीपासून सुलतानाची

पातशाही बुडोन गेली असे आमल जाहाले ते टाउक होय ते हकीकत जाहीर जालिया बजद बरहुकूम मालूम नाही. आऊर हकीकत कमजास्त असलिया चार वजीर चहुकडे नामजाद केले होते तेच तेच विज्यापुराकडे विदलशाहा होता व दौलताबादेस निजाम- शाहा होता यैसे वजीर तिकडील तिकडेच राहिले तेच जागा पारखे करून विलायेति बाधुन बलकाविली. आपणच खावंद जाहाले. बरिदाची पातशाही तधीपासून जाहली व मलिक बेदरी त्यास पातशहानें आपला जीव दिल्हा, तो शहर बेदरी पातशाही करूं लागला. यैसा अहावाल जाहला. तो बंदगीस रोशन होय. हे अर्ज साहेबाचे मामापासी जाहीर केला. छ ४ माहे जमाहिलावल किल्क नाम संवत्छरे मार्गश्वर माघे सुधि चवथी अदितवारी (२४ नवंबर १७२८) समाप्त. लिहिते माहादाजी जयेवंत राऊ देसपांडे प्रा अटपाडी, याचे असे हे बखर

भा. इ. सं. मं. षाण्मासिकवृत्त, शके १८३४, भाग २ रा, स्वी. ग्रं. क्र. ४, पृ. २०६–२१३.

## (–४८४–)



शेख हुसेन मुजावर — शेख अबदुल रहिमान मुजावर

शेख मसूद मुजावर — शेख शरीफ मुजावर

शेख शिलेमान मुजावर — शेख इब्राहिम मुजावर

भा. इ. सं. मं. त्रै, व. ७, अं. १-४, पृ. ३३.

## (-४८५-)

[बाजी प्रभु देशपांडे याच्या मुलाचें पत्र]

आपले इनाम गांव व इनाम सेतें गांवगना व हक .. (फाटलें) कारकिर्दी निजामशहा चालत आ .. (फाटलें) असतां दरमियान देसमुख ता। मजकूर दिवाणासीं गैररूजु होऊन पुंडावे करूं लागला. आपले वडील मारिले व जखमी केले. बी ता—

पिलाजी प्रभु पणाजे जीवेंच मारिले १
अनाजी प्रभु चुलते जीवेंच मारिले १
कृष्णाजी प्रभु आजे जखमी केले १
आपले बाप बाजी प्रभु जखमी केले जखमा सुमार ४७., परंतु वाचले

येणेंप्रमाणे मारेचुरे करून आपले गांव इनामती व सेतें व हक चालों दिल्हा नाहीं. तरी पादशहा मेहरबान होऊन करीना मनास आणून आपले वतन आपणांस बहाल केलें पाहिजे म्हणून इलतमास पोंह्चाविली. त्यावरी पादशहा मेहरबान होऊन दिवाणास हुकूम दिल्हा कीं देसकुलकर्णी याचे हमशाही देशमूख व देशपांडे येक जागा करून त्यांचा करीना मनास आणून यांचें वतन यांचे दुमाले करणें. (फाटलें)

महाराष्ट्र-साहित्य, व. १, अं. १, जुलै १९१९, पृ. ३३.

## (-४८६-)

[बाजी प्रभु देशपांडे यांची वंशवेल]

पिलाजी (बादल देशमुखानें ठार मारिले.)
- बाळाजी
- कृष्णाजी (बांदलानें जखमी केले.)
  - बाल्हो
  - अनाजी (बांदलाने ठार मारिले)
  - फुलाजी
  - बाजी प्रभु
    - बाजी प्रभूस बायको दोन पुत्र आठ




महाराष्ट्र–साहित्य, व. १ अं. १ जुलै १९११, पृ. ३०–१.

## (–४८७–)

[सरदार बाजी देशपांडे यांच्या घराण्याची वंशावळ]

१ पिलाजी

- १ बाळाजी
- २ कृष्णाजी
  - १ वाल्ही
  - २ अनाजी
  - ३ फुलाजी
  - ४ बाजी (पुत्र ८ बायका दोन)
    - सोनाई १
      - १ महादजी
        - बाजी
        - मैराळ
      - २ मोरोजी
        - त्र्यंबक
      - ३ रामजी
        - रखमाजी
    - गोतमाई २
      - १ एसाजी
      - २ बावजी
      - ३ हरजी (२)
        - खंडेराव (२)
          - श्रीनिवास (४)
            - राजेश्वर (५)
        - भास्कर
          - रघुनाथ
            - खंडेराव
      - ४ विसाजी
      - ५ मताजी
        - गोविंद

| विठ्ठल | वामन (६) | रघुनाथ |
|---|---|---|
| । | । | । |
| रामकृष्ण | लक्ष्मण (७) | विनायक मृत्यू बुधवार ज्ये. ब. ६ ता. ४-६-१९ |

* ह्यात सुभेदार बहादर अफगाणवार.

महाराष्ट्र-साहित्य, व. १, अं. ३, सप्टेंबर १९१९, पृ. १००.

## (-४८८-)

कैलासवासी स्वामी राज्य... (फाटले) बाजी, देशमुख कृष्णाजी नाइक बांदल... (फाटलें) ऊन राजश्री दादाजी कोंडदेउ यासी युध्य प्रसंग करून गैररूजु जाला. त्यावरी राजश्री दादाजीपंती कृष्णाजी बांदल देसमुख धरून चौरंग केलें. त्याचे वतन अमानत केलें. त्यास आपले बाप बाजी प्रभु व दिपाई बांदल देशमुखीण व देशकअम ........पत्र घेऊन राजश्री... स्वामीपासी हुजूर हाजीर जाले. त्यावरी राजश्री स्वामीस आपले बाप बाजी प्रभु याणी इनामंती गांव इनाम सेतें येविसी अर्ज केला. त्यास राजश्री स्वामीनीं अभये दिल्हें कीं मसलत सुरू जालीयावरी तुमचे तुम्हांस देऊं. म्हणून बराबर घेऊन गेले. कितेक स्वामी कार्ये केले. त्यास पनालाहुन विशालगडास येतां गजापुरी युद्ध जालें. तेथें साहेबकामावरी आपले बाप बाजी प्रभु पडिले. याक रित वतनाचा प्रसंग होऊन आला नाहीं. आपण घ्यावें तरी आपला नेणतपणा. याकरित राहिलें. त्यावरी करून घ्यावें तों राजश्री स्वामीनीं कुलवंतदारांचीं वतनें अमानत करून मोइनी करून दिधली. त्यावरी तुलापुर प्राा पुणें येथें अवरंगजेब पादशहा याचा मुकाम जाला. तेथें निजामशाही व अदलशाही व कुतुपशाही यैसे कुलवंतदार जमा जाले.

महाराष्ट्र साहित्य, व. १, अं. १, जुलै १९१९, पृ. ३४.

## (-४८९-)

श्री

हाकीकत रंगो बापूजी धडफले पुणा आले कारकीर्द निजामशा पातशा दौलतबादचा आंमल मलिक आंबर पातशाही दिवाण याचे तर्फेनें सिदी याकूब व रंजितराये पुणे ठाणेदार होते. शके १५०२ ताा शके १५५१ (१५८०-१६२९ इ.) मलिकंबर याणी मुलूख वैराण वोस पडिला. झाडी होवोन जनावर बहुत जाले. दुर्गादेवीचा काळ तीन वरषे पडिला. थोर जागा वस्ती राहिली. पुढे दाहा बारा बरषे मुलकात वसती नाही. मार्ग चालेना. तेव्हा मलकाबर याणी रयेतीस आणून वसती केली. काटवण तोडिले. गावच्या

सिवा करून तनखा करून जमाबंदी जाब्ता केला. सिवेचे नेम वही दाणे जमीन जुमले कानगोहोच्या दप्करी असे. मलिकाबर याणी खडकी पेठ वसाहत करून कौल दिल्हा. सशाने लांडगा मारिला म्हणौन वसती केली. हैबतखान व चिंगसखान मनसबदार होते. हरएक इनसाफ करीत होते. मल्कापुर पेठ केदारवेसी सनिध केली.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, स्वी. ग्रं. क्र. ७, पृ. ३७५.

## (-४९०-)

[मदारी मेहेतर]

श्री

सेवेसीं विज्ञापना ल्याहावया कार(ण) यैसे जे प्रथमचे पादशाही पासून चालत अले. विज्यापूरच्या पातशाचे वजीर शाहाजी राजे हे विज्यापुरात पातशहा संनीध होते आणि सिवाजी राजे हे रायगडास होते. तेंव्हां दिल्ली हस्तनापूरच्या पातशहान देशमुखी सिवाजी महाराजास देतो मणऊन आपले तरफेन सवाई जैसींग राजे व मिराजी राजे जैनगरवाले व दलेलखान या त्रिवर्गास पातशहानी माहाराजाकडे रवाना केलें. तेव्हां तिघ उमराव सिवाजी राजे याजपासी येऊन हकीकत जाहीर केली की तुम्हावर मेहेरबान होऊन तुम्हास देशमुखी द्यावी यैसा निश्चये केला आणि आम्हास साहेबाकडे रवाना केलें. त्यास आपण अले पाहिजे. ते समई माहाराजानी खुशाली मानून तिघा उमराव याजबराबर दिलीस गेले. पातशाची भेट घेतली. पातशहानी माहाराजाचा बहुत सन्मान केला. तो कांहीं दिवस विसरा पाडून... करून माहाराजास अटकेत ठेविले. तेंव्हा माहाराजास संकट पडले. उपायें दिसेनासा जाला. चिंतागत जाले. ते समई हिरोजी फरजद जवळ होता. त्यास महाराजांनी उपाये सांगितला की मिठाईच्या डाल्या तयार करणें म्हणून. माहाराजानी आपले सेवकास सांगितल आणि दरोग्यास सांगितल की डाल्या करावयाबद्दल पातशहाचा हुकूम घेणें. तेव्हां दरोगा पाछाया संनिध जाऊन हुकूम मागितला. त्यास पातशहान दरोग्यास विचारलें की सिवाजी राजे मिठाई कशाची वाटतात म्हणून विचारलें. तेंव्हां दरोगा म्हणून लागला की सिवाजी राजे म्हणतात की पूर्वीपासून आमचे व्रत चालत आले आहे. आज काही अटकेत आहो म्हणून आपला नेम न करावा यैसा अर्थ नाहीं. साहेबी हुकूम दिल्हा तर नेम चालऊं नाहीं तर न करूं. यैसे म्हणताच पातशहानीं हुकूम दिल्हा आणि डाल्याच्या मोईनी केल्या. पहिली डाली पाछायास पाठविली. दुसरी डाली उदेपुरच्या राजास पाठविली. तिसरी डाली जयेनगरच्या राजयास पाठविली. यैसे नेमणुकाप्रमाणें च्यार राजे वगैरे उमराव व मुत्सदी यासी डाल्या सहा महिने पावेतो पाठविल्या. सुदांमत चालले. मागती चवकीदारास सांगितल की डाल्याचा झाडा कशास घेता.

म्हणून राबता मोडला. ते समई हिरोजी फरजंद बोलाविला आणि दरोग्यास इतबार देऊन राबता पाडला. तेव्हां हिरोजीस महाराजांनीं बोलाविल आणि विचारल की ये समई संकट पडल आहे. तर माजे जिवाचे सारथी कोण कोण आहेत. तेव्हां हिरोजी फरजंद बोलिला कीं साहेब जे समई आज्ञा करतील ते समई हिरोजी फरजंद व मदारी मेहेतर फरास हाजर होऊं. हुकूम करावा. यैस म्हणताच हिरोजी फरजंदास आपला अंगचा पोशाख दिल्हा. तेव्हां सर्व गोस्टीचा प्रकार महाराजांनीं हिरोजीस निरऊन सांगि(त)ल जे आमचे स्वरुप होत तेंणे प्रमाणे तुम्ही रुप पालटून आमचे पलंगावर निजण व मदारी मेहेतर यास सांगितलं की हा मनसुभा तीं सिवाये फूट पडू न देण. यैस बोलून दोघांपासून महाराजानी क्रिया घेतली. इमान जाले. इमान जहालियावर मिठाईच्या डाल्या काढल्या. काढल्यावर राजयास डाली मधे बैसविल. सरपोशे वर टाकिला. तमाम डाल्या निघाल्या. महाराज कासीस गेले. तेथून आपले देशास आले. आल्यावर माघेमाघ पुकार जाली. तेव्हां पातशहा दरोग्यास पुसु लागले की महाराज काये करितात. तेव्हा मदारी मेहेता बोलिला की राजयाच्या जिवास समाधान वाटत नाहीं. यैसे म्हणताच पातशाहानी थोर थोर उमराव माहराजाच्या समाचारास पाठविले. ते पलंगाजवळ आले. तो उशास हात ठेऊन निद्रा केली. तो उमरावानी हात पाहतांच परीक्षा केली तो राजा नव्हे. तेव्हां पदर तोंडावरला काढला. तो हिरोजी निजला होता. त्यास पुसूं लागले की राजा काये जाला. तेव्हा हिरोजीस पाछाया जवल नेल. तेव्हा पाछाया पुसो लागला की महाराज काये जाले. तेव्हा हिरोजी म्हणून लागला की साहा महिने जाले माहाराज आपले देशास गेले. ते समई पातशा क्रोधायेमान होऊन बोलिले की हिरोजीची गरदन मारा म्हणून इतराज जाले. हजरतानी सुखरुप सिरछेद करावा. हा जीव महाराजावरुन सतका केला असे. यैसे म्हणताच पातशा मेहेरबान जाले आणि म्हणो लागले की इमानी चाकर हलाल आहेस. मेहेरबान जालो. काये मागतोस ते मागण. तेव्हा हिरोजीन मागितले की मदारी मेहेतर व मजला यैस दोघास जीव माफ करून आज्ञा द्यावी. तेव्हां पातशहानी सिरपाव देऊन सर्वत्रास निरोप दिल्हा. तेव्हा समस्त निघोन रायेगडास आले. माहाराजास मुजरे केले. ते समई माहाराजे मेहेरबान जाले. सिरपाव देऊन हिरोजीस अवघे किल्याच्या इमारतीचा हावाला दिल्हा व मदारी मेहेतर यास पोशाख व सोन्याच्या कड्या सुधा इनाम दिल्हा. ते समई तख्ताची पूजा भरजरी बादली चादर व मोहरा ५ पांच व ताडपत्री पासोडी १ यैसे कानु करून मेहेरबान होऊन बकसीस केल. श्रीमंत माहाराज शाहाजी राजे व शिवाजी महाराज शिवाजी महाराजाचे लेक संभाजी महाराज याजबरोबर मदारी मेहेतर याचा लेक सादुला मेहेतर फरास हे (होते). संभाजी महाराज याच भाऊ सावत्र भाऊ राजारामसाहेब यानी चंदीच व पनालाच राज्य केल. याजबरोबर सादुला मेहेतर याचा चुलत भाऊ सांगात गेला. आमदखान मेहेतर फरास राजाराम महाराज याजबरोबर गेल. राजश्री संभाजी महाराजाबरोबर नोकरीस सादुला मेहेतर

आले. आणि संभाजी महाराजास अवरंजीब पातशहानी धरून नेल ते समई सादुला मेहेतर सांगात नौकारीसी गेले होते. तेथून संभाजी महाराजास देवाज्ञा झाली. मागती शाहू महाराज याजबराबर जमण मेहेतर महाराजाची सेवा करीत होत. जमण मेहेतर हे हरालीचे भारे व काशाच भारे विकून पोट भरीत होते आणि पातशहाचे कैद मधे महाराजाची चाकरी करीत होते. तेव्हां पुढें माहराज येऊन तख्तावर बैसले. ते समई महाराजानी मेहेरबान होऊन जमण मेहेतर यास तक्ताची पूजा व इनाम इक्राम दिल्हे. यासिवाय चवरंगाची... व वाटणी ·· व अंगाचा पोशाख ते समई असेल तो सेवट पर्यंत देत आले. त्या मागे आईसाहेब व रामराजे याणी राज्य केलें. त्याज़पासी महमदखान फरास होते. आजपर्यंत सुदामत चालत आले. श्रुत होय हे विज्ञापना.

भा. इ. सं. मं. त्रै., व. ४, अं. १–४, पृ. ३७–३९

## (–४९१–)

[ कोल्हापूर येथील पारसनवीस यांची हकीकत ]

श्री

आमचे मूळपुरुष, नीळकंठराव येसाजी हे खंडाळेतर्फेचे देशकुळकर्णी मौजे चऊल नजीक अल्लीबाग येथें राहत होते. यांसीं पारशीं संस्कृत लिहितां वाचतां येत होतें. यांसी श्रीमंत महाराज शिव छत्रपती शककर्ते यांहीं आणून आपले जवळ पारसनाविसीची नोकरी देऊन ठेविले. हे श्रीमंत महाराजांबराबर स्वारी मोहिमीस जात असत. श्रीमंत महाराज आलंगीर ऊर्फ औरंगजेब दिल्लीचे पादशाह यांचे भेटीस दिल्लीस गेले. तेव्हां नीलकंठराव बराबर होते. पादशाहाची भेट झालेवर श्रीमहाराजांवर पादशाहानी गैरमर्जी होऊन पादशाहांनीं महाराजांस दिल्लींत प्रतिबंधात महाराजांचे ज्येष्ट चिरंजीव शंभु छत्रपति यांसहित ठेविले. तेव्हां नीलकंठराव यांणीं, स्वारीबराबर आलेली फौज व सरदार मानकरी यांशी फौजेनिशीं रायगडास परत पाठवून आपण थोडी मनुष्यें बराबर घेऊन दिल्लींत राहून दिल्लीचे कोतवालास अनुकूळ करून घेऊन कांहीं दिवस गेल्यानंतर एके दिवशीं महाराजांस चिरंजीवासहि दोन पेटाऱ्यांत बसवून दिल्लीचे हद्दीबाहेर काढून आणून महाराजांचा व आपला वेष बदलून गोसाव्याचें सोंग घेऊन मथुरेस जाऊन फिरत फिरत रायगडास आले. नंतर महाराजांनीं आपल्यास पट्टाभिषेक करून घेणेंचा निश्चय करून गागाशास्त्री यांस काशीहून आणविलें. शास्त्रीबावा यांणीं महाराज क्षत्रियकुलांतील आहेत, अशी आपली खातरी करून द्यावी म्हणजे आम्ही शास्त्रयुक्त विधीनें पट्टाभिषेक करू. असें सांगितल्या वरून महाराजानीं नीलकंठराव यांसी उदेपुरास पाठवून उदेपूरचे राजाकडून महाराज हे उदेपूरचे राजघराण्यांतील आहेत अशी वंशावळ आणवून शास्त्रीबावांस दिल्ही. नंतर महाराजानीं आपल्यास पट्टाभिषेक करून घेतला. तेव्हां अष्टप्रधानांतील पंडित सुमंत याचें मुतालीक हे पद नीळकंठराव यांसीं देऊन

मुतालीक डबीरपंत हा हुद्दा दिल्हा. पुढें श्रीमंत शिव छत्रपति यांचा काळ झालेवर नीळकंठराव हे श्रीमंत शंभु छत्रपति यांचा पक्ष सोडून श्रीमंत राजाराम छत्रपति यांचा पक्ष धरून राज्यकारभारांत पुढें न येतां शंभु छत्रपति यांचे हुकुमाप्रमाणें वर्तणूक करून राहिले. नंतर शंभु छत्रपति यांसीं व त्याचे चिरंजीव शाहू छत्रपति यांसीं औरंगजेब पादशहांनीं धरून नेल्यावर सरदार कामगार यांचे मसलतीनें राजाराम छत्रपति यासी गादीवर बसवून मुलकाचा बंदोबस्त करण्यास सरदारांस सांगून महाराजांस गोसावीयाचा वेष देऊन काहीं मंडळीनिशीं महाराजांस चंदीस घेऊन गेलें. त्यांबराबर नीळकंठराव गेले होते. चंदीचे किल्ल्यांत महाराज होते. ही बातमी औरंगजेब पादशहास समजतांच पादशहानें आपलें सर लष्कर जुलफकारखान यांसी चंदीस लष्कर देऊन राजाराम महाराजांस धरणेस पाठविलें. ते चंदीस येऊन किल्ल्यास वेढा घालून बसल्यानंतर महाराजांकडून नीळकंठराव जुलफकारखान यांजकडे वकीलीस येऊन त्यांजबराबर स्नेहाचे बोलणें लावून त्यास अनुकूळ करून घेऊन राजाराम छत्रपतियांसीं चंदीचे किल्ल्यांतून बाहेर काढून घेऊन स्वदेशीं येऊन साताऱ्यास राजधानी करून राहिले. पुढें राजाराम छत्रपति यांचा काळ झाल्यावर त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव शिव छत्रपति गादीवर बसले. ते राज्य करीत असतां सन १७०७ इसवी सालीं औरंगजेब पादशहा वारल्यावर श्रीशाहू छत्रपति पादशहाचे अटकेंतून सुटून स्वराज्यावर आले. तेव्हां शिव छत्रपति अल्पवयी असल्यामुळें त्यांची मातुश्री श्रीमंत ताराबाई साहेब यांणीं आपले पदरचे अष्टप्रधान वगैरे कामगार मंडळीकडून आपले पक्षास रहावे म्हणोन शपत घेऊन शाहू छत्रपति साताऱ्यास येतांच श्रीमंत ताराबाई साहेब आपले चिरंजीव शिव छत्रपति व धाकटे सवतीचे चिरंजीव शंभु छत्रपति यांसी घेऊन पन्हाळयास आल्या तेव्हां बराबर रामचंद्र नीळकंठ अमात्य, कृष्णाजी परशुराम प्रतिनिधी, सेनापति घोरपडे वगैरे मंडळी आली. तेव्हां नीळकंठराव पन्हाळयास आले. पुढें कांहीं दिवसांनीं नीळकंठराव वारल्यावर त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव बावाजी नीळकंठ यांसी मुतालीक डबीर हें पद व धाकटे गोविंदराव नीळकंठ यांसीं पारसनविसीची नोकरी श्री. बाईसाहेब यांनीं दिली. नंतर थोडे दिवसांनीं बावाजी नीळकंठ मयत झाल्यावर त्यांचे चिरंजीव रामचंद्र बावाजी यांसी मुतालीक सुमंत हें पद दिल्हें. सन १७०९ इ. चे सुमारास शिव छत्रपति यांचा काळ झाल्यावर शंभु छत्रपति गादीवर बसले. त्याणी, कोल्हापूर पन्हाळेस स्वतंत्र राज्य स्थापन करावें, अशी मसलत चालवून आपल्यास नवाब निजाम उल्मुलुक यांणीं अनुकूळ व्हावें म्हणोन त्यांजकडे वकीलीस रामचंद्र बावाजीस पाठविलें. रामचंद्र बावाजींनी नवाबांकडे जाऊन महाराजांनीं नवाबाचे भेटीस जावें असें ठरवून महाराजांची आणि नवाबांकेड भेट करविली. आणि नवाब निजाम उल्मुलुक यांचे मार्फत दिल्लीचे बादशहाकडून शाहू छत्रपति यांसीं राज्य दिलें आहे त्यापैकीं निम्मे राज्य शंभु छत्रपति यांसीं द्यावें, अशी सनद आणविली. तेव्हां शाहू छत्रपति यांचा व शंभु छत्रपति यांचा तह होऊन

कोल्हापूर स्वतंत्र राज्य स्थापन झालें. या मोठ्या कामगारीबद्दल शंभु छत्रपति यांणीं रामचंद्र बावाजींस हल्याळ परगणा ऐशीं हजार रुपये उत्पन्नाचा इनाम देऊन कर्नाटक प्रांताचा बंदोबस्त करण्यास पाठविले. या उत्पन्नाची सनद आहे तिची नक्कल निा १ ची पोटी आहे.

रामचंद्र बावाजी यांणीं हल्याळ परगण्यावर जाऊन फौज ठेवून कर्नाटक प्रांताचा बंदोबस्त करून बहुतेक जमीदार पाळेगार संस्थानीं यांजकडून खंडण्या घेतल्या. रामचंद्र बावाजी यांजकडे टाणीं होतीं त्यांबद्दल बाळाजी बाजीराव पंत प्रधान यांजकडून त्यांस पत्र आल्याची नक्कल निाचारची पोटीं आहे.

रामचंद्र बावाजी म्हैसूरचे नवाब हैदर अली याजबरोबर सल्ला करून म्हैसूरप्रांतीही थोडा अम्मल केला होता. हल्याळ परगणा रामचंद्र बावाजी यांचे चिरंजीव बळवंतराव रामचंद्र यांजकडे टिपूचा अम्मल होईपर्यंत चालत होता. पुढें टिपूनें हल्याळ तालुका काढून घेतला.

गोविंदराव नीळकंठ यांशीं शंभु छत्रपती यांणीं रामचंद्र बावाजीस तालुके दिल्हेवेळीं तीन गांव इनाम दिल्हे. या तिनीं गांवच्या मूळच्या सनदा गहाळ जाहल्यामुळें पुढें श्रीमंत शिव छत्रपति यांहीं खंडेराव गोविंद यांशीं सनद दिल्ही. तिची नक्कल निा दोन व मालवण किल्ल्याचे कारखानिसीबद्दल सनद आहे. तिची नक्कल निा ३ ची पोटीं आहे. तीन गांवापैकीं हल्लीं हरिवंडें व मालवणची कारखानिशी चालत नाहीं. मौजे खबगळें व दापोली हे दोन गांव चालतात. गोविंदराव नीळकंठ यांचे वंशज आम्हीं आहों. याप्रमाणें हकीगत आहे.

~~~~~~~~~~~~~~~~~

चां. का. प्रभूंच्या इतिहासांचीं साधनें, ब. १, अं. १२, जुलै १८८२, पृ. १–३.

## (–४९२–)

### श्रीरामलिंग प्रसन्न

हकीकत पा खटाऊ सन ११०० (१६९१ इ.) कारणे अवल साली पा मजकुरी ठाणे पाद्शाही हिलालखान फोजदार होते. रस्तुमखान सातारेखाली वेढा घालून बैसले होंते. त्यावरी गनीम संताजी घोरपडा व धनाजी जाधव निा राजाराम भोसिले यानी स्वारी करून लढाई जाली. खाने अजमाचे फौज कुल बुडविली. त्यावरी गनीमं वाईस गेले. वाईचा किला पाडून टाकिले. किलेदार लुटून सोडून दिल्हे व जागाजागाची ठाणी होती ती घेतली व गनीम वंदनाखाली येऊन राहिले. हे यैकोन बुधपांचिगाऊ त्यामध्ये महमद अमीन खान सर फौजदार होते. बुधीचे फौजदार खुदायेवद खान व सिदी हिलालखान पा खटाऊ होते. गनिमाची खबर यैकोन ठाणी टाकोन निघोन गेले. ठाणी खाली देखोन गनीम सदरहू फौज घेऊन किले वर्धनगडाखाली नेरी मुकाम केले. पा मजकुरास फौजा
~~~~~~~~~~~~~~~~~

पाठवून कसबे मजकूर व विलायती लुटून तलाख केले. कितेक मख्तासर रयेता धरून किलेवर घातले. कोट पाडीत होते. इतकियामध्ये खबर आली की मन्हामत खान वगैरे पाहशहा फौजा मसुरावरून अवधास अले म्हणौन यैको(न) कोट पाडीत होते ते नेरास गेले. नेरीहून फौज उठोन अवधास पादशाही फौजवरी मुकाबलेस गेलें. पादशाही फौज पाा मजकुरास अले. त्यावरी गनीमहि पाा माा अले. काा मारास वेढा घालून भाडो लागले. जुजवी मुलुक जरा बाकी राहिले होते तेहि लुटून गेले. बारा दिवस वेढा घातला होता. त्यामध्ये पादशाही फौजन कसबे मााचे नौशकराचे बिघे बिगे २५॥ ३० व तरकारी २५॥ ३० यो ५०। ६० बिघे चारी काढून गेले. रणमस्तखान पाा मजकुरास अले, दाहा बाहा रोजे खटावी होते. खटावीचे ठाणियाची उस्तवारी करीत होते. ठाणे कोणी कबूल करीना. मग नबाब रणमस्तखान पादशाही हुकुमावरून मसुर ताास (तर्फेस) गेले. ठाणे खाली पाडिले. देखोन गनिमानी किल्यातून लोक पाठऊन मालिया व घरें जालिली. पाडून किलेयासी नेली. यैसे २० / २५ रोज लुटिले व रयता मुजेरी व मोपलेकडे मोगलाई मुलुकात निघोन गेले. पाा मजकूर कुल खराब पडिले. त्यावरी खाने अजम मामुरखाखान पाा माास अले. कसबे माााराहून कोट पडिले होते ते जागाजागा बाधिले. दांहापधरा रोज जाहाले. त्यावरी नबाब बुदालिकखान पाा माास अले. अशाढ सुध्द दसमी सोमवार (१७ जून १६८९) गावाबाहेर राहिले. पाा माा ठाणे नारो राघो पंचहजारी यांसि दिल्हे. पाा माास कौल दिल्हा जवली पास रयता होता. तियाते धेऊन येऊन जुजवी कसबे व पाा माारी वसाहाती केली. त्याचे धारे माणिक जमाबंदी जाहली. जमा असे. बाकी देहाये बेचिराख व लष्कर मायेवाली बेरीज साल... गुदस्ता साल मजकुरास नुकसान बिताा.

येन देहाये वैरान बिचिराख
५४ मौजे दरजाये
९ मौजे जाब
४७॥ मौजे लोणी
६६८ मौजे जाखणगाऊ
० सुंदरपुर
१९॥ घारपुडी
१०॥ वेनकुल नाा
देसमुख सबब
जमा
२०६॥

लष्कर पायेमली जाहाली लस्कर येऊन मुकाम कसबे माा राहिले जमीन पेरणीस राहिली व शहीर मार्ग चालिल नाहीं जे गोणी अली तीं लस्करांत नेऊन खंडिले सबब नुकसान जाहाले.
१०३८॥ कसबे खटाऊ
४८८॥ मुजेरी
५५० सायेर
काा
१०३८॥

१२४५ ८
जमा
बाकी
७६९॥

फाल्गुण वद्ये त्रयोदसीं मंगलवार ( २५ फेब्रुवारी १६९० ) ते दिवसी शाहाने मौजे नेरावरी येऊन गडास चौकिया देऊन राहिलें १५ / २० पंधरा वीस रोज गडाखाली बैसले. मग गढ सोडोन खटावी मुकाम करून राहिले त्याबाा ( =बरोबर बुदालीकखानाजी आले होते. ते खटावी मुक्काम करून राहिले असेत. शाहाजादा येकदोनी वेला आला गेला. मागती अले .. ... ...

भा. इ. सं. मं. त्रै., व. ८, अं. ३, पृ. १५६-१५७.

## (-४९३-)

[शिवछत्रपतींची बखर]

श्रीमन्महाराज क्षत्रियकुलावंतस राजश्री छत्रपति स्वामी यांचा मजकूर राज्य वगैरे सुद्धां येकंदर सारांशरूप लिहितो कीं, सृष्टीचे क्रमापासून इस्तमाबील तागायत सुमित्र पावेतों, वंषावळ भागवताचे नवम स्कंधीं लागली आहे. त्याउपरी आलीकडे आजपावेतों कोण कोण जाहाले, व त्यानीं राज्यें कोठें कोठें केंली, तो अनुक्रम अनेक ग्रंथांत पाहून येकंदर वंषवृक्ष लिहिली आहे त्यावरून कळेल. सारांश यांचें राज्य, पूर्वी कौशलदेश आयुद्याप्रांतीं होते नंतर चितोड येथें, त्यापूर्वी विभक्तपणें कछभूज व नेपाळ व उदेपूर वगैरे जागजागा, येक येक पुरूष राजधानी करून राहिले. दक्षणप्रांतीं देवराजजीमहाराज आले, आणि फौजसुद्धां राज्य आक्रमण करण्याचा उद्योग करीतच होते. नंतर त्यांचे नांव शिसोदे म्हणोन प्रसिध्द होतें. तें राहून भोसाजी महाराणा यांजपासून भोसावंत म्हणों लागले व पुढें भोसलें असे नांव झालें. तो मजकूर वंषवृक्षावरून कळेल. दक्षिणेत आल्यावर शाहाजी महाराज नगर व विजापूर येथें वजिरी करून होते. पुढें त्यांचे पुत्र शिवाजी महाराज शीव आवतार प्रगट होऊन हिंदुधर्म स्थापिला व राज्य आक्रमण केलें. त्यासंधांत नगर व दौलताबाद व विजापूर वगैरे बादशाह्या तीन कायम होत्या. परंतु महाराजानीं तें मनांत न आणितां धर्म स्थापण्याबद्दल आपले बुद्धी व पराक्रम दाखवून राज्याची अभिवृद्धि दिवसेंदिवस चालविली. त्याकालीं शहाजहान बादशहा दिल्लीस राज्य करित होता. त्याजला चार पुत्र होते. त्यांपैकीं मुरादबक्ष शहाजादा दक्षण काबीज करावे म्हणोन तेथील फौजेसुद्धां रवाना झाला. त्याणें दौलताबाद व नगर वगैरे बादशहातींत आपली जरब बसाविली. त्याचे भयामुळें कित्येक संस्थानी त्यास शरण जाले. परंतु कैलासवासी शिवाजी महाराज याजपुढें उपाय चालेनासा जाहाला. त्याआधीं विजापुरकर यांनीं अबदुल्लाखान व शायस्ताखान वगैरे महाराजांसी युद्ध द्यावें म्हणोन रवाना केले. परंतु महाराजांचे पुण्यप्रभावापुढें त्यांस जयच आला नाहीं. त्या समयांत शाहाजीमहाराज विजापुरी होते. त्याजवर कांहीं अपाय योजावा म्हणून येथील वजीर व आमीरउमराव, मुरारजगदेव वगैरेनीं कुष्टें योजिलीं. तत्रापि शेवटास गेलीं नाहींत. पुढें याच कारणामुळें शिकंदर आदलशाहा यांचे कारकीर्दीस

खवासखान म्हणून वजीर होता. त्याणें शाहाजी महाराज यांस धरण्याचा बेत केला. परंतु ही मसलत शिकंदराचे आईचे मनास न येई कारण, खवासखानाचा बेत आपण बादशाहात करावी असा होता. सबब त्यामुळे खवासखानानें मुरादबक्ष यांसी राजकारण केलें कीं विजापुरची दौलत मी तुम्हास हस्तगत करून देतो, परंतु शाहाजी महाराजांचा बंदोबस्त आधीं केला पाहिजे. त्याजवरून त्यार्णी कांहीं फौज कुमकेस पाठविली. हें वर्तमान शाहाजीमहाराज यांस कळवून शिकंदराचे आईचें व त्यांचे बोलणें होऊन, यार्णी बाहेर निघोन जाऊन खवासखानाचें पारिपत्य करावें; दौलत रक्षावी, असें ठरवून शाहाजीमहाराज निघोन गेले. ते काळीं खवासखानाने दिल्लीवाल्यास हस्तगत करण्याविषई पत्रें लिहिलीं. महाराजांनींहि खवासखानाचें पारपत्य करण्याचें राजकरणाचें लिहिलें. खवासखानाचा बेत शाहाजीमहाराजाचें निघणें जाल्याखेरीज आपल्या हातीं राज्य येणार नाहीं म्हणोन होता. तो अनायासें सिद्ध जाहाला. इतक्यांत दिल्लीवाल्याचे कामगारांनीं शाहाजी महाराज यांस विश्वास दाखवून किल्ले बेदर येथें हस्तगत केलें. आणि खवासखानाकडे पाठवावे असे बेतांत होतें. तों शाहाजी महाराज यांणीं बादशहाची रजाबंदी खवासखानास नाहीं, आपल्याकडे मुखत्यारी वगैरे राजकारणाचे कागदपत्र दाखविल्यावरून, दिल्लीवाल्याचें व याचें राजकारण बळावत चाललें. हें खवासखान याणें पाहून दिल्लीवाल्यासी बदलून गोष्ट सांगितली; परंतु शिवाजी महाराज यांचें चित्तांत खवासखाचे सांगितल्यावरून दिल्लीवाल्यानीं शाहाजीमहाराजांस अटक केली आहे असें आलें. त्यास उभयेताचें निर्मूळ करून मक्केस पाठवीन म्हणोन प्रतिज्ञा करून हर दोघांचा मुलुख लुटींत चालले व ठाणीं घालीत चालले. तेंव्हां दिल्लीवाल्याचे राजे जेसिंग जयपुरवाले, आणखी सरदार मुकाबल्यावर येतील, परंतु उपाय न चाले. तेव्हां मनांत आणिलें कीं दक्षिणेंत यापरता प्रतापी दुसरा कोणी नाहीं, यासी सल्ला केला पाहिजे म्हणोन शाहाजी महाराजांची बहुत मुदारत राखिली आणि शिवाजी महाराजासी स्नेह करावा म्हणोन बोलणीं लाविलीं. परंतु शाहाजी महाराज उत्तरच न करीत. सबब राजे जेसिंग यास लिहून लढाई तहकूफ करून सल्लेचे बोलणें लाविलें. यांत राजे जैशिंग याचें म्हणणें, 'आम्ही सर्व जसे त्यापाशीं आहो त्या अन्वये, आपणहि असावें तें आपणास आपली बाजु असे जाणतात वगैरे बोलून, आपण एक पत्र द्यावें म्हणजे आपले मनांत असेल तसा बंदोबस्त करितो' म्हणोन पत्र लिहून घेऊन मुरादबक्ष शाहाजादे याजकडे पाठविले. तुमची आमची भेट व तह वगैरे होईल असा मजकूर होता. त्याचे उत्तर त्याजकडून आले. वरचेवर त्याणी लिहिले ते फरमान पारशी.

[४९३-१]

(बादशाई फरमान दिल्लीहून कैलासवासी शिवाजी महाराज व शाहु-महाराज यांचे नांवें आलें. त्याच्या नकली फारसी व तरजमा मराठी केला असे.)

फरमान मुरादबक्ष यांचा शिवाजीमहाराज यांचे नांवें, आहे. त्याचें नांव शाहाजहान बादशाहा यांचे नांवचा कारण तक्तावर कायम होते म्हणोन.

दुगरा खालीं
मोहोर शहाजादे
मुरादबक्ष यांची
होती तिची नक्कल

(दुसरा शाहाजादे मुरादबक्ष यांचे तीर्थरूप राज्यावर कायम होते म्हणोन, आधीं त्याचे नांवचा लिहून नंतर आपण कामगिरीवर आले होते. सबब आपली लिहिली असे.)

मुनसी अबदुललतिफ याचें निशाण
मोहोर अबदुललतीफ याची

नंबर १

कवरीद अवतीफ जुमायान, म्हणजे नानाप्रकारचे स्नेह व कृपेस योग्य, कैकुल इनायत वल इहमान, म्हणजे ईहसान व कृपेस पात्र, उमदतुल इमसान, म्हणजे उपमेयोग्य, शिवाजी भोसले यांणीं बादशाही कृपेंचे इछित होऊन जाणावें कीं, तुम्ही खातरजमेचें पत्र आल्यानंतर हूजूर येतो म्हणोन स्नेहयुक्त अर्जी पाठविली, ती पाहिली. ऐसियास तुमचा इतबारी वकील अगोदर पाठविणें. म्हणजे मजकूर समजून खातरजमेचे पत्र पंजासहित पाठविण्यांत येईल. तारिख छ. १० रबीलाबल सन २२ जुलुस मुा सन १०५९ हिजरी. (१४ मार्च १६४९)

(हा तरजमा पत्रांतील हंशील काढून लिहिला आहे. अक्षरशहा लिहिलीयास मजकुर वाढतो म्हणोन.)

येणेंप्रमाणें शाहाजाद्याचा फरमान आला; परंतु शिवाजीमहाराज याणीं शाहाजीमहाराजांचा मजकूर नाहीं म्हणोन उतर दिल्हे नाहीं. सबब दुसरें पत्र आलें त्याची नक्कल.

[-४९३-२]

फर्मान मुरादबक्ष याचा शिवाजी महाराज यांचें नांवे. दुगरा शहाजान बादशाहाचे नांवचा कायम सबब.

मोहर शाहाजादे मुरादबक्ष याची सन १०४९
दुगरा मुरादबक्ष याचा.
नंबर २ दुसरा
माना

इमारत वबियालतपनाह, म्हणजे उमराई सरदारी योग्यतेचें, शहामत वबिसालत दस्तगाह, म्हणजे शूर पराक्रमी, नेक खाहानेखास, म्हणजे उत्तम प्रकारचे दौलतीचे, खुलीसे आकीपत मदान वायखलीस, म्हणजे निष्ठेनें वागणाराचे शिरोमणी, महब्रत ईनायत कामीक, म्हणजे महत कृपेचे पात्र शिवाजी भोंसले यांणीं बादशाही कृपेस आपला सत्कार जाणून समजावें कीं, तुमचे वडीलांच्या गोष्टी मनांत न आणितां तुम्हां सर्वांवर संतोष आहे. अशा समयांत तुम्ही हुजूर यावें म्हणजे पांच हजारी मनसब व पांच हजार स्वार व बहुत इनाम तुम्हांस दिल्हा जाईल व तुमचे भावांपैकीं जे समागमे येतील त्यांसहि नोकरी करतां येईल. यास्तव खातरजमेनें यावें आणि हें पंजाचें निशाण जाहाले आहे यास आपली बाहादारी जाणोन निश्चय ठेउन बादशाही कृपा पूर्ण समजावी. तेरिख छ. १५ साबान सन २३ जुलुस मुा सन १०५९ हिजरी. ( १४ आगष्ट १६४९ )

"याअन्वयें पत्र आले," तथापि शिवाजीमहाराज यांणीं उत्तर दिल्हें नाहीं. व दिवसेंदिवस खराबा करीत चालले. तेव्हां मुरादबक्ष याणीं शाहाजीमहाराज यांस पत्र लिहून त्याजकडून शिवाजीमहाराजांची खातरजमा करावी म्हणोन फरमान लिहिला.

## [ – ४९३–३ ]

फारमान मुरादबक्ष यांचा शाहाजीमहाराजांचें नांवें.

दुगरा शाहजाहान बादशाहचे नांवचा तक्तावर कायम होते सबब

मोहर शाहाजादे मुरादबक्ष याची

दुगरा शाहदादे मुरादबक्ष याचा मुनसी आबदुल लतीफ याचे निशाण मोहर आबदुल लतीफ याची.

नंबर तिसरा ३

इमारत वबियालत पनाह म्हणजे उमराई सरदारी योग्यतेचे शाहमत वबिसालत दस्तगाह म्हणजे शूर पराक्रमी नेक खाहानेखास म्हणजे उत्तम प्रकारचें दौलतीचे खरे खद खुलीसु अकीदत मदान बाय खसाक म्हणजें निष्ठेनें वागणाराचें शिरोमणि महब्रत ईनायत कामीका म्हणजे महत कृपेंचे पात्र शहाजी भोंसलें यांणीं बादशाही कृपेचा आपला सत्कार जाणून समजावें कीं तुमचे पुत्र शिवाजी यांणीं अर्जदास्त हुजुर येण्याविशीची पाठविली ती पाऊन कृपेस कारणी जाहाले. पेशजीच्या गोष्टी मनांत न आणितां तुमची मोकळिक करण्याविषयीं लिहिलें आहे, त्यास हल्ली आम्ही दिल्लीकडेस जात आहों. परंतु तुम्हांस खुषखबर देतो की तुम्ही सर्व प्रकारें खातरजमा ठेवावी जे आम्हीं हुजुर पावलीयावर तुमचे मजकुराविषई अर्ज करून बंदोबस्त करून देऊ. परंतु तुम्ही आपला येक वकील इतबारी पाठवून द्यावा म्हणजे त्या समागमें फारमान कौलाची पंज्याचें निशाहार्णीचें मुा पाठविण्यांत येईल. आणि

तुमचे चिरंजीव संभाजी वगैरे सरकार कृपेस पात्र होऊन पेशजी प्रमाणें मनसबा व नूतन सरफराज्या पावतील. इकडील स्नेह लक्षांत वागणे हें सर्व आपले मनोरथ पूर्ण करून घेण्याचे कारण आहे. जाणोन तसें वागावें. खातरजमा ठेवावी आणि तुम्हां-करितां पोशाख पाठविला आहे हा घेऊन आपल्यावर पूर्ण लोभ आहे असें मनांत आणावें. छ ५ माहे जिल्हेज सन २३ जुलुस हुमायुनईल्हक मुा सन १०५९ हिजरी. ( ३० दिसेंबर १६४९ ) राज खं. ८ क्र. ३)

येणेंप्रमाणें मुरादबक्षाचे पत्र आले. आणि लागलीच शाहाजी यांची रवानगी केली. ते चंदावराकडेस गेले, आणि शिवाजी महाराजांस बहुत प्रकारें लिहिल्यावरून त्यांचे मनांत आलें कीं, आपण युक्तीनें आपलें काम साधावें, व वडील म्हणतात ती गोष्ट खरी आहे किंवा नाहीं हें पाहण्याबद्दल जुन्नर व अमदानगरचे देशमुखीविशीं बादशाहाजाद्यास लिहिले. त्यानीं त्याचे उत्तर फर्मान पाठविला. त्याची नक्कल फारशी व तरजुमा मराठी.

## [ -४९३-४ ]

फर्मान मुरादबक्ष याचा शिवाजी महाराजांचें नांवे.

दुगरा शहाजहान तक्तावर होता सबब. मोहोर मुरादबक्ष याची.

दुगरा मुरादबक्ष जाहाजादे याचा.

नंबर ४

मवर्रीद आवतीफ जुमालमान म्हणजे नानाप्रकारचे स्नेह व कृपेस योग्य लायकुलइनायत वलईहसान म्हणजे इहसान व कृपेस पात्र उमदतुलइमसाल म्हणजे उत्तम उपमेयोग्य शिवाजी भोंसले यांणीं बादशाई कृपेचे इछित होऊन जाणावें कीं, तुमचें पत्र राघोपंत याजबरोबर पावलें, आणि बादशाही कृपेस कारण जाहाले. जुन्नर व अमदानगर येथील देशमुखी विषई लिहिलें, त्यास आम्ही हुजूर गेल्यांनतर हा मजकूर घडोन येईल. खातर जमा ठेवावी. परंतु आपणाकडील येक वकील पाठवून द्यावा, म्हणजे मजकूर समजून घेऊन अमलांतील वकिलानें जो मजकूर विचारून त्याचें उत्तर द्यावें म्हणजे काम होण्यास दिरंग लागणार नाहीं, जाणोन उद्योग करावा. आणि इकडील लोभ पूर्ण जाणावा. तेरीख छ ५ जिल्हेज सन २३ जुलूस मुा सन १०५९ हिजरी इलहम. ( ३० नवंबर १६४९ ). ( राज. खं. ८ क्र. ४ ).

यापुढें मुरादबक्ष दिल्लीस गेले. व दक्षिणेस औरंगजेब मुखत्यार झाले. त्यासहि शिवाजी महाराजांनीं आपला मुलख संरक्षण व्हावा, सबब आम्ही घेतला मुलख आम्हाकडे ठेवावा. आम्ही तुमची मदत करूं, आहे तो म्हणोन लिहिल्यावरून उत्तर आलें तें.

[-४९३-५]

फर्मान औरंगजेब बादशहा याचा शिवाजी महाराज यांचे नांवें. दुगरा शाहाजहान तक्तावर कायम होता सबब. मोहर औरंगजेबाची. दुगरा औरंगजेब याचा बाप तक्तावर कायम होता. सबब आधीं त्याचा लिहून मग आपला लिहिला.

नंबर ५.

मुलासतुलईष बादवल अयान म्हणजे सर्व उमराव लोकांत श्रेष्ठ नुबादतुल आमसाल वल आलराज म्हणजे आपले बरोबरीचे मंडळाहून थोर काबाल्ल मरहमेत वलइहसान म्हणजे नानाप्रकारचे कृपेस पात्र शिवाजी बादशाही कृपेनें कृतकृत्यता पावून जाणोत की तुमची अर्जदास्त इकडील पंज्याचे निशाणची पोंचल्यानंतरची पाहिली. दरयेक गोष्टी विषईं जे सांगणें तें तुम्हाकडील वकील सोनाजी याजपाशीं सांगितलें होते. त्यानें तुम्हांपाशीं बोलून खतरजमा केलीच असेल. सांप्रत कीं जे मुलीख विजापुरकराकडील तुमचे हातीं होता तो पेशजी प्रमाणें येऊन तुमचे मनाजोगता अन्वयें बंदर दाभोळ व त्याजखालील मुलुख तुम्हास दिला. अशीयास इकडील दौलतीची किफायत मदत जी करणे असेल त्याचा समय हाच आहे जाणोन करण्यांत आणावे आणि हुजूर भेटीस यावे. या खेरीज जे, मतलब तुमचे वकीलास परत जाण्याची जलदी होती सबब नीरोप दिल्हा आहे. त्याची जबानी इकडील लक्ष दिवसे-दिवस तुमचा एतकर्ष करण्याचे वगैरे सर्व ध्याना येईल. याकरितां इकडून दोस्तीचे लहानमोठे कामाकाजाजी उमला आपले मर्जीताचे कारण समजोन. करीत जावी व वारंवार इकडील कृपेचे इछित असावे. सांप्रती ईश्वरी कृपा व आमचे दैवशालीत्व व फौजेचे शूर याचे बळाने वाइट इच्छणार दैवहत होऊन दिवसेंदिवस इकडे जय येत चालला तो असा कीं किले बेदर हा मोठा मजबूद आजपावेतो त्याला कोणीच सर केलें नवते व कोणाचे मनांत कल्पना देखील सर करण्याची येत नवती जो एकंदर दक्षण व कर्नाटक देशाचा दरवाजा तो एक दिवशी हस्तगत जाहाला. इतराची वर्षोंवर्षेही दाद न लागती. हे सर्व कृत्य इकडील प्रताप व शूराचे शौर्यामुळे जाहाले. तुम्हीहि ये विषयीचा संतोषाचे वर्तमानावर कल ठेवित जावा आणि आमचा लोभ पूर्ण आहे असे मानीत जाणे. छ. १८ माहे रजब सन ३१ जुलूस सन १०६७ हिजरी. (२३ एप्रिल १६५७) (राज खंड ८, क्र. ५)

सदरहू पत्रांत आमचे मतलब असतील ते घेऊन येतील म्हणोन लिहिले आहे. त्यावरून शिवाजी महाराज यांणीं मागती एक पत्र पाठविले की, विजा-पुरकराचे इलाख्यांतील आमचा मुलख व किल्ले आहेत ते आम्ही अथवा तुम्ही कोणीहि घेतले तर आम्हांकडे असावें. याप्रमाणे तुम्ही आमची खातरी करित असल्यास तुमचे कुमकेस पांचशे स्वार निवडक देतो आणि तुमचे मुलकात पुन्हा बंड वगैरे न होईल असा बंदोबस्त ठेवितो. असें लिहिल्यावरून औरंगजेब याणी उत्तराचा फर्माना पाठविला. त्याची नक्कल पारशी व तरजमा मराठी.

# [४९३ - ६]

फर्मांना औरंगजेब याचा शिवाजी महाराज याचें नांवे.

दुगरा शाहाज्यान पादशाहा मोहोर औरंगजेब याची

तक्तावर होते सबब त्याच्या नांवचा

दुगरा औरंगजेब शहाजादे होते सबब आधीं बापाचा लिहून मग आपला लिहिला आहे.

नंबर ६

मुकसतुल अमसाल वल अमराज ( म्हणजे आपले बरोबरीचे मंडळींत थोर ) उमदतुल इषबाह वल अयान (सर्व उमराव लोकांत श्रेष्ट) लायकुल ईलतीफात वल इहसान ( म्हणजे महत् कृपेस पात्र ) भूतीयुल इसलाम ( म्हणजे मुसल्मानी धर्म रक्षक ) शिवाजी भोसले बादशाहीकृपेस आपला सत्कार मनांत आणोन समजोत कीं, तुमची अर्जदास्त कृष्णाजी भास्कर पंडित याचे पत्रासुद्धा. रघुनाथपंत वकिला बरोबर पाहून मजकूर ध्यानास आला. यद्यपी तुमच्या पेशजीच्या गोष्टी विसरण्याजोग्या नाहींत. तथापि तुम्ही आपल्या कृत्याचा पश्चाताप केला आणि हा दरबार उपेक्षाचा नाहीं जाणोन तुमचें लक्ष निभ्रांत इकडे आहे असे समजोन तुमचे पूर्वकृत्य मनास आणित नाहीं. ये विषयीचा संतोष मानून इकडील दौलतीविसी कोशीस करीत जावी. आपले वतनी महाल किल्ले व कोकण देशासुद्धा नगरवाले निजामा खेरीज जे विजापुरकर आदिल्खानाचे इलाख्यांत जे आहेत ते याजकडील मुलूख हस्तगत जाल्यानंतर दरोबस्त घ्यावी. वचन असावे. म्हणजे सोनोपंत यास हुजूर पाठवितो आणि त्याजबरोबर हें बोलणें कबुल झाले म्हणोन फरमान आल्यास त्यांतील मजकूर पाहून पांचशें स्वार निवडक व येक सरदार इकडील फौजेबरोबर पाठवितो. इकडील लक्षांत वागून सरकारी मुल्काची सरहद्द रक्षण करूं. कामदाराशीं शरीक होतो कीं ज्या योगे बंड वगैरे बखेडे न होईत म्हणोन लिहिले. त्यास तुम्ही लिहिल्याअन्वयें वर्तून हा फर्माना पावतांच आपले मजकुराची अर्जी लिहून सोनोपंतासमागमें पाठवून देणें. म्हणजे त्याप्रमाणें केलें जाईल. हे जाणोन लक्षांत वागून आमचे लोभाची पूर्णता समजावी. छ १ जाफर सन १०६८ हिजरी. (२४ फेब्रुवारी १६५८)

ताजाकलम माहाराज जशवंतशिंग व कासमखान हे उभयता इकडील फौज आलीशी समजोन ऊज्जनेहून साहा कोस पुढें लढाईचे इराद्यानें आले होते. परंतु ईश्वरकृपनें इकडील शूर असे लढले कीं सहा सात हजार स्वार त्यांजकडील कामास येऊन शेवटीं पळूं लागले. त्याजकडील खजीना व तोफखाना व हत्ती वगैरे बहुत कारखाने लुटले गेले. ईश्वरें अशा तऱ्हेनें आमची फत्ती करविली, यापुढें आणखीहि नानाप्रकारचे जय जे सर्वांस संतोषदायक व शत्रूस पादाक्रांती देणार असे सत्वरच होतील. तुम्हीहि ये विषयींचा संतोष मानून इकडील लक्षांत वागून कल्याणाचे

उमेदवार असावें. तारीख व सन मजकूर. ( राज. खंड ८, क्र ६ )

या अन्वयें पत्र लिहिलें व त्याच सालीं औरंगजेब शाहाजादे होते ते बादशाहा झाले आणि शिवाजी महाराजांनीं स्नेह राहावा म्हणोन बाह्यात्कारें लोभ दाखवून पत्र लिहिलें होते. त्याच उत्तर पेशजी विजापुरकराचा मुलुख साध्य करून घ्यावयाचा करार होता. त्याप्रमाणें अमलांत आणावें, आम्ही बादशाहा जाहालो वगैरे मजकुराचा फर्मान व पोषाख पाठविला. त्या फर्मानाची नक्कल पारशी व अर्थाचा तरजमा मराठी प्रवर्तेचे भाषेने लिहिला आहे.

## [ ४९३ – ७ ]

फर्मान औरंगजेब बादशाहाचा शिवाजी महाराज यांचे नांवे.

दुसरा औरंगजेब याचा आपण बादशाहा जाले सबब — मोहोर औरंगजेब याची अकरा पिढी बादशाहा जाहले त्या नांवासुद्धां

नंबर ७.

अलीफ

जुब्रादुल अमसाल वल अकरान (म्हणजे आपले बरोबरीचे राज्यांत श्रेष्ट) खुलासतुल आषवाद वलयान (म्हणजे सर्व उमरावात थोर) काबीलुल मरहमत वल अहसान (म्हणजे महतर कृपेचे पात्र) मुतीयुल इसलाम (म्हणजे मुसलमानी धर्मरक्षक) शिवाजी याणी बादशाई कृपेचे उमेदवार होऊन जाणावें की ईश्वरें धर्मवृद्धि व न्याय यथास्थित जुलुम पृथ्वींतून नष्ट होण्याबद्दल आम्हांस जय होऊन जे शत्रुधर्म व दौलती विषयीं होते त्यास पादाक्रांत करून छ. २४ रमजान रोज रविवार ( २८ जून १६५७ ) या दिवसी सिव्हासनाधीश्वर केले. त्या प्रभूचा बहुत उपकार मानितो. तुमची अर्जदास्त अशा संतोष समयांत पाऊन मजकूर ध्यानास आला. अशीयास तुम्हीहि इकडील लक्षांत वागतांच आहा. त्या अन्वये वागून खरेखादी करित जावी. हल्ली दक्षणेकडील सुभ्याचे कामावर उमदतुल मुलक अमीरुल उमरा याची योजना करून तेथील सर्व कामाचा बंदोबस्त त्याजकडे सांगितला आहे. तरी तुम्हीहि त्यांचे सलेत वागून वारंवार कोशीस करून जसें पुर्वीचें बोलणें त्याप्रमाणें अमलांत आणावें. या कालीं ईश्वरकृपनें जे जे मनोरथ होते ते मुलुकदौलती विषयीचे सिध्ध होऊन कोणतीहि इच्छा राहिली नाहीं. जे शत्रू इकडील आपकषाची वासना धरीत होते ते आपले केलेले कर्माचे शासन पाऊन शेवटीं मुलाबाळांसुद्धां बेहेकरचे हद्दींत हस्तगत जाले. ते लवकरच शिक्षाहि पावतील. तुम्ही इकडील लोभ आपणावर पूर्ण आहे असे जाणोन लक्षांत वागोन कृपेचें इच्छित असावें. तुम्हांकरितां येथून पोषाख पाठविला आहे. हा घ्यावा. छ ४ माहे जिल्काद सन ३१ जुलूष मुा सन १०६९ हिजरी. (५ ऑगस्ट १६५७) (१४ जुलै १६५९ राज. खंड ८ क्र. ७).

येणेंप्रमाणें फर्मान पाठविला आणि दक्षिणेस सुभा रवाना केला ते काळीं विजापुरची दौलत कायम होती. त्यांणीं शिवाजी महाराजांचें व औरंगजेब यांचें सख्य जाले आहे, हें पाहून व त्याचे राज्यांतहि कांहीं सरदार फितेले होते जाणोन त्याणी सुभ्याशी सख्य करून शिवाजी महाराज याजवर चाल करावी असें ठरविलें. हें शिजाजी महाराजांस कळतांच त्यांणीं विजापुरकरांचें मुलखांत व किल्लेकोटांत ठाणीं घालण्यास प्रारंभ केला आणि दिल्लीवाल्याकडेस जो मुलख निजामशाईत आला होता तोहि लुटून ठाणीं घालूं लागलें. हें वर्तमान औरंगजेब यास कळून राजे जैसिंग व आणखी कितीयक दुसरे सरदार फौज घेऊन शिवाजी महाराज यांजवर रवाना केले. परंतु हे कांही केल्यानें न आटपेत. वरचेवर त्यांच्या रसत मारूं लागले आणि छापे घालूं लागले. यामुळें राजे जैसिंग फार जेरीस येऊन त्यांणीं औरंगजेबास लिहिलें कीं, शिवाजीचा प्रताप व कजादी भारी आहे. तीस चाळीस कोश पावेतो दौड करून रसद मारितो आणि हरयेक वाटेनें बर्छी न लागे असा अकल्पित येऊन छापे घालितो. या प्रांतीं इतका फौजबंद व जुरतीचा माणुस दुसरा नाहीं. ऐसियास कोणतेहि प्रकारें यास सल्यात घेतल्यावाचून परिणाम लागणार नाहीं. त्याजवरून बादशाहाचे उतर आलें कीं, तुम्ही त्यासी सल्ला करावा आणि सांगतील तसा तह ठरवावा. सबब राजे जैसिंग याणीं वकील पाठविला. शिवाजीमहाराजांचें मनांत असें आलें कीं, दोन शत्रू दोनीकडे असल्यास आपलें कार्य सिद्धीस जाणार नाहीं. याजकरितां जैशिंगाचें बोलणें आलेच आहे त्यासी संख्य करून विजापुरकराचा मुलख हातीं आल्यानंतर मग पहाण्यास येईल. म्हणोन जे किल्ले विजापुरकराचे घेतले होते त्यापैकीं, कांहीं राज्ये जैसिंगास द्यावयाचें ठरवून कोंकणप्रांत व बारा किल्ले आपलेकडे आहेत तेथें याणीं उपद्रव करूं नये व विजापूर घेतल्यावर पांच लक्ष होनांचा मुलख द्यावा असें ठरवून दिल्लीस पत्र लिहिलें. त्याचें उत्तर आलें. तो फर्मान :

## [४९३-८]

फर्मान औरंगजेब याचा शिवाजीमहाराजांचे नांवे

मोहोर औरंगजेबाची अकरा पंजा औरंगजेब याचे हातचे पत्र आहे पुरुषांचे नांवासुा. सबब

दुगरा औरंगजेब याचा

मोहोर जाफरखान याची

नंबर ८.

जुवादुल अमसालवल अकरान (म्हणजे आपले बरोबरीचे राजांत श्रेष्ठ) उमदतुल अषवाद वल अयान (म्हणजे सर्व उमरावांत थोर) काबीलुल मरहमत वल अहसान (म्हणजे महत कृपेस पात्र) मुतीयुल इसलाम (म्हणजे मुसलमानी धर्म रक्षक) शिवाजी याणी बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावे कीं, सांप्रत तुैंमचे बहूत नरमाईचे पत्र राजे

जैसिं ा याची भेट आपले केलेलें कृत्य साफ व्हावे म्हणोन घेतल्याचे पाऊन मजकूर ध्यानास आला. यापूर्वी तुमचे मनांतील हाशील सरकार कामदारांनीं समजाविले होते कीं, तुम्ही आपल्या कृत्याचा पश्चाताप करून या दौलतीचें आश्रयास येऊन वीस किल्ले आपणाकडील इकडील कामगारांचे स्वाधीन करून बारा किल्ले व त्याखालचा मुलुख एक लक्ष होनाचा निजामशाहीचे किल्ले व मुलकापैा, त्याजप्रकारें आणखी चार लक्ष होनांचा मुलुख तळकोकणांतील विजापुरकराचे इलाख्याचा जो हल्लीं तुम्हांकडे चालत आहे व पांच लक्ष होनांचा मुलुख बालीघाट पावेतो विजापुरकराचे इलालाख्यांतील येणें प्रमाणें येकंदराचा फर्मान बादशाही मागता व चाळीस लाख होन दर साल तीन लाखप्रो पेशकशीबद्दल देऊं म्हणतात. येसीयास तुमच्या गोष्टी ज्या तुम्ही दूर अंदेशा न पाहातां केल्या त्या माफी जोग्या नाहींत. तथापि राजे जैसिंग याणीं लिहिल्यावरून तें सर्व माफ करून तुमचे मनोदयाप्रो बारा किल्ले ज्याचा तपशील खालीं लिहिला आहे ते व त्याजखालचा मुलुख देऊन आणखी हूकुम केला आहे कीं, जो मुलुख नऊ लक्षांचा होनाचा पैा चार लक्ष होनांचा तळकोंकण पैा विजापुरकराचे इलाख्यांतील हल्लीं तुम्हांकडे चालत आहे तो बंदोबस्तामुळें इकडील सरकारांत आला सबब व बालीघाटीं पांच लक्षाचा विजापुर आमचे हाती येईल त्याआधीं तुम्ही त्याचेकडून घेतल्यास या अन्वयें तुम्ही चांगले फौजसुद्धां राजे जैशिंग याणी मिळोन बादशाही कामांत त्याचे मर्जीप्रमाणें कोशीस केल्यास विजापूर फत्ते झाल्यानंतर तुम्ही पेशकशीचे ऐवजाचा भरणा केल्यास तुम्हाकडे बहाल ठेवून हल्ली तुमचे चिरंजिवास पांच हजारी मनसबा व पांच हजार स्वार की येका येकाची दोन दोन तीन तीन घोडी असावी याप्रमाणें देऊन तुम्हाकरितां पोषाख पाठवून हा फर्मान आपले पंज्याचे चिन्हासुद्धां पाठविला आहे. तरी तुम्ही इकडील लक्षांत वागोन बादशाही काम लहान मोठें सुद्धां करून हे सर्व आपले उर्जिताची गोष्ट आहे असे समजत जावे. छ ५ रबिलावल रुन ८ जुलूष (५ सप्टेंबर १६६५) मुताबी सन १०७६ हिजरी.

किल्ल्यांचा तपशील राजे जयशिंग याचे लिहिल्याप्रमाणें

| | | | |
|---|---|---|---|
| १ राजगड | १ दुगणगड | १ घोसाळा | १ भोरप |
| १ रायरे | १ तोरणा | १ माहारगड | १ आलवारी |
| १ कुवारी | १ पाल | १ तलेगड | १ उंधेदुर्ग |

(राज. खंड ८, क्र. १४)

येणेप्रमाणें तहाचा फर्मान पाठविला. त्याजवरून शिवाजी महाराज याणीं आपलें कर्ण्यास दिल्लीवाल्याची फौज आडवी येणार नाहीं असें समजून ताथवडा व फलटण वगैरे किल्ले घेऊन त्या मुलुखांत आपली ठाणीं घालून विजापुरकराची फौज त्या प्रांतीं शिकस्त करून राजे जैशिंग यास कळविलें. त्याणीं दिल्लीस हा मजकूर लिहून पाठविल्यावरून औरंगजेब बहुत संतोष पावून पोषाख व जडावाची कटार पाठवून शाबासकीचा फर्मान लिहिला. त्याची नक्कल फारशी व तरजमा मराठी.

## [४९३-९]

फर्मान औरंगजेब याचा शिवाजी महाराज याचें नांवें
मोहोर औरंगजेब बादशाहा याची
दुगरा औरंगजेब याचा
मोहोर जाफरखान याची

नंबर ९

जुबदतुल अमसान वल अरान (म्हणजे आपले बरोबरीचे राजांत श्रेष्ठ) उमदतुल आषवाह वल अयाम (म्हणजे सर्व उमरावांत थोर) फाबीलुल मरहमत वल अहसान (म्हणजे मुसलमान धर्म रक्षक) शिवाजी यांणीं बादशाही कृपेस आपला सत्कार जाणोन समजावे कीं तुम्ही फौजेसुद्धां बादशाही लष्करांत आहा आणि ताथवडा फलटण हे किल्ले विजापुरकराकडील होते तें घेऊन त्याची फौज तळकोंकण प्रांतीं होती तेथें तंबी पोचली. म्हणोन राजे जैशिंग यांणीं लिहिल्यावरून तुमचे शाबासकीस कारण जाहाले. सबब तुम्हांकरितां उत्तम पोषाख व जडावाची कटार पाठविली आहे. या लोभाचा संतोष मानून इतःपर या स्वारींत जितकी कोशिस कराल तितकी पहिलेपेक्षां अधिक लोभास कारण होईल. छ ७ जावल सन ८ जुलूस (७ सप्तेंबर १६६५) मुा सन १०७६ हिजरी. (राज खंड ८, क्र. १५).

या अन्वयें पत्र आल्यानंतर शिवाजी महाराज यांणीं विजापुरवाल्याचा मुलुख घेण्याची फार कोशिस करून किल्ले कोट घेत चालले. तेव्हां राजे जैसिंग यांणीं बोलणें लाविलें कीं, तुम्ही औरंगजेबाकडे चलावे. म्हणजे तुम्हांस सरफराज करून या मोहिमेवर घेऊन येतो. शिवाजी महाराजास त्याचा बंदोबस्त पाहणें जरूर होता. सबब कूच दिल्लीकडे जाण्याबद्दल केलें व औरंगजेबास पत्र लिहिलें व त्याणी उत्तर पाठविलें. तो फर्मान पारशी व तरजमा मराठी.

## [४९३-१०]

फर्मान औरंगजेबाचाशिवाजी महाराजांचे नावे
मोहोर औरंगजेबाची दुगरा औरंगजेबाचा

नंबर १०

जुबलतुल अमसान वल अमराज (म्हणजे आपले बरोबरीचे राज्यांत श्रेष्ठ) उमदतुल आहाहाद वल आयाम (म्हणजे सर्व उमरावांत थोर) काबिलुल मरहमत वल अहसान (म्हणजे महत कृपेस पात्र) मूर्तीयुल इसलांम (म्हणजे मुसलमानी धर्म रक्षक) शिवाजी यांणीं बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावें कीं तुमचे पत्र मिरजा राजे जैशिंग यांणीं ठरविल्या प्रमाणें इकडील प्रांतीं रवाना झाले म्हणून पाठविलें तें पाहून बहोत संतोष जाहला. ऐशियास इकडील लोभ तुम्हांवर पूर्ण आहे जाणोन अवकाश न करितां खातरजमानें मजल दरमजल निघोन यावें म्हणजे भेटीअंतीं बहूत सत्कार

पाऊन माघारें जाण्याविषयींचा निरोप दिल्हा जाईल. सांप्रत तुम्हांकरितां पोशाख पाठविला आहे तो घ्यावा. तेरीख १० दाहा सवाल सन ९ जुलूस (२७ एप्रिल १६६४) मुा सन १०७४ हिजरी. (राज खंड, ८ क्र. ९६).

याप्रमाणें खातरजमेचें पत्र आल्यावरून शिवाजी महाराज दिल्लीस जाऊन पावले. बादशाहानी बहुत सत्कार व मेजवान्या वगैरे करण्याचा बेत करून भेटीस बोलाविले. तें काळीं, महाराजांनी मुजरा वगैरे केला नाहीं. तेंव्हां हे दक्षणचे राजे यांस कायदा माहित नसेल जाणोन उगीच राहिले. पुढें चाकर म्हणवावे, वजीरीचें काम करावे, येथें राहावे असें बोलणें बोलूं लागले; तें महाराजानीं कबुल केलें नाहीं. कारण आपण जात्या महाराज असोन दुसऱ्यांचें काय म्हणवावें ? त्यांत हा यवन. आपणास धर्मस्थापना करावयाची. जाणोन वरघडीचें बोलणें बोलूं लागले कीं, दक्षिणेंत गेल्यानंतर बादशाहाचे मनोगताप्रोा वार्गू. परंतु हे बादशाहाचे मनांत न आलें व लोकांनीहि कळविलें कीं ते आपणासच थोर मानतात व मुजरा वगैरे करित नाहींत. यास्तव दाब द्यावा. त्याजवरून बादशाहानीं बंदोबस्त चौकी पहारे वगैरे केला. ते काळीं शिवाजी महाराज याणीं आपली फौज पागा आधीं रवाना करून नंतर कामदारहि काढून त्याउपरी आपणहि युक्तीनें निघाले. ते तीर्थयात्रा करीत राजगडास दाखल जाहाले. नंतर जे किल्ले व मुलुख औरंगजेबाकडे दिल्हा होता, तो सारा जवामर्दीनें परत घेऊंनें त्याचा प्रांत लुटूं लागले. हे औरंगजेबास कळून दिल्लीहून बादशाहाजादे महंमद मोअजम याची रवानगी केली आणि सांगितलें कीं, शिवाजी राजे यांसीं हरतऱ्हेनें सला करून चालावे. कारण तो पुरुष बहुत शहाणा व जवामर्दी आहे. त्याशी सला केल्यास उत्तम. नाहीं तरी गारद करील. त्याजवरून त्याणी राजकारण पा. शिवाजी महाराज यांजकडीलहि किल्ले कोट तयार व्हावयाचे होते. सबब तहनाम्याच्या यादी दिल्या कीं, अमुक मुलुक आम्हाकडे असावेत. सर्व दिल्लीहून शाहाज्याद्यानीं लिहून आणविलें. परंतु लोभ दाखविण्याबद्दल राजे जाजती किताबाचा फर्मान आणविला तो त्याजकडे पाठवून दिल्हा आणि वकीलाचे विद्यमानें बहुत प्रकारचीं बोलणीं लोभ व ममतेची, आणि पेशजी दिल्ली मुक्कामीं तीर्थरूपानी निरोपचार लहान माणसांचें सांगण्यावरून दिल्हा नाहीं, तें मनांत येऊं नये म्हणोन बहुत सफाईची बोलणीं वरचेवर इकडे चालून यांचें साह्याखेरीज इकडील राजकारण शेवटास जाणार नाहींत. वगैरे अंदेशा मनांत आणून फारच सख्य मांडलें. तो मजकूर बखरेत हस्त बाग म्हणोन, विजापुर प्रकरणीं तवारिख आहे त्यांत व आणखी दुसरे ग्रंथात सविस्तर लिहिला आहे. सारांश हे अवतारी पुरुष यांजवर कोणाचेंहि तेज पडलें नाहीं. श्रीदेवींचा साक्षात्कार होता. जे वेळेस संकट पडेल, तेसमयीं प्रत्यक्ष येऊन त्याची तजवीज सांगावी. द्रव्य नसल्यास दाखवून द्यावें. असे बहुत प्रकार अवतार चरित्रासारखी सविस्तर आलाहिदा आहेत. महाराजानीं कित्येक किल्ले व कोट बांधले आणि तेथें बंदोबस्त अशा कायद्याचे राखले कीं त्यांत शत्रूचा रिघाव होऊ नये आणि

श्रीदेवीचे वरप्रदान सत्तावीस पिढ्या राज्य चालेल असें होतें, तें सिद्धीस गेलें पाहिजे सबब.

## [ ४९३ – ११ ]

कोणतेहि शत्रूचा पराक्रम होऊन सल्ला केला नाहीं आणि कोणाचेंच तेज पडले नाहीं. याजवरून औरंगजेबाचे पुत्र याणीं सख्य करावयाचें मनांत आणोन राजे म्हणोन किताबाचा औरंगजेबाचा फर्मान आणोन दिल्हाल्याची नक्कल पारशी व तरजमा मराठी.

फर्मान शाहाजादे मोहजम याचा शिवाजी महाराज यांचे नांवें
दुगरा औरंगजेब याचा राज्यावर कायम होते सबब
महंमद मोअजम बीन अलमगीर औरंगजेब बादशाहा याची मोहोर
दुगरा मौ मोंअजम शाहाजादे याचा

नंबर ११.

जुवलतुल अमसान वल अमरान म्हणजे (आपले बरोबरींचे राजांत श्रेष्ठ) माफ खारून आष आष ब्राहवल आयान (सर्व उमरमचांत थोर) कैकूल ईलातिफात वल इमतीमल (म्हणजे स्नेह व विश्वासास योग्य) समवर इमायत जुमायान (म्हणजे महत कृपेस पात्र) मोरीद आष फाम बेकाराल (म्हणजे पूर्व लोभांत घेतलेले) महब्बतात फतून दात बे पायान (म्हणजे लोभ करण्यास पूर्ण पात्र), राजे शिवाजी याणी बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावे. आमचा बहुत लोभ तुम्हावर आहे. याजकरितां तुमचा सर्व मजकूर हुजूर लिहिल्यावरून तुम्हांस राजेपणाचा किताब दिला असे. या गोष्टीस सत्कार मानून पेशजीपेक्षां अधिक काम करून दाखवावे. म्हणजे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तुमजे कार्याविषयीं विनंती लिहिली आहे. तोहि बंदोबस्त यथास्थित घडोन येईल. खातरजमा ठेवावी. आणि बादशाही लोभ आपणावर आहे असे समजावें. छ० ५ माहे सबान सन ११ जुलूस (१९ दिसेंबर १६६९) सन १०७९ हिजरी. (राज. खंड ८, क्र. १७).

याप्रमाणें पत्र आलें. परंतु शिवाजी महाराज यांस त्याचें कामांत चालणें गरज नव्हती. याजकरिता वरचेवर मुलुख वाटणी घेत असत. त्या समयांत इंग्रजांशीं दोस्ती होऊन तह ठरला. त्याची नक्कल.

## [ ४९३–१२ ]

यादी शिवाजीमहाराज याचा व इंग्रज याचा पेशजी तह राजगडचे मुक्कामी सन सबान व आलफचे साली जाहाला. त्यांतून मुख्य कलमें.

१. इराण बादशहा व हिंदुस्थानांत मोंगल बादशहा यांचा व इंग्रेजांचा

तह जाहाला. त्यांचे देशांत इंग्रेजांचा व्यापार चालत आहे. तसा महाराजांचे राज्यांत व्यापार चालविण्यास आडथळा होऊं नये. कलम.

२. व्यापार माल येईल जाईल त्याजवर जकात घेऊं नये. कलम.

३. इंग्रजांचे शिक्याचे रुपये व मोहरा व पैसे महाराजांचे मुलखांत चालवावे. कलम.

४. महाराजांचे मुलखांत दर्याचे काठीं इंग्रजांची जहाजें मोडून फुटून किनारीं लागल्यास त्यांतील माल आमचा आम्हांस द्यावा.

४

एकुण कलमे ४

पैकीं महाराजानीं ठराव केलीं तीं

२ सकारांतून करार केली ती कलमें.

१ महाराजांचें राज्यांत तुम्ही व्यापार करावा. कलम.

१. माल येईल जाईल त्याची जकात माफ केलीं असे. कलम

० गैर मजुरा कलमें

१. इंग्रजांचे शिक्याचे रुपये व मोहरा व पैसे मुलुखामुलखांत चालणार नाहींत.

१. महाराजांचे मुलखांत दर्याचे काठीं किनाऱ्यास जहाजे मोडून फुटून किनारी लागल्यास माल देणार नाहीं.

—

२

याप्रमाणें पेशजी मुंबईहून इंग्रज याजकडून आठजण व दुसरा एक इंग्रज रायगडीं, येऊन दोस्ती नेहमी चालावी याप्रमाणें केलें. शालीवाहन शके १५९६ आनंदनाम संवत्सरीं इंग्रजाची व या सरकारची दोस्ती चालत होती. व फैयर्ज इंग्रज महाराजांचें स्वारीबरोबर कित्येक मुलुख फिरत होते. हल्ली इकडील सरदार यांनीं बंगाल्याहून इंग्रजाचें जहाज जात होतें तें जबरदस्तीनें मारून घेतलें. त्यांतील माल अदमासे साडेपांच लक्षाचा होता, म्हणोन इंग्रजाचें पत्र दक्षणी महालाचें नांवें आले. त्याजवरून पेशजी कैलासवासी महाराजांपासोन दोस्ती चालत आल्याप्रमाणें पुढें चालावी असें मनांत आणून याजकडील माला माघारा देणें व पुढें उपद्रव करूं नये म्हणोन सरदारांस ताकीद केली असे. सारांश, शिवाजी महाराज याणीं आपले जवामर्दीनें मोठें मोठे प्रताप केले व सिंहासनाधीश्वर होते. त्याजला दिल्लीवाल्याशीं दोस्ती राखणें जरूर नव्हते. सबब फडपोशीची उत्तरें लिहून, मुलुक व किल्ले कोट वगैरे वरचेवर घेत चालले. दिल्लीवाल्याचा कांहीं उपाय चालेनासा जाहला. ते वेळेस शिवाजी महाराज याणीं येकंदर राज्य आक्रमण केलें. त्याचा तपसील.

सालेरी आहिवंता पासोन चंजी ( चंदी ) कावेरी पावेतो व तळकोंकण दुर्ग जंजिरा सुद्धां व शतावधी किल्ले कोट येणेंप्रमाणें निष्कंटक करून सिंहासनारूढ झाले ते वेळेस फौज चाळीस हजार पागा व साठ हजार शिल्लेदार व दोन लक्ष पायदळ व कोट्यावधि खजिना व जवाहिर बेसुमार व अनेक वस्तु संपादिल्या. येणेंप्रमाणें सिंहासनाधीश्वर म्हणऊन राज्य केलें. कित्येक किल्ले बांधले तो तपसील आलाहिदा आहे. येणेंप्रमाणें चतुर्विध पुरुषार्थ साधन करून कैलासवास केला. नंतर त्याचे वडील चिरंजीव संभाजी महाराज राज्यावर बसले आणि तीर्थरूपाप्रमाणें प्रताप करूं लागले. परंतु राग फार होता. यामुळे कामदार वगैरेंचे न ऐकतां राज्याचा उपभोग करीत होते. पुढे कांहीं दिवसी औरंगजेब बादशहा दिल्लीहून दक्षणेस आले आणि कुतुबशाही व आदिलशाही बुडविली. ते काळी शिवाजी महाराज याणीं चाकर म्हणविलें नाहीं वगैर मनांत होते. सबब फौज पाठवून संभाजी महाराजांस हस्तगत करण्याचे तजविजीस लागले. संभाजी महाराज यांणी पेशजी कितेक वेळ त्याचे फौजेस सिकस्त केले होते. याकरितां त्याची फौज येते हें मनांत आणिले नाहीं. आणि दिल्लीवाल्याकडे कबजी ( कलुशा ) म्हणोन एक फितुरी आला होता. त्याचे कृत्य न जाणतां त्यास लोभांत घेऊन त्याचे मसलतीने चालत असतां शेवटी सावधगिरी न राखतां औरंगजेबाकडील फौजेनें संभाजी महाराज यांस हस्तगत करून तुळजापूर मुक्कामी नेलें. तेथें गेल्यावरही शरण होण्याचे बोलणें न पडले. कन्या द्यावी बोलल्यावरून मारले गेले. हें औरंगजब याचे कन्येनें ऐकून आपणामुळें त्याचा प्राण गेला, हें समजोन आपण दुसरा भ्रतार करणार नाहीं म्हणोन निश्चय केला आणि शाहु महाराज यांचें नांव पूर्वी शिवाजी महाराज होते त्यासच आपला पुत्र म्हणवून मोठे सत्कारें आणून शाहुमहाराज म्हणोन किताब दिला आणि बहुतच बंदोबस्त करून ठेविले. इकडे राजारामसाहेब शिवाजी महाराज यांचे धाकटे चिरंजीव. याणीं सारे कारभारी बरोबर घेऊन चंदी प्रांतीं जाऊन पेशजी प्रमाणें मुलुक काबीज करीत चालले. इकडे शाहुमहाराज मसलतीने औरंगजेबाचे मनांत राहून चुलत्याचें आपलें वैमनस्य दाखवित असत. पुढें औरंगजेब याचा काल जाहला. आणि दिल्लीस मो. मोअजम शहाजादा याणें बंदोबस्त करून आपण तक्तावर बसला. दुसरा त्याचा पुत्र शहाज्याहान याणें इकडील बंदोबस्त फौजेसुद्धा करून दिल्लीचें तक्त घ्यावे म्हणून तिकडे जाण्यास कुच केले. त्याकाळीं दोनीकडे वेढे पडल्यास कसे होईल असें मनांत आणोन शाहुमहाराजासीं ताबेदारींत राहणें वगैरे मजकूर बोलूं लागले व पेशजीप्रमाणें राज्य कदीम चौथाई व सरदेशमुखी वगैरेंच्या सनदा देतो. तुम्ही दक्षिण प्रांतीचे सुभ्याची मदत करून सरकारी मुलिक रक्षण करावे असें ठरलें. ते काळी बेगमेचे शिक्याप्रमाणें शाहु महाराजांनीं सर्व कबुल करून रूखसत घेऊन इकडे रवाना जाले. बादशाहाजादे दिल्लीस गेल्यानंतर, तेथें दुसरा भाऊ राज्यावर बसला होता. तेथे कसकसे जाहले तो मजकूर तेथील प्रकर्णांत सविस्तर आहे. यापुर्वी दिल्लीचे तक्तावर

अबदुलशहा बसले होते. त्याजकडे राजाराम साहेब शिवाजी महाराज याचे धाकटे चिरंजीव त्यांची स्त्री ताराबाई राणीसाहेब यांचे राजकारण आले होते कीं, आम्ही आजपावेतो औरंगजेबाची स्पर्धा करून जवामर्दीनें राहिलों, ऐसियास शिवाजी महाराज यांचे वेळेस जो मुलूख आम्हाकडे होता, तो व दक्षण चौथाई सरदेशमुखीच्या वगैरे सनदा आमचे चिरंजीव शिवाजी राजे नांवे पाठविल्यास आम्हीं फौजेसुद्धां तुमचे कुमकेस येतो. हा मजकूर शाहुमहाराजांकडील रायभान म्हणून वकील दिल्लीस होता त्याने ऐकूण अबदुलशहा यास राजकारण लिहिलें कीं, आमचे वैर पेशजीपासून औरंगजेबाशीं व त्याचे वंशाशी आहेच. हल्ली शाहुमहाराजहि त्याचे अटकेतून निघोन फौज जमा करून तयार आहेत. तुम्ही बोलाविल्यास तुमचे मदतीस येतील आणि आमचे मनोरथ आपले कुमकेने सिद्ध करवितील. दक्षण प्रांती त्यांचे कारभारी वगैरे फौजसुद्धां तयार आहेत. हें बोलणें अबदुलशहास खरें वाटून रायभान वकील यास बहुत नावाजून शाहू महाराजांस फौजेसुद्धां जलदी येथें येण्याविषयीं लिहावे आणि आम्हीहि फार उपकार मानूं व राजाराम साहेब यांचे चिरंजीवाकडील बोलणें आलें आहे ते कबुल करणार नाहीं अशी बहुत तऱ्हेनें खातरजमा करून या मजकुराचा फरमान शाहु महाराजांचें नांवे लिहून पाठविला. त्याची नकल पारशी व तरजमा मराठी.

[ ४९३ – १३ ]

फर्मान अबदुलशाहा याचा. शाहुमहाराज यांचें नांवें

दुगरा अबदुलशहा याचा.

मोहोर अबदुलशाह याची.

नं. १२

उमदे मुनहवीराजइशादितऐन ( म्हणजे सर्व शूरांत श्रेष्ठ ) जुबदे आदवी यान जलापत गुनीन ( सर्व उमरावांत थोर ) खानजाद मूर्तियुल इसलाम ( म्हणजे स्वकीय, मुसलमानी, धर्मरक्षक ) राजे शाहु यांणीं बादशाही कृपेनें संतोषित होऊन जाणावें कीं, तुम्हांकडील रायभान वकील यानें विनंती केली जे, तुम्हीं आपले जहागिरीचें महाली आल्यानंतर इकडे यावयाचा इरादा केला. याजकरितां राणीनें जामीनदारांचा फर्मांना मिळावा म्हणोन कृत्रिमानें अर्जी लिहिली होती. तीं व तिचे चिरंजीवासहि कपटी समजले. त्याचें उत्तर दिलें नाहीं. कारण कीं, आमचे मुलखांतील राज्य व जमीदारी तुम्हाकडे असावी आणि तुम्ही आपले वडिलाप्रमाणें तेथें कायम राहावे. नंतर जे किल्ले थोरले बादशहाचे वेळेस हातीं आले नव्हते, तेहि फौजपाळीनें घ्यावे जाणोन, तुम्ही आत्मिक असें समजोन, हा फरमान पंज्यासुद्धां तुम्हास लिहिला आहे. तरी तुम्ही आपले फौजसुद्धां जलद येथें येऊन पोचावें. म्हणजे तुम्हावर कृपा आणि लोभ वारंवार उत्कृष्ट होईल, छ० ४ माहे राकर सन १ जुलुष. ( १३ फेब्रुवारी १७१९ व २४ जून १७०७ ) ( राज. खंड ८, क्र. ५६. )

याप्रमाणें फर्मान आणवून अबदुलशाह याजकडीलहि धोरण हातांत ठेविलें. इतक्यांत शाह अलम औरंगजेब याचे पुत्रहि दिल्लीस जाऊन पोन्चले. त्याची व अबदुलशाह याची लढाई होऊन अबदुलशाह धरले गेले. आणि शाहाअलम बादशाहीवर कायम जाहाले. आणि पेशजी आबदुलशाह याचे व शाहु महाराजाचे राजकारण चाललें होते, ( तेव्हां न ) जाणों कसें होईल, असें मनांत आणोन आपण तक्तावर बसोन बादशाहीवर कायम जाले म्हणोन. एक फर्मान आपले नावें वंशपरंपरे

[४९३-१४]

या शिक्यासुद्धां पाठविली त्याची नक्कल पारशी व तरजमा त्यांतील अर्थाचा मराठी भाषेंत लिहिला असे.

फर्मानशाह
(शहा अलमचा फर्मान)
तुगरा शाहअलमचा
मोहोर शहा अलम याची
नंबर १३

जुबाद तु आमसान वल आमराल (म्हणजे सर्व राजांत श्रेष्ठ) खुलासद्दुल अशबाद अल अखवल (म्हणजे सर्व उमरावांत थोर) मुतीयुल इसलाम (मुसलमानी धर्मरक्षक) राजे शाहु यानी बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावे कीं, सांप्रत ईश्वर कृपे आमची फते होऊन सिव्हासनारूढ जाहलो. तुमचे निष्ठेविर्सीचा मजकूर अमीरूल उमरा यानी समजाविली. ऐसेयास तुम्ही पेशजी प्रमाणें इकडील लक्षांत वागून मशारनिल्हे लिहितील तशी वर्तणुक करीत जावी. छ. २ जाकर सन १ जुलस (१९ आगष्ट १७०७) (राज खंड ८ क्र. ५७) फर्मान खाली दिवाणाचा हालकाब लिहिला आहे. दिवाणाचे दप्तरीं बार झाले म्हणोन.

येणेंप्रमाणें शहा अलम याचा फर्मान आल्यानंतर सन ११२४ हिजरी या साली माहे जुदीनशाहा ज्याहा तक्तावर बसून त्याणी शाहुमहाराज यास फर्मान आपण तक्त घेतले व फत्ते जाली तुम्ही बादशाही मुलकास उपद्रव करूं नये वगैरे मजकुराचा लीहिला त्याची नकल पारशी व तरजमा मराठी केला असे.

(४९३-१५)

फर्मान ज्याहालदार बादशाहा याचा शाहुमहाराज याचे नांवे.
(जुनदिशाहाच्या फर्मान)
दुगरा शाहाचे नांवे
मोहोर शाहाची
नंबर १४.

जुब्रदतुल आशबाद बल अयान खुलासतुल अमसाल वलआमरान मुतीयुल इसलाम राजे शाहु यांणीं बादशाही सत्कारास संतोष मानून समजावे की, महंमद अजीम मारला जाऊन इकडील फत्ते जाहाल्यानंतर कायम मजकूर जाहला तो लिहिण्यांत येत आहे कीं तुजस्त-आतखर याचें दैव फिरल्यामुळें, त्यानें आपले कामदाराचें सांगणें ऐकून इकडील लोभावर लक्ष न ठेवितां लढाईस आला होता. तो स. १० सफर रोजीं सोमवारी आपले पत्रासुध्दां मारला गेला व कित्येक लोकही कामास आले असे. त्यास तुम्ही या गोष्टीचा संतोष मानून अशी ताकिद ठेवावी कीं, तुमचे फौजेपैकी कोणी पादशाही मुलकांत हंगामा करूं नये आणी रयतेस इजा देऊ नये. सर्वकाळ इकडील लोभास आपले उदयाचे कारण समजत जावें. छ. ९ सफर सन १ जुलूस (११ मे १७०७) ( राज. खंड क्र. ५४ ).

या खालीं दिवाण याचा आल्काब व बारनिशी केली म्हणून लिहिले आहे.

याउपरी फरुकशीयर बादशाहीवर बसले. त्याणीहि शाहुमहाराजाचा आश्रय करावा आणि त्याचे जोरावर आपली बादशाहात कायम करावी म्हणोन एक हातचिठ्ठी आपले निशाण करून लिहिली कीं, तुम्हांस दाहा हजारी मनसबा व दहा हजार स्वार दिले आहेत म्हणून लिहिले. त्याची नकल पारशी व तरजमा मराठी या फर्मान अन्वयें येण्याचें पुर्वी शाहुमहाराज याणी फरोखशीयर यास एक पत्र लिहिले होते. त्याचा जबाब त्याणे लिहिला आहे. हा फर्मान जलदीनें व खुणेचा कोणास न कळता सइयद अबदुल्लाखान याजबरोबर गुप्तरूपे रवाना केला आहे. सबब या फर्मानावर सिका अगर दुगरा वगैरे कांहीं बादशाही निशाणें केली नाहींत. वरील दुकार व पत्र पुरे होण्याचे ठिकाणीं आपले हताची साहा मात्र लिहिली आहे. या अस्सल पत्राचीच नकल व तरजमा मराठी त्यांतील अर्थ काढून लिहिला असे.

## [४९३ - १६]

फर्मान फरोकशियर शाहु महाराज यांचे नांवें

नंबर १५

शायस्ते आलाताफ़ुजुमयामन सजावर मराहिम बोकीरान मुकर बादगाई को आताम दवार गाह जलल्हात वंहिसाल तई ती बाद अखलास व अकीदत दस्तगाह रांजे शाहु याणी बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावे की तुमचेपासून लोभास कारण जालें. तुम्हास दहा हजारी मंनसब व दहा हजार स्वारांची सरदारी दिली असे व बाकीचे तुमचे सर्व मजकूर सयद अबदुलाखान बहादुर कुाबुल मुलुक यांजकडे सांगितलें आहे त्याप्रमाणें आमलात आणावे. आणि आपला वकील एक तुमचे येणें तेथें होई. त्यापुर्वी पा द्यावा, म्हणजे मनसबेच्या सनदा सरकारांतून तयार करविल्या जातील. छ. २७ सफर सन १ जुलूष ( राज. खंड, क्र. ५५ ) कलमा (१) प्रमाणें हातचिटी आली. परंतु जे शाहुमहाराजांचे चितांत होतें तसे त्याजकडून

घडून आलें नाहीं व बादशाहींतही कांहीं फंद होऊन दक्षणचे सुभे यांणी शाहु महाराज याशी राज्यकारण करून श्मपुप्तीनरफियुदरज्यांत बादशाहा यास दौलतीवर कायम करावे म्हणजे चौथाई राज्याची देउ वगैरे करार केला व तहनामा ठरविला. ते काळी शाहु महाराजहि त्याचे राज्यकारणास अनुकुल होऊन, आपली फौज पन्नास हजार मदतीस दिली. बादशाह दौलतीवर बसले तेव्हा कराराप्रमाणे कागदपत्र उलगडून घ्यावयाचे ते काळीं महाराजाचें म्हणणें हिंदुस्थानांतील चौथाईची सनद आम्हांस नको. दक्षिणेच्या सनदा तूर्त द्याव्या; म्हणजे तुमचा हुकुम वरचेवर राखत जाऊं. त्याजवरून चौथाईचा फरमान दक्षणचा दिल्हा त्याची नकल पारशी व तरजमा मराठी केली असे.

## [४९३ – १७]

( रफियुदरजातचा फर्मान )

फर्मान रफियुदरजात बादशाहाचा. शाहु महाराजाचे नांवे.

नंबर १६

सांप्रत अर्ज झाला की, राजश्रेष्ठ राजे शाहु हे इकडील लक्षांत वागोन पंधरा हजार स्वारानिशीं दक्षणचे सुभ्याचे कुमक राखतील. त्यावरून सहा सुभे दक्षणची चौथाई सदरहू स्वाराचे खर्चाबद्दल घेत जावी असें ठरलें. ऐसियास हकीम व मामलेदार व जाहागिरदार व करोडे वगैरे वर्तमान व भावी याणी सुभे मजकुरची चौथाई त्यास देत जावी. याबाबे ताकीद आणावी. छ २२ राकर सन १ जुलुष मुा सन ११३१ हिजरी. ( २० फेब्रुवारी १७१९ )–( राज. खंड ८, क्र. ७७ ). याप्रमाणें चौथाईचा फर्मान दिल्हा. यास्तव दक्षिणेंतील कदीम राज्याचा तपशील विचारिला. ते वेळेस शाहू महाराज याणीं राजाराम साहेबाचे स्त्रियेनी आपण अधिकारी होण्याबद्दल राजकारण करून महाराजासी बदलून होते सबब त्याजकडे मुलुख होता तो न सांगतां सदतीस परगणेचा लिहून देऊन, त्याचा फरमान घेतला. यांतील कारण शिवाजी महाराजांनी राज्य घेतलें. राजाराम साहेबीं रक्षिलें. त्यापैकीं जो मुलुख मागे लिहित गेला होता तो आपला कदीम आहे असें सांगून ताहात फरमान करून घेतला.

## [४९३ – १८]

नंबर १७

फर्मान रफीयुलदरजात बादशाहाचा शाहू महाराजाचे नांवे

फर्मान रफियुलदरजातच

जुबतुल अशबाद वल आयान खुलास गुल असमान वल आमरान उमदे राजे हा करदान मुतीयुल इसलाम राजे शाहू याणी बादशाही कृपेस आपला सत्कार समजून

जाणावे कीं, सांप्रत अमीरुल उमराव यांणीं अर्ज केल्यावरून तुमचे कदीम राज्य दाहा लक्ष रुपये पेशकश ध्यावयाची मुकरर करून हा फर्मान लिहून तुम्हास दिले असे. तरी पेशकशीचा ऐवज चौथाई रोख व बाकी किस्तीप्रमाणें द्यावा; आणि सदोदित इकडील लक्षांत बागोन मुलखाची आबादी व मुफजदास व तंबी पोचवित जावी व इकडील दौलतीचे कियाफ करण्यास आपले कल्याणचे कारण जाणावे. छ ४ जावल १ सन १ जुलूष मुा सन ११३१ हिजरी. (१५ मार्च १७१९).

## [४९३-१९]

फर्मान खाली दिवाणाचा किताब, व मोहोर वगैरे आहे व त्याजखाली यादी आहे ती. नंबर १७ अ

यादी माहाल राज्य कदीम पेशजी प्रमाणें राजे शाहू यांजकडे दिले. त्याची पेशकश दाहा लक्ष रुपये ठरली, त्यापैकी चौथा हिसा फर्मान हस्तगत झाल्यावर द्यावी आणि बाकी ऐवज किस्तीप्रमाणें त्याजवरून सरकारी आज्ञा जाहली ते

महाल सदतीस बी तपशील

२४ बालाघाटावरील माहाल

१ परगणे मुकरार तर्फा साहा ६ बिा

| | | |
|---|---|---|
| १ हवेली मजकूर | १ तर्फे निरथडी | १ ताा. कडेपठार |
| १ ता. सांडस | १ ता. पाटस | १ ता. सासवड |
| — | — | — |
| २ | २ | २ |
| १ परगणे सुपे बारामती | १ परगणे इंदापूर | १ प. वाई तर्फ |
| १ मुकरर तर्फा ४ | १ ता. हवेली | १ ता. निंब |
| १ ता. वाघोली | १ ता. कोरेगांव | |

१ परगणे मावल मुा तर्फा १३

| | | |
|---|---|---|
| १ ता. कर्यात मावल | १ ता. कावटखोरे | १ ता. गुजनमावळ |
| १ ता. खेडेबारे | १ ता. नाणेमावळ | १ ता. खोरे |
| १ ता. जुनेमावल | १ ता. मुठखोरे | १ ता. मुसेखोरे |
| १ ता. वलणेखोरे | १ ता. हिरडसमावल | १ ता. रोहिडखोरे |
| १ ता. सिरवाल | — | — |
| — | ४ | ४ |
| ५ | | |

१ परगणे सातारा मुा तर्फा ६

| | | |
|---|---|---|
| १ ता. हवेली मु. | १ ता. परली | १ ता. तारगांव |
| १ ता. उंबरज | १ ता. कुडाळ | १ ता. वंदन |

१ परगणे कऱ्हाड मुा तर्फा ९

| | | |
|---|---|---|
| १ ता. हवेली मु. | १ ता. मारूळ | १ ता. ब्रासळें |
| १ ता. तारळे | १ ता. काले | १ ता. मरळी |
| १ ता. कर्यात नाणेघोल | १ ता. पाटण | १ ता. विंग |
| — | — | — |
| ३ | ३ | ३ |

१ परगणे खटाव मुा. तर्फ ११

| | | |
|---|---|---|
| १ हवेली मजकूर | १ ता. क. मलवडी | १ ता. वांगी |
| १ ता. क. निंबवाड | १ ता. क. मायणी | १ ता. क आलगुडे |
| १ ता. क. औउध | १ ता. क. विटे | १ ता. क. भालवणी |
| १ ता. क. खानापुर | १ ता. क. कंलेढोण | |
| — | — | — |
| ४ | ४ | ३ |

१ परगणे मानदेश मुा तर्फ ४

| | | |
|---|---|---|
| १ ता. क. दहिगांव | १ ता. क. वेळापूर | १ ता. क म्हसवड |
| १ ता. क. आटपाडी | | |

१ परगणे फलटण

१ परगणे मलकापुर मुा तर्फ ४

| | | | |
|---|---|---|---|
| १ ता हवेली मजकूर | १ ता. वारूण | १ ता. कासेगांव | १ ता. सिराळे |

परगणे तारळे मुा तर्फ ५

| | | |
|---|---|---|
| १ ता. हवेली मजकूर | १ ता. असवली | १ ता. आरळे |
| १ ता. खानापूर | १ ता. घोळ | |

१ पैकी पन्हाळे मुा तर्फ १०

| | | |
|---|---|---|
| १ ता. मळचोर | १ ता. कांडोली | १ ता. सातवे |
| १ ता. ठाणें | १ ता. चोरगांव | १ ता. आष्टें |
| १ ता. आळते | १ ता. रोकडी | १ ता. वाळवे |
| १ ता. वडगांव | | |

पैकीं आजरें मुा. तर्फ ११

| | | |
|---|---|---|
| १ ता. हवेली मजकूर | १ ता. अंभेरी | १ ता. गणेगांव |
| १ ता. करटोली | १ ता. अंबोली | १ ता. माहागांव |
| १ ता. येळोशी | १ ता. कापसी | १ ता. खानापूर |
| १ ता- लोणी | १ ता. नितळी | |

१ पाा जुनर तर्फ मुा १३

| | | |
|---|---|---|
| १ ता. खेड | १ ता. नारायणगांव | १ ता. निघोज |

१ ता. हिंदूरे
१ ता. महाळुंगे
१ ता. वाकेरी
१ ता. अशेरी
१ ता. येळगांव
१ ता. वेरूळ
१ ता. मनघर
१ ता. मढखोरे
१ ता. चाकणखोरे
१ ता. मंथर (पाबळ)

१ पा कोलापूर मुा तर्फे ९

१ ता. हवेली
१ ता. एकसबे
१ ता. वाहळ
१ ता. कागल
१ ता. सावगांव
१ ता. क. भेगळे
१ ता. रायबाग
१ ता. सिवलिंग
१ ता. जागेले

८ पैकीं मलकापूर वगैरे आठ परगणे जे खाली लिहिले जात आहेत त्याचे सरहद्दींत सहा किल्ले राजे शाहु याचे हातीं आहेत. राजे मवसूफ हुकूम लक्षांत वागतात, त्यापक्षी त्या किल्ल्याचे किल्लेदारास मनसबा वगैरे नाहींत, त्याजला आठ हजार रुपये सालिना हरयेक किल्ल्यास बारा हजार रुपये खर्च आहे. परंतु मखत्याचे व जमाव याचे ते किल्ले. किल्ले महिपलगड किल्ले महिपतगड किल्ले भुजंगगड ऊर्फ रामदुर्ग किल्ले कापले किल्ले सूरगड किल्ले बहादुरबिंडा

यासी खर्चाचे परगणे बितपसील :-

१ प. मलगांव
१ प. भुजंगगड
१ प. सुपेंगांव
१ प. कोपळ
१ प. गदग
१. प. हल्याळ
१ प. लखमेश्वर
१ प. नरगुंद

२४

१३ तळघाट कोकण येथील महाल

१ परगणे रामनगर घनदेवीसुध्दां
१ परगणे जवार

१ परगणे चिपळोण मुा तर्फा ६

१ ता. चिपळोण
१ ता. वळुते
१ ता. नागनाथ
१ ता असामती
१ ता आमरधार
१ ता. माळे

१ परगणे भीमगड मुा तर्फा ५

१ ता. मांडे
१ ता. सांगली
१ ता. पारणे
१ हरोळी
१ ता. मकरे

१ परगणे भिवंडी मुा तर्फा १२

| | | |
|---|---|---|
| १ ता. सुरत | १ ता. दामुद्री | १ वरे ता. कपसुतली सुरली |
| १ ता. मोरनानारे | १ ता. गुरेघर | १ ता. तडे |
| १ ता. आगटी | १ ता. आळुते | १ ता. राहुडे |
| १ ता. खेडे | १ ता. घाग | १ ता. दुर्गा |
| — | — | — |
| ४ | ४ | ४ |

१ परगणे कल्याण मुा तर्फा २०

१ का कल्याण
१ ता. आमरनाथ
१ ता. वाखळ

१ ता. सोरटी
१ ता. वाग
१ ता. वासे
१ ता. वरानपूर
१ ता. प्रोळी
१ ता. मोठे
१ ता. चोपबदरापूर
१ ता. कोथळे खंडाळे
१ ता. आरूथ
१ ता. मळठण
१ ता. झटविल
१ ता. वासे
१ ता. तरे
१ ता. कांबळी
१ ता. ओंकारइंग
१ ता. वासी
१ ता. निरसखल

१ परगणे राजापुरी मुा तर्फा १२

१ ता. मोरगांव
१ ता. कोळे
१ म्हसेवे
१ मांडगांव
१ ता. गोवेळ
१ ता. दिठे
१ ता. निजामल
१ ता. मोहरे
१ ता. माघे
१ ता. श्रीवर्धन
१ ता. बिरवाडी
१ ता. माडवी

१ परगणे दाभोळ मुा तर्फा ११

१ ता. हूमगांव
१ ता. छोवे
१ ता. खेड
१ ता. वेलम
१ ता. हवेली
१ ता. पंचनदी
१ ता. गुहाघर
१ ता. जाबगांव
१ ता. चिपळी
१ ता. माढे
१ ता. सावडे

१ परगणे जावळी मुा तर्फा १८

१ ता. बिरवाडी
१ ता. खोरे
१ ता. कोंडवी
१ ता. आठेगांव
१ ता. होर्तें
१ ता. विठेसाळवे
१ ता. सोमेश्वर
१ ता. वेल
१ ता. चांदेश्वर
१ ता. मद्रणी
१ ता. मढेखोरे
१ ता. बालखोरे
१ ता. वासे
१ ता. वेहेले
१ ता. बिनावळे
१ ता. माहूली
१ ता. जोरखोरे
१ ता. घरठाण

१ परगणे राजापूर मुा तर्फा १८

१ ता. खारेपाटण
१ ता. राकापूर
१ ता. इतघाणे
१ ता. देवळे
१ ता. मारूशी
१ ता. संगमनेर
१ ता. सहस्ते
१ ता. आकोले
१ ता. हारखरी
१ ता. खलपगांव
१ ता. शाखंबरी
१ ता. प्रभावली
१ ता. सौंदळ
१ ता. देवरथ
१ ता. भुवळकोट
१ ता. ढेणसी
१ ता. गडवले
१ ता. धामणशी

पैकी भवंड मुा तर्फ ५

१ ता. आतरूप
१ ता. आसगांवपोरी
१ ता. हिमारताल
१ ता. चंद्रवाडी
१ ता. माले

| | | |
|---|---|---|
| | १ पोा कौल मुाा तर्फ ५ | |
| १ ता. हवेली | १ ता. शिवनेर | १ ता. कडुर |
| १ ता. कनेरडे | १ ता. कडत | |
| | १ पो कुडाल मुाा तर्फ १५ | |
| १ ता. हवेली | १ ता. म्हसवड | १ ता. ढवळे |
| १ ता. अस्मारे | १ ता. बुसरले | १ ता. निघोती |
| १ ता. नायगांव | १ ता. मूळपूर | १ ता. मारुळे |
| १ ता. दईरी | १ ता. पाठ | १ ता. माकडी |
| १ ता. माणगांव | १ ता. बेरडे | १ ता. करनोळी |
| १३ | | |
| — | | |
| ३७ | | |

## [-४९३-२०]

### शाहुमहाराज यांचे नांवे
### नंबर (१८)

जुबादतुल आषबाद वल अयान खुलासतुल अमसाल वल अमरान उमदे राज हायकारदान मुतीयुल इसमाल राजे शाहू बादशाही कृपेस आपला सत्कार समजोन जाणावें. कीं, सांप्रत तुमचे मनोदयानुरूप अमीरूल उमरा याणी अर्ज केल्यावरून हा फर्मान लिहिला जातो जे. साहा सुभे दक्षणचा सरदेशमुखी सेकडा दाहा रुपये रुसुमाप्रमाणें येक कोट सतरा लक्ष येकुणीस हजार तीनसे नव्वद रुपये पेशकस ठरवून तुम्हास दिली असे. तरी पेशकसीचा ऐवज चौथा हिसा रोख व तीन हिसे किस्तीनें तुम्ही करार केला आहे. त्याप्रमाणें देऊन आपला रुसुम रयतेचे खुषर-जावंदीनें घेत जावा. ज्याजती मागो नये, आणि चांगले जमेतीनें इकडील लक्षांत वागोन रयेतची आबादानी व बंडाचे पारिपत्य करीत जावें, आणि किताब राखावी. कोणी मुसदे लोकास साहा सुभे दक्षणेंत आश्रय न देई. कदाचित कोणाचा माल लुटला गेला अगर गारद जाला तर माल मालकास देऊन चोरास शिक्षा करावी. हें न घडतां मालाची किंमत आपणास द्यावी लागेल. सबब मुलकाचे अबादीवर रयतेची उस्तवारी बरचेवर राखून इकडील सुभे वगैरेस मदत देत जावी. छ ४ जाःवल सन १ जुलूष मुाा सन ११३१ हीजरी (१५ मार्च १७१९).

## [४९३-२१]

फर्मानामागें दिवाण सैद अबदुलाखान मीरन उमरा याचा किताब व मोहोर लिहिली आहे. याखाली यादी वगैरे आहेत त्या.

यादी साहा सुभे दक्षणची सरदेशमुखी दिवाणीचे जमीखर्चाप्रमाणें राजे शाहु यांजकडे येक कोट सत्रालक्ष येकुणीस हजार तीनसें नव्वद रुपये पेषकसीबद्दल राजे मवसुफानी कबूल करून, सदर्हु ऐवज पो. चौथा हिसा रोकड व तीन हिसे किस्तबंदीनें देतों म्हणोन, वकीलानें लिहून दिलें, याजकरितां मुकरार केली तें साल रबिइतवल (हें वर्ष तुर्की आहे.) पासोन तेविसाचा शेरा लिहिण्यांत येत आहे. छ १६ रोवल सन ७ या वेळचे यादींत असें आहे कीं, राजे शाहु याचे वकिलाचे म्हणणें दक्षीण देश बंडाचे वगैरे उपद्रवामुळें उजाड जाहला आहे, ऐसीयास तेथील सरदेशमुखी साहा सुभ्याचा सेकडा दाहा रुपये रुसूम मुकरार करून आम्हाकडे दिल्यास मुलकाची आबादानी करून बंडाचीं पारपत्यें करून, म्हणजे मुसाफर सौदागीर वगैरेच्या जाण्यास वाट निर्वेध होईल. कदाचीत कोणी लुटले गेले तरी त्याची चौकशी करून माल मालकास व चोरास शिक्षा करित जाऊं आणि सरकारचे कामदारासीं सामील राहूं. याजवरून पाहातां वास्तविक मुलीक उजाड जाला आहे. शंभराचे ठिकाणीं एक रुपयाही वसूल येत नाहीं. याजकरितां तनखे प्रमाणें पेशकस दस्तुर माफक देऊं शकत नाहीं. याजकरितां सदरहू ऐवजाप्रमाणें चौथाई फरमान हाती आल्यास रोख देऊन बाकी किस्तबंदीने देतों म्हणोन मुचलका लिहुन दिला आहे आणि सनद मिळावी म्हणोन उमेदवार आहे. एकंदर दक्षीण मुकरार सुभे ६ यांचा तनखा मुकरार.

रु.

१८०५१७२९४।-।।।.

यादी तपशील सुभेवार

सुभेखुजस्ते बुनीयाद
१२३७६०४२ ॥=॥.

सुभे महंमदाबाद
७४९१८७९॥। ।.

सुभे फरखुद बुनीयाद
६४८८७४८०

सुभे वराड
११५२३५० ॥=॥.

सुभे दारूजपूर
७८५०८५६०॥=।.

सुभे खानदेश
५७४९८१९ ८॥.

१८०५१७३० रु.

यांसी रूसूम दहा रुपये प्रमाणें

यासी पेशकरा सरकारी सिरस्तेप्रमाणें दर हजारी ५१०

११७५१६७३२ याचे आदाईचा तपशील.

प्रमाणें एकंदर

चौथा हीसा रोकड द्यावे ते रु.
२९३७९१९० ॥.

किरत बंदीने द्यावे ते
८८१३७५७१

राजे शाहु यांचे वकील पेशकस कबूल करितात ती

११७१९३९० ॥।.

यासी तपसील

चौथाई ऐवजाकडे
२९२९८४७ ॥=

बाकी किस्तीने देणार ते
८७८९५४३ ८-

दिवाणी हुकूम

## [-४९३-२२]

सिरस्ता असा आहे कीं चौथा हिसा पेशकसीबद्दल रोकडे पटल्या खेरीज दप्तरातुन सनद होत नाहीं वकील सदरीं लिहिल्याप्रमाणे कबूल करीता येविसी जशी सल्ला मुचलका पेशकसी बद्दल दफतरी पावला आहे.

मुचलका यादवराव वकील निसबत राजे शाहु सन ७ लिहुन दिली ऐसीजे, साहा सुभे दक्षणची सरदेशमुखी शेंकडा दहा रुपये प्रमाणें दिवाणी मोहोरेची यादी अन्वयें एक कोट सत्रालक्ष एकुणीस हजार तीनशें एकुणीस रुपये बारा आणे पेशकसी बद्दल होतात त्यापैकीं चौथा हिसा रोख व बाकी किस्तबंदी येणें प्रमाणें ठरून वतन आम्हाकडे दिल्हे. ऐसीयास सदरहू ऐवज माझे जिमेस मी कबुल केला असे. याचे अदाईचा तपशील.

२९२९८४८ चौथा हिसा रोख.
८७८९५४२।॥· बाकी किस्तबंदीने.

११७१९३९०।॥·

येणे प्रमाणे मुचलका दिल्हा असे तेरीख छ १९ रावल सन मजकूर.

## [-४९३-२३]

दुसरे मुचलक्याची नक्कल.

नंबर १८ ब

मुचलका यादवराव वकील नि॥ राजे शाहु सन ७ लेहुन दिल्हा मुचलका ऐसा जे, साहा सुभे दक्षणची सरदेशमुखी दिवाणीचे यादी प्रमाणे आम्हाकडे मुकरार जाली. याजकरिता करार करीतो जे मुलकाची आबादी व मुफसदाची तंबी करून कोठें चोरी होउ देणार नाहीं. जाहल्यास मालकाचा मालकास देऊ, चोराचे पारपत्य करूं. हे न होई तरी चोरी बद्दल ऐवज रोकड देऊ आणि चांगले जमेतिनीसी सरकारी कामांत मदत जाउ. त्या येंकदर सुभ्याचा तपशील.

१ सुभे खुजस्ते बुनियाद औरंगाबाद दरोबस्त
१ सुभे फरखुदा बुनीयाद हैदराबाद दरोबस्त
१ सुभे दारूजफर विजापुर दरोबस्त.

३

१ सुभे वराड दरोबस्त.
१ सुभे महंमदाबाद बेदर दरोबस्त
१ सुभे खानदेश दरोबस्त.

३

६

[ - ४९३ - २४ ]

या प्रमाणे तीन फर्मान राज्य कदीम व चौथाई व सरदेशमुखी साहा सुभे दक्षीणची करून दिल्ही म्हणोन महंमद रफीयुदरज्यात पादशाहा यांणीं शाहु महाराजांचे नांवे फरमान करून दिल्हे. त्यांत मजकूर बहुत करून चाकर व्हावे वगैरे वरचेवर प्रौढी करून लिहीत गेले आहेत. अशीयास त्यालोकाची चाल पहिले पासून अशीच आहे कीं आपणास शक्ती थोडीहि असली तत्रापी अधीक बोलून दाखवावे, त्याअन्वयेंच अद्याप हरकोणास पत्र लिहिणे झाल्यास प्रौढी आपली दाखऊन लिहितात, त्या संप्रदाय प्रमाणेंच लिहीत गेले आहेत. असो. शाहूमाहाराज याजकडे सदरहू सनदा आल्यानंतर शाहुमहाराज याणी चौथाई व सरदेशमुखीचा ऐवज घ्यावयास प्रारंभ केला. बखरेंत पेशजी पासोन हे वसूल घेत होते असें आहे. असो. दिल्लीहून दक्षणेत एक सुभा आलमआलिखान म्हणोन होता. त्याउपरि हैदराबादकर नबाब किलिमखान आसफजाहा म्हणोन आले होते. त्याणीहि सुभ्याचे काम आपणाकडे कायम राहावे याजबद्दल शाहुमहाराज याचा आश्रय केला. तो मजकूर साद्यंत बखरीत आहे. शाहुमहाराज याणी बहुत करून इकडील किले कोट व मुलूक सर्व पेशजी प्रमाणें साधीला. परंतु राजाराम साहेब यांचे पुत्र संभाजी राजे यांचे मनांत व त्याची मातुश्रीचे वगैरेचे चितात आपण राज्यांत वाटणी मागावी, वगैरे मजकूर होते. सबब हैदराबादकराशीं राजकारण करीत असेत. हैदराबादकराचे घरांत फूट जाहाली आहे. हे आपले उपयोगी म्हणोन ते धोरण होते. इकडे दिलीस महंमद रफीयुदरजात बादशहा तक्तावर बसले होते. त्याचे जाग्यावर शाहेज्याहान म्हणोन दुसरे बादशाहा छ २० रजब रोज शनवार सन ११३१ हिजरी ( २९ मे १७१९) बादशाहातीवर बसले व शाहुमहाराजाकडील फौजा हिंदुस्थानांत जाऊन हरएक जागा खंडण्या व फत्ते पावत चालले. व बादशाही घराण्यांतही परस्परे येकमेक शाहाज्याद्याची विरूद्धे वाढून हरयेक राज्याची इछा करून जी माणसे करती होती, यांची फोड येक येकानी वगैरे केली. यामुळें दाबही कमी पडत चालला. सबब शहाजाहान याणी मनांत आणीले कीं, आपण येकादा मोठा आश्रय केल्यावांचून आपणाकडे बादशाहात कायम राहवायची नाहीं. जाणोन शाहुमाहाराजाकडील वकील बोलावून बोलणें लावीलें कीं, पेशकसीचा ऐवज आम्ही मागणार नाहीं, चौथाई व सरदेशमुखी वगैरे सनदा पेशजी दिल्या आहेत. त्याप्रमाणें महाराजानीं अनभव करावा आणि आमचे परम विश्वासू सैद अबदुलाखान वजीर आहेत याचे सल्यानें. वागावे आमची बादशाहीं कायम राखावी. मुलकास उपद्रव होऊ नये. याप्रमाणें झाल्यास आम्ही आपली बाजु आहे असें समजोन जे मनोरथ शाहुमाहाराज यांचे असतील त्याप्रमाणें सर्व करून देऊं. हे वकीलानी लिहिल्यावरून शाहुमाहाराज यांचे मनात आपलें पहिले राज्य हिंदुस्थानांत होते तसे आपले प्रतापाने पुन्हा स्थापावे असे वागत होते. सबब या मज-

कुराचा बादशाहाचा दस्ताऐवज असावा म्हणोन लिहिल्यावरून बादशाहानीं फरमान लिहिला त्याची नकल पारशी व तरजमा मराठी.

[–४९३–२५]

फर्मान

शाहाजहान याचा फर्मान

दुगरा शाहाज्याहान याचा.

मोहोर शाहाज्याहान याची.

नंबर १९.

जुवादतुल आशाबाह वल अयान खुलासतुल अमसाल वल अमरान उमदे राज हायकारदान मुतीयुल इसलाम राजे शाहु याणी बादशाही कृपेस आपला सत्कार जाणोन समजावे कीं, सांप्रत थोरले बादशाह याणी कैलासवास करण्यापूर्वी तीन चार दिवस आम्ही दौलतीचा अधिकार करावा असें सांगितलें. त्याजवरून छ २० रजब सन ११३१ रोज शनवारी (२९मे १७१९) तक्तनिशीन जाहालो आणि खजीना व हुकूम व शिक्का वगैरे स्वाधीन जाहाला. याजकरितां तुम्हांस हा फर्मान लिहिला आहे. तरी तुम्ही या विषयीं संतोष मानून पूर्ववत लक्षांत वागण्यांत आपले कल्याण जाणावे आणि आलमआल्लीखान वजीर व त्याजकडील कामदार व ठाणेदार यास मदत देउन असा बंदोबस्त राखावा कीं बादशाही मुलकांत कोणी बंड वगैरे कोणतेही तऱ्हेने खराबा न करीत. छ २७ रजब सन १ जुलुष (५ जून १७१९) (राज खंड ८, ले ७९, ३० जून १७१९) करीत.

याजखाली दिवाणाचा किताब वगैरे लिहिला आहे.

याप्रमाणें शाहाज्यादा याचे पत्र आल्यानंतर पुढे त्याचे शरीरी व्यथा होऊन वारले आणि त्याचे पुत्र महंमदशाहा तक्तावर बसू लागले. तेवेळेस दुसेर साहेबजादे याणी फंद केला. सबब त्यानीं शाहु माहाराज याजकडे राजकारण करून, पन्नास हजार फौज कुमकेस आणीली. ते वेळेस करार केला जे तुम्हास तमाम मुलकाजी चौथाई व सरदेशमुखी देतो, आणि राज्य कदीम जे तुमचे आहे त्याचे फर्मान करून देतो. तेव्हां माहाराजानीं उत्तर केळे कीं हिंदुस्थान आमचेच राज्य आहे. दक्षणच्या पेसजी सनदाही दिल्याच आहेत. बाकी आमचे आम्ही पाहु. सबब करार ठरून फौज गेली. व महंमदशाहा तक्तावर बसले. ते वेळेस त्याणी फर्मान लिहिला त्याची नकल पारशी व तरजमा मराठी.

[–४९३–२६]

नंबर २०

महंमदशहाचा फर्मान

जुवादतुल आशावाह वल अयान खुलासतुल अमसाल वल आमरान उमदे

राज हायकारदान मुतीयुल इसलाम–राजे शाहु याणी बादशाही कृपेस आपला सत्कार जाणोन समजावें कीं, सांप्रत थोरले बादशाहा यास तापाचा अजार होऊन कैलास्वासी जाहाले आणि ईश्वरकृपे आम्ही राज्याधिकारी जाहलो. सबब तुम्हास हा फर्मान लिहिला आहे. तरी तुम्हीहि ये विषयींचा संतोष मानुन पेशजी प्रमाणें इकडील लक्षांत वागण्यांतच आपले बढतीचे कारण समजोन आलम आलीखान वजीर व त्याजकडील उमराव यासी सख्य राखुन सुमेदार व ठाणेदार यास मदत देत जावी आणि असा बंदोबस्त राखावा कीं, कोणी मुफसद बादशाही मुलकांत बंड न करूं सकें. छ १९ जीलकाद सन १ जुलीष मुतावला सन ११३२ हिजरी (२३ सप्तेंबर १७१९; हिजरीप्रमाणें १२ सप्तेंबर १७२०) राज खंड ८ ले ८०, २२ सप्तेंबर १७१९.

याप्रमाणें बादशाहा याचा फर्मान आला. व परंतु पेशजी पासुन बादशाहि घरांत कलह वाढल्यामुळे जरब कमी जाली व महंमदशाहा ऐषआराम फार करीत असे. त्यामुळें हिंदुस्थानात अमीर उमराव होते तें आपलाले जागा जबरदस्त होउन हुकूम मानीनासे जाले व दक्षणचे सुभेही त्या प्रकारेच याजमुळे महंमदशाहा याणी शाहु माहाराजाकडील वकीलास बोलावून सर्व बादशाहीचा बंदोबस्त करावा. ते म्हणतील ते आम्ही कबूल करितो वगैरे बोलून भेटीस निसंषय यावे. म्हणोन बहुतप्रकारें खातरजमेचा फर्मान आपले पंज्यासुद्धां पाठविला. ह्याची नकल पारशी व तरजमा मराठी.

[ – ४९३ – २७ ]

नंबर २१

लायकुल इनायत वल अहसान म्हणजे महत कृपा व उपकारांस योग्य काबील तुल मरहमत वल हमतीजाल म्हणजे प्रसनता व प्रार्थनेस पात्र खानज्याहा अकीदत जिहाद म्हणजे परमभक्तीमान आत्मीक राजे शाहु याणी बादशाही कृपेस आपला सत्कार करून जाणावें कीं, तुमचे निष्ठेचा मजकूर सविस्तर तुमचे वकीलाचें बोलण्यावरून सरकारचे ध्यानांत आला आणि शाबासकीस कारण जाले व तुमचे मतलबास सर्व कबूल जाले. पेशजी वडीलाचे वेळेस जी कामें तुम्हांकडून घडुन आली ती लक्षांत आहेत. सबब पुढें दुसरी त्यापेक्षां अधिक आणखीही होतील असी खातरी आहे. याजकरितां हा फर्मान हाताचे चिन्हा सुद्धां लिहिला आहे कीं, जो मामुल आहे त्यांत तफावत होणार नाहीं व संकेता प्रमाणें सर्व घडून आल्यानंतर तहाचा फर्मान दक्षणचे चौथाई व सरदेशमुखी बद्दल कदीम राज्यासुद्धां लिहून दिल्हा जाईल, आणि पन्नास लक्ष रुपये इनामही द्यावेत एकूण या खेरीज जी बोलणी असतील ती हरयेक विषयींची कबूल होतील अशी खातरजमा ठेऊन जितके उपयोग होतील तितके इतबाराचे कारण आहे. छ १७ माहे सवाल सन ७ मु. सन ११३४ हीजरी (२० जुलै १७२२).

येणेप्रमाणें फर्मान येत गेले व शाहू माहाराज यांनींही मुसलतीचे जोराने जे वेळेस जसा प्रसंग पडला तसा साधून नेऊन पदरची माणसे पेशवे वगैरे वाढऊन,

हरेयक जागा त्याच्या फौज्रा पाठऊन राज्य आक्रमण करीत होते. तों राजाराम साहेब याचे पुत्र संभाजी महाराज यांनीं आम्हांस वाटणी असावी वगैरे तजवीज काढून पेशजी जाधव वगैरे हाती राजकारण हैदराबादवाल्याशी केलेंच होते ते बळाऊन युद्धास प्रवर्त जाले असता यश आले नाहीं. ते काळीं पुन्हा शाहुमहाराजाकडे बोलणें लावून आपला बंदोबस्त करून घेऊं लागले. शाहु महाराज याच्या व त्यांच्या भेटीं होऊन त्यास कांही मुलीक द्यावा समजुत करावी म्हणोन तहनामा करून दिल्हा त्याची नक्कल.

## [–४९३–२८]

(नंबर २२)

तहनामा राजश्री संभाजी राजे सुभा इहिदे सलासीन मया व अलफ छ १६ सवाल इा ता. मुक्काम सातारा (१३ एप्रिल १७३१).

इा वारूण माहाल ता. संगम दक्षणतीर कुल दुतर्फा मुलुक दरोबस्त देखील ठाणी व किल्ले दिल्हे असत. येकूण ओळी सु. ६ तुंगभद्रा पासोन तहद रामेश्वर देखील संस्थान निम्मे राजश्री संभाजी राजे यांस दिल्हे बोळी चार किल्ले कोपल त्यास दिल्हा त्याणी मुबदला रत्नागिरी द्यावी. वळी सुमार तीन. वडगांव किल्ला पाडुन देउ. वळी दोन. जे तुम्हासी वैर करतील त्याचे पारपत्य आम्ही करावे. आम्हासी वैर करतील त्याचे पारपत्य तुम्ही करावे. तुम्ही आम्ही येकविचार राज्याची अभिवृद्धी करावी. वळी सुमारे ७ सात. वारणेचा व कृष्णेचा संगमापांसोन दक्षणतीर ताां निवृती संगम तुंगभद्रा पावेतो दरोबस्त देखील गड ठाणी दिली. वोळी सुमारे ६. कोकणप्रांत सालसी पलीकडे तहत पंचमहाल अकोलें पावेतो बंदोबस्त दिल्हा. वोळी सुमारी चार. इकडील चाकर त्याणी आम्ही ठेउ नयेत. वळी तीन. मिरजप्रांतीची ठाणी देखील तासगांव आमचे स्वाधीन करावी. वळी तीन.

येकुण कलमे ९ करार करून सदरहु प्रमाणे तह करून दिल्हा असे.

## [–४९३–२९]

सदरहु प्रमाणे कलमे नऊ कराराप्रमाणे करून देऊ. यादी प्रमाणें बहुत काय लिहिणे. आसीरवाद. वळी सुमारी च्यार येणेप्रमाणे तहनामा शके १६५३ इंग्रजी सन १७३१ इा या अन्वये तहनामा ठरऊन, संभाजी राजे यांस मुलीक दिल्हा. त्याजकडुन आणखी राज्ये खाधणे व खंडण्या घेणे वगैरे कांहीं येक जाले नाही. ते काली शाहु महाराज यांणीं हरयेक मुल्कांत स्वाऱ्याकरून दक्षण व हिंदुस्थानांत मिळून कोठे खालसात आमल केला व कोठे खंडण्या

व कोठे चौथाई कोठे सरदेशमुखी कोठे बाबती वगैरे हरयेक बाबी मुलीक काबीज करून बसविल्या. त्या समई फौजहि बहुत होती. त्यायोगे अनेक शत्रू पादाकांत होऊन आज्ञेप्रमाणें वागत होते. राजधानींत अष्टप्रधान व प्रतिनिधी वगैरे नागपुरकर सेनासाहेबसुभा व सेनाधुरंधर सर्वही फौजसुद्धां तयार असोन हरयेक जागा स्वाऱ्या-सीकाऱ्या आज्ञेप्रमाणे करीत असत. ते काली स्वामीचे पुण्यप्रभावानें सरकारांत मुलुक खालसा व खंडण्या व चौथाई मिळोन यकंदर होता तो सुभेवार बिा.

१८२९११८९६५।.।।।. दक्षण नर्मदेचे आलीकडे सालेरी आहीवंत पासोन कर्नाटकांत चनी कावेरी पावेतो राज्य कर्दमच होते. बाकी सुभ्यांत चौथाई व सरदेशमुखी वगैरे

७८२८३९२६।। ।· सुभेदारूजफर विज्यापुर

१२०६६९५९ ।।।–।।. सुभे खुजस्ते बुनियाद औरंगाबाद

७५९५८९८ सुभे महंमदाबाद बेदर

५८०८१५९ ।।।≈ सुभे खानदेश बुरहानपुर

१३०५३४८९।. ।। सुभे वराड आल्नपुर

६६११०५३१ ।।।. ।। सुभे फरखुद बुनीयाद हैदराबाद

१८२९११८९६५ ।.।।।

३२४६१०६३ ।।।≈ हिंदुस्तान सुभे पंधरा हे पूर्वीचेच राज्यवंश वृक्षाअन्वये याचेच होते. हल्ली दक्षण काबीज झाल्या नंतर तेथें पुन्हा अमल बसऊन खंडण्या वगैरे घेत असत

२७१००१०३ सुभे आकबाराबाद आंगरे

३१०१२१५४ सुभे शाहाजाहानाबाद दिल्ही

१०६०९०९७१ सुभे इल्हाबाद प्रयाग

१८७०४९८ सुभे पंजाब

९२२५५९१ सुभे आयुद्धा

२४७५३४९।।।≈ सुभे मुलतान

१०५९७३७१ सुभे लाहूर

३५२४५९ सुभे काश्मीर

३७०४२०१ सुभे अंतरेबदी

२३६५३९७ सुभे टेटा

९६३५५५१

८४७२२९९

सुभे ब्रहार
८६१९२४६०
सुभे बागलाण
८९६२८०३
सुभे गुजराथ

सुभे मालव
१६५५८८५६
सुभे उडइसा

---
३२४६१६०६३॥≡

---
५०७५३५०२९८≡॥

येणेप्रमाणे मुलीक कोठे खालसात आणि कोठे खंडण्या ठरबिल्या कोठे चौथाई सरदेशमुखी व धारदाणा बगैरे अनेकबाबी बसविल्या. येणेंप्रमाणें दक्षण हिंदुस्थान आक्रमण केलें. पुढें शाहूमहाराज याणी कैलासवास केला. हें देशोदेशीं कळल्यावर जितके अमल बसले होते तितकेच चहुकडे दाबले गेले आणि रामराजे महाराज राज्यावर बसले. तेवेळेस च्यारवर्षे पावेतो पेशवे येकनिष्ठपणे सेवा करून आज्ञा होईल त्याप्रमाणे वर्तत असत. नंतर दिवसेंदिवस मुखत्यारी जास्त करित जाऊन आपणच जोरावर होऊन इरयेक कामात हुजुरचा हुकुम घेणें वगैरे सोडून सरदार व कामदार वगैरेस पदाची वस्त्रें देवविणें व आपण प्रधानपदाची वस्त्रें घेणें व हुजुर येऊन चरण बारदारी करणें वगैरे करीत होते. त्याउपरी अलिकडे जो मजकूर जाला तो सर्वास माहित आहे. सारांश सूर्यवंशी क्षत्रीय कुलावंतस याची पिढी दरपिढी सर्वास समजण्याकरितां आनेक ग्रंथाचे आधारावरून जो पेशजी वंशवृक्ष लिहिला आहे. त्यातील मुख्य याचेच पुरुषाची नांवे तपशीलवार लिहितो.

| | |
|---|---|
| १ श्री विष्णुसगुण स्वरूप | २ ब्राह्मण श्रृष्ठी निर्माणकरतां |
| ३ मरीची | १ मरीची सूर्यवंशकारण |
| ४ कश्यप | १ आत्री चंद्रवंशकरण |
| ५ विवस्वत मनु | — |
| ६ श्राधदेव मनु यांस | २ |

| | | |
|---|---|---|
| आकरापुत्र पो. | | ७ इक्ष्वाकु |
| ८ विकुक्षी | ९ पुरंजय | १० अनेमा |
| ११ पृथु | १२ विश्वगांधी | १३ चंद्र |
| १४ युवनाश्व | १५ शवस्त | १६ ब्रहदश्व |
| १७ कुवलयाश्व | १८ धृढाश्व | १९ हर्यश्व |
| २० निकुंभ | २१ बहिरणाश्व | २२ कृशाश्व |
| २३ सेनजीत | २४ यौवनाश्व | २५ मांधाता |
| २६ पुरुकुछ | २७ त्रसदस्यु | २८ आनरंण्य |
| २९ हर्यश्व | ३० आरूण | ३१ त्रीबंधन |

| | | |
|---|---|---|
| ३२ त्रिशंकु | ३३ हरिश्चंद्र | ३४ रोहीत |
| ३५ चेण | ३६ सुदेव | ३७ विनय |
| ३८ भरूक | ३९ वृक | ४० बाहीक |
| ४१ सगर सार्वभौम | ४२ असमंज | ४३ आंशुमान |
| ४४ दिलीप | ४५ भगीरथ ज्याने भागीरथी आणिली | ४६ श्रुत |
| ४७ नाभ | ४८ सीद्धीदीप | ४९ आयुतायु |
| ५० रुपर्ण | ५१ सर्वकाम | ५२ सुदास |
| ५३ कलमाशपात | ५४ आश्मक | ५५ नारीकवच परशरामाचे वेळस होता. |
| ५६ दशरथ | ५७ ओडुहीड | ५८ विश्वासह |
| ५९ खटवांग | ६० दीर्धबाहु | ६१ रघु |
| ६२ अज | ६३ दशरथ | ६४ रामचंद्र (अवतार) |
| ६५ कुश | ६६ आतीथी | ६७ निषध |
| ६८ नभ | ६९ पुंडरीमाक | ७० क्षमधन्वा |
| ७१ देवानीक | ७२ आहील | ७३ परियात्र |
| ७४ बालस्थल | ७५ वज्रनाथ | ७६ स्वगण |
| ७७ धिधृती | ७८ हिरण्यनाथ जैमीनीचा शिष्य | ७९ पुण्य |
| ८० ध्रुव संधी | ८१ सुदर्शन | ८२ अग्नीवर्ण |
| ८३ सिध्र | ८४ मनुक कषग्रामी ओहतो | ८५ पशुश्रुत |
| ८६ संद्धी | ८७ आकर्वण | ८८ सहस्वान |
| ८९ विस्वसावह | ९० ब्रहत्वल हा अभिमन्यूने मारला | ९१ ब्रहद्रण |
| ९२ उरूकीय | ९३ वछवृद्ध | ९४ प्रतीलोभ |
| ९५ भानु | ९६ दिवक | ९७ सहदेव |
| ९८ वीर | ९९ बृहदस्व | १०० भानुमान |
| १०१ प्रतीकान | १०२ सुकतीक | १०३ मरूदेव |
| १०४ सनुक्षत्र | १०५ पुस्कर | १०६ अंतरीक्ष |
| १०७ सुतपा | १०८ आमित्रजीत | १०९ बृहदभानु |
| ११० बही | १११ कृतंजय | ११२ रणजय |
| ११३ संजय | ११४ शाकय | ११५ शुद्धोद |
| ११६ कंग | ११७ प्रसेनाजित | ११८ क्षुद्रक |
| ११९ कुणक | १२० सूरथ | १२१ सुमित्र विक्रमाचेवेळेस मारला गेला |
| १२२ शतधन्वा | १२३ माहासेन | |
| १२४ कृतवर्मा | १२५ शतानीक हे | |

१२६ कृतकार्य
१२७ तीव्रसिंह
१२८ मान्यसीव्ह
१२९ अजपाल
मेवाडचें राज्य
करीत होते
१३० जयसेन यांणीं
सिधदेवीचे
आराधन
करून परीस
घेतला व राज्य
साधीलें

की अशर येथे
राज्य करीत विक्रम
संवत १३४

त्यास पुत्र
१ शतधन्वा
शिसोद्याचा
पुर्वज
१ कुश कसवाव
पुर्व याचा
पुर्वज

---

२
१३१ सुभानसिव्ह
याणी कीला
चीतोड बंधीला
१३२ पृथ्वीपाळ

१३३ सुरजसिव्ह
१३६ सहागसिव्ह
१३९ सजनसिव्ह
यांनीं साधंवाडा
येथील राज्य घेतलें

१३४ माहसेन
१३७ सुमरसिव्ह
१४० दिलीपसिव्ह
महाराणा

१३५ प्रतापसेन
१३८ लक्ष्मणसिव्ह
हे पद्मिणीकरितां
लढले यास पुत्र

१ सजन सिव्ह

१४१ शिवाजी माहा-
राणा यास पुत्र
१ सोधवडकर
१ भोसजी
महारणा

---

२

१४२ भोसाजी
महाराणा यास
पुत्र दोन
१ नेपाळवाले
१ देवराजजी

---

२

१ आरसिव्ह हे उदेपुर
कराचे पुर्वज

---

२

१४३ देवराजजी महा-
राजा दक्षणेत ये-
उन भोसावत हे.
भोसले असे नांव
पडले
१ महादेव ख-
वनटी हिंग-
णी देऊन
गांवकरवा-

१४४ इद्रसेनजी महा
राजे
१४६ रूपसीव्हजी
१४८ धोपजी महाराज
१५० खेमडजी महा-
राज
१५२ संभाजीमहाराज
१५५ शहाजी माहा-
राज हे नगर

१४५ शुभ कृष्णा
जी माहाराज
१४७ भुमींद्रजी म.
१४८ बारहटजी
महाराज
१५१ कर्णसिव्ह म-
हाराज
१५२ बाबाजी मा-
हाराज यांस

वी. वगैरे ध-
राणो नागपुर
१ इंद्रसेनजी
—
२
१४५ मालोजी माहा-
राजा यास पुत्र
शरीफजी सू-
रवे म्हणतुं ला--
गले. पुढे खानवेलीस राहिले
सबब यांस खानवलकर
म्हणतात व दुसरा
शाहाजी महाराज
१५७ संभाजी महाराज
१५८ शाहु महाराज
याणि दक्षण
हिंदुस्थानांत
अमल
बसविला
१५९ रामराजे महाराज
१६१ प्रतापसिव्ह महा-
राज हल्ली साता-
रा येथें राज्य
करितात.

व विजापुर येथें
वजीरीवर होते
त्यास पुत्र तीन
१ संभाजी राजे
युद्धांतत मारले
गेले
१ व्यंकोजी
राजे घराणें
चंदी चंदावर
१ शिवाजी म-
—
३
१६० शाहु महाराज
धाकटे यास पुत्र तीन
१ प्रतापसिव्ह
माहाराज
१ रामराजे
महाराज.
भाऊसाहेब
वारले.
१ शाहाजी मा-
हाराज
आपासाहेब
—
३

पुत्र
१ मालोजी
माहाराज
१ विठोजी
—
२
१५६ शिवाजी मा-
हाराज यांणीं
धर्म स्थापला
यास पुत्र दोन
१ संभाजी
माहाराज
१ राजाराम
साहेब
घराणे
करवीर
—
२

~~~~~~~~~~~~~~~~

प्रभात, धुळें, व. १, अं. ११ व १२, माघ व फाल्गुन शके १८२८, पृ. १-१६ व १७-२४; व. २ अं. १ व २ चैत्र व वैशाख १८२९, पृ. २५-४० व ४१-५२.

## ( -४९४- )

भोंसल्यांच्या वसतींच्या गावांची यादी

गावांची नांवे

१ सातारा
२ चंदी चंदावर
३ खानवट
४ तांदुळवाडी (ता. गंगापूर)
५ कोडरुरे, प्रा सातारा
६ जिंती
~~~~~~~~~~~~~~~~

७ भांबोरे (प्रा चांभारगोंदे)
८ नानजवळ
९ कवठ
१० राजेगांव
११ मुंड (प्रा वाई)
१२ हिंगणी
१३ किन्ही (वाई)
१४ सिरीम (,,)
१५ येसकळ (,,)
१६ येळू पिंपरी
१७ तारगांव नारगांव
१८ खानापूर
१९ तडवळ (प्रा वाई)
२० उघडन प्रा इंदापूर
२१ चांभारगोंदि
२२ जलालपूर (प्रा चांभारगोंदे
२३ शेडगांव
२४ बेलवंडी (प्रा करड लिंबोणे)
२५ भावसडे
२६ लिंबगांव
२७ आरवी प्रतापरायाची तर्फ माकूर
२८ सुती तारापूर
२९ गांव देवळानी हंबीररायाची
३० कारल
३१ जळगांव प्रा बारामती
३२ गव्हान (प्रा दर्यापूर)
३३ तऱ्हाळे (प्रा कऱ्हाड
३४ सिरापूर
३५ टाकळी
३६ जोगवडी
३७ कडे ठाण
३८ बाखडी
३९ बावंडी
४० पारगांव
४१ टकवाड
४१ हिंगणगांव
४३ पळसदेव
४४ कोथूट
४५ तुळापूर
४६ पाटेवाडी
४७ दिवी खिरडी
४८ रेटरे
४९ आव्हाळ
५० कडसमुडी
५१ वाठार
५२ नरतवड
५३ नागापूर
५४ पडजवल
५५ खोडसी
५६ वडस (सातारा)
५७ उंबर (आकळूज)
५८ इस्लांमपूर
५९ मांडोगण
६० देवराष्ट्र
६१ सरकुली
६२ मंगरूळ
६३ येळंच (वाई)
६४ सिरगाव (वाई)
६५ जाम (वाई)
६६ खवजनपूर (वाई)
६७ अपसिंग (,,)
६८ रहिमतपूर (,,)
६९ सुरगली (,,)
७० देवपिंपरी
७१ अंगापूर
७२ शिंगणापूर
७३ बनसेंद्रें
७४ वडनेर
७५ वावी
७६ संभुखेड

७७ राजोडी बिजोडी
७८ रांजणो धुळगांव
७९ बोरगांव
८० इंदापूर
८१ फलठण
८२ भाळककिरात
८३ येलकभाद
८४ सेळव
८५ भिकवाडी
८६ जामत
८७ पारड
८८ पाटनखोर
८९ नेलकरंज
९० अंजनडोह
९१ कोल्हापूर
९२ बीड ( कोल्हापूर )
९३ चिकोढी
९४ मनराजुरी
९५ सरकोर
९६ कळंब
९७ केरल ( प्रा दहि )
९८ गांवकरिता
९९ कडेपूर
१०० वडगांव
१०१ करळ
१०२ पिंगवत
१०३ धानवी ( गांडापूर )
१०४ बीट ( बीड )
१०५ अष्टी ( गोपाळरायाची )
१०६ जखड ( प्रा परंडा )
१०७ वेळापूर
१०८ तळिवनी सिरसगांव
१०९ रायगांव-सायगांव
११० ताडल
१११ रेवड
११२ कळस ( इंदापूर )
११३ बनवाडी ( चंदनवंदन )
११४ जांबगांव (वाई)
११५ भोईज (वाई)
११६ सासूर
११७ नागोठण
११८ नागपूर
११९ कऊलाग
१२० अक्कलकोट
१२१ विशालगड
१२२ हरीपूर
१२३ पंढरपूर
१२४ माणिकदौंडीची टमळवाडी
१२५ मुंगी

~~~~~~~~~~~~

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. १३९-१४०.

## (-४९५-)

[ कुमठे येथील राणे भोसल्यांची हकीकत ]

वौशावळ दालजी राणे भोसले मौजे कुमठे बुजरुख कुस्मेस्वराचे सा कोरेगांव पां वाई सुहूर सन हाजार १०७० सबैन अलफ.

आपले मूळ पुरुष रतनसिंह पा मौजे कुमठे बुजरुख यास पुत्र

१ भागीवंत वडील                    सावजी यास पुत्र
~~~~~~~~~~~~

१ जयसिंग दुसरा
१ सुरसिंग तिसरा
१ उदसिंग चवथा
१ कमलसिंग पाचवा
१ चितसिंग
—
६

१ वडील सिवाजी
१ दालजी दुसरा यास पुत्र इजाजी व येसू आहे.
१ लखमोजी तिसरा
१ भानाजी चवथा
१ रामोजी पाचवा
—
५

एकूण असामी साहा याचा विस्तार
भागीवंत यास पुत्र
१ सावजी वडील
१ दुसरा मालोजी
—
२

मालोजीस पुत्रे तोच आहे १
बाकी राहिलेले आसामी पांच
१ जयसिंग दुसरा
१ सुरसिंग तिसरा
१ उदसिंग चवथा
१ कमलसिंग पाचवा
१ चितसिंग साहावा
—
५

येणेप्रमाणे पांच असामी बेदराहून पातशहानी चंदीच्या टाणीयास पाठविले, तिकडेच पाच जण झुंजात टाणियाच्या पडिले. पाच जणाचे नकल जाहाले. आमचे आजे भागीवंत बेदरात पातशाहापासी राहिले. मौजेमजकूरच्या पाटीलकीचे कामकाज चालिले पाहिजे याजकरिता गुमास्तेगिरीस तुकोजी व राजजी पनाळे यास ठेविले होते तैसेच कुमठीयात ठेऊन गेल होते. काजिया पडोन पनाळे यास पहिलेच पातशाहानी खोटे केले होते. भागीवत यास पहिल्याने बायको दताजी जाधवराव याची लेक सुलक्षणाबाई केली होती. ती पाच जण चदीच्या ठाण्यात पडिले म्हणून त्याच्या दुःखेकरुन मृत्य पावली. तिच्या पोटी काही विस्तार नाही. तेव्हा भागीवंत यास बायेको पाहिजे म्हणून बेदरात दादजी गोयाजी माने होते त्याची बहीण उपवर नवरी होती तिचे नांव रंभाबाई ती पातशाहानी भागीवंत राणे भोसले पाटील मौजे कुमठे बुजरूख यास बायेको करून दिल्ही. तिच्या पोटी विस्तार पुत्र वडील सावजी व धाकटा मालोजी व लेक येमाबाई येणेप्रमाणे मुले जाहली. पुढें आमचे आजे भागीवंत बेदरात मुत्य पावले म्हणून आम्‍ची आजी रंभाबाई याणी आपली मुले लहान कुमठे येथील पाटीलकी कारभार थोर याजकरिता मागती तुकोजी राजजी पनाळे यास पाटीलकीच्या गुमास्तेगिरीचे काम सांगोन बेदराहून पातशाहाई हुकम घेऊन आपल्या पाटीलकीच्या गांवावरी सावजीस व मालोजीस व येमाबाईस कुमटीयास घेऊन आली. पाटीलकीची गुमास्तेगिरी च्यार

वर्षेपर्यंत रंभाबाईच्या आज्ञेप्रमाणे केले. पुढें बाईच्या आज्ञेप्रमाणे वर्तणूक करीनासे जाले. पाटीलकीचे खावंद आम्ही तुमचे नातें कांही नाही म्हणून बाईपासी बेबदल होऊन फिराऊन गोष्टी पनाळे सांगू लागले. उपरांतीक रंभाबाई याणी उभयता पनाळे यासी उतर केले कीं माझ्या दादल्याने तुजला पातशाहापासी खोटे केले. आता माझी मुले नेणती व मी बायको देखोन बदअमली आम्हासी करिता तरी तुम्ही आमचे पाटीलकीची गुमास्तोगिरी न करणे. तुमचे काम नाहीं. तुम्ही जाणे. माझ्या कुमट्यास न राहणे. ऐसे बाइचे बोलणे पनाले याणी ऐकून मनसबा केला की बाईस व मुलास दगा करून जिवे मारावे. याजला मारल्यावर आम्ही पाटीलकीचे धणी अहो. ऐसा मनसबा केला. ती बातमी बाईस कळताच बाईनी आपले भाऊ दादजी गोंयाजी यास वाडीहून बोलावून आणिले. त्याजला पनाळे याचा विचार सांगितला. उपरांतीक बाई आपल्या उभयता भावास व सावजीस व मालोजीस व येमाबाईस बेदरास घेऊन गेली. तेथें जाऊन आपले दोघे लेक यास पोशाख करून मौजे कुमठे बुजरूख कुमेस्वराचे येथील आपले पाटीलकीचे वतनाचे कागद बराबर देऊन पातशाहाचे भेटीस पाठविले. पातशाहा तख्तराव्यावर होते. नजीक कचेरीस खाली ख्यालतमाश्या कलावतीणीचा होत होता. तेथें दाटी बहुत. जावयासी रीग होईना. तेव्हा सावजीने तजविजीन रीग करून जाऊन कचेरीस तख्तराव्याखालता उभा राहिला आणि पातशाहास मुजरा केला. तो पातशाहानी आपल्या मनांत आणिले की हे मारेकरी आहेत. तेव्हा हुजरातीस हुकूम केला की हा मारेकरी आहे. तरी यास धरून नेऊन वडाचे झाडाखालते याचे डोसके मारणे. ऐसी फर्मास जाली. एकाएकीच सावजीवर गर्दी जाली. इतकी इशारत होताच सावजीने जलद करून झग्याच्या खिशात हात घालून वतनदारीचे कागद पाटीलकीचे होते ते पातशाहाच्या पुढे टाकिले. लिखा पाहाताच सबूर ऐसा हुकूम हुजरातीस केला. कागद वाचून पाहिले तो मोजे कुमटे बुजरूख पा। बाई येथील राणे भोसले पाटील याचे निघाले. तेव्हा डोचके मारावयाचे पातशाहानी राहाविले आणि सावजीस पुरसीस केली की तुजकर काये जुलुम आहे तो सांगणें. त्यावरी जी हाकीकत जाली होती ती सावजीने पातशाहाजवळ जाहीर केली कीं माझा बाप भागीवंत याणें पनाळे यास कुमट्याची पाटीलकीची गुमास्तेगिरी सांगितली म्हणून त्याणी आम्हा मायलेकराचा मारा करावयाचा मांडिला आहे. याजकरिता हाजूर आलो. साहेब दुधापाण्याचा निवाडा करणार आहेत. त्याजवर पातशाहा बोलीले की पनाळे गुमास्ते ठाऊक आहेत. तेच वेळेस पनाळे यास पातशाहानी ... देवाकडून बेदरी पंचाईत करऊन खोटे केले. पारपत्य करून शहर बेदर लाऊन दिल्हे. रंभाबाई यानी पातशाहास अर्ज केला की साहेबी पनाळे यास खोटे करून लाऊन दिल्हें. आतां माझा गांव थोर, मुले लाहान चालवितो कोण, याजकरिता माझे भाऊ दादजी गोयाजी माने नाईकवाडी बेदरचे आहेत त्यास माझ्या दादल्याने जमीन पाच चावर कृष्णेचे तीरी करून दिल्ही आहे त्याजला साहेबी हुकूम करावा म्हणजे

माझी मुले नेणती आहेत तोपर्यंत पाटीलकीची गुमास्तगीरी चालवितील. आमचा पाटीलकीचा मानपान होळीची पोळी माहार नांगर सिरालशेट विडा टिला पटीपछोडी हाक लाजिमा कानू कायिदे इनामती चावर व घुगरी सेव धार येणेप्रमाणे माझे मजकडेच चालवावे. गुमास्तेगिरीचा कारभार मात्र माझे भाऊ माने याणी करून माझी मुले नेणती आहेत ती वाढवावी. याप्रमाणे अर्ज केला. त्याप्रमाणे पातशाहानी अर्ज ऐकून दादजी गोयाजी माने यास आपले हुजूर हुकूम केला की पनाळे खुनी नफर दिसोन आले. याजकरिता त्याचे पारपत्य करून खोटे लाऊन दिल्हे आहेत. तरी रंभाबाई याची मुले लहान नेणती आहेत तो पर्यंत तुम्ही त्याच्या गावची पाटीलकीची गुमास्तेगिरी घेऊन जाऊन करणे. बाईचे रजतलबेखेरीज वर्तणूक न करणें. पाच जण चंदीच्या ठाण्यात पडिले. हे जाहीरपणा पातशाहास कळला. पातशाहानी हुकूम पाचजणाच्या बायेका सती निघत आहेत. तरीं तुम्ही पांच थडी आपल्या वतनाच्या गावावरी बांधणे. सरकार साहित्य हुजूरचे दिल्हे. कलवतीणीचा ताफा व सदानद परमानद घडसी वाजंत्री व भाट ऐसे दिल्हे. आपले गांव पाटीलकीचे कुमठे बुजरूख येथें आली. सती निघाल्या. पाच थडी बांधली. गावावर रंभाबाई व मालोजी व यमाबाई कुमठ्यांत नांदू लागली. सावजी परभारें चंदीच्या ठाण्यास पातशाहाचा हुकूम घेऊन गेले. दादजी गोयाजी बाईच्या रजेतलबेत राहून मौजेमजकुरचे पाटीलीचे गुमास्तागिरीचे कामकाज करून राहिले. दादजीचा लेक दत्ताजी होता. त्याजला येमाबाईचे लग्न करून दिल्हे. तिकडे सावजीने चंदीचे ठाणे बलकाविले. हे खबर पातशाहास कळली म्हणून रणदुलाखान यास हुकूम पातशहानी केला कीं राणे भोसले पाटील कुमठे बुजरूख वाई येथील आहेत. त्याणी चंदीचे ठाणे बळकाविले आहे तरी तुम्ही तेथे जाऊन कुमठ्यांत त्याची मुले माणसे आहेत ती धरून कैद करणें. गांव लुटून टाकणें. म्हणून हुकुम जाला होता. तो हुकुम रणदुलाखान घेऊन स्वारी तयार करून कुमठ्यास येऊन गाव लुटला. रंभाबाई मुले यास घेऊन दादजी गोयाजी यास घेऊन परागंदा जाहली. ही खबर चंदीस साबजी होता तेथें कळली. चंदीहून साबजीने पांच हजार फौज तयार करून रणदुलाखान याजवरी चढाई करून आला. रणदुलाखान यास हारीस आणिले. गावची खबर घेतली. तो रणदुलाखान याणे गाव जाळून जमीनदोस्त करून टाकिला. दुसरे जागा पांढर बसवून नांव रहीमपूर ठेविले. तेंव्हा रणदुलखान याची व सावजीची कटकट बहुत जाली. मधी दरम्याने माने पडिले आणि सांबजीची व रणदुलाखान याची समजूत करून दिल्ही. सला जाहाला. आपली मौजे मजकुरची पा हाली रहिमपूर नाव वसाहत जाली आहे. तरी तुम्ही करून राहणे. मुलमाणसे परागंदा जाहली असतील ती गांवावरी आणून पाटीलकीची वहिवाट करणें. याप्रमाणे बोलणे होऊन रणदुलाखान फिरोन विजापुरास गेला साबजीने मुले माणसे आणून माने याच्या हवाली करून दत्ताजी माने दादजी माने याचा लेक यास आपले पाटीलकीची गुमस्तगिरी ज्याप्रो। दादजी गोयाजी करीत होते

त्याप्रमाणें सांगून बाईची आज्ञा घेऊन आपण निघोन चंदीस गेले. हाली माने आमचे गुमास्ते ऐसे असोन सांगितले काम तरी कह्यांत नाही. याजकरितां तुम्ही प्रा। मजकूरचे जमीदार आहां. आम्हांस तुमचे महजरपत्र देशमुख व देशपांडे याचे असल्यांनें दुसरीयाचा दावा आम्हावरी चालणार नाहीं. त्यास तुम्ही देशमूख व देशपांडे आहां व हाजीर मज्यालसी देव आहे. आम्हावरी मेहरबान होऊन महजर करून देऊन वौशावळ आपल्याजवळ ठेवावी. याप्रमाणे हाकीकत सर्ह मोर्तब.

भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १७३७, स्वी. ग्रं. क्र. ११, पृ. २१४–२१७.

( – ४९६ – )

[ शिवाजीमहाराजांचा वडील भाऊ संभाजी ]

१ लुइस राईसकृत एपिग्राफिआ कर्नाटिका नामक ग्रंथमालेच्या इ. स. १९०५ त छापलेल्या दहाव्या खंडांत खालील शिलालेख आलेले आहेत. त्यांत शाहाजीराजे भोसले यांचा वडील पुत्र संभाजी याचा उल्लेख आहे, तो असा–

(१) [1]जयसंवत्सर आश्विन ब ५ (१० आक्टोबर १६५५) व्रलु श्रीमत् राजाधिराज राजमान्य राजश्री संबोजीराज महाराज रैयनवर इ. इ. इ.

Epi. Carnatica Vol. X., कोलार, १९३, मदवाडी होबळी.

(२) [1]विजयसंवत्सर कार्तिक बहुल ११ ( २४ नवंबर १६५४ ) लु श्रीमत् राजाधिराज राजराजश्री संभाजीराज महाराजद इ. इ. इ.

Epi. Car. Vol. X., मुलबागल, १५४, कोंडीपल्ली होबळी.

(३) स्वस्ति श्री विजयाभ्युदय शालिवाहनशकवर्षगलु १५८५ शुभकृतुसंवत्सरद वैशाख शु ५ ( २ मे १६६३ ) लु श्रीमद्राजाधिराज राजश्री संभाजी राजेसाहेब इ. इ. इ.

Epi. Car. Vol. X., मुलबागल, ११९, होळूर, होबळी तळयाजवळ.

(४) स्वस्ति श्री विजयाभ्युदय शालिवाहनशकवरूषंगलु १५८८ नी विश्वावसुसंवत्सरद पुष्य ब. १० ( ९ जानेवारी १६६७ ) .... दय पुण्यकालददलु श्रीमत् कौशिकगोत्र भोसलतिल शिवाजी (शहाजी) राजर पुत्रराद संभाजीराजर कुलस्त्री जैताबाय मानवर इ. इ. इ.

Epi. Car. Vol. X., कोलार, २२७, होळूर, होबळी.

---

१. कर्नाटकांतील पद्धतीप्रमाणे हीं गत संवत्सरांचीं नामें आहेत.

२ ह्या शिलालेखांत,

| | | | |
|---|---|---|---|
| विजयसंवत्सर शालिवाहन शक | १५७६ | इ. स. | १६५४ |
| जय | १५७७ | | १६५५ |
| शुभकृत् | १५८५ | | १६६३ |
| विश्वावसु | १५८८ | | १६६६ |

शक वर्तमान आहेत. संवत गत आहेत.

३ म्हणजे शहाजीचा पुत्र संभाजी, शक १५७६, १५७७ व १५८५ ह्या तीन सालांत हयात होता. त्याची बायको जी जैताबाई तिचा शिलालेख शक १५८८ तील आहे. त्यावरून असें दिसतें कीं, शक १५८५ पासून शक १५८८ पर्यंतच्या तीन वर्षांत संभाजी केव्हां तरी वारला.

श्रीसरस्वतीमंदिर, वर्ष ७ अंक १, क्र. २९, चैत्र शके १८२९, पृ. १–२.

## (–४९७–)

राजेश्री बालाजी हार मेंडजोगी यांस रगभट बिन... जगमईत्र पिरगुटकर मौजे पिरगुट मौजे पिरगुट ता। मुठेखोरे लेहौनु दिधले ऐसे जे. मौजेमजकुरीचे कुलकर्ण आपली मिरासी होती. अैसियास आपणास पुत्र नाहीं व दाईज गोत्रज हि नाही. आपल्या माघाऱ्या वृती खावयास कोण्ही नाही. ह्मणउनु आपण मौजेमजकुरीचे कुलकर्ण तुह्मास पैके घेऊनु विकिले. त्याचा कागद अल्हादा आपण तुह्मास लेहौनु दिधला आहे व महजरहि करूनु दिधला आहे. यैसयास तुह्मी आपणास पुसिले जे मौजे मजकुरीं मुशाहिरा व हकलाजिमा काय चालिला आहे. तो मोकदमाचे गोहीनसी लेहौनु देणे. त्याप्रमाणे आपण घेत जाउनु म्हणऊनु पुसिले. तरी कुलकर्णास मुशाहिरा व हकलाजिमा मौजे मजकुरी सालाबाद एणे प्रमाणें आहे. बितपसील

मुशाहिरा सालिन्या हरसाल मुजेरी कास खडी ९२ दर खडीस मख्ता देखील गला टके १॥· येकूण टके १३८८.

पेठ शाहापूर टके पचवीस २५ निा। मोहतर्फा टके

१७।४॥ निा। पवले

१७।४॥ निा। गोले

२।३ वाडी तुकाई

———

३७८.

---

२ संभाजी पडला हे ऐकूण शाहाजी युद्धार्थ गेला व घोड्यावरून पडून २३ जानेवारी १६६४ रोजी मेला. त्यापूर्वी दोन तीन महिने संभाजी मारला गेला.

हकलाजिमा हरसाल चवाले निा धणगर सालिन्या चवाली दोनो २

निा तेली तेल दर दुकानास आठा दिसा दर घाणियास वजन नव टाक ८८८९

खाटीक दर दुकानास आठा दिवसा बाजारात रूका येक ८१

निा कोस्टे व साली व ढवण निा मोहतर्फा व पेठ

मोहतर्फा निा पवले पासोडी येको १ धोतरजोडा येक १ रूमाल १

मोहतर्फा निा गोले पासोडी येक १ धोंतरजोडी येक १

निा पेठ शाहापूर पासोडी १ येक धोतरजोडा १ येक रूमाल १

वेव्हारे दोघे वादी सभेस वेव्हार सांगायास एतील त्याचे कतबे अगर तकरारी लिहिल्यावरि दोघा यासी घेणे रूके ।॥ ८

अग्रवादी ।४ पचमवादी ।४

गावामधे वराडें व पाट होतील त्यांस उलफा माजना घेणे.

सुमार उंस आंबे माजना पाहोनु घेणे

निा चाभार जुते वाहाणाचे जोडा येक १

| | |
|---|---|
| निा तांबोली पाने दर गुरास सुमार पंचवीस २५ | बाजारात आठा दिसा दर दुकानदारास पाने १३ |

निा पेढारी दर दुकानास आठा दिवसा अडका ८॥

निा मोमीन मुडास येक १

निा बकाल दुकानदार आठा दिवसा बाजारात दर दुकानास सुपारी येक १ पकसई बाजारात हर जिनसास दर मोटेस पसा येक १

निा माली मालवे सेव बैल व टोणगियाचे भरीत व मोट व पाटी ऐसे विकायास एईल त्यास माजना पाहोन घेणें.

सण निसबतीवार

| तेली | तांबोली |
|---|---|
| १ दसरा | १ दसरा |
| १ दिवाली | १ दिवाली |
| १ सिमघा | १ सिमघा |
| १ भावई | १ भावई |
| — | — |
| ४ | ४ |
| दर सणास दर दुकानास तेल वजन नव टाक ८८९ | दर दुकानास सदर सणास पाने पचवीस २५ |

गुल

दर बैलास वजन पटी ८१। दर पाटीस ८८।

| | |
|---|---|
| खारखंड अडवार व बाजार दर दुकानास ८॥ | केले दर बैलास सुा ५ दर पाटीस येक १ |

कागद ब्राब हरसाल सालिन्या मरुता पटीस घालून घेणे टके बारा १२ एणेप्रमाणे आपले वडील घेत आले व आपण हि घेत होतो. त्याचप्रमाणे तुम्ही घेऊनु सुखे कुलकर्ण खाणे हे लिहिले. सही

गोही

रा चाहूजी गभिराऊ
मारण देसमुख तपे मुटेखोरे
दादसेटी गोलासेटीया व बालावा माहाजन पेठ शाहापूर मौजे मा।
दाद सेटी सेटिये निशाणी तराजू
बालसेडी महाजन नि. तराजू

बलुते मौजे मजकूर

जोसी अजहती
जोसी राइरकर
भिवा सुतार (नि. किंकरे)
सोन सालवी कुंभार (नि. चाक)
पिल माहाला न्हावी (नि. आरसा)
महार परस नाक मुकाबला कौम आंबी (नि. काठी)
पाडेवार माहार वीर जुमाल मौजे मा।
चांदभाई बिन फनुभाई मुलाणा (नि. मनोरा)
कान्ह मेहतरी चांभार (नि. विगा)
भिवा वरटा परीट (नि. डिवणे)
सिव दरणा गुरव (निशाणी जेंगट)
तराल भान नाक (नि. काठी)
दादनाई मांग (नि. भाली)

मोकदम मौजे मजकूर

रायजी पवला
मोकदम ता। पवले नि नांगर
रायाजी बिन भिकाजी गोला मोकदम
वाडी तुकाई नि।। नांगर
बाबाजी सेटींगा मौजे मजकूर
मलसेटी पिरगुटकर बाला सेटी पाहाडी
बाबलिंग जंगम (नि।। घंटा)
विसाजी मोकदम मौजे भुकुम (नि. नांगर)
भानजी मोकदम ता। गोले नि।। नांगर
हरसेटी सेटिये कबावधान पा। वांई नि।। (तराजू)
बाऊ सेटी कोस्टी मेहतरीया ता। गोलें (नि।। धोटे)

भा. इ. सं. मं. तृतीय संमेलन वृत्त, शके १८३७, स्वी. ग्रं. क्र. १२, पृ. १३९-१४१.

(-४९८-)

... ... ... ...

दोन तीनं घरें जंजिरेयांत होतीं. परंतु आपले ती नव्हे. ते त्यास आपण गेल्यानंतर राजश्री सुभानजी मोहिते हवालदार व सुभानजी खराडे सरनोबत व मल्हार

नारायेण सबनीस कारकून ऐसे असतां लाये पाो यासी पुसिले कीं तुम्ही कोठील. तेव्हां लाये पाा म्हणो लागले कीं आम्ही चने कोलवाडी व दादर कोलवाडी तेथील पाो तेव्हा आदर करून सेवेसी ठेविलें. आरमाराचा कारभार अगदी स्वाधीन केला. तेव्हां लाये पाटेल यांहीं मेहनत करून आपली स्वयाती लोक बरे कर्ते मर्दाने मेलउन आरमाराची थाटणी करून आरमार सिध्द करून स्वारीसिकारी करावयासि लागले. तेव्हां कोण्हे येके दिवसी श्रीमंत मोरोपंत पेसवे यांही आपले स्वयातीचे कोली लोक बोलउन आणून आदर केला. लोक खुशाल केले तेव्हां श्रीमत् पेशवे यांही समस्तास बोलाउन आणून म्हणो लागलें कीं तुम्ही चाकर. श्री—छत्रपतीचे सरकारची चाकरी निकडीची पडली तरी कराल की नाही. तेव्हां लाये पाो म्हणो लागले कीं जी आज्ञा ते प्रमाण. तेव्हां श्रीमंत मोरोपंत याही आपणासनिध बसउन जो करार केला होता तो लाये पाो यांसीं विदित केला कीं जंजिरेयासी सिड्या लाऊन मात्र द्याव्या आम्ही हजार बारासें धारकरी तयार केले आहेत. सिड्या मात्र तुम्ही लाऊन द्याव्या. जंजिरा घेऊन श्री—छत्रपतीचे पावेतो नाव कीर्ती होईल. त्यावरून आपले समस्त लोक येक जागा मिलोन समस्ताचा येक विचार करून सिड्या तयार करून जाऊन उभ्या केल्या. धारकरी याची वाट पाहतां धारकरी दिसत नाही. तेव्हां समस्तांही येक विचार करून निघोन जंजिरेयास आले. तेव्हां समस्त लोक येऊन राजपुरीस पेसवे याचे मुजरेयास उभे राहिले. मुजरा जाहाला. तेव्हां पेसवे यास बोल लाविला. आम्ही शिड्या लाऊन धारकरी याची वाट पाहात राहीलो. उजडावयासी आले. प्रभात जाली. तेव्हां निघालो. तेव्हां श्रीमंत पेसवे म्हणो लागले कीं आम्हां पासून कोताई जाली. धारकरीयाही माघार घेतली. आम्हा पासोन अंतर पडले हे तो खरे. त्या उपर श्रीमंत पेसवे निघोन राईगडास छत्रपतीचे भेटीस निघोन समागमें लाये पाो व आणिखी ताडल समागमे घेऊन राईगडास गेले. तेथे गेल्यानंतर सुभानजी मोहिते व सुभानजी खराडे सरनौबत व मल्हार नारायेण सबनीस ऐसे समागमे घेऊन राईगडास गेले. तेथे गेल्यानंतर पेसवे याही समागमे घेऊन राईगडावर वरते गेले. श्री छेत्रपती जवळ उभे केले. समस्ताचा मुजरा जाहाला. तेव्हां छत्रपती याही पेसवे यासी पुसिले की कोण आहेत. तेव्हा पेसवे याही सांगितले की पदमदुर्गकरी राजश्री सुभानजी मोहिते हवलदार व सुभानजी खराडे सरनोबत व मल्हार नारायेण सबनीस याखेरीज आरमारकरी लोक लाये पोा व आणखी ताडल त्याची ही नावनिसी छेत्रपतीस विदित केली. सिडया लाविल्या याची हकीकत छत्रपतीस श्रीमंत पेसवे याही सर्व हकीकत महाराजास विदित केली. निवेदन केल्यानंतर श्री छत्रपतीने पेसवे यासी बोल लाविला. तेव्हां पेसवे यासी म्हणो लागले की याही ऐसे कार्य केले असतां तुम्ही कोताई केलीत. कार्य राहून गेलें. त्यावरून छत्रपती महाराज मेहेरबान होऊन चार पालकिया आणविल्या. हुदे रूमाल दिवट्या बुधल्या ऐसा सरंजाम आणऊन हवालदार व सरनोबत कारकून या तिघांस तीन पालक्या हुदुरूमाल व वस्त्रे देऊन खुशाल केले. चवथी पालकी लाये पाो यांसी दिल्ही. तेव्हां लाये पाो म्हणो लागले की माहाराजाही पालकी दिली ते सेवकांस पावली. तेव्हा महाराज

खुशाल होऊन छेत्री व निशाण दिल्हे. पेसवे यासी आज्ञा केली कीं गलबत बांधोन त्या गलबताचे नांव पालकी ठेऊन लाये पोा याचे स्वाधीन करणे. समस्तास लोंकांस वस्त्रे उत्तम प्रतीची दिल्ही. लाये पोा यांसी पाटेलपणाचे वतन कोण्ही दिल्हे. तेव्हां पेसवे याही सर्व वृत्तांत छेत्रपतीस निवेदन केले. पाटलकी पाछाही दिल्ही. त्यावरून महाराज छत्रपती मेहेबान होऊन दर्याकाठी छत्रपतीचे किले जंजिरे आहेत तेथपासोन पाटेलकी सर पोा ऐसे देऊन मानपान लग्न करील त्याणे सेला पाट दाम व न्यायेमनसुबी हलाली हरामीचा न्याये तुम्ही करावा. अष्टागर कोली लोक ऐसीयास सनंदा श्री छत्रपती यांच्या सनदा न्यायेमनसुबी सरकारात न्यावयासी प्रयोजन नाही. आमचे गोताचा न्याये लाये पाा सरपाा याही करावा. श्रीमत् छेत्रपतीचे देणे. हा कालपरयंत व वेठबेगार कारकारसाद सर्व माफ केली असे. छत्रपतीचे देणे. हा कालपरयंत चालतच आले. आम्ही निपुत्रिक येखादे जाहाले तर मालमवेसी जे असल ती आम्हां पाटलास माफ असे व जेथून स्वयात आपली असेल त्यास दर घरास दरसाल ढबू २ पैसे द्यावे या प्राा करार करून सनदा सादर केल्या. त्याची तपसील येणे प्रोा

| | | | |
|---|---|---|---|
| सुभाप्रांत | सुभाप्रांत | सुभाप्रांत | समस्त अष्टागर |
| दाभोळ १ | चेऊल १ | कल्याणभिवडीं १ | प्राा १ |

या प्रो सुभे अष्टागर या विरहित जंजिरे सुवर्णदुर्ग व पदमदुर्ग जंजिरे कुलाबा व जंजिरे खादेरी व साष्टी बारदेव जेथून हमजात स्वयात असिले तेथपर्यंत वतनदारिची पेस न्यायेमनसुबी हलालीहरामी व कितेक माार गोतसमंधांची पाटलाविना दुसरें कोण्ही न करी ऐसा सर्वही श्रीमान् छेत्रपतीचे आज्ञात व पत्रात ठेविले नाही.

भा. इ. सं. मं. त्रै., व. २, अं. १–४ पृ. १३३-४.

## (–४०९–)

श्री

यादी घोरपडे याची वौशावळ. मूळ जागा उदेपूर श्री सीवाजी महाराज छेत्रपती यांचे कारकीर्दीपूर्वी पादशाईत उदेपुराहून येऊन जांबेची व बागींची व भालवणीची व न्हावीची व पाटीलकी व ईट देशमुख पादशाईपासून खाऊन पाच च्यार डोई वहीवाट केली. नंतर शककर्ते श्रीमन्ममहाराज छत्रपती अवतार उत्पन्न होऊन राज्ये काबीज केलें. त्यासमई घोरपडे याचा पुरुष माहलोजी घोरपडे हे महाराजापासी पाचसेहे स्वारानीसीं चाकरीस राहिले. पुढें कांहीं दिवसानी सीव छेत्रपती महाराज शके १६०२ रौद्रनाम सवछंर चैत्र पौर्णमा रविवारीं कीले रायेगड येथें सीव जाहले. त्याचे पुत्र संभाजी राजे जेष्ठ पत्नी सईबाईसाहेब याचे गर्भीचे आणि कनिष्ठ पत्नी सोईराबाईसाहेब याचे उदरी राजारामसाहेब रायेगडी होते. नंतर संभाजी महाराज यांणी म्हलोजी घोरपडे यांसी सरंजामी देऊन मुखत्यारी सांगोन सरनोबतीची वस्त्रें दिल्ही आणि किले पनाळेस ठेऊन आपण रायेगडास गेले. पुढे राज्यांत फौजा

येऊन संभाजी महाराज मुलुक सर करीत होते. इतक्यांत अवरंगजेब पादशाह याची फौज चालून आली. सबब म्हलोजी घोरपडे माहाराजाकडे संगमेश्वरास गेले. तेथें पादशाहाकडील फौजेची व महाराजाची लढाई होऊन संभाजीमहाराज यासी धरून नेहले. त्या गर्दीत म्हलोजीबाबा घोरपडे ठार जाहाले. त्या समई घोरपडे यांसी तिघे पुत्र जेष्ठ संताजी घोरपडे दुसरा पुत्र बहीरजी घोरपडे कनिष्ट तिसरा पुत्र मालोजी घोरपडे. त्या वेळीं संताजी घोरपडे वडील पुत्र म्हलोजी घोरपडे याचे फौजेचा अधिकार जाहाला. कृपा बहुत संपादली. त्या समई ममलकतमदार या किताबाजी वस्त्रे दिल्ही. नंतर राजारामसाहेब छेत्रपती याणी सेनापतीची वस्त्रें संताजीबाबा घोरपडे यांसी दिल्ही. शके १६१० चे साली दिल्ही. दुसरा पुत्र बहिराजी घोरपडे यांसी हिंदुराव किताबत दिल्ही तिसरा मालोजी घोरपडे यांसी अमरूल उमराव हे किताब दिल्ही. नंतर राजाराम छेत्रपती चंदीस राहात होते. काही दिवसा मोगलाच्या फौजा येऊन भुदरगडास वेढा दिल्हा सबब संताजीराव घोरपडे सेनापतीं वेढा उठवून येणेविसी महाराजांची आज्ञा जाहली. त्याजवरून सरंजाम फौज घेऊन सेनापती याणी लढाई मारून वेढा उठविला. पुढे कर्नाटक प्रां‌ा सर करीत होते. ते समई महाराजांचे दर्शनास आले. तेव्हां मर्जी प्रसन्न होऊन आज्ञा जाहली जे तुमचे कुटुंब राहाणेस भुदरगड दिल्हा. नंतर कांही दिवस फौजबंदी करून प्रांतात स्वाऱ्या करीत होते. इतक्यात म्हसवडकर माने यांणी दगा फटका करून संताजी बाबा सेनापती यांसी शके १६३५ ' सोळासेहे पसतीस ( १७१३ इ. ) साली मारिले. नंतर त्याचे पुत्र पिराजी घारपडे हे महाराज छेत्रपतीकडे आले. शातवन करून सेनापतीची वस्त्रे शके १६३७ ( १७१५ इ. ) साली दिल्ही. ते ही सेवा चाकरी करीत स्वामीकार्यावर हलकर्णी का‌ा नूल यां मुकामी शके १६५० (१७२८ इ.) साली काळ जाहला. पुढे त्याचा पुत्र राणोजी घोरपडे लाहान पाच वर्षांचे होते. तेव्हा पिराजी घोरपडे याची मातुश्री द्वारकाबाईसाहेब यांणी नातु राणोजी घोरपडे यांसी घेऊन करवीरास संभाजी महाराज छेत्रपती याजकडेस आली. त्यांणीं सेनापतीची वस्त्रे शके १६५२ ( १७३० इ. ) साली दिल्ही. नंतर कापसीस द्वारकाबाईसाहेब व राणोजी घोरपडे सेनापती घेऊन राहिली. नंतर शके १६८५ ( १७६३ इ. स.) साली द्वारकाबाईआईसाहेबाचा काळ जाहला. त्याजवर राणोजी घोरपडे सेनापती सके १७०५ ( १७८३ इ. ) साली कैलासवासी जाहले. त्याचे पोटी पुत्र वडील स्त्री लक्ष्मीबाईचे पोटी वडील पुत्र सुबाराव व सखाराम बाबा व नारायेणराव व द्वारकोजी बाबा धाकटी स्त्री आंबीकांबाईचे पोटी पुत्र संताजी बाबा व पिराजी बाबा व म्हलोजी बाबा व जयेराम बाबा.

जेष्ठ स्त्रीचे वौशातील सबाजी व नारायण राव याचा नातु नारायणराव आहे. १ जेष्ठ संताजी घोरपडे, यास पुत्र दोन रामचंद्रराव जेष्ठ राणोजी बाबा कनिष्ठ. रामचंद्रराव याचे पुत्र संताजीराव घोरपडे सेनापती कनिष्ठ बंधु लक्ष्मणराव यास दत्तक रामबाबा आजे यास दत्तक दिल्हे. राणोजी घोरपडे यास पुत्र येक रघुनाथराव. साम्रत सेनापती जवल आहेत.

१ माहलोजी बाबा हे दुसरे पुत्र जीवनराव जेष्ठ दुसरे मानसींगराव तिसरे मालोजी चवथे चंदोजी घोरपडे हे हिंदुस्थानी आहेत. या चौघास पुत्रसंतान आहेत ( हमुरूहेबी येथें राहतात )

१ पिराजी बाबा तिसरे यास पुत्र गोविंदराव व आमृतराव हे ( गलसलेख ) सांप्रत आहेत.

१ राघोजी बाबा चवथे याचे नकल.

१ पाचवे जयेराम बाबा यास पुत्रसंतान नाही. सा संताजी घोरपडे सेनापती याचे रामचंद्रराव याचे पुत्र लक्ष्मणराव घेतले ते सांप्रत नवलीथल येथें आहेत.

———

५

भा. इ. सं. मं. वार्षिक अहवाल, शके १८३६, स्वी. ग्रं. क्र. ९, पृ. ६०-६२.

## (-५००-)

### तळ कोंकणची हकीगत

राजे संगमेश्वरी मोगलाचा वजीर सेखोजी... संभाजी व कब्जी दस्त करून तुलापुरासी ... पातशहा होते. मग दोघे जण मारिले. तैसी धामधूम जाली शके १६११ १६८९ इ. स.

या उपरी कबीले ज्या बानीद औरंगजेब पातशा येहि मोहिम केली. येकपतखान कोंकणांत उतरोन माहाली बैसला. रायगडीं वेढा घातला. गडावरी राजाराम होता. पातशा (चा) मुकाम तुळापूर तेथें होता. रायेगड घेतला. इसलामगड नांव ठेविले. येकपतखानाचे जुलपुकारखान नांव ठेविले. त्यांस रायेगड जो घेतला नव्हता तो हजरती खैरतखान येहि सिलेमान महंमद नामजाद पाठवून किल्ले तलगड व घोसाला व अनसबुरूज सुरगड हे किल्ले घेतले, शके १६११ सुा तीसैन अलफ भाद्रपदमासी (आगष्ट १६८९) तळे गोवेले घोसाळे काबीज करून मामले तळें येथें रायाजी देऊजी यासी हवाला व शामजीपंत वल्लद पदमाजीपंत यासी मजमू दिली. गणोजी शिंदा हवाला देऊन ठेविला. बीवस्त खोत पाटील सोबत घेऊन जंजिरा येऊन भेटला रयतेचा दिलासा केला. बीवस्त गोवेले याचे वतनाचा अर्ज केला कीं कदिमाचे वतन कदीम लायक आहे. साहेबांस माहाल अर्जानी जाला. कदिमास सिरपाऊ देऊन वतनावरी रवाना केलें पाहिजे. बी हुजूर धर्म सावंत होऊन सावंत अर्ज मनास आणून तानाजी राम यासीं मजमु होती. अर्ज फर्मावला कीं वतनावरी जावया परवाना करून देणें. हकलाजीमा देखील दुमाला करणें, त्यावरून परवाना छ २५ जिल्हेज सुा तीसैन ( ३० सप्तेंबर १६८९ ) मरामत जाला. परवाना होऊन महाली जाऊन आपले दिलानी देशमुखीचा कारभारासी सुंदर तुकाजी यासी ठेविले व रख-

माजी रघुजी देशकुळकर्णी कुलकर्णासी राहिले. भानजी गणेश श्रीवर्धनकर यासी हवाला व मोरोबा यांसी मुजमी व अंताजी येसप्रभु चेऊलकर हे पागणीदार माहाली ठेविले. कमावीस चालत असतां तळकोंकण सारे कबज मोंगलांनी केलें. मुलकाची नेमणूक केली. निजाम जाऊल यास दिवाण शेख महंमद बाकीर यासी जाली. कल्याणचें मुक्कामीं राहिले तेथून करोडी नबाना केले. सेख अबदुल फता करोडी मामले तळे व घोसाळे व मामले रायेर यासी करोडी जाली. ते परभारे जंजिरे यास येऊन हजरती खैरतखान साहेबास भेटलें. तों खान साहेबास लष्करांत जाणें तयारीस होते. तें समयीं कांहीं करोडीनें आपली सरंजामी करून घ्यावयाचीं ते घेतली. सवेंच दुसरे रोजीं खान स्वार जाले. ते अष्टमीचे तलियाजवळ मुकाम केले. करोडी व आम्हीं सारे माहालीचे देशक तेथें गेलो. तेथें महाली हकीम होते. त्यांस परवाने घेतले कीं दिवाणा खाले जाले. करोडी कमावीस करतील. तुम्हीं जंजिरा येणें ऐसे कागद घेतले. ते वेळेस तुम्हीं कासीखान साहेबी करोडीचे हाते दिधले. याचे खुप चालवीत जाणें. पातशाही कामावरी आहेती. याउपरी खान साहेब स्वार होऊन लष्करांत रवाना जाले. ते वेळेस पातशहा बेदरीस होते. सुा. तीसैनामध्यें (१६८९–९० इ.) करोडी व तुम्हीं देशक मामले मजकुरी आलों. सुंदर तुकाजी दिमत देशमुख व रखमाजी कुळकर्णी यासी गोवेले याहून पाचारून आणिले. तपे मजकुरीचा कारभार रुजु केला. मागते रवाना केले. गोवेले यासी सेखदार ठेविला नाहीं. तळयाहून कमाविस करोडी गिरीचा चालवूं लागले. त्यास कल्याणहून दिवाणाचे पाचारणे आलें कीं सरदेशमुख व तुम्हीं करोडी हुजूर येणें. त्यावरून अष्टमीचे मुक्कामीं गेलो. तो सेखमहमद बाकीर याची दिवाणी तैगीर जहाली आणि मिरजा महमद सफी यास दिवाणगिरीची खिजमत बहाल जहाली. त्याचे कागद आले कीं आम्हीं चेउलास येतो. तरी तुम्हीं करोडी व सरदेशक चेउलास येणें. ऐसा कागद आलियावरी दिवाण चेऊलास आले. नरसो भास्कर पेसदस्त ठेविले. तो करोडी व आम्हीं देशक चेऊलास जाऊन भेटलो. कारभार मामला मनास आणून आब्दुल फत्ता करोडीयाची करोडगिरी दूर करून कान्हो भास्कर नरसो भास्करचे भाऊ मोकरार करोडगिरीस जाली. महादाजी बाबाजी तलकर यास लिहिणार ठेविले तलियासी सीरपाऊ देऊन रवाना केले. महाली करोडी व आम्हीं आलो. राईर मामला सारा खराबा माहाड नाते तो रायगडा खाले गेले. कमावीस चालो देत नाही. घोसाले यासी सेखदार ठेविला. जनाजी केशव तलेयास खासा राहिले. गोवेले यास शिवाजी बावोजी सेखदार लिहिणार कान्हेर नरसिंहपंत व अमीन सैयद जाफर वल्लद सैयद नसरूला व सुंदरजी देशमुखीचे कारभारास बरखमार्जा कुळकर्णी ऐसे ताा मजकूरी जाऊन कारभार चालत असतां नबाब फत्तेजंगखान पाचाडी पातशहानें ठेविलें होते.

तोहि मुलूख मारावयासी रवाना केले. उसमानखान व भिवराव तलियास आले. धामधुम करूं लागले. उगीच बदनामी हरयेकाचें शिरी ठेऊन टका पैका घेऊं लागले. त्यास चेऊलाहून महंमद सफी दिवाण याणी आपला भाचा मीरवादी व

पालीचे राजा रूद्रसिंग यासी सांगोन महमद बुदलाबासी १०० लोकानिसी मदत मागोन रवाना केले. तलियासी येऊन उसमानखान बाहेर घातले.

गाजीखान वगैरे पठाण गोवेल्यास आले. ते नांदवी पुराचे नदीवर बैसले. त्यास सेख दाऊद नख दादे भेटलें कीं मुल्खाची वकिबी आपणांस आहे. तरी सेखदारीचें काम सांगणें. कबूल करून सेखदार मेले व गबाजीपंत त्यास मजमदार आले आणि मिरजा महंमद दिवाण याचें निसबत मदनाजी काकाजी सेखदार यांस दबवून बाहेर घालवून धामधुम करूं लागले.

सुंदर तुकाजी व रखमाजी कुळकर्णी आपले कारभाराबद्दल राहिले. त्याजवळ पटिया करून मागता देत नाहीं. त्यास सेख दाऊद जखदादे व गबाजीपंत त्यांस बहिरजी चिकुल्करहि मिळाले आणि गाजीखानास बोलले की हे देशक कामावर न येत तरी आम्हीं वकीब आहो. याची गरज काये असें. मग मनास माने तैसी धामधूम करूं लागले. सुंदरजी व रखमाजी तैसेच तेथें राहिले. संभाजीराव सिर्के व मातुश्री जिजिआऊ यांकडून जे पाहिजे ते घेऊन राहिले. त्यास गाजीखान निघोन पाचाडी गेला. सेख दाऊद व गबाजीपंत रूपाजी भालेराव यांचा जमाव होता. त्यासर्वे सलुखा करून सेख महंमद वाकिनिवीस मुकाम देऊन तेथें वसिला करून गोवेले यासी येऊन जोरावरी येऊन बैसले सुंदरजी व रखमाजी यासी दस्त करून नेऊन चावडीयावरी घाल(न) ठेवावे ऐसी खबर कळतां दिवाणाचा विचार कीं आपली खराबी होईल. सबब तलियास आले. उपरि हजरती खानसाहेब लष्करांतून जंजिरे यासी सलामत आले. इसलामगड जावयाचा हुजूरचा हुकूम. सबब तलियाचे राहाणें जावयासी तलीयास सामना करविला. त्यास कुमाजी देसाई बंदगीस अर्जून गोवेले याची हकीकत जाहीर केली. गोवेले यासी रूपजी भालेराऊ दरम्यान पुंडाई करितो ऐसे मालूम जाले. यावरी गोवेलें येथें राहाणें जावे करार करून स्वार होऊन मुकाम म्हसले यासी केलें ते छ १४ जिल्काद सुंा इहिदे (१० आगष्ट १६९०) मुकाम नांदवीपुरेचे नदीवर केले. याउपरी दिवटीयाचा सलाम जाला. यावरी शेख दाऊद नखदाद व गबाजीपंत व कोन्हेरेपंत रामाजी नरसिंहाचा भाचा व नारो विश्वनाथ गांव लिहिणार यासी दस्त करून टेविले रूपाजी भालेरावास सांगोन पाठविले कीं तुम्हीं या मुलखांतून जाणें नाहीं. तरी खबरदार राहणें व शेखदाऊदचीहि रूपजीस खबर कळविली. त्यावरून ते सकाळीं निघोन खाडीपलिकडे गेले. बहिरजीहि सवे गेला. खबर मालूम जाली. नखदादा व ब्राम्हण चेऊलास दिवाणाकडे रवाना करावे करार. तलियावरी दाऊद बोथलानी सेख दाऊद मागोन घेतला. ब्राह्मण चेऊल दिवाणाकडे रवाना केला. यावरी जिवाजी दादजी सेखदार व कोनेरे नरसी मजमदार व सुंदरजी दिमंत देसाई व रखमाजी कुळकर्णी माहाली पाने देऊन खानसाहेबी टेविलें. वाडीस स्वार जाले. माहालाची कमाविसी चालत असतां मिरजा महमद याची दिवाणगिरी तहगीर जाली. महंमद इसफ यांस दिवाणगिरी बहाल जाली. यावरी बायाजीराम चेऊलकर यासी बाजी त्रिमल सेखदार व लिहिणार गोविंद हरि व

संकर प्रभु तळें गोविंळे तळीयासींच कमाविसी चालविली. देशमुखाचे मुतालिक सुंदरजी व रखमाजी कुळकर्णी तपे मजकूरी असेत. बाजी त्रिमळ ८ रोजे तळीयासी ८ रोजे गोवेळेयासी चालत असतां मीरताहीर जमाबंदीचे आकाराबद्दल तळीयास आले. तेथून सेखदार व देसक गोवेळेयासी आले व तेंच सायंकाळीं छापा थोर बळाचा पडला. मीरताहीर व २ दोन पठाण पडले. घोडे २ व वस्तभाव कुळवडी करून नेली. सेखदार व आम्हीं देशक जंगलांत पळालो. सूर्याजी चौधरी जमातदार होता. तो चोऱ्यास पळाला. सबनीस व मनाजी भानजी दिवेकर तोहि पळाला. या उपरी दुसरे रोजीं गावामध्ये आलो. बाजी त्रिमळ सेखदार व देशक येक खबर चेऊलास रवाना केली. येक खबर वाडीस रवाना केली. वाडीचा जबाब आला कीं ऐसे बेफाम कसं होता. आतां याउपरी खबरदार असत जाणे. खबर कळतांच लेहून पाठविणें. खबरदारी केली जाईल. याउपरी कितेक रोजीं तुफान झाला कीं चेऊलचे काजीनें वाडीस लिहिले कीं तळीयाचे देशक यार्णी पिलाजी येसप्रभु याहि सांगितले की तुम्ही दिवाणाकडे अर्ज पाठविणें कीं, खैरतखानसाहेब तळे गोवळे या महालीचे जाहगीर करून द्यावी. तरी आम्हीं देशक रुा ५००० पांचहजार देतो. हें दरबार सर्व करून ज्याहागिर नव्हेसे करणें म्हणोन पिलाजीने येऊन दिवाणास सांगितले. हे तह केला आहे म्हणून वाडीस पाठविले. तो ज्याहागिरीची पहिलीच प्राप्त होती ती सनद गुजरून आली. दिवाणाची कमावीस राहिली. खानसाहेबाचे कमाविसदार महाली गेले. तळयास तानको राम गोवेले यास रामाजी नरसिंह देशकास जावयास राजी नाहीं. कुभांडाची खबरदारी मांडली. खरे करितां केली करणी रूजू जाली. त्यावरी ज्याणे केली त्यास सजाहि पोहचली. त्याचा सासरा पिलाजी येसप्रभु त्यावरी कितेक रोजी अर्ज करितां मेहरबानीची नजर केली. सरंजाम होईल. खानसाहेब वफत जाले. सर्कराज करणार साहेब धनी आहे.

~~~~~~~~~~~~~~~

नवा मनु, व. २, अं. ८, दिसेंबर १९३०, पृ. १७२–१७४, अं. ९, जानेवारी १९३१, पृ. १९५–१९७.
~~~~~~~~~~~~~~~

# मराठा साम्राज्यांतील थोरपुरुषांचे शिक्के

श्री. शिवाजी महाराजांचा शिक्का-

प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
शाह सूनो : शिवस्यैषा मुद्राभद्राय राजते ॥

श्री. संभाजी महाराजांची मुद्रा-

श्री शंभो : शिवजातस्य मुद्राद्योरिव राजते
यदंकसेविनो लेखा वर्तते कस्यनोपरि ॥

श्री. राजराम महाराजांची मुद्रा-

धर्मप्रद्योतिता शेषवर्णा दाशरथेरिव ।
राजारामस्य मुद्रेयं विश्ववंद्या विराजते ॥

श्रीशिवाजी महाराज दुसरे-

प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
रामसूनोरियं मुद्रा शिवराजस्य राजते ॥

श्री. शाहु छत्रपति-

वर्धिष्णुर्विक्रमोविष्णु: सामूर्तिरिव वामनी ।
शंभुसूनोरसौमुद्रा शिवराजस्य राजते ॥

श्री. रामराजाची मुद्रा-

गौरी शंभुवरं प्राप्य राज्यसाम्राज्य संपदा
शिवसूनोरियं मुद्रा रामराजस्य राजते ॥

श्री. प्रतापसिंह महाराजांची मुद्रा-

गौरीनाथवरप्राप्ता शाहूराजात्मनात्मन: ।
मुद्राप्रतापसिंहस्य भद्रा सर्वत्र राजते ॥

श्री. संभाजी छत्रपति करवीरकर-

प्रतिपच्चद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
शंभुछत्रपतेर्मुद्रा रामसूनोर्विराजते ॥

श्री. धनाजी जाधवांचा शिक्का :-

राजारामचरणीं दृढ भाव ।
सेनापति धनाजी जाधवराव ॥

श्री. शामराव निळकंठ पेशवे -

श्री शिवनरपति हर्षनिधान
शामराज मतिमत् प्रधान ॥

श्री. मोरो त्रिंबक पिंगळे –

श्री शिवचरणीं तत्पर
त्र्यंबक मोरेश्वर ॥ (इ. स. १६७२ सुमाराची)
श्री शिवराजेन्द्र हर्षनिधान।
त्र्यंबक मोरेश्वर मुख्य प्रधान ॥ (इ. स. १६७६ सुमाराची)
एषाश्री शिवराजेन्द्र मुख्यामात्यस्य सत्य धृक्।
मुद्रा मोरेश्वरस्यास्तां भद्रा सद्रांगदायिनी ॥ (इ. स. १६८० सुमाराची)

श्री. निळकंठ मोरेश्वर पिंगळे –

श्री शिवनरपति हर्ष निधान।
मोरेश्वर सुत निळकंठ मुख्य प्रधान ॥ (इ. स. १६८३ सुमाराची)
श्री शंभु भजनोत्कंठ।
मोरेश्वर सुत निळकंठ ॥ (इ. स. १६८५ सुमाराची)

श्री. भैरव मोरेश्वर पिंगळे –

श्री शाहू नरपति हर्ष निधान।
मोरेश्वरसुत भैरव मुख्य प्रधान ॥

~~~~~~~~~~~~~~

मराठा–चित्र, नवे व. २, अं. १, आक्टोबर १९२०, नागपूर, पृ. ७–८.
~~~~~~~~~~~~~~

## मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या
## इतिहास संशोधन मंडळाची ग्रंथमाला

१. पानिपतचा संग्राम–श्री. सेतुमाधवराव पगडी व प्रा. न. र. फाटक रु. ५–००
२. घाशीराम कोतवाल–संपा. प्रा. न. र. फाटक रु. ४–००
३. मुंबईचे वर्णन–प्रा. न. र फाटक रु. ८–००
४. मराठे व निजाम–श्री. सेतुमाधवराव पगडी रु. ७–५०
५. गड–कोट–दुर्ग व त्यांची वास्तु–श्री. वा. सी. बेंद्रे रु. ३–००
६. इतिहास संशोधन पद्धति–श्री. के. मो. पंडित रु. ०–७५
७. राणा जयसिंग आणि शिवाजी महाराज–वा. सी. बेंद्रे रु. ६–००
८. रट्टवंशीय बल्लाळ यांचा अर्धापूर शिलालेख–श्री. न. शे. पोहनेरकर व श्री. हरिहर ठोसर रु. २–००
९. महाराष्ट्रेतिहास परिषद–अधिवेशन पहिलें–निबंधसंग्रह–संपा. श्री. वा. सी. बेंद्रे रु. ८–००

जुन्या मासिक–त्रैमासिकांत प्रसिद्ध झालेली महाराष्ट्रेतिहासाचीं साधनें–संपा. वा. सी. बेंद्रे

१०. प्रथम विभाग ( प्रस्तावना, सूच्या वगैरे ) छापत आहे.
११. द्वितीय विभाग ( इ. स. १५०१ ते १७५० ) रु. २०–००
१२. तृतीय विभाग ( इ. स. १७५१ ते १८५० ) छापत आहे.
१३. शिवाजी महाराजांचे वडील बंधु – संभाजी राजे भोसले – श्री. वा. सी. बेंद्रे छापत आहे.

### इतिहास संशोधन मंडळाचें त्रैमासिक
### भारतीय
## इतिहास आणि संस्कृति

या त्रैमासिकांत अव्वल पुराव्[illegible] आधारलेले, ऐतिहासिक व सांस्कृतिक विषयांवरील संशोधनपूर्ण व चर्चा–चिकित्सात्मक लेख प्रसिद्ध होतात. प्रत्येक [illegible] सुमारें १०० पृष्ठांचा असतो. तिसरें वर्ष गेल्या एप्रिलपासून सुरू झालें.

त्रैमासिकाची वार्षिक वर्गणी रुपये सहा फक्त. पहिल्या व दुसऱ्या वर्षांचे थोडे शिल्लक आहेत.

पत्ता : श्री. वा. सी. बेंद्रे, डायरेक्टर इतिहास संशोधन मंडळ,
१७२, नायगांव क्रॉस रोड, दादर, मुंबई–१४.